# ' पहिलें महायुद्ध '

## १९१४–१८

## ( भाग पहिला )

लेखक

**श्री. कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर**

मुद्रक व प्रकाशक

श्री. यशवंत कृष्ण खाडिलकर

श्री[illegible] प्रिंटिंग प्रेस, १३ खोताचीवाडी मुंबई नं. ४

( आवृत्ति पहिली )

सन १९४०

किंमत २ रुपये

# प्रस्तावना

ती. कृष्णाजी प्रभाकर ऊर्फ काकासाहेब खाडिलकर यांनीं १९१४–१८ च्या महायुद्धाच्या वेळीं चित्रमय जगत् मासिकांत महिनेवारीनें महायुद्धासंबंधीं लिहिलेले लेख अत्यंत लोकप्रिय झालेले होते. पहिलें महायुद्ध आणि ती. काकासाहेबांचे लेख हे मराठी वाचकांच्या दृष्टीनें इतके सांधले गेले आहेत कीं, पहिल्या महायुद्धाचा उल्लेख होण्याबरोबरच ती. काकासाहेबांच्या लेखाचाहि उल्लेख अद्याप होत असतो. हे लेख ग्रंथरुपानें प्रसिद्ध व्हावेत अशा सूचना वारवार होत असत आणि तसे विचारहि मनात येत असत. पण कोणत्या ना कोणत्या कारणानें हे बेत तसेच रहात. अखेर दुसरें महायुद्ध सुरू झालें आणि पहिल्या महायुद्धावरील ती. काकासाहेबांचे लेख ग्रंथरुपानें प्रसिद्ध करण्याच्या इच्छेस जोराची चालना मिळून, पहिलें महायुद्ध १९१४–१८, ह्या ग्रंथाचा पहिल्या वर्षाचा प्रथम खंड वाचकांच्या हातीं देण्यात येत आहे. पहिलें महायुद्ध १९१४ सालच्या ऑगस्ट महिन्यात भडकलें. ता. २८ जुलै रोजीं ऑस्ट्रियाने आपल्या युवराजांच्या खुनाच्या संबधात सर्व्हियाशीं युद्ध पुकारलें. ता. १ ऑगस्ट रोजीं जर्मनीनें रशिया व फ्रान्सशीं युद्ध सुरू केलें. ता. ५ ऑगस्ट रोजीं इंग्लंडनें जर्मनीशीं युद्ध पुकारलें, आणि युद्धाचा भडका उडाला. युद्ध सुरू झाल्यापासून युद्धतहकुबीपर्यंत ती. काकासाहेबांनीं चित्रमय जगत्मध्यें लेख लिहिले असून दर वर्षाचा एक भाग ह्याप्रमाणें पांच भागात हा ग्रंथ संपविण्यात येणार आहे. ह्या पहिल्या भागात पहिल्या महायुद्धाच्या पहिल्या वर्षातील ती. काकासाहेबांचे त्यावेळीं चित्रमय जगत्मध्यें प्रसिद्ध झालेले लेख जसेच्या तसे दिले आहेत. 'नवाकाळा'तील युद्धविषयक लेखांचे मार्गदर्शक या नात्यानें ती. काकासाहेबांच्या डोळ्यासमोरून दुसरें महायुद्ध जात असताना पहिल्या महायुद्धावरील त्यांच्या लेखाचा हा भाग वाचकांच्या हातीं देण्याचा योग लाभत आहे. ह्याबद्दल पहिला भाग हातावेगळा करतांना परमेश्वराचे धन्यवाद गाइल्याशिवाय राहवत नाहीं.

नवाकाळ ऑफिस
मुंबई नं. ४ } प्रकाशक

॥ श्री ॥

# पहिलें महायुद्ध

## युरोपियन महायुद्धांतील धोरण व डावपेंच

### पहिले दोन महिने

रशिया, इंग्लंड व फ्रान्स ह्या त्रिकुटाबरोबर आस्ट्रिया व जर्मनी ह्यांचें युरोपांत महायुद्ध सुरू होऊन दोन महिने होऊन गेले, ह्या दोन महिन्यात दोहीं पक्षांकडील लढाईचें धोरण व डावपेच ह्यावरील पडदा आस्ते आस्ते दूर होत गेला असून लढाईचें पुढील स्वरूप योग्य रीतीनें समजून घेण्यास गेल्या दोन महिन्यांत दृग्गोचर झालेलें युद्धाचें धोरण वाचकापुढें मांडण्यास आतां अडचण उरली नाहीं. ह्या लेखात युद्धाचें तात्कालिक कारण, त्या कारणाच्या पूर्वीची युरोपची राजकीय परिस्थिति व दोन महिन्यांतील युद्धाचा ओघ ह्याचा मेळ घातला असतां, युद्धाचें पुढील धोरण व डावपेंच त्या मेळातून कसे निष्पन्न होतात, हें वाचकापुढें मांडण्याचें योजिलें आहे.

आस्ट्रिया-हंगेरीच्या युवराजाचा-पमुख मुत्सद्याचा-खून बोस्नियामध्यें एका तरुण सर्व्हियननें केला; ह्या खुनाच्या कटाच्या शाखा सर्व्हियाची राजधानी बेलग्रेड येथपर्यंत पसरल्या असून, सामान्यतः सर्व्हियन लोकांचें राजकीय धोरण आस्ट्रियाच्या महत्वाकांक्षेच्या विरुद्ध आहे असें आस्ट्रियास आढळून आलें; सर्व्हिया देशाच्या व सर्व्हियन लोकाच्या मनांतील ही द्वेषबुद्धि कायमची नष्ट करण्याकरितां आस्ट्रियानें सर्व्हियापाशीं असें बोलणें लाविलें कीं, सर्व्हियन लोकांच्या सामाजिक, धार्मिक, नैतिक व राजकीय मनोवृत्ति आस्ट्रियास आपल्या मुठींत ठेवतां येतील इतकी ढवळाढवळ राजकारणांत करण्याचा अखत्यार सर्व्हियानें आस्ट्रियास द्यावा; लढाईंत जिंकलें जाणारांनाहि असलें पारतंत्र्य सहन होणारें नसल्यामुळें स्वतंत्र सर्व्हियाला

आस्ट्रियाचें हें म्हणणें मान्य झालें नाहीं. लगेच आस्ट्रियानें युद्धास आरंभ केला. युरोपांतील सांप्रतच्या महायुद्धाचें हें तात्कालिक कारण झालें. ह्या युद्धात रशिया, जर्मनी, फ्रान्स, इंग्लड, बेल्जम व जपान हीं एकामागून एक कां सामील झालीं, ह्याचें कारण युरोप खंडाच्या गेल्या दहा बारा वर्षांच्या राजकीय परिस्थितींत पाहिलें पाहिजे.

१८७० सालीं फ्रेंको-जर्मन युद्ध होऊन जर्मनीनें फ्रान्सचा पुरा पराभव केल्यानतर युरोप खंडात जर्मनी व रशिया हीं दोन राष्ट्रें जमिनीवरील लढवय्यीं राष्ट्रे होत, असें समजण्यात येऊ लागलें. जर्मनीपासून आपणाला पुढें त्रास होऊ नये, म्हणून फ्रान्सनें रशियाशीं मैत्रीचा तह केला. ह्या तहाच्या तोडीस तोड म्हणून जर्मनी, आस्ट्रिया व इटली या तीन राष्ट्राशीं त्रिकूट-मैत्रीचा तह झाला. युरोप खंडात अशा रीतीनें दोन तट झाले. एक तट रशिया व फ्रान्स याचा, व दुसरा तट जर्मनी, आस्ट्रिया व इटली याचा. या दोन्ही तटासबधानें दहा बारा वर्षांपूर्वी इंग्लडची उदासीन वृत्ति होती इंग्लड स्वतःस ह्याहि पक्षाचा म्हणवीत नसे व त्याहि पक्षाचा म्हणवीत नसे. समुद्रावर आपलें श्रेष्ठत्व कायम ठेवावें, आफ्रिका व आशिया येथे पसरलेल्या आपल्या साम्राज्याच्या सुरक्षितपणाविषयीं काळजी वहावी, आणि आपला व्यापार जगभर पसरवावा, ह्या दृष्टीनें इंग्लडचा राज्यकारभार हाकलला जात असे. इंग्लडचा असा क्रम चालला असताना बोअर-युद्धाचा समय आला बोअर हे डच लोक. अर्थात त्याच्याकडे जर्मन लोकांचा शेजारीपणाचा ओढा. बोअर लोकाचा प्रेसिडेंट क्रूगर यास मदत करण्याची इच्छा जर्मनीमध्यें प्रबल झाली. पण करतात काय! जर्मनीपाशीं त्यावेळीं आरमार मुळींच नव्हतें. जमिनीवरील युद्धात बोअर लोकानीं बहुत चपळाई दाखविली, पण बाहेरून कांहींच मदत न आल्यामुळें अखेरीस त्या युद्धात इंग्लडचा विजय झाला. आपल्यापाशीं आरमार नाहीं, त्यामुळें आपले मनोरथ दरिद्रयाच्या मनोरथाप्रमाणें "उत्पद्यन्ते विलीयन्ते" अशा प्रकारें हास्यास्पद झाले, हें जर्मनीच्या ध्यानांत येऊन त्यानें लगेच ड्रेडनॉट तऱ्हेची लढाऊ जहाजें बांधण्यास सुरवात केली. रशियानेंहि जर्मनीचें अनुकरण करून आपलें आरमार वाढविण्यास आरभ केला. युरोपांतील रशिया व जर्मनी या दोन प्रमुख राष्ट्रास त्यावेळीं असें वाटलें की, जमिनीवरच्या लढाईत अध्वर्यु आचार्य काय ते आम्हीं दोघेच. असें असून, एवढ्या मोठ्या बोअर युद्धात "असें नाहीं, तसें नाहीं," काहीं तरी म्हणण्याचा अधिकार आपणांस मुळींच

नसावा म्हणजे काय ? बोअर–युद्धाच्या वेळीं व बोअर–युद्धाच्या नंतर, जर्मनी काय, रशिया काय, व फ्रान्स काय, किंबहुना सर्व युरोपखंड इंग्लंडच्या विरुद्ध होतें. इंग्लंडला ह्या सर्व राष्ट्रांनीं एकीकडे काढून टाकल्यासारखें केलें होतें. पण इंग्लंडच्या आरमारापुढे कोणाचेंच काहीं चालण्यासारखें नसल्यामुळे सर्वांसच त्यावेळीं मनांतल्यामनांत चरफडत स्वस्थ बसावें लागलें. इंग्लंडच्या आरमाराचें प्रस्थ अंशतः तरी कमी करण्याकरिता सर्व युरोपियन राष्ट्रांनीं आरमारावर पैसा खर्च करण्यास अहमहमिकेनें सुरुवात केली या संधीस जपाननें रशियाशीं दहा वर्षांपूर्वी युद्ध केलें त्यांत रशियाच्या आरमाराचा विध्वंस झाला व जमिनीवर लढण्याच्या रशियाच्या शक्तीची रग हि बरीच जिरली जपानशीं इंग्लंडनें समान–शत्रुत्वाच्या मैत्रीचा तह केला. जपान व इंग्लंड यांचा अशा प्रकारचा तह झाल्यानंतर रशियाचें व इंग्लंडचें अधिकच फाटावयास पाहिजे होतें. पण तसे न होता रूसो–जपानी युद्धामुळें रशिया व इंग्लंड यांच्यामध्यें नवीन दोस्तीस सुरवात झाली. ही दोस्ती जमण्याचें कारण असे झालें कीं, रूसो–जपानी युद्धांत रशिया निस्तेज झालेला पाहून युरोपियन राष्ट्रामध्यें अग्रपूजेचा मान आपणास मिळाला पाहिजे, असे म्हणण्यास किंवा पर्यायानें, तर केव्हां उघडपणें जर्मनीनें सुरवात केली. मोरोक्कोमध्यें मोरोक्कोचा सुलतान व फ्रान्स यांमध्ये लढा उपस्थित झाला फ्रान्सनें इंग्लंडशीं संधान बांधून इजिप्तमध्यें इंग्लंडास काय पाहिजे तें करण्यास पूर्ण मुभा देऊन मोरोक्को घशांत घालण्याचा घाट घातला. आरमारी राष्ट्र या नात्यानें इंग्लंडची अशी पूजाअर्चा करणें फ्रान्सला भाग होतें. व त्याप्रमाणें त्यानें केलेंहि: पण जर्मनीनें ह्या लढ्यांत मध्येंच तोंड घातलें. तुर्कस्थानाच्या सुलतानाचे मुखावर हात फिरवून इजिप्तसंबंधानें तुर्कस्थानाला सहानुभूति दाखविली व आमची अग्रपूजा न करता मोरोक्कोची विल्हेवाट लावणारे तुम्हीं कोण म्हणून फ्रान्सला विचारलें. मध्येंच असें तोंड घातल्यामुळें फ्रान्सला वाईट वाटलें खरें, पण करणार काय? रूसो–जपानी युद्धांत रशियाचा सेनाशकट विसकळीत झाला असल्या कारणानें फ्रान्सला गम खावी लागली; व त्यानें मोरोक्कोचा काहीं भाग जर्मनीला देऊं करून जर्मन बादशहाची अग्रपूजा केली. पण तो प्रसंग फ्रान्स व रशिया या दोघांच्या मनांत डांचत राहिला. रशियानें आपला सेनाशकट बळकट करण्याचा उद्योग तेव्हांपासून जारीनें चालविला. गेल्या पंधरा वर्षांत बोअर–युद्ध ही पहिली आकस्मिक गोष्ट घडून आली.

आकस्मिक म्हणजे युरोपियन राष्ट्राच्या इच्छेने किंवा प्रेरणेनें न घडलेली. त्यानंतर दुसरी आकस्मिक गोष्ट म्हणजे रूसो-जपान युद्ध. पहिल्या आकस्मिक गोष्टीनें इंग्लंडचें व रशियाचें थोडेसे बिनसलें, पण ह्या दुसऱ्या आकस्मिक गोष्टीनें युरोपखडात जर्मनीस अग्रपूजेची हाव सुटून प्रथम इंग्लडचें व फ्रान्सचें सूत जुळलें, व नतर इंग्लडचें व रशियाचेहि मेतकूट जमलें. अशा रीतीनें मोरोक्कोच्या प्रकरणानतर युरोपखडात दोन त्रिकुटे झाली. एक जर्मन, आस्ट्रिया व इटली याचें त्रिकूट व दुसरें-इंग्लड, व फ्रान्स व रशिया याचें त्रिकूट. दोनहि त्रिकूटाच्या बलबलाचें पारडे सारखे जड समजलें जात असल्यामुळे, युरोपियन राष्ट्रात समतोलपणा उत्पन्न होऊन युरोपखडभर ह्या दोन त्रिकूटाच्या तटामुळें कायमची शातता नादेल, असे मुत्सद्दी लोक ह्मणू लागले. इतक्यात गेल्या पधरा वर्षातील तिसरी आकस्मिक गोष्ट सहा वर्षांपूर्वी घडून आली व त्या आकस्मिक गोष्टीपासूनच साप्रतच्या महायुद्धाच्या उपोद्घातास सरवात झाली असे म्हणण्यास हरकत नाहीं. तिसरी आकस्मिक गोष्ट म्हणजे तरुण तुर्कांनीं तुर्कस्थानात घडवून आणलेली राज्यक्राति होय तुर्की साम्राज्य म्हणजे एक आसन्नमरण झालेला रोगी होय, व या साम्राज्याच्या वाटणीच्या प्रसगीं युरोपखडात महायुद्ध माजेल अशी खात्री युरोपियन मुत्सद्याना वाटत असल्यामुळे ह्या रोग्याच्या वाटेस महायुद्ध टाळण्याच्या इच्छेनें कोणी जात नसे पण तरुण तुर्कांनीं राज्यक्राति केल्यामुळे आसन्नमरण झालेला हा रोगी कात टाकून पुनः ताजातवाना होतो कीं काय, अशी शका युरोपियन मुत्सद्याच्या मनात उद्भवली तुर्की साम्राज्याला तरुण तुर्कांनीं पुनः तारुण्य आणून दिल्यानतर काय व्हायचें असेल तें होतो, पण सध्या तर आपण अमलीं लहानसहान कामें साधून घ्यावीं, अशा बुद्धीनें आस्ट्रियानें त्याच्या वहिवाटीस असलेल्या बोस्निया व आर्गोनिया या दोन प्रातावर आपली साम्राज्यसत्ता स्थापिली. तरुण तुर्कांना नवीन व्यवस्था अमलात आणावयाची होती, व सदर दोन जिल्हे आस्ट्रियाच्या वहिवाटीलाच होते, म्हणून त्यानीं आस्ट्रियाच्या ह्या बळजोरीच्या कृत्याकडे डोळेझाक केली. फ्रान्सनें मोरोक्को घेतला, इंग्लडनें इजिप्त पचविला, किंवा उत्तर आफ्रिकेंतील ट्रिपोलीचा मधला प्रात आपणाकडे असणें का अयोग्य असे इटालीला वाटून त्यानें तुर्कस्थानशीं युद्ध सुरू केलें. इटली पडला जर्मनीच्या त्रिकूटांतला, तेव्हा त्याला तोहि तट येईना. फ्रान्स व रशिया दोघानाहि तुर्की साम्राज्याचें

पुनरुज्जीवन तितकें आवडलें नसल्यामुळें त्यानींहि इटलीच्या बळजोरीकडे दुर्लक्ष केलें; व इटलीला तुर्की साम्राज्याचा एक मोठा लचका घेऊं दिला. तुर्कस्थान व इटली यामधील युद्धाचे वेळीं रशिया, फ्रान्स व त्याबरोबर इंग्लड हें त्रिकूट इतकें उदासीन का बसलें, याचें कारण आता बाहेर आलें आहे. रशियाला एक निराळें धोरण साधावयाचें होते, व त्या धोरणाचा उपक्रम इटालियन युद्ध सुरू असताना रशियानें गुप्तपणें आरंभिला. सर्व्हियाचे रशिया येथील वकील ग्रीस, सर्व्हिया बल्गेरिया या तिन्ही देशात ह्यावेळीं सचार करीत होते. सर्व्हिया, ग्रीस व बल्गेरिया या तीन बाल्कन देशाशीं गट्टी यावेळी रशियाने जुळवून आणली. त्याच्यामध्यें महत्त्वाकांक्षा उत्पन्न करून त्याच्याकडून सैन्याची तयारी करविली व इटालियन युद्धाची समाप्ति होण्यापूर्वीच दोन वर्षांपूर्वीच्या बाल्कन युद्धाला ह्या चिमुकल्या राष्ट्राकडून प्रारभ करविला. बाल्कन युद्ध हें चमत्काराचे युद्ध झालें. त्याला हा हा म्हणता प्रारभ झाला. व हा हा म्हणता बल्गेरियाचें सैन्य तुर्कस्थानाच्या राजधानीजवळ थडकले. ह्या असल्या चमत्काराच्या अवचितपणामुळें, जर्मन त्रिकूटाला त्या युद्धात तोड घालता आले नाही तथापि बाल्कन युद्धाच्या तहाच्या वेळीं जर्मन त्रिकूटाला रशियाच्या कारस्थानाचा समज पडून, अड्रियानोपल तुर्कस्थानच्याच हवालीं ठेवण्याच्या कामीं तुर्कांची बाजू जर्मनीनें शक्य तेवढी उचलली. बाल्कन युद्धाच्या वेळीं अवचीत घडून आलेल्या गोष्टी जर्मन त्रिकूटाच्या मनासारख्या झाल्या नाहींत कारस्थानीपणात, बाल्कन युद्धाचा पाया रचण्यात व व्यूह बनविण्यात, रशिया व फ्रान्स याची एक प्रकारची सरशी झाली. बाल्कन युद्धापासून निघणाऱ्या बारीकसारीक गोष्टीची विल्हेवाट लावताना, जर्मन त्रिकूटानें अग्रपूजेचा हक्क धरला व तो रशिया व फ्रान्स यानीं मानलाहि. कारण त्या बारीकसारीक गोष्टी होत्या. पण मोठ्या बाबी म्हणजे सर्व्हियन लोकाचा मोठा सघ निर्माण करून तुर्की साम्राज्याचे अवशिष्ट भाग यथास्थित यथासुख त्याला खावयाला घालण्याचे बाबतींत रशियानें डाव जिंकला. रशियात सर्व्हियन लोकाची वस्ती मोठी व या सर्व्हियन लोकाचें पुरस्कर्तृत्व झारसाहेबांच्याकडे आहे छोट्याशा सर्व्हियाचा बडा सर्व्हिया करून तेथें सर्व्हियन लोकाच्या वाढीस, महत्त्वाकांक्षेस आणि वैभवास ऐसपैस जागा करून देणें, यांत रशियाच्या इभ्रतीस मोठेपणा व साम्राज्यास बळकटी आहे मोरोक्कोच्या प्रकरणात जर्मनीनें डाव साधल्यामळें जसें रशिया व फ्रान्स

ह्याच्या हृदयांत शल्य सलत राहिलें, तसलेंच शल्य अवचित रीतीने सर्व्हियाचा डाव साधल्यामुळें जर्मनी व आस्ट्रिया ह्याच्या हृदयांत सलत राहील, हातचा बाण गेला, आता बोलण्यात अर्थ नाहीं, असे पाहून जर्मनी व आस्ट्रिया या दोन्हीं राष्ट्रांनी आपले सेनाशकट अधिक बळकट करण्याचा उद्योग बाल्कन युद्धाच्या प्रारंभापासून आरंभिला. नवीन लष्करी कायदे पास करून घेऊन जर्मनी व आस्ट्रिया ह्यानीं आपलें सैन्य, दारूगोळा व रिसाला हीं सवाई दिडीने वाढविलीं. फ्रान्सलाहि अशीच वाढ करण्याची जरुरी भासली, व त्या अनुसंधानाने फ्रान्सने नवीन लष्करी कायदे पासहि केले. जर्मनी व आस्ट्रिया ह्याचीं सैन्ये नवीन कायद्याप्रमाणें महायुद्धाच्या पूर्वीच जय्यत तयार झालीं होतीं व फ्रान्सचे कायदे अमलात आलेले नव्हते एवढाच काय तो फरक. बाल्कन युद्धात रशियाच्या झालेल्या बोलबाल्यामुळे जो रशियाचा डाव साधला, तो संधि येताच फिसकटून टाकावयाचा, या हेतूनेंच जर्मनी व आस्ट्रिया याच्या लष्कराची तयारी झालेली होती. ही गोष्ट ध्यानात ठेवली म्हणजे आस्ट्रियाच्या युवराजाचा खून झाल्याबरोबर एकंदम महायुद्धास क्षुल्लक कारणावरून कसा प्रारंभ झाला, हें वाचकाच्या तेव्हाच ध्यानात येईल. ह्या महायुद्धाच्या कारणाचा उगम बोअर युद्धापासून आहे, ह्यातील दोन तटाची रचना जपानी युद्धानें केलेली आहे; व तुर्की राज्यक्रांतीपासून ह्या युद्धाच्या प्रत्यक्ष तयारीस सुरवात झालेली आहे, तुर्की राज्यक्रांतीनें बाल्कन युद्धाचा प्रसंग घडवून आणला व बाल्कन युद्धानेंच सांप्रतच्या महायुद्धास "सूतउवाच" केलें! सांप्रतच्या महायुद्धात सामील असलेल्या युरोपातील लहान मोठया राष्ट्रांचा स्वार्थ कोणच्या बाबतींत व कसा आहे, हे वरील हकिकतीवरून वाचकाचे लक्षात येईल. प्रत्येकाचा स्वार्थ व प्रत्येकाची गणगोत मैत्री हीं ध्यानात ठेवावी म्हणजे महायुद्धाचें धोरण व डावपेंच याचा अंदाज बांधणें सोपें पडेल.

## युद्धाच्या वेळची प्रत्येक राष्ट्राची दृष्टि

महायुद्धाचें तात्कालिक कारण व त्याच्या पाठीशीं असलेली कारण परंपरा हीं ध्यानांत घेऊन युद्धात सामील झालेल्या प्रत्येक राष्ट्रास यु ्चे अखेरीस काय काय मिळावयाचें आहे तें आपण पाहू. ( १ ) सर्व्हियाला आपली सत्ता बाल्कन प्रदेशांतील सर्व सर्व्हियन लोकांनीं व्यापिलेल्या प्रदेशावर स्थापावयाची आहे. म्हणजे सर्व्हियाला बोस्निया, हर्गोनिया, वगैरे बाल्कन प्रांतांतील प्रदेश आपल्या राज्यास

सामील करून घ्यावयाचें असून, साधल्यास हंगेरियापैकीं कांहीं भागहि सर्व्हियाला पाहिजे आहे. सर्व्हियाची ही महत्त्वाकांक्षा असून त्याच्या आड आस्ट्रियाचे युवराज प्राधान्येंकरून येत होते, ह्मणून एका तरुण सर्व्हियनानें त्याचा बोस्नियात खून केला. ( २ ) रशियाला छोटया सर्व्हियाचा बडा सर्व्हिया व्हावयाला पाहिजे असून त्या बडया सर्व्हियानें पुढे रशियाच्याच तत्रानें वागावे अशी रशियाची इच्छा आहे. बडया सर्व्हियाची सरहद्द व रशियाची सरहद्द एकाला एक भिडवून, रशियातील आगगाडया बडया सर्व्हियामध्येंस्वेच्छेनें संचार करीपर्यंत रशियाची ही महत्त्वाकांक्षा सफल होत नाहीं. यामुळे हंगेरीचा कांहीं भाग सर्व्हियाला देऊन स्वतःच्या राज्याला जोडून असलेला हंगेरीचा भाग रशियाला स्वतःच्या राज्यास सामील करावयाला पाहिजे आहे हंगेरीमध्ये नैऋत्य कोपऱ्यापासून निघून वायव्य कोपऱ्यापर्यंत कार्पेथियन पर्वताची ओळ जाते कार्पेथियन पर्वताच्या उत्तरेकडील त्रिकोणास ग्यालीशिया म्हणतात, ह्या प्रातात सर्व्हियन व पोल्स लोकाची वस्ती असून रशियाला लोकवस्तीच्या दृष्टीनें व सरहद्दीवर एका मोठया पर्वताची रांग असणें बळकटीचें होय ह्या दृष्टीने, कार्पेथियन पर्वत व ग्यालीशिया हे रशियाला स्वतःला पाहिजे आहेत. ग्यालीशिया कार्पेथियन पर्वत व कार्पेथियन पर्वताच्या दक्षिणेकडील कांहीं भाग रशियाला व काहीं भाग सर्व्हियाला अशी वांटणी झाल्यास, रशियाचें समाधान आहे. ह्या योगानें छोटया सर्व्हियाचा बडा सर्व्हिया होतो, सर्व्हिया व रशिया यांची सरहद्द एक होऊन बडा सर्व्हिया रशियाच्या तत्रांत पक्केपणानें गुरफटला जातो. रुमानिया बल्गेरिया वगैरे बाल्कन प्रदेशांतील छोटीं राज्यें इतर जगापासून अलग होऊन रशियाच्या पजातलीं खेळणीं होत. एवच ग्यालीशिया, कार्पेथियन पर्वत व दक्षिण हंगेरी एवढा मुलूख आस्ट्रियापासून जिंकून स्वतःच्या राज्यास सामील केल्यास सर्व बाल्कन प्रात रशियाच्या हातातील हत्यार बनून बाल्कनबरोबरच रशियाचीहि तुर्की साम्राज्यावर कुरघोडी होण्यास आडकाठी पडणार नाहीं. लढाईचा शेवट रशियाच्या दृष्टीनें योग्य व्हावयाचा असल्यास ग्यालीशिया, कार्पेथियन पर्वत व आग्नेय हंगेरी इतक्या मुलखांना ताबा रशियानें युद्धाच्या वेळीं घेतला पाहिजे ( ३ ) आस्ट्रियाला ह्या युद्धामध्यें रशियाचे हेतु विफल करावयाचे आहेत. ग्यालीशिया व कार्पेथियन पर्वत हे रशियाच्या ताब्यांत जाऊ न देता सर्व्हियाला जिंकून सर्व्हियाच्या दक्षिणेस मॅसिडोनिया आपल्या कबजांत

घेऊन सालेनोका बंदरात व त्याबरोबरच भूमध्य समुद्राच्या तुर्की सागरात स्वतःचा प्रवेश करून घेणे ही आस्ट्रियाची महत्वाकांक्षा आहे. ह्यायोगे छोटया सर्व्हियाचा बडा सर्व्हिया होण्याचीं स्वप्नें समूळ नाहींशीं होतात. तुर्की साम्राज्यावर पुढेमागें लोभाची दृष्टि टाकण्यास व भूमध्य समुद्रावर आरमारी सत्ता वाढविण्यास सवड मिळते. त्यायोगे रशियाच्या महत्वाकांक्षेची दृष्टि कार्पेथियन पर्वत कॉन्स्टॅटिनोपल ह्यावरून उडून पूर्वेकडे आपोआप वळते. रशियाला ग्यालीशिया व कार्पेथियन पर्वत घेऊ न देणें व सर्व्हिया जिंकून सालेनोकापर्यंत चाल करून जाणे हें आस्ट्रियाचें ह्या युद्धातील ध्येय आहे. (४) जर्मनीला ह्या युद्धात मुख्य तटयाच्या प्रदेशासबंधानें काहींच प्रत्यक्ष मिळावयाचा नाहीं. आस्ट्रियाच्या महत्वाकांक्षेच्या उडया जर्मनीच्या सेनाशकटावर आरूढ झाल्या असल्यामुळे ह्या महायुद्धात अग्रपूजेचाच तेवढा मान जर्मनीच्या पदरात पडण्यासारखा आहे. पण ह्या अग्रपूजेच्या मानाबरोबर पर्यायानें बरेच फायदे जर्मनीचे व्हावयाचे आहेत. सालेनोकापर्यंत आस्ट्रियाची सत्ता पसरल्यास, व्यापार, आगगाडया, व इतर कारखाने यांच्या दृष्टीनें तुर्की साम्राज्य व्यापून टाकण्यास जर्मनीला सोपे जाईल. व्यापाराच्या व इतर धंद्याच्या सवलतीच्या लोभानें जो आपल्या राजकीय सत्तेचें सरक्षण करू शकेल, पण मुलखाला मुलूख लागून बसल्यामुळें जो राजकीय सत्ता लुबाडण्याचें पाप आजच मनात धरणार नाहीं, असल्या लढवय्याचा पाठिंबा तुर्कस्थानास सांप्रत अवश्य आहे. असलें राष्ट्र म्हणजे एक जर्मनीच होय. ह्यामुळें अग्रपूजेच्या मानाबरोबरच तुर्की साम्राज्याचा वालीपणाहि जर्मनीस ह्या महायुद्धात मिळवावयाचा आहे. तुर्की साम्राज्यांतील व्यापार व उद्योगधंदे स्वतःच्या तंत्रानें चालतील अशी परिस्थिति बाल्कन प्रदेशांत व भूमध्य समुद्रात उत्पन्न करणे, हें जर्मनीचे ह्या महायुद्धातील साध्य होय. अर्थात रशियाला कार्पेथियनपर्वत घेऊ न देणें व आस्ट्रियाची सत्ता सालेनोका बंदरापर्यंत नेऊन भिडविणें ह्या गोष्टी युद्धप्रसंगानें जर्मनीला घडवून आणावयाच्या आहेत. (५) जर्मनीला ज्याप्रमाणे तटयाच्या मुलखापैकीं प्रत्यक्ष काहींच भाग नको आहे, त्याप्रमाणें फ्रान्सलाहि तटयाच्या मुलखापैकीं काहींच प्रदेश नको आहे; पण आस्ट्रिया सालेनिका बंदरापर्यंत येणें हें फ्रान्सच्या फार वर्षांच्या महत्वाकांक्षेविरुद्ध आहे. भूमध्य समुद्रात आपल्या स्वतःच्या आरमाराची वरचढ असावी, अशी नेपोलियनच्या पूर्वीपासूनची फ्रान्सची महत्वाकांक्षा आहे; पण ही महत्वाकांक्षा

सांप्रत पूर्वी इतकी प्रबळ नसून नूतन आरमारास आरंभ करणारें आस्ट्रियासारखें राष्ट्र सालेनोका बंदरापर्यंत येऊन धडकतें, एवढ्याच मुद्याकरितां फ्रान्स युद्धात प्रवृत्त होणार नाहीं. जे जर्मन राष्ट्र १८७० सालीं उत्तरेकडून आपल्या मानगुटीवर बसलें, त्याच जर्मन राष्ट्रास युरोपात अग्रपूजेचा मान मिळावा ही गोष्ट फ्रान्सला इष्ट नाहीं व सह्यहि नाहीं. जर्मनीच्या व्यापारापैकीं, प्रदेशापैकीं, किंवा वैभवापैकीं फ्रान्सला काहीं पाहिजे आहे अशातलाहि भाग नाहीं; पण जर्मनीच्या ज्या बागुलबोवामुळे फ्रान्सला झोप येत नाहीं तो जर्मनीच्या सेनाशकटाचा बागुलबोवा फ्रान्सला नष्ट करावयाचा आहे, जर्मनीचा सेनाशकट स्वतःच्या सेनाशकटाकडून मोडून टाकण्याची ताकद फ्रान्सच्या अंगात नाही तेव्हा समान शत्रू मित्र समजणारा आपला दोस्त जो रशिया त्याला जर्मनीच्या बरोबरीचा लोकांनीं मानावा व साधल्यास त्याची अग्रपूजा युरोपखंडात व्हावी, ही गोष्ट फ्रान्सला ह्या महायुद्धात घडवून आणावयाची आहे. अर्थात् जर्मनीला युद्धप्रसंगीं सपाटून तवी देणें एवढीच कामगिरी फ्रान्सच्या वाटणीला ह्या महायुद्धात आलेली आहे.

## इंग्लंडचा उच्च हेतु

फ्रान्सप्रमाणे इंग्लडालाहि या युद्धात काहीं प्रदेश मिळवावयाचा नाहीं. फ्रान्सहून इंग्लडचे हेतु अधिक उच्च प्रतीचे आहेत. रशियाला काहीं मिळवावयाचें आहे, आस्ट्रियाला काहीं मिळवावयाचें आहे, सर्व्हियाला काहीं मिळवावयाचें आहे. म्हणजे महायुद्धात पहिल्या तिघाचे हेतु तामस प्रकारचे होत. जर्मनीला मिळवावयाचें काहीं नाहीं खरें, पण अग्रपूजा व तदंगभूत फायदे यावर त्याची दृष्टि आहे, तेव्हा जर्मनीचा हेतु राजस मानण्यास हरकत नाहीं. फ्रान्सला अग्रपूजाहि नको व मुलूखहि नको, पण जर्मनीचा बागुलबोवा नष्ट करावयाचा असल्यामुळें फ्रान्सचा सात्विकपणा थोडासा हिणकस दिसतो. इंग्लडची स्थिति तशी नाहीं. इंग्लडला ह्या महायुद्धात कोणचाहि लोभ नाहीं किंवा कोणच्याहि भीतीपासून मुक्त व्हावयाचें नाहीं, म्हणून इंग्लडचे हेतू उच्च आहेत. जर्मनीस एकट्यासच अग्रपूजेचा मान मिळाल्यास, तुर्कस्थान, बाल्कन प्रदेश, स्वित्झर्लंड, बेल्जम, हॉलंड, डेन्मार्क वगैरे चिमुकल्या राष्ट्रांना आस्ते आस्ते आपल्या राजकीय स्वातंत्र्यालाहि मुकावे लागेल, ह्यांत संशय नाहीं. युरोपखंडाचा प्राचीन व

अर्वाचीन इतिहास पाहिला असता, अथेन्स, बेल्जम, हॉलंडसारख्या चिमुकल्या राष्ट्रांनींच युरोपखंडात माणुसकीचें मानवी उन्नतीचें, मानवी विचाराच्या प्रगल्भतेचें, व आत्म्याच्या सात्विक तेजाचें संरक्षण केलेले आहे, असे दिसून येईल. बलाढय राष्ट्रांनीं सेनाशकटाची पूर्णावस्था केली आहे, सेनेला लागणाऱ्या निरनिराळ्या शास्त्रातील अद्भुत शोधाची अस्त्रे आपल्या सेनाशकटाभोवती कायमचीं फिरतीं ठेविलीं आहेत, पण माणुसकीची उन्नति करणे हें काम छोटया राष्ट्रांनीच आजपर्यंत युरोप खंडात केलें आहे. ही राष्ट्रे युरोपात नष्ट होऊ नयेत व त्याबरोबरच माणुसकीचेहि युरोपात नुकसान होऊं नये, या उच्च हेतूनेंच मि. आस्क्विथ याचे प्रधानमंडळ या महायुद्धात सामील झालें आहे. छोटया राष्ट्रांचे युरोपखंडात कसे संरक्षण करावयाचे याला उपाय एकच आहे तो हाच की, कोणत्याहि एका राष्ट्राला स्वतःच्या एकटयाच्या मनगटाच्या शक्तीवर सर्वांपासून अग्रपूजेचा मान मिळविता येईल एवढे मोठें होऊ द्यावयाचें नाहीं. जर्मनीचा अग्रपूजेचा तेवढा मान जावा एवढयाच सात्विक हेतूनें इंग्लंड ह्या युद्धात पडले आहे. फ्रान्सला जर्मनीचा बागुलबोवा नष्ट होऊन अग्रपूजेचा मान रशियाकडे गेल्यास तो नको आहे असे नाहीं इंग्लंडला हा मान जर्मनीकडे रहावा अशी इच्छा नाहीं व रशियाकडे रहावा अशीहि इंग्लंडची इच्छा नाहीं. स्वतःकडे रहावा अशी इंग्लंडची इच्छा आहे असे जर म्हणावे, तर इंग्लंडचा सेनाशकट इतका लहान आहे की, अग्रपूजेच्या मानाला तो हपापलेला आहे असे म्हणणेंच युरोप खंडात हास्यास्पद समजलें जाईल. अग्रपूजेचा मान युरोपात अमक्याकडेच आहे अशी निर्णयात्मक स्थिति युरोपखंडाची नसली म्हणजे इंग्लंडचा उच्च हेतु सफल झाला. आज अग्रपूजेचा जर्मनीचा मान जाऊन जर रशियाकडे आला तर बेल्जम व स्वित्झर्लंड यांचें ग्रहण सुटून इराण अफगाणिस्थान याना तें ग्रहण लागावयाचें. युद्धाच्या वेळीं कोणत्या गोष्टी घडून आल्या असतां इंग्लंडचा हा हेतु सिद्धीस जाईल ? जर्मनीला चिमुकल्या राष्ट्राना हातहि लावू देता कामा नये, म्हणजे पोलंड किंवा बेल्जम यापैकीं काहींहि भाग जर्मनीला मिळू देता उपयोगी नाहीं. दुसरें सर्व्हियाचा कोणताहि भाग आस्ट्रियाच्या ताब्यात जाता कामा नये. सर्व्हियाला हर्गोनिया व बोस्निया हे जिल्हे मिळून आस्ट्रिया दक्षिणेच्या बाजूला थोडासा क्षीणबल झाला पाहिजे, हें इंग्लंडच्या उच्च हेतूला

धरून आहे. पण छोट्या सर्व्हियाचा बडा सर्व्हिया होऊन रशिया व सर्व्हिया एकजीव होणें हें इंग्लंडला मान्य होणार नाहीं. कार्पेथियन पर्वतापर्यंत मुलूख घेण्यास रशियास परवानगी मिळेल, पण सर्व्हिया व रशिया या दोघांना आस्ट्रियाचा हंगेरी प्रांत वाटून घ्यावयास देणें म्हणजे केसरच्या मुकुटावरील अग्रपूजेचीं फुलें उचलून झारच्या मस्तकावर ठेवण्यासारखेंच होय. माणुसकीच्या बचावाच्या दृष्टीनें अशा गोष्टी घडवून आणणें साहजिक इंग्लंडास श्लाघ्य नाहीं. अर्थात् युद्धाच्या प्रसंगीं इंग्लंड स्वतः होऊन त्या घडवून आणणारहि नाहीं. पूर्वेतिहास व निरनिराळ्या राष्ट्रांच्या मनांतील युद्धप्रसंगाच्या वेळचे हेतूहि ध्यानांत ठेऊन आपण आतां रणभूमीकडे वळूं.

## इटालीची उदासीन वृत्ति

महायुद्धाचे प्रारंभींच इटालीनें जर्मन त्रिकूटांतून आपलें अंग काढून घेतलें आणि युद्धाचे वेळीं उदासीन वृत्तीनें आपण रहाणार म्हणजे कोणच्याच पक्षास आपण मिळणार नाहीं असे इटलीनें जाहीर केलें. जर्मन त्रिकूटांत इटाली जो सामील झाला होता तो स्वार्थाच्याच दृष्टीनें. आफ्रिकेच्या उत्तर किनाऱ्यावर फ्रान्सचा डोळा, तर त्याच किनाऱ्यावर इटालीचाहि डोळा. तेव्हा ज्या जुटीमध्यें फ्रान्स सामील त्याच जुटीमध्ये इटालीनेंहि सामील होऊन इटालीचा स्वार्थ कसा साधणार ? म्हणून इटालीनें जर्मनीची कास धरली. पण आस्ट्रियाच्या पारतंत्र्यातून इटाली देश जो स्वतंत्र झाला, तो फ्रान्स व इंग्लंड यांच्या मदतीनें. तेव्हां पूर्वीची आठवण विसरून फ्रान्स आणि इंग्लंड यांच्या शिपायांच्या अंगावर लढाईंत गोळी झाडणें इटालियन लोकांना कठीण वाटलें. सैन्य असल्या युद्धांत लढण्यास नाखूष व प्रत्यक्ष लाभाचीहि कांहीं आशा नाहीं. अशा कारणांनीं इटालीनें तटस्थ वृत्ति स्वीकारली. महायुद्धाच्या शेवटीं अखेरच्या वेळीं दोन पक्षांपैकीं एक पक्ष बराचसा हटेल, व तहाचें बोलणें सुरू करतील त्यावेळीं हटलेल्या पक्षाकडून म्हणा किंवा विजयी पक्षाकडून म्हणा ज्याच्याकडून प्रत्यक्ष लाभाची लांच अधिक मिळेल त्यास इटाली सामील होण्याचा संभव आहे. पराभूत झालेल्या पक्षास पुनः पूर्वस्थितीवर आणण्याचें सामर्थ्य युरोपखंडांत त्यावेळीं एकट्या इटलीकडे राहील व त्या सामर्थ्याचा उपयोग इटालीनें करावा म्हणून म्हणा किंवा उलटपक्षीं करू नये म्हणून म्हणा, इटालीस मोठा लाभ कोणी ना कोणी तरी देऊं करील. मोठा लाभ प्रत्यक्ष पुढें

दृष्टीस पडल्यावर श्लाघ्याश्लाघ्यतेचा फारसा विचार इटालियन लोकसमूहाच्या मनात येणार नाहीं. त्रिपोलीच्या लढाईच्या वेळीं योग्यायोग्यतेच्या विचारापेक्षा नफानुकसानीच्या विचाराचा पगडा इटालियन राष्ट्रावर विशेष दृष्टीस पडत होता व तीच हिशेबी वृत्ति ह्या महायुद्धाच्या वेळींहि इटालीनें स्वीकारली असल्यामुळें द्रव्यदृष्टया व प्रदेशाच्या दृष्टीनेंहि महायुद्धात इटलीस बराच फायदा होण्याचा संभव आहे. महायुद्धात सर्व राष्ट्रे गुतलीं असल्यामुळे इटालियन व्यापाराला सहजगत्या भरती येणारी असून व्यापारात भरपूर द्रव्य मिळविण्याची इटालीला ही संधि आहे. बरें, युद्धाच्या अखेरीस निरनिराळया प्रदेशाची वाटणी व्हावयाच्या वेळीं गप्प बसण्याबद्दल किंवा आयत्या वेळीं थोडा वेळ लढल्याबद्दल इटालीला काहीं मुलूख मिळाल्यावाचून राहणार नाही. अशा रीतीनें काहीं अशीं लोकसमूहाच्या पूर्वग्रहामुळे व काहीं अशीं प्रधानमंडळाच्या हिशेबी धोरणामुळे इटालीच्या बंदुकानीं व तोफानीं ह्यावेळी मूकवृत्ति स्वीकारली आहे. इटालीच्या ह्या मूकवृत्तीमुळे महायुद्धातील रणभूमीचीं स्थानें विशेष बदललीं नसून जर्मन पक्षाचें पारडें मात्र जरा हलके झालें आहे.

## महायुद्धांतील रणक्षेत्रें

महायुद्धाच्या लढाईचीं कारणे व युद्धात सामील असलेल्या निरनिराळया राष्ट्राच्या महत्वाकांक्षेचीं स्वरूपे ध्यानात घेतलीं म्हणजे रणभूमीचे एकंदर सहा भाग पडतात. ही महायुद्धातील सहा रणक्षेत्रेच होत. सर्व्हिया. कार्पेथियन पर्वत, ग्यालीशिया, पोलंड, प्रशिया, पूर्व बेल्जम व उत्तर फ्रान्स ही रणक्षेत्रे होत ह्या प्रत्येक क्षेत्रात कोणत्या पक्षाचा कितपत जय किंवा पराजय होतो, हें पाहून तहाचीं बोलणीं सुरू होतील. पहिलें रणक्षेत्र सर्व्हिया होय. सर्व्हियाला जिंकून आस्ट्रियाला सालेनोका बंदरापर्यंत जावयाचें आहे. येथेंच लढाईची पहिली तोफ उडाली. सर्व्हियाचा देश डोंगराळ असून हंगेरियाची तीच स्थिति आहे. सर्व्हिया आणि हंगेरिया याच्यामध्ये डॅन्यूब नदी वहात असल्यामुळें उताराच्या ठराविक मार्गाशिवाय इतर मार्गांनीं हल्ला चढविणें कठीण आहे. सर्व्हियाची राजधानी बेलग्रेड शहर हें डॅन्यूब नदीच्या काठीं असून, डॅन्यूबच्या दुसऱ्या तीरावरून बेल्ग्रेडवर तोफाचा भडिमार करता येतो. आस्ट्रियानें पहिल्या तडाख्याला बेल्ग्रेडवर तोफाचा भडिमार केला व डॅन्यूब नदी उतरून सर्व्हियामध्यें तीन चार ठिकाणीं आस्ट्रियन सैन्यानें प्रवेश केला.

गेल्या दोन महिन्यांत रशियाची तबी बसल्यामुळे आस्ट्रियाला आपलें सैन्य सर्व्हियामधून काढून घ्यावे लागलें आहे, व सर्व्हिया आस्ट्रियात उलट प्रवेश करणार नाहीं, एवढाच काय तो बंदोबस्त आस्ट्रियानें डॅन्यूब नदीच्या काठीं ठेवला आहे. मधून मधून डॅन्यूब नदीच्या उत्तर किनाऱ्यावर आस्ट्रियन तोफखाना बेल्ग्रेड शहरावर तोफांचा भडिमार करीत असतो. पण त्यापासून विशेषसा फायदा आस्ट्रियाचा झालेला दिसत नाहीं. आस्ट्रियास स्वदेशातून बाहेर हाकून दिल्यानंतर माऊंट निग्रोची मदत घेऊन बोस्निया, व हर्गोनिया या सर्व्हियन वस्तीच्या आस्ट्रियन प्रांतावर सर्व्हियानें हल्ला चढविला आहे, व तेथे त्यास बरेंचसे यशहि मिळालें आहे. आणखी महिन्या दीड महिन्याच्या अवधीत हे दोनहि प्रांत सर्व्हियास पूर्णपणे काबीज करता येतील. कार्पेथियन पर्वत ओलांडून हंगेरियामध्ये घुसण्याचा समय जर रशियास यावयाचा असला तर त्यास अद्याप महिन्या दोन महिन्याचा अवकाश आहे. हा अवकाश कां आहे, ह्याचीं कारणें पोलंडच्या रणभूमीचा विचार करतांना वाचकाच्या ध्यानांत आपोआप येते. सर्व्हियाच्या कामगिरीच्या विचाराच्या वेळीं एवढी गोष्ट नमूद करणे आहे की, हंगेरियात रशियाचे मोठें सैन्य उतरण्याचे वेळीं डॅन्यूब नदी ओलांडून हंगेरिंगात प्रवेश करण्यास महिन्या दीड महिन्यानें सर्व्हियाहि समर्थ होईल. ह्या महायुद्धाच्या अखेरीस जर रशियासच अग्रपूजेचा मान मिळावयाचा असेल, तर कार्पेथियन पर्वत ओलांडून रशियाचे पांच दहा लाख सैन्य महिन्या दोन महिन्यांनीं म्हणजे महायुद्धाच्या चवथ्या किंवा पांचव्या महिन्यांत उतरलें पाहिजे. तसेंच तें उतरल्यास डॅन्यूब नदीवरचा आस्ट्रियाचा शहहि कमी होईल, व बोस्निया व हर्गोनिया हे प्रांत जिंकून हंगेरियांत जाऊन रशियन सैन्याशीं संलग्न होण्यास सर्व्हियाला हरकत पडणार नाहीं पहिल्या दोन महिन्यांची सर्व्हियाची कामगिरी रशियाचे त्रिकूटास अनुकूल असून जर्मन त्रिकूटास प्रतिकूल झाली आहे. पहिल्या तडाख्यालाच सर्व्हियास जमीनदोस्त करण्याचा आस्ट्रियाचा घाट फसला असून सर्व्हिया आस्ट्रियाला मागें परतवून स्वतःच्या पायावर इतस्ततः सांप्रत संचार करीत आहे. ह्या महायुद्धांत सामील झालेल्या मोठमोठ्या सेनासागराशीं तुलना करतांना सर्व्हियाच्या बलाला विस्तीर्ण डबक्याहून मोठीशी किंमत नाहीं हें खरें, तथापि चिमुकल्या सर्व्हियानें आपली लहानशीच कामगिरी बऱ्याचशा शिताफीनें दोन महिने बजाविली आहे असें म्हणणें भाग पडते.

## बेल्जियम व फ्रान्स यांमधील युद्ध

आस्ट्रिया व सर्व्हिया यामधील ोन महिन्याच्या युद्धात आस्ट्रियास इष्ट गोष्ट साधता आली नाही. उलट सर्व्हियानें स्वत.च्या स्वार्थापैकीं निम्मा शिम्मा भाग साधला. बरे, आस्ट्रियास मिळवावयाचें होतें ते मिळविता आले नाही पण रशियाच्या बाजूनें जे गमवता कामा नको होते, त्यापासून तरी रशियास त्यानीं अतरावर ठेविलें काय? आस्ट्रिया व रशिया, जर्मनी व रशिया याच्यामधील रणभूमीकडे नजर फेकण्यापूर्वी बेल्जम व फ्रान्स ह्या दोन देशातोल रणक्षेत्राकडे प्रथम नजर फेकणें जरूर आहे. कारण, गेल्या महिन्यात ही दोन रणक्षेत्रें प्राधान्येकरून लोकाच्या नजरेपुढे आलीं असन या रणक्षेत्रातील चमत्कारानीं इतर रणक्षेत्राना दिपवून सोडलें आहे गेल्या दोन महिन्यात रशियाच्या बाजूच्या रणक्षेत्रात अग्रस्थान मिळण्याचा सभव असून बेल्जम व फ्रान्स येथील रणक्षेत्रे किंचित हीनतेज होणारीं आहेत. ज्या रणक्षेत्राचा पराक्रम आता अस्ताकडे जाऊ लागला आहे, त्याचें वदन प्रथम करून, नतर उदीत क्षेत्राकडे पहावे हें उचित होय. बेल्जम व फ्रान्स ह्यामधील रणक्षेत्राकडे पहाता, प्रथम साहजिक असा प्रश्न उपस्थित होतो कीं, हे चिमुकले बेल्जम थोराच्या लढालढींत कसे येऊन पडलें? बेल्जमला उदासीन वृत्तीचे नेहमीं समजून त्याच्या प्रदेशाना कोणीहि हात लावणार नाहीं असे तहनामे जर्मनी, फ्रान्स, इग्लड वगैरे देशात पूर्वी झालेले होते. असे असताना बेल्जमची उदासीन वृत्ति कशी नाहींशी झाली? याचें उत्तर असे आहे कीं, बेल्जम इग्रजाच्या त्रिकूटात सामील झालें ते स्वेच्छेने नव्हे, तर परेच्छेने. ह्मणजे जर्मनीनें पूर्वीचा तह कस्पटाप्रमाणें समजून स्वतःच्या स्वार्थाकरिता बेल्जमवर हल्ला केला ह्मणून. जर्मनीनें बेल्जमवर जर हल्ला केला नसता आणि फ्रान्सच्या उत्तर–पश्चिम किनाऱ्यावर आरमारी युद्ध न करण्याचें जर कबूल केलें असतें, तर इग्लडहि ह्या महायुद्धात सामील झालें नसते. युद्धाच्या प्रारभीं अशा तऱ्हेचें बोलणें इग्लडने जर्मनीपाशीं लाविलें. सदर आरमारी युद्ध न करण्याचें जर्मनीनें कबूल केलें, पण युद्धाच्या अखेरीस बेल्जमचा प्रदेश जरी घेणार नाहीं, तरी युद्धाच्यावेळीं बेल्जममध्यें सैन्य घुसून तेथे सैन्याच्या हालचाली केल्याशिवाय आपणास गत्यतर नाहीं, असे जर्मनीचें उत्तर आलें. व या उत्तराबरोबरच जर्मनीचें सैन्यहि बेल्जममधील लीजच्या किल्ल्यापर्यंत येऊन धडकलें. लढाईचें धोरण व डावपेंच याच्या दृष्टीनें वरील उत्तराचा आपण

आता विचार करू, म्हणजे गेल्या दोन महिन्यातील बेल्जम व फ्रान्स यामधील लढायाच्या वेळच्या दोनहि पक्षाच्या सैन्याच्या हालचाली एक तऱ्हेनें कशा सुसंगत होत्या हे ध्यानात येईल. ह्या महायुद्धात जर्मनीला फ्रान्सपैकी कांहीं मुलूख घ्यावयाचा नाहीं, व फ्रान्सला जर्मनीपैकीहि काही मुलूख घ्यावयाचा नाहीं. जे मुलूख प्रत्यक्ष घ्यावयाचे किंवा द्यावयाचे ते बाल्कन पर्वत व कार्पेथियन पर्वत याच्या सभोवारचे आहेत. या दोन पर्वताच्या रागाशीं फ्रान्स व जर्मनी ह्याच्या मुलखाचा प्रत्यक्ष संबंध कोठेच नाहीं. असे असताना लढाईच्या पहिल्या दोन महिन्याचा भर फ्रान्सात का? " देवी रानात व नायटे गावात " अशी स्थिति का? कार्पेथियन व बाल्कन हे पर्वत फ्रान्सच्या सरहद्दीपासून पूर्वेकडे शेकडों मैलावर, आणि युद्धाच्या पहिल्या भयंकर टकरी फ्रान्स व जर्मनीच्या सरहद्दीवर, हे कोडें कसे उलगडावयाचे? जर्मनी व फ्रान्स ह्या दोघाना जरी परस्पराचा कोणताहि मुलूख घ्यावयाचा नसला, तरी कार्पेथियन पर्वत व बाल्कन पर्वत ह्याच्या शेजारचे रशिया व आस्ट्रिया याना या युद्धात काहीं प्रत्यक्ष देणें घेणें आहे. हे देणें मात्र देऊ नये व घेणे घेता येईल तेवढे घ्यावे, म्हणून रशियाचा किंवा आस्ट्रियाचा पक्का पराभव होणें जरूर आहे. कोणाचा तरी हा पक्का पराभव होत असताना इतरानीं आपापल्या दोस्ताना पूर्ण मदत केली पाहिजे. फ्रान्स रशियाला मदत कशी करणार? जर्मनीला तंबी दिल्याशिवाय मदत केल्याचे पुण्य फ्रान्सला मिळत नाही. फ्रान्सनें जर्मनीला तंबी द्यावयाची म्हणजे जर्मनीवर स्वारी करून जर्मनीचे शक्य तेवढे अधिक सैन्य आपल्या अंगावर ओढून घेऊन साधल्यास त्याचा पराभव करून, पश्चिम जर्मनीचा नाश करावयाचा, व हा नाश न साधल्यास निदान स्वतःचें संभाळून पश्चिम जर्मनीच्या नाशाचे बागुलबोवाने शक्य तेवढे अधिक जर्मनीचें सैन्य आपल्याकडे गुतवून ठेवावयाचें. महायुद्धातील फ्रान्सच्या रणक्षेत्रातील फ्रान्सचे हें ध्येय होय. ही गोष्ट फ्रान्सला कशी घडवून आणता येईल? फ्रान्स व जर्मनी यामधील रणभूमीच्या नकाशातील फ्रान्स व जर्मनी आणि बेल्जम व जर्मनी ह्यामधील सरहद्दीकडे पहावे. हे सरहद्दीचे पट्टे डोंगराळ प्रदेशाचे असून प्रदेशाचा हा टेकडाळपणा सरहद्दीपासून चाळीस पन्नास मैल फ्रान्सच्या बाजूला व जर्मनीच्याहि बाजूला आत पसरलेला आहे. फ्रान्सने जर्मनींत घुसावयाचें तर शभर मैल रुंदीचा हा टेकडाळ

भाग आक्रमून नतर जर्मनीच्या मैदानावर उतरलें पाहिजे. बरें, जर्मनीनें फ्रान्समध्यें घुसावयाचें तर तोच उपद्व्याप जर्मनीलाहि केला पाहिजे. स्वतःच्या हद्दींतील पन्नास मैल डोंगराळ प्रात व फ्रान्सच्या हद्दींतील पन्नास मैल रुंदीचा टेकडाळ प्रात ओलांडून फ्रान्सचे मैदान जर्मन तोफानीं पहावे, तेव्हा हे महायुद्ध स्वतःचे घरात पडू न देता उत्तर फ्रान्सात जर्मनीनें पाडलें असे होणार. फ्रान्स व जर्मनी याची सरहद्द टेकडाळ आहे. इतकेच नव्हे, तर ह्या सरहद्दीवरील हरएक माऱ्याच्या जागीं नवीन तऱ्हेचे प्रचड किल्ले १८७० सालचा अनुभव पूर्णपणें ध्यानात घेऊन दोन्ही राष्ट्रानी बाधले आहेत. फ्रान्स व जर्मनी ह्यामधील सरहद्द ओलांडून फ्रान्सच्या मैदानात उतरण्याचा उद्योग जर जर्मनीने केला असता, तर फ्रान्सच्या सरहद्दीवरील तटबदीशीं झुजण्यास जर्मनीस हे गेले दोन महिनेहि पुरले नसते. तेव्हा जर्मन सेनापतीनें असे ठरविलें कीं, पहिली धडकी बेल्जमला द्यावी. बेल्जम व जर्मनी यामधील सरहद्द जरी डोंगराळ असली तरी बेल्जमचें सैन्य चिमुकले व त्यास हा हा म्हणता मागे रेटण्यास हरकत नाहीं. अशा रीतीनें बेल्जमला मागे रेटून बेल्जम व फ्रान्स ह्यामधील सरहद्द गाठावी व तेथून फ्रान्सच्या मैदानात लढाई उतरवावी हा द्राविडी प्राणायामाचा मार्ग सरळ हल्ल्यापेक्षा जर्मनीला सोपा का वाटला ? सरळ हल्ला करून फ्रान्सची सरहद्द ओलाडणें म्हणजे फ्रान्सच्या सरहद्दीवरील तटबदीवर वाजवीपेक्षा अधिक वेळ डोकीं फोडून घेणें होय. शिवाय बेल्जम आणि जर्मनी ह्यामधील सरहद्द जर्मनीला जवळ व फ्रान्सला दूर असल्यामुळे जर्मन व बेल्जम सरहद्दीवर फ्रान्सचें सैन्य जर्मनीच्या अगोदर येणे शक्य नव्हतें. सैन्याची जमवाजमव करणें, त्याच्या हालचाली करणें वगैरे चकमकींच्या कामात फ्रान्स व रशिया याच्यापेक्षाहि आपण श्रेष्ठ होय, अशी जर्मनीची सकारण समजूत आहे. तेव्हा जर्मन-बेल्जम सरहद्द ओलाडून बेल्जम-फ्रान्स सरहद्द गाठण्यात आपणास तोटा होणार नाहीं, अशा अदाजानें जर्मन सेनापतीनें बेल्जममधून फ्रान्समध्यें घुसण्याचा द्राविडी प्राणायाम पसत केला. लढाईच्या पहिल्या क्षणाला बेल्जममध्यें जर्मनी घुसणार हें धोरण जर एकदम प्रकट झाले होते, तर इग्लड फ्रान्स ह्याच्या सैन्यानेंहि बेल्जमचेच रणक्षेत्र का केलें नाहीं ? फ्रान्सच्या मैदानावर जर्मनीला का घुसू दिलें ? ह्या प्रश्नाचा विचार करताना पुनः आपण रणभूमीच्या नकाशाकडे पाहिलें पाहिजे. ह्या नकाशातील

स्वित्झर्लंड, फ्रान्स व जर्मनी ह्यांच्या सरहद्दी ज्या ठिकाणीं मिळतात, त्या फ्रान्सच्या पूर्वोत्तर कोपऱ्याकडे पहा; आणि जर्मनीला नुसतें थोपवून धरून भागत नाहीं, तर जर्मनीच्या प्रदेशात लढाई नेऊन घातली पाहिजे ह्या फ्रान्सच्या ध्येयाकडे लक्ष द्या. सदर कोपरा हा पहिल्या दोन महिन्यातील फ्रान्सचा मोहपाश झाला. हा कोपरा फ्रान्सला सर्वांत जवळची रणभूमि होय. अर्थात मोठें सैन्य जमवून जर्मनीवर हल्ला चढविण्यास हीच सोयीची जागा होय. जर्मनी सरळ मार्गानें फ्रान्सवर चाल करून येत नसून बेल्जमचा दूरचा मार्ग स्वीकारीत आहे, हें पाहून फ्रान्सच्या सेनापतींना वाटलें कीं, प्रचंड सैन्यानिशीं जर ह्या कोपऱ्यात घुसलो, आणि चपळाई करून चाळीसपन्नास मैलाचा टेकडाळ प्रदेश आक्रमून जर्मनीच्या मैदानावर फ्रान्सचें सैन्य उतरविलें, तर द्राविडी प्राणयामासाठीं जर्मनीच्या आताच्या होत असलेल्या हालचालीं फसून त्याच्याच हाताचा विळखा त्याच्याच मानेला पडल्यावाचून रहाणार नाहीं. जर्मनीनें लीज किल्ल्यावर ज्यावेळीं चाल केली, त्यावेळीं फ्रान्सनेंहि सदर कोपऱ्यावर चाल केली, अर्धामुर्धा बेल्जम जर्मनी आक्रमितो न आक्रमितो त्यापूर्वींच जर्मनीचें मैदान गाठावयाचें, ह्या ईर्षेनें स्वतःची सरहद्द ओलांडून मुल्ला हसेनच्या बाजूनें फ्रान्स जर्मन मुलखात घुसला. लीजचे किल्ले ह्यांची जागा मोठया मान्याची आहे, हें ब्रुसेल्स, ॲंटवर्प, लीज व नामूर ह्यांचे जे नकाशे आहेत त्याकडे पाहिलें असता ध्यानात येईल. लीजवरील पहिल्या हल्लयात जर्मनीचे सात आठ हजार लोक कापले गेले. बेल्जमचें छोटें सैन्य अत्यंत धिटाईनें व शौर्यानें लढलें, बेल्जमची पाठ इंग्लंड व फ्रान्स ह्या दोन्ही राष्ट्रांनीं थोपटली; व फ्रेंच सेनापतींना वाटलें कीं, लीजचे किल्ले जर्मनीच्या ओघास एक दोन आठवडे तरी थोपवून धरतील. लीजने व बेल्जम येथील सैन्यानें आपली कामगिरी उत्कृष्ट रीतीनें पार पाडली खरी, पण जर्मन सैन्याची संख्या फारच मोठी येऊन पोंचल्यामुळे, इंग्रजांची कुमक येऊन पोंचण्यापूर्वींच लीज सोडून लढाऊ बेल्जमला मागे परतावें लागलें. लीज पडल्यानंतर लीज व ब्रुसेल्स ह्यांच्यामध्यें बेल्जम सैन्यानें जर्मनीच्या सैन्याशीं पुनः एकवार निकराचें युद्ध केलें. बेल्जमची ही दुसरी लढाई चालू असताना फ्रान्समध्ये उतरण्याची इंग्रजी सैन्याची तयारी पूर्णतेस गेली. ही तयारी जर एक दोन आठवडे अगोदर झाली असती, तर इंग्रजी सैन्य

फ्रान्समध्यें न उतरतां बेल्जममध्येंच उतरले असतें, व बेल्जमच्या मदतीला धावून गेलें असतें. बेल्जमच्या ह्या दुसऱ्या लढाईंत पहिल्या दिवशीं बेल्जम सैन्याचा जय झाला, व ब्रुसेल्सवर चाल करून येणाऱ्या जर्मन सैन्याला बेल्जम सैन्य कांहीं काळ थोपवून धरील अशी पुनः आशा उत्पन्न झाली. ह्या आशेचे वेळीं इंग्रजी सैन्य रणांगणावर उतरण्यास सिद्ध झाले ह्या सैन्यानें कोणतें रणक्षेत्र गांठावे हा त्यावेळीं प्रश्न होता. लीजमधून जर्मन सैन्य जे निघालें तें बेल्जम सैन्याच्या रोखानें ब्रुसेल्सकडे चाल करून गेले, व दुसरे मोठें सैन्य जे निघाले ते नामूरकडे चालले. नामूरचा किल्ला हा फार मजबूत असून नामूरची जागाहि मोक्याची आहे. नामूर घेतल्याशिवाय बेल्जम सरहद्दीने फ्रान्समध्ये उतरणे जर्मन सैन्यास अशक्य तेव्हां इंग्रजी सैन्यानें मॉन्स, नामूर हा पट्टा गांठून तेथे जर्मनीशीं दोन हात करणे हें अधिक किफायतीचें ठरलें. ब्रुसेल्स व अँटवर्प ह्या बाजूला मागें परतलेले बेल्जम सैन्य ज्या ठिकाणीं ब्रुसेल्स व अँटवर्पचे दोन रस्ते विभागतात, त्या ठिकाणीं जर्मनास तोंड देण्यास उभे राहिले. बेल्जमनें साधल्यास जर्मनीला ह्या ठिकाणी थोपवून धरावे न साधल्यास ब्रुसेल्सच्या रस्त्याने न जाता अँटवर्पचा मार्ग धरावा, अँटवर्प व बेल्जम सेनाशकट ही कायम ठेवणें, एवढीच कामगिरी ह्या ठिकाणी बेल्जमच्या वाटणीस आली होती. ब्रुसेल्स शहराच्या संरक्षणाची भानगड बेल्जमनें करू नये, असे इंग्रज व फ्रेंच सेनापतींचें धोरण होते. मॉन्स–नामूर हा पट्टा जर इंग्रजांनी व्यापला आणि अँटवर्प जर बेल्जमने ताब्यात ठेवले तर ब्रुसेल्समध्ये घुसणाऱ्या जर्मन सैन्यास उत्तरेकडून व दक्षिणेकडून तबी देण्यास ठीक पडेल किंबहुना ब्रुसेल्सच्या आमिषानें जर्मनीचा मोठा सेनासागर ब्रुसेल्स सभोंवती आणून ठेवावयाचा व दक्षिण–उत्तरेकडून यथावकाश त्याजवर हल्ला करून त्याला जेरीस आणावयाचे, असा डाव इंग्रजांनीं व फ्रेंचांनीं आरंभिला. ब्रुसेल्सचा मार्ग ज्यावेळीं जर्मनीला खुला झाला, त्या वेळेला मॉन्सच्या पट्ट्याकडे इंग्रजी सैन्य चाल करून जात होते. अँटवर्पची बाजू बेल्जमनें धरली होती, आणि मॉन्स व लीज ह्यामध्यें नामूरचा किल्ला झुंजण्यास उभा टाकला होता.

## नामूर व मॉन्स येथील लढाया

अँटवर्पकडे बेल्जम सैन्य वळून बेल्जमची राजधानी ब्रुसेल्स शहर जर्मनीचे

हचालीं झालें त्यावेळीं बेल्जम व उत्तर फ्रान्स येथील रणभूमीची स्थिति येणेंप्रमाणें होती. फ्रान्सच्या पूर्वीच्या सरहद्दींतून फ्रान्स व स्वित्झर्लंड ह्याच्या सरहद्दीवर असलेल्या जर्मनीच्या कोपऱ्यात फ्रान्स घुसला होता; व फ्रान्सला आपलें बरेंच बळ त्या बाजूस झुकविण्यास सापडलें असतें तर जर्मनीच्या मैदानावर उतरण्याची त्याची तयारी होती. ह्या धोरणानें फ्रान्सच्या बळापैकीं सर्वांत मोठा भाग त्या बाकजूडे वहात होता. नॉन्सी आणि मॉबर्ग ह्या किल्ल्यामधील सरहद्द फ्रान्सनें गाठली होती, पण ह्या बाजूनें जर्मनीवर चाल करून जाण्याचा त्याचा इरादा नसल्यामुळे जर्मनीचें जें सैन्य या सरहद्दीच्या पलिकडून फ्रान्समध्यें उतरण्याचा प्रयत्न करील, त्यास थोपवून धरण्यापुरतेंच फ्रान्सनें आपलें सैन्य ह्या भागीं ठेवलें होते. नान्सी व मुल्हाहुसेन ही फ्रान्सची उजवी बाजू, नान्सी तेमाव्रेज ही फ्रान्सची मध्य बाजू आणि नामूरपासून बेल्जमची सर्व दक्षिण सरहद्द ही फ्रान्सची डावी बाजू. ब्रुसेल्स शहर जर्मनीच्या ताब्यात गेले, त्यावेळी फ्रेंच व इंग्रज याच्या सेनाशकटाचें धोरण असे होते कीं, जर्मनीला बेल्जममध्येच थोपवून धरावयाचा आणि पूर्व फ्रान्सातून जर्मनीवर फ्रान्सचा हल्ला चढला म्हणजे बेल्जममध्ये असलेल्या जर्मन सैन्याचा बेल्जममध्ये कोंडमारा करावयाचा. ह्या गोष्टी साधण्यासाठीं त्यानीं आपली उजवी बाजू फार जड केली, मधली बाजू जर्मनीच्या सैन्याच्या हिशेबात समतोल ठेवली; आणि डाव्या बाजूचें काम जर्मनी फ्रान्समध्ये त्या बाजूने ज्यावेळीं उतरूं लागेल त्यावेळीं त्याला थोपवून धरावयाचे, एवढेच असल्यामुळे अर्धवट लुली ठेऊन दोन आठवडयानीं हा डावा हात भलाभक्कम करून जर्मन सेनाशकटाला त्याचा आडसर घालण्याचा बेत ठरविला. एक दोन आठवडे हा आडसर लुला ठेवण्याचें कारण एवढेंच कीं, फ्रान्सच्या उजव्या हातात जर्मनीला चागला तडाखा देण्याचें सामर्थ्य यावे. बरें, या लुल्या हाताचा जर्मनी फायदा घेईल अशीं भीति इंग्रज व फ्रेंच याना ह्यावेळीं का वाटली नाहीं ? ह्याचें उत्तर असे आहे कीं, लीजचे किल्ले पडायला दहा बारा दिवस लागले, लीजच्या किल्ल्याहून नामूरचे किल्ले अधिक मजबूत व मूळच्या टेकडयावर बाधलेले. तेव्हा नामूर पडण्यास निदान पधरा दिवस तरी लागतील असा हिशोब होता. इंग्लडमधून व दक्षिण फ्रान्समधून नवीन सैन्य येत होतें. तें या डाव्या हाताला पधरा दिवसांत मिळून त्याचा कणखर आडसर बनणें किमपीहि अवघड नव्हतें. मग फ्रान्सनें उजव्या हातानें

जर्मनीला रद्दा देऊन, जर्मनीच्या मैदानात शिरून जर्मन मध्याला वळसा घालण्याचा प्रयत्न करून बेल्जममध्ये जर्मनीच्या सेनाशकटाना कोंडण्याचा मोह का सोडावा ? फ्रान्सच्या मनात आपला उजवा हात जर्मनीमध्ये घुसवावयाचा आणि जर्मनीच्या मनात आपला हात बेल्जममध्ये घुसवून फ्रान्सच्या डाव्या हाताला मागें सारून तो फ्रान्समध्ये घुसवावयाचा. अशा इराद्याने दोनहि सेनाशकट फ्रान्सची पूर्वोत्तर सरहद्द व बेल्जम एवढा दोनशे मैल लांबीचा पट्टा व्यापून अक्राळविक्राळ पुरुषा प्रमाणे उभे राहिले होते. फ्रान्सचे मुख्य बल उजव्या हाताकडे झुकले होतें, जर्मनीचें मुख्य बल मध्यावर राहून थोडके डाव्या हाताकडे झुकले होते. ब्रुसेल्स शहरात जर्मन जाऊन पोचले, त्यावेळीं दोन्ही बाजूच्या सेनाशकटाच्या अक्राळविक्राळ स्वरूपाची स्थिति वरील प्रकारची होती. नामूर दोन आठवडे न पडून, फ्रान्सला आपला उजवा हात जर्मनींत रेटण्यास व लुल्या हाताचा अडसर बनविण्यास थोडा वेळ पाहिजे होता नामूर लवकर पडून फ्रान्सचा उजवा हात थोपवून धरला आहे, तोंच लुल्या डाव्या हाताला छिन्नभिन्न करण्याची जर्मनीला संधि पाहिजे होती. कोणच्या सेनाशकटाचें धोरण यशस्वी होणार हे नामूरवर सर्वस्वी अवलंबून होते. वरील हकीकतीवरून नामूर व मॉन्स ह्या जागा दोंही बाजूच्या सेनाशकटाच्या हाल-चालीच्या मर्मस्थानीं कशा होत्या, हें वाचकाच्या ध्यानात येईल. ब्रुसेल्सला जर्मन जाऊन पोचतात न पोचतात तोंच लीजमधून मोठी जर्मन सेना नामूरकडे वळली, व लगेच त्यानी नामूरवर हल्ला चढविला जे नामूर पधरा दिवस लढेल म्हणन वाटत होते ते एक दिवसातच पडले, व नामूरच्या पलीकडे फ्रेंचाच्या डाव्या हाताच्या जागीं मॉन्स व त्याच्या आसपास असलेल्या इग्रजी सेनेस १-१। लाख जर्मन सैन्याशी झुजण्याच्या ऐवजी ३-४ लाख जर्मन सेनेने एकदम गाठले. ह्या बाजूला तीन चार लाख जर्मन सेना उतरेल हे फ्रेंचाना माहीत होतें, पण त्या गोष्टीस आठ दहा दिवस लागतील असा त्याचा अदमास होता. नामूरच्या कोनाचा दगड ढासळल्यामुळे लुला हात बळकट होण्यापूर्वीच डाव्या हाताला म्हणजे १-१। लाख इग्रजाना तीन चार लाख जर्मन सेनेला मॉन्स येथे अडवून धरण्याची पाळी आली. नामूर चटदिशीं पडल्यानें जर्मनीचा डाव साधला, व तडाखा देण्यासाठीं फ्रान्सनें उचललेला उजवा हात आखडून धरावा लागला; लुल्याडाव्या हाताला मागे हटण्याशिवाय दुसरा मार्गच नव्हता. जर्मनीनें ह्या

वेळीं मॉन्सच्या लढाईत इंग्रज मागे हटताहेत असे पाहून हा लुला हात अजीबात छाटून टाकावा अशी इच्छा धरली व इंग्रजी सैन्याला कोंडून चुरडण्याकरिता अत्यंत निकराचे प्रयत्न केले. अशा बिकट प्रसंगात सापडलेल्या सेनेचा सेनापति जर खरा कर्तृत्ववान नसेल तर सेनाशकटाचा चुराडा झाल्यावाचून रहात नाहीं. इंग्रजी सेनापति जनरल फ्रेंच हे फार कसलेले व दूरदर्शी सेनानायक असल्यामुळे त्यानीं ह्यावेळीं अत्यंत निकराने, धैर्यानें व सावधगिरीनें जर्मन हल्ल्याशीं लढून आस्ते आस्ते आपला सेनाशकट जर्मनीच्या मगरमिठीतून पार पाडून घेतला ! जनरल फ्रेंच ह्याच्या धैर्याची व चातुर्याची खरी परीक्षा यावेळी झाली व त्यानीं नामूर जलदी पडल्यामुळे फ्रान्सवर ओढवलेल्या मोठ्या संकटातून फ्रान्सचा बचाव केला. जनरल फ्रेंच याच्या योग्यतेचा जर सेनानायक ह्या वेळी फ्रान्सच्या डाव्या बाजूस नसता तर त्याने एखादा किल्ला झुंजविण्याच्या भलत्या मोहास बळी पडून स्वतःच्या सेनाशकटास त्या किल्ल्यात कोंडून घेऊन किल्ल्याबरोबर स्वतःच्या सेनेचाहि नाश करून, मध्य व उजवा हात ह्याच्या पाठीवर तेथीलहि सेनाशकट मोडतील एवढे जबरदस्त रट्टे देण्यास जर्मनीस संधि दिली असती. जनरल फ्रेंच मोठ्या शिताफीने दगडाखालीं सापडलेला हात काढून मागे सरकत सरकत व पॅरिस शहराच्या पश्चिमेस व उत्तरेस ३०-४० मैलावर येऊन पोंचले. जर्मन कचाट्यातून निसटताना, इंग्रजी मुख्य सेनापति लॉर्ड किचनेर व फ्रेंच मुख्य सेनापति जनरल जॉफ्रे याचें धोरण अक्षरशः अमलात आले. जय मिळाला तर तो मिळवावयाचा, पण शत्रूला आपला सेनाशकट केव्हाहि मोडू द्यावयाचा नाही. शत्रूच्या तावडींत सापडले असता माघार घेताना सेनाशकट थोडासा विस्कळीत झालेला एक वेळ पुरवेल, पण कोणच्याहि मोहाला बळी पडून गाड्याचीं छकलें होऊ द्यावयाचीं नाहीं, व तो मोडून बंद पडेल असे केव्हाहि घडून आणावयाचे नाहीं. इंग्लंड व फ्रान्स ह्यानीं हे धोरण स्वीकारण्याचे कारण असे कीं, मुख्य लढाई जर्मनी व रशिया ह्याच्यामध्ये असून दुय्यम लढाई जर्मनी व फ्रान्स ह्याच्यामध्ये आहे. ह्या दुय्यम लढाईत फ्रान्सचें उजव्या, डाव्या किंवा मधल्या बाजूचें सेनाशकट मोडून पडलें तर फ्रान्सने जर्मनीचे बरेच सैन्य ह्या दुय्यम लढाईत अडकवून ठेवण्याचें राहून, फ्रान्सच्या नरडीला नख लावतो नाहींतर लढाई थांबीव असा धाक जर्मनीला रशियास दाखवावयास सांपडावयाचा

जर्मनीचें मोठें सैन्य आपल्या बाजूला अडकवून ठेवावयाचें हें फ्रान्सचें पहिलें कार्य, हें साधून मग जर्मनीचे हातात हा प्रांत किंवा तो किल्ला जाऊं न देण्याचा अगर जर्मनींत घुसण्याचा प्रयत्न करावयाचा अशा रीतीनें रचलेल्या व्यूहाच्या कमानीवरील मधला नामूरचा दगड अवचित ढासळल्यामुळे डाव्या हाताला ज्याप्रमाणें मागें सरकावें लागले, त्याप्रमाणे डावा हात मुख्य शरीरापासून छिन्न-भिन्न होऊं नये म्हणून फ्रान्स मध्यालाहि डाव्या हाताच्या तोलानें मागें सरकत सरकत डाव्या हातात मिसळावे लागले. मागें सरकलेला मध्य पारिसच्या उत्तर-पश्चिमेस असलेल्या डाव्या हातात मिसळला व जनरल जॉफ्रे ह्यानीं अत्यंत चपळाईनें जर्मनीवर हल्ला करण्याच्या उद्देशाने उजव्या हाताकडे जे बळ फाजील झुकलें होते तें मध्याकडे व्यवस्थितपणाने परतविण्यास आरंभ केला. पारिस शहराच्या आसपासच ह्या सर्व हालचाली व्हावयाच्या असल्यामुळे पारिस शहरात राजधानी ठेवणे ठीक न वाटून फ्रान्सचे सरकार पारिसमधून दक्षिणेंत बोर्डो येथे गेलें व त्यामुळे उत्तर फ्रान्सात व पारिसमध्ये एकच चळवळ झाली. जवळजवळ एक तृतियांश शहर बाहेर पडलें. ह्यावेळीं फ्रेंच लोकानीं आपली नेहमींची उतावीळ वृत्ति न दाखविता अत्यंत शांतपणाचे व धिमेपणाचें वर्तन ठेवलें होते, व जर्मन-सैन्य पारिसच्या जवळ आले, तरी आपले सेनाशकट मोडूं न देता सर्वांत मोठ्या जर्मन सेनेला रशियाकडील युद्धाचा सोक्षमोक्ष होई तो फ्रान्समध्ये अडकावून पाडण्याचा निश्चय त्यानीं केला होता. व हा निश्चय पार पाडण्याकरिता फुगलेल्या उजव्या बाजूचें सैन्य मध्याकडे व डाव्या हाताकडे अत्यंत जलदीनें फेकण्याचा उपक्रम फ्रेंच-सेनापति जनरल जॉफ्रे ह्यानीं या आणीबाणीच्या प्रसंगीं यत्किंचित्‌हि न डगमगता सुरू ठेवला होता. त्यास इंग्लंडातून लॉर्ड किचनेर नव्या सैन्याची, नव्या तोफखान्याची व नव्या रिसाल्याची अत्यंत जलदीनें मदत करीत होते.

## मॉर्न व ऐनी या नद्यांवरील लढाया

फ्रेंचाचा डावा हात पारिसच्या पश्चिमेला व उत्तरेला आला होता, मध्यहि पारिस शहराच्या उत्तरेला व पूर्वेला आला होता. हा मध्य डाव्या हातात मिसळत असताना खऱ्या मध्यात कमजोरपणा येऊं नये म्हणून उजव्या बाजूकडील फाजील वजन मध्यावर येत होतें. डाव्या हाताशीं जर्मनीची चार दिवस एकसारखी लगट

चालली होती, पण इंग्रज-फ्रेंचाचा डावीकडचा सेनाशकट जर्मनीस मोडतां आला नाहीं. उलट पल्लेदार व अवजड तोफांच्या मदतीशिवाय ह्या डाव्या सेनेवर एकसारखें घालून घेण्याचे बिकट काम जर्मन सैन्यास करावे लागल्यामुळें, जर्मन सैन्याचा फार नाश झाला होता. उजव्या हाताकडून मध्याला व डाव्या हाताला कुमक येण्याचें जर बंद पडेल तरच डावा हात छिन्नविच्छिन्न करण्यास सापडेल, असे जर्मनीला आढळून आले, व त्याबरोबर नान्सीमॉबेज बाजूनें जर्मनीनें आपलें मध्यावरचे सैन्य-फ्रेंच सैन्य ह्या हालचालीत गुंतलें आहे ही संधि पाहून-व्हीम्स व्हर्डनच्या बाजूने ऐनी नदीच्या खालीं आणून ऐनी नदीच्या दक्षिणेस असलेली मार्न नदीहि ओलांडून पारिस शहराच्या पूर्वेस व नैऋत्येस ४०-५० मैलपर्यंत आपल्या आघाडीचा रिसाला दौडत नेला. उजव्या हाताचे सैन्य डाव्या हाताकडे जाण्याच्या हालचालीत गुंतले असल्यामुळे जर्मनीला डावा हात व उजवा हात ह्याच्यामध्ये पाचर ठोकण्याच्या इराद्याने अशी धावपळ करता आली. असा चपळाईचा हल्ला करण्यात जर्मनीचे दोन हेतू होते. एक नॉन्सीपासून मॉबर्गपर्यंत असलेली फ्रान्सची सरहद्द ओलांडून फ्रान्सच्या किल्ल्याची तटबंदी फोडून आत शिरून व्हर्डन, व्हीम्स, सॉसेन व पेरोनीपर्यंतच्या ऐनी नदीच्या उत्तरेकडचा व सभोवारचा टेकडाळ मुलूख व्यापता यावा. नामूरगिव्हेटच्या व लक्सनबरीच्या बाजूनीं ऐनी नदीच्या ह्या उत्तर भागात जर्मन सैन्य घुसलें व वाटेंतील किल्ले घेण्याच्या नादी न लागता व्हीम्स-सॉसेनपासून तों पेरोनीपर्यंतचा प्रांत तटबंद करण्याचा त्यांनीं एकदम उद्योग आरंभिला. सर्व ठिकाणीं सैनिकांना लपून बसण्याकरिता त्यांनीं चर खणले. चराच्यापुढें कांटेरी तारांचीं ठिकठिकाणीं कुंपणे घातलीं, व हरएक मोक्याच्या जागीं चुनेगच्ची पाया तयार करून सुरक्षित लहानशी तटबंदी बांधून तेथे अवजड तोफांची स्थापना केली. सरहद्दीवरील टेकडाळ मुलूख ओलांडून मैदानाच्या तोंडाशीं शत्रूच्या मुलखात मजबुतीनें जागा पकडून बसल्यानें शत्रूच्या घरात लढाई पडून रशियाकडे स्वस्थ चित्तानें पहाण्यास हरकत येणार नाहीं, म्हणून जर्मनीनें नामूरच्या व मॉन्सच्या लढाईनंतर योग्य जागा पकडण्याची पहिली खबरदारी घेतली. ही जागा जर्मनीनें प्रथम मजबूत केली. तोफांचे मोर्चे बांधून काढले, व नंतर मोबेज वगैरे किल्ले पाडण्याचा उद्योग करून पाठीमागील किल्ल्याचा त्रास चुकविला. शत्रूचा सेनाशकट एक मोडला

तरी पाहिजे, किंवा शत्रूच्या राज्यातील टेकडाळ मुलूख ताब्यात घेऊन आपली पाठ सुरक्षित राखून मजबुतीनें तरी बसलें पाहिजे. फ्रेंचाचा सेनाशकट मोडण्याच्या इराद्यानें पारिस शहराच्या उत्तर–पश्चिमेपर्यंत जर्मनीनें डाव्या सेनाशकटावर निकराचे हल्ले केले. हे हल्ले चालले असताना फ्रान्सची उत्तर सरहद्द ओलाडून, ओलाडून म्हणण्यापेक्षा बेल्जमच्या बाजूने वळून फ्रान्सच्या उत्तर सरहद्दीच्या दक्षिणेस येऊन, व नतर मोबेज वगैरे किल्ले तसेच टाकून मध्यात घुसून ऐनी नदीपर्यंत येऊन, ऐनी नदीच्या सबध लाबलचक पट्ट्याला त्यानी एक तऱ्हेच्या मजबूत किल्लयाचें रूप दिलें टापटिपीनें काम करण्याची शिताफी, बारीक सारीक गोष्टींचीहि आगाऊ तरतूद ठवण्याची त्याची सूक्ष्म दृष्टि, व आपला इष्ट हेतु साधत असता तडाख्यासरशीं पूर्ण फायदा गिळकृत करून बसण्याची हिशेबी नजर, इत्यादि लष्करी गुण ह्यावेळीं जर्मन सैन्यानें फार वाखाणण्यासारखे दाखविले. त्यानीं नामूर एका दिवसात घेतले ते ह्याच गुणाच्या जोरावर घेतलें. मोठमोठया अवजड तोफा योग्य जागीं नेमक्या नेऊन कशा जलद ठेवावयाच्या, अवजड तोफानीं वरून विमानानी दाखविलेल्या शत्रूच्या मर्मस्थळीं एकसारखे कसे गोळे सोडावयाचे, व तोफाच्या गोळयाचा असा वर्षाव होत असताना, शत्रूच्या जाग्याजवळ एकदम जमावाने जाऊन पायदळानें कसे पडावयाचे, यासबधाचें त्याचे शास्त्र शिताफी करण्यासारखे आहे नामूर व मॉन्स येथील लढायाचा पूर्ण फायदा घेऊन एका बाजूने ते पारिसपर्यंत चाल करून गेले, व त्याच वेळीं लगेच पडद्याच्या आड त्यानीं ऐनी नदीची तटबदी बाधून काढली. ही तटबदी बाधताना डाव्या बाजूचा फ्रेंचाचा सेनाशकट मोडण्याचा त्याचा प्रयत्न चालूच होता. मात्र हा प्रयत्न चालू असताना ऐनी नदीची तटबदी करण्याचें एका बाजूला ठेऊन जनरल फ्रेंच याचा सेनाशकट मोडण्याच्या कामीच सर्व वजन खर्च करण्याच्या भरीस ते पडले नाहींत. कारण, तसे करण्यानें हातचे सोडून पळत्याच्या पाठीस लागण्याची चूक त्याच्या हातून झाली असती. ऐनी नदीच्या तटबदी बांधत राहून फ्रेंचाचा उजवा हात व डावा हात अलग करण्याच्या हेतूनें मॉर्न नदी ओलाडून जेव्हा जर्मन सैन्य पारिस शहराच्या पूर्वेस उतरू लागलें, तेव्हा जनरल जॉफ्रे यानीं जर्मनीची हिकमत तत्काळ ओळखली. व लगेच उजव्या हाताकडील बजनानीं पुढें पुढें दवडणाऱ्या जर्मन घोडयाना जोराचे रट्टे देण्यास

सुरवात केली. जर्मन सेनानायक असें कांहीं तरी करतील हें स्वप्न लॉर्ड किचनेर व जनरल जॉफ्रे याना पूर्वीच पडलें होतें. पारिस शहराच्या दक्षिणेकडच्या आग-गाड्यातून सैन्याची एकसारखी हालचाल ठेवून कोणत्याहि ठिकाणचा सेनाशकट त्यानीं यावेळीं लुळा ठेवला नव्हता. पाचरेप्रमाणें पुढें आलेल्या जर्मन सैन्यास थप्पडा बसू लागल्या, आणि डावा हात लुळा न दिसता त्याच्या अगीं कणखर अडसराची असलेली लायकी जर्मनीच्या दृष्टीस पडली. ही स्थिति लक्षात येताच मॉर्न नदीवर आपला निभाव लागणार नाहीं असे जर्मनीनें ठरविलें आणि मॉर्न नदीवर पराभव कबूल करून मागें पाय घेण्यास सुरवात केली. मॉर्न नदीवरील जर्मनीच्या पराभवामुळें पारिस शहराला जी ग्रहणाची भीति वाटत होती ती नष्ट झाली, फ्रेंच व इंग्रज सैन्यात नवा दम आला, व उत्तर फ्रान्सातील हवालदील झालेले लोक पुन्हा सतेज झाले. मॉर्न नदीवर आपण शत्रूला झोडपणार अशा उत्साहात इंग्रज सैन्य असताना एक दिवस जनरल फ्रेंच याच्या मजरेस आलें कीं, आपणावर हल्ला करण्याचें सोडून देऊन जर्मन सैन्य हळूच पूर्वेकडे वळलें आहे. ह्या वळणास त्यानीं हरकत घेतली नाहीं, जणू काय तें आपल्या लक्षातच आलें नाहीं असा वरवर बहाणा केला, व जर्मन सैन्याची पिछाडी पूर्वेकडे निघून गेल्यावर एकदम जोराचा हल्ला इंग्रजी सैन्याने जर्मनीवर चढविला. ह्याचा परिणाम असा झाला कीं, जर्मन सैन्याला ऐनी नदीकडे व्यवस्थितपणानें जाता आलें नाहीं. काहीं तोफा व सामानसुमान इंग्रजाच्या हातीं लागलें व इंग्रजानीं ऐनी नदीच्या पट्ट्याच्या मजबूत ठिकाणाकडे पळत सुटलेल्या जर्मन सैन्याचा खरपूस समाचार घेऊन मॉन्सच्या लढाईचा एक तऱ्हेचा सूड उगवून घेतला. मॉर्न नदीवरील जर्मन सैन्याची हीच गत झाली, आणि फ्रेंच शकटाचे डावे उजवे भाग निरनिराळे करून एकेकाला अलग चोपण्याच्या जर्मनीच्या धाडसी धोरणाची परिसमाप्ति मॉर्न नदीवरील पराभवानें केली. हें धाडसी धोरण प्रकट करीत असताना जर्मनीची ऐनी नदीवरील तटबंदीची तयारी चालली होती, व धाडसी धोरण फिसकटतांक्षणींच जर्मनी ह्या नवीन निर्माण केलेल्या तटबंदींत जाऊन स्वस्थ बसला. ही तटबंदी नॉन्सी, व्हर्डून, ऱ्हीम्स, सॉसेन, पेरोनी, बेल्जमची दक्षिण सरहद्द व ब्रुसेल्स येथपर्यंत पसरली असून, जर्मनी मोर्चे बांधून मोठ्या तोफाच्या व चरांच्या आश्रयानें फ्रान्सशीं लढत आहेत. सप्टेंबरचे पहिले दहा बारा

दिवस मॉर्न नदीच्या काठीं गेले व शेवटचे वीस दिवस ऐनी नदीच्या ह्या तटबंदीशीं झुंजण्यांत निघून गेले आहेत. सांप्रत म्हणजे आक्टोबरच्या प्रारंभास जर्मनीनें ॲंटवर्पच्या किल्ल्यावर बड्या तोफांचा भडिमार चालविला आहे. फ्रान्सवर अधिक हल्ला पुढें नेण्याचा जर्मनीचा हेतु दिसत नाहीं. प्रसंगीं अवचित जय मिळाल्यास पारिस–बाजूने जर्मन दोन पावलें पुढें येईल इतकेंच; त्याचप्रमाणें अवचित पराजय झाल्यास थोडक्याशा जागीं दहावीस मैल जर्मनीला हटावें लागेल इतकेंच, व अशा हटण्याची व्यवस्था लावण्याकरितां जर्मनीनें आपल्या सैन्याच्या मागच्या बाजूस चराची व मोर्चाची दुसरी तिसरी रांगहि निर्माण केली आहे. फ्रान्सनें जर्मनीचें हे धोरण ओळखून आपल्या सैन्यालाहि चराचें, मोर्चाचें व मोठ्या तोफांचे सहाय्य दिलें असून दोन्हीं दळें एकमेकांसमोर जणू काय एकमेकांनीं एकमेकाच्या किल्ल्याला वेढा दिला आहे, अशा रीतीनें एकमेकाशीं दोन हात करीत आहेत. ज्याच्यापाशीं पांच दहा लाख सैन्य हल्लींहून अधिक मिळेल त्याला शत्रूची फळी फोडतां येईल. जर्मनीपाशीं सांप्रत हें अधिक सैन्य नाहीं. ऑक्टोबरपासून फ्रान्सच्या बाजूची त्याची हालचाल थंडावली असून ऑक्टोबरमध्यें तो रशियाशीं झुंझण्यास तयार झाला आहे. खुद्द फ्रान्सला चार पांच लाख नवीन सैन्य रणभूमीवर अधिक आणतां येणें शक्य नाहीं. पुढें होणारी रोजची झीज व गेल्या दोन महिन्यांतील झीज फ्रान्स भरून काढील, पण एकदम एका मापानें पांच सहा लाख सैन्य आणल्याशिवाय जर्मनीनें बेल्जमला व ऐनीनदीच्या उत्तरेस फ्रान्सला मारलेली भगरमिठी सुटावयाची नाहीं. अशा प्रकारचा पुढें प्रसंग येईल हें लॉर्ड किचनेर यानीं लढाईच्या प्रारंभींच ताडलें होतें, व म्हणून लढाईच्या सुरवातीपासून त्यानीं पांच लाखाचें नवीन सैन्य इंग्लंडांत उभारण्यास आरंभ केला. ह्या नव्या सैन्याची भरती झाली असून आणखी दोन महिन्याच्या अवधींत रणक्षेत्रावर उभे राहण्यास ते लायक होईल. ह्या सैन्यास हिंदुस्थान, कानडा, ऑस्ट्रेलिया, ईजिप्त, आयर्लंड वगैरे प्रांतांतून दोन तीन लाख सैन्याची कुमक महिन्या दोन महिन्यांत पोंचणारी आहे. म्हणजे नोव्हेंबर महिन्यांत किंवा डिसेंबर महिन्यांत झीज भरून काढून ५–६ लाख सैन्याचा एक गोळा स्वित्झरलंडपासून ॲंटवर्पपर्यंत कोणच्या पाहिजे त्या जाग्यावर पाहिजे त्यावेळीं एकदम फेकण्याची शक्ति लॉर्ड किचनेर यांच्या मनगटांत येणारी

आहे. ऐनी नदीवरील व बेल्जममधील तटबंदीच्या झुंजीची ही स्थिति ध्यानांत घेता लॉर्ड किचनेर ह्यांच्या ह्या नवीन सेनेच्या तयारींतील दूरदर्शीपणा वाखाणावा तितका कमीच वाटतो. मॉर्न नदीवर ज्याप्रमाणें जय मिळविला, त्याप्रमाणें ऐनी नदीवर अखेरचा जय मिळवूं ह्या इच्छेनें नवीन सेनाशकटाची तयारी लॉर्ड किचनेर सांप्रत अधिक जलदीनें व अधिक तडफेनें करीत आहेत. तेव्हा हें नवीन अस्त्र अदाजापेक्षाहि बरेच लवकर जर्मनीवर सोडण्यात येण्याचा संभव आहे. ऑक्टोबरच्या प्रारभीं फ्रान्समध्ये व बेल्जममध्ये तटबंदीच्या धर्तीच्या स्वबचावाच्या युद्धास आरंभ करून जर्मन बादशहा केसर विल्यम रशियाकडे वळले आहेत. तेव्हा रशियाकडील रणभूमीकडेहि आपण आता नजर फिरवूं.

## रशियाच्या बाजूची रणभूमि

चालू महायुद्धाचा खरा निकाल फ्रान्सच्या बाजूच्या रणभूमींत लागावयाचा नसून रशियाच्या बाजूच्या रणभूमींत लागावयाचा आहे, हें प्रत्येक राष्ट्राचें उद्दिष्ट ज्यानीं ध्यानात धरिलें त्यास सागावयास नकोच. फ्रान्सच्या रणभूमींत निश्चयात्मक निर्णय एकाच योगानें लागू शकतो. तो योग म्हणजे एका पक्षाने दुसऱ्या पक्षाच्या रणशकटाचा पूर्ण विध्वंस करणें हा होय. पण गेल्या महिन्यातील फ्रान्सकडील हकीकत ध्यानात घेता असला योग तेथें दृष्टीस पडण्याचा फारसा संभव नाहीं, हें कोणीहि सागू शकेल. हा योग जर जुळून येत नाहीं, तर शत्रूच्या मुलुखात लढाई घालून टेकडाळ मुलूख जेथे संपतो व मैदानास सुरुवात होते, तेथें चर खणून मोर्चेबदी करून स्वस्थ बसण्यातच अधिक फायदा आहे. या न्यायाला अनुसरून जर्मनी सांप्रत ऐनी नदीवर मोर्चाच्या आड बसून रशियाकडे वळला आहे. या तटबदीमुळे शक्य तितके कमी लोक फ्रान्समध्यें ठेवून बाकीची सेना जर्मनीस रशियाकडे वळविता आली आहे. जर्मनीला आपले लोक कमी करता येऊ नये म्हणून फ्रान्सला वारवार या तटबदीवर हल्ले करावे लागतील, आणि लॉर्ड किचनेर घडवीत असलेलें पाच लाख सैन्याचें नवीन अस्त्र तयार होईतों रोजच्या दमचक्कीच्या असल्या हल्ल्याशिवाय अधिक महत्त्वाच्या गोष्टी ऐनी नदीवर घडून यावयाच्या नाहींत. रोज दमचक्की करून जर्मनीला इतके जेरीस आणून ठेवावयाचें कीं, लॉर्ड किचनेर यानीं आपला पाच लाखाचा गोळा फेंकावयाच्या वेळीं जर्मनी दमात उखडून जाऊन बेल्जममध्ये चारीमुडे चीत पडेल.

दमांत उखडण्याचा हा समय येईतों रशियाच्याच बाजूला रणदेवता संचार करणार हें उघड आहे. रशियाच्या बाजूच्या रणभूमीमध्यें कार्पेथियन पर्वत ही महत्त्वाची जागा आहे कार्पेथियन पर्वताच्या उत्तर–पूर्वेचा त्रिकोण म्हणजे गॅलिशियन प्रांत व्यापून दक्षिण–पश्चिमेचा त्रिकोण म्हणजे हंगेरियाचा निम्मा भाग रशियानें व्यापला म्हणजे रशियाचा इष्ट हेतु साधला. ज्या काटकोनाची त्रिज्या कार्पेथियन पर्वत होतो तो काटकोन रशियास पाहिजे आहे. तो रशियास मिळाल्यास रशिया सर्व्हियाशीं संलग्न होतो व बाल्कन प्रदेशाच्या सभोंवती रशियाचा विळखा बसून तुर्की साम्राज्य रशियाच्या पंजाखाली आयतें आल्यासारखे होते. रशियाची सर्व धडपड ह्या मोठ्या लाभासाठीं आहे. हा इष्ट हेतु सिद्धीस नेण्याकरिता रशियानें गॅलिशिया प्रांताच्या ईशान्य कोपऱ्यावर प्रथम स्वारी केली. रशिया जसजसा गॅलिशिया प्रांतात घुसेल, तसतसें रशियाचें स्वारीचें काम अवघड व्हावे म्हणून गॅलिशियाच्या वायव्य कोपऱ्यातून ऑस्ट्रियानें पोलंडमध्ये स्वारी केली. ही स्वारी करण्याचा हेतु इतकाच कीं, युद्ध पोलंडमध्यें म्हणजे शत्रूच्या प्रांतामध्ये पडून गॅलिशियावरील रशियाची स्वारी ढिली पडावी. पहिल्या दोन महिन्यात रशियाला या गॅलिशिया रणभूमींत पूर्ण यश आलें असून, गॅलिशियाचा वायव्य कोंपरा सोडून बाकी बहुतेक सर्व भाग रशियानें व्यापला आहे, व या भागाचा कार्पेथियन पर्वताचा उतारहि रशियाच्या ताब्यात गेल्यासारखा आहे. कार्पेथियन पर्वत ओलांडून हंगेरियन प्रांतात उतरण्याचे दोन तीन घाटहि रशियाच्या ताब्यांत गेले आहेत. गॅलिशियातील ऑस्ट्रियाचा सेनाशकट या पहिल्या दोन महिन्यांत रशियानें मोडल्यासारखा आहे. पोलंडमधून शिरलेलें ऑस्ट्रियाचें सैन्यहि गॅलिशियांतील या पराभवामुळें गॅलिशियाच्या वायव्य कोंपऱ्यापर्यंत मागे परतलें आहे. आतां रशियाला यापुढील मार्ग आक्रमावयाचा म्हणजे एक गॅलिशियाचा वायव्य कोंपरा घेऊन कार्पेथियन पर्वताचा सर्व उजवा उतार आपल्या ताब्यांत घ्यावयाचा आणि दुसरी दिशा म्हणजे या बाजूला विशेष जोर न करता हातीं पडलेल्या दोन तीन घाटांच्या रस्त्यानें कार्पेथियन पर्वताच्या पलीकडे हंगेरीमध्ये उतरावयाचें. हंगेरीमध्यें ह्या घाटांनीं उतरावें तर तें काम अवघड, जड तोफा व इतर अवजड सामान बरोबर घेऊन जाणें मुष्किलीचें व नेमक्याच घाटांनीं खालीं उतरावयाचें असल्यामुळें हल्ल्याहल्ल्यांनीं

जाणाऱ्या रशियन सैन्याचा समाचार हंगेरियन सेना सहज घेऊ शकेल. कार्पेथियन-मधल्या चार वाटा हंगेरियनाना माहीत. अशा स्थितींत पर्वताचा प्रत्येक भाग पूर्णपणें ताब्यांत घेऊन जड सामान वर चढवून प्रत्येक पाऊल उचलावें लागणार. रशियाला ही गोष्ट कर्तव्य आहे. पण तसें करण्यापूर्वी गॅलिशियाचा वायव्य त्रिकोणहि ऑस्ट्रियाच्या हातीं रहाता कामा नये. कारण त्या बाजूनें ऑस्ट्रियाचा व जर्मनीचा पिछाडीवर अवचित हल्ला चढून कार्पेथियन पर्वतावर चढून गेलेलें रशियन सैन्य पायबद्ध व्हावयाचें. तेव्हा ऑक्टोबर महिन्यांत रशिया गॅलिशियाचा हा वायव्य कोंपरा पूर्णपणें ताब्यात घेण्याचा उद्योग करील, व ह्या कोंपऱ्यांत ऑस्ट्रि-याच्या व जर्मनीच्या सरहद्दी गॅलिशियाशीं भिडल्या असल्यामुळे जर्मनी व ऑस्ट्रिया या दोघांच्याहि बड्या सैन्याशीं लढाई देईल. ह्या लढाईत जर्मन व ऑस्ट्रियन ह्या दोघांच्या सेनाशकटाचा विध्वस जर रशियानें केला तर हंगेरीमध्यें उतरण्यास रशियास कोणचीच हरकत नाहीं. सेनाशकट जर रशिया मोडू शकला, तर दातीं तृण धरून ऑस्ट्रिया तहाचें बोलणें लावील. बरें आपण अशी कल्पना घेऊ कीं, रशियाच्या हातून जर्मनी व ऑस्ट्रिया यांचा सेनाशकट ह्याठिकाणीं मोडवला नाहीं; जर्मनी व ऑस्ट्रिया याचा साधा पराभव होऊन ते शेंपन्नास मैल मागें हटले तर रशिया काय करील ? जर्मनीनें ज्याप्रमाणें फ्रान्समध्ये-ऐनी नदीच्या कांठीं तटबंदीची जागा तयार केली त्याप्रमाणें ऑस्ट्रिया व जर्मनी ह्याच्या खुद्द प्रदेशात शिरून मोर्चेबंदीस अनुकूल जागा पाहून तेथे बदोबस्तानें रशिया बसून राहील का चाल करून आत अधिक घुसेल ? अशावेळीं बर्लिन किंवा व्हिएन्नाकडे ऑष्ट्रिया व जर्मनी ह्याचे सेनाशकट शाबूत असताना अधिक आत घुसणें हें लष्करी धोरणाच्या दृष्टीनें इष्ट नाहीं. व्हिएन्ना किंवा बर्लिन घेणें हें उद्दिष्ट नव्हे. तेव्हा गॅलिशियाच्या वायव्य कोंपऱ्यात ऑक्टोबर किंवा नोव्हेंबर महिन्यात होणाऱ्या लढाईंत जर ऑस्ट्रो-जर्मनांचा नुसता पराभव झाला, तर ऐनी नदीच्या काठीं जर्मनीनें तट-बंदीची जी सृष्टि निर्माण केली, तसलीच सृष्टि गॅलिशियाला लागून असलेल्या जर्मन व ऑस्ट्रियन प्रदेशांत रशिया निर्माण करील. ह्या योगें ऑस्ट्रिया व जर्मनी या दोघांच्याहि सेनाशकटापुढें एक मोठा बागुलबुवा उभा केल्यासारखें होऊन कार्पे-थियन पर्वत ओलांडून हंगेरियांत उतरून सर्व्हियाशीं सलग्न होण्यास रशियास ठीक पडेल. सेनाशकट न मोडतां नुसत्या केलेल्या पराभवानें ऑस्ट्रिया किंवा जर्मनी

तहाचें बोलणें लावणार नाहीं, पण हंगेरियांत शिरून सर्व्हियाशीं संलग्न झाल्यानें सेनाशकट जरी शाबूत असले, तरीहि रशियास अग्रपूजेचा मुजरा करण्यास ऑस्ट्रिया तयार होईल. ह्या लष्करी धोरणाच्या दृष्टीनेंच साप्रत रशिया गॅलिशियाच्या वायव्य कोपऱ्यावर जोराची स्वारी करीत आहे. पूर्व गॅलिशियातला ऑस्ट्रियन सेनाशकट मोडलेला आहे. पोलंडमध्यें बरेंच आत घुसलेलें ऑस्ट्रियन सैन्य मागें परतलें आहे. वायव्य गॅलिशिया व वायव्य गॅलिशियास लागून असलेला रशियन पोलंडचा थोडकासा भाग ह्याठिकाणीं साप्रत ऑस्ट्रियाचा मुख्य सेनाशकट उभा असून रशियाच्या दुसऱ्या टकरीशीं तोंड देण्यास ऑस्ट्रिया तयार आहे. रशियाच्या सेनासागरापुढें पूर्व गॅलिशियांत ऑस्ट्रियाचा टिकाव लागला नाहीं. रशियानें आपलें मुख्य बल ह्याच ठिकाणीं पहिल्या महिन्यात ओतलें होतें. रशिया व ऑस्ट्रिया ह्यांच्या सैन्याची तुलना करता ऑस्ट्रियाचा निभाव न लागणे हें काहीं चमत्कारिक नव्हे. ऑस्ट्रियानें पूर्व गॅलिशियातील आपला सेनाशकट मात्र शाबूतपणे मागें घ्यावयास पाहिजे होता. जनरल फ्रेंच ह्याच्या सारखा सेनानायक ऑस्ट्रियापाशी नसल्यामुळे पूर्व गॅलिशियात ऑस्ट्रियाची दुर्दशा झाली. बेल्जम व फ्रान्स येथील बदोबस्तात जर्मनी गुतला असल्यामुळें जर्मनीची मदत पहिल्या दोन महिन्यात ऑस्ट्रियास झाली नाहीं. आता जर्मनीचें दहाबारा लाख सैन्य ऑस्ट्रियास मदत करण्यास रणभूमीवर उभे राहिलें आहे. ही जर्मनीची मदत कशी व कोणच्या ठिकाणीं पोहोंचणार याकडे आपण आतां नजर टाकू.

## पोलंडची रणभूमि

जर्मनीच्या बावीस आर्मी–डिव्हिजन्स म्हणजे जवळजवळ दहा लाख सैन्य सप्टेंबरअखेर रशियाच्या पूर्व सरहद्दीवर जुळून आक्टोबर प्रारभाला पोलडमध्यें घुसलें आहे. ह्या सैन्याचीं मुख्य ठिकाणें थॉर्न, पोसन व सॅलिशिया हीं आहेत. सॅलिशिया हा प्रात गॅलिशियाच्या वायव्य कोपऱ्यावर आहे. थॉर्न येथें महायुद्धाच्या पहिल्या महिन्यांतच रशियानें जर्मनीवर स्वारी केली होती, पण जर्मनीच्या क्रूपच्या मोठ्या तोफा रशियन सैन्यावर एकदम चाल करून गेल्यामुळें रशियन सेनापति लढाईत पडून रशियाची सेना मागें हटली. थॉर्न येथून पोलंडची राजधानी जें वारसा शहर ह्यावर एक जर्मन सैन्य चाल करून साप्रत जात आहे. थॉर्न शहर व पोसन शहर ह्यामधील पट्टा हा ह्या सैन्याचा पाया असून वारसा शहर

हें या सैन्याचें उद्दिष्ट आहे. अर्थात् थॉर्न, पोसन, वारसा ह्या तीन बिंदूंच्या त्रिकोणांत कोठेंतरी एक मोठी लढाई झाली पाहिजे. जर्मनीचें दुसरें मोठें सैन्य गॅलिशियामध्यें तळ देऊन बसलें असून, गॅलिशियाच्या पायावर उभें राहून पोलंडमध्यें घुसलें आहे. ह्यांतला निम्मा भाग वारसावर चाल करून जाणार व निम्मा भाग वायव्य गॅलिशियास मदत करण्यास वायव्य गॅलिशियास लागून असलेल्या पोलंडच्या भागांत उतरणार. अर्थात् वारसाचे दक्षिणेस व पश्चिमेस कोठेंतरी ह्या सैन्याशीं रशियाला लढलें पाहिजे. म्हणजे वायव्य गॅलिशिया, दक्षिण पोलंड, वारसाची पश्चिम बाजू व ईशान्य बाजू अशा चार ठिकाणीं चार मोठ्या लढाया जर्मनीशीं देऊन खुद्द गॅलिशियामध्यें ऑस्ट्रियाशीं एक लढाई रशियाला दिली पाहिजे. म्हणजे वायव्य गॅलिशिया धरून वार्सा व थॉर्न या पट्ट्यात एकसारखें युद्ध ऑक्टोबर व नोव्हेंबर महिन्यात चालू रहाणार. ह्या महायुद्धात जर रशियाला जर्मनीचा पराभव करतां आला निदान जर्मनीला जर्मनींत हटवून तटबंदी निर्माण करून पोलंड सुरक्षित ठेवता आलें, तरच गॅलिशियांतील पहिला मोठा विजय रशियाच्या पचनीं पडून, हंगेरीमध्यें उतरण्यास रशियास ठीक पडेल. पण पोलंडमधील या महायुद्धांत जर रशियाला माघार खावी लागली तर गॅलिशियात मिळविलेला विजय निरर्थक होईल. पोलंडमधील युद्धात रशियाला माघार खावी लागली तर कसें ? रशियाचा सेनाशकट जर्मनीला मोडतां येईल काय ? पोलंडमध्यें खुद्द रशियातून रशियाचे दोन तीनच आगगाडीचे फाटे जातात. अर्थात् रशियाला माघार खावी लागली म्हणजे ठराविक रस्त्यानेंच माघार खाल्ल्याशिवाय मागची कुमक मिळणार नाहीं. माघार खाण्याचे जेथें नियमित रस्ते असतात तेथें दगडाखालीं सांपडलेला हात काढून घेणें फारच कठीण पडतें. पण रशियापाशीं जर्मनी व ऑस्ट्रिया यांच्याहून फार अधिक सेना असल्यामुळें पोलंडमध्यें रशियास जय मिळण्याचा संभव अधिक आणि जय न मिळाल्यास अव्यवस्थित माघारीचा प्रसंग तर रशियावर येणारच नाहीं. बरें, हा व्यवस्थित माघारीचा प्रसंग रशियावर येऊन रशिया वार्साच्याहि मागें गेला तर कसें ? अशा प्रकारची लढाई वर्षानुवर्षें झुंजण्याची ताकद रशियाच्या अंगांत आहे, व लॉर्ड किचनेर यांचें नवें अस्त्र आणखी सहा महिन्यांनीं तयार होऊन बेल्जममध्यें तें जर्मनीच्या अंगावर फेंकलें जाईतों रशिया पोलंडच्या बाजूला माघार

खात खात जर्मनीला पूर्ण गुंतवून ठेवील. रशियानें जर माघार खाल्ली तर महिना दीड महिन्यातच म्हणजे नोव्हेंबर महिन्याच्या दुसऱ्या किंवा तिसऱ्या आठवड्यात कोठें तरी योग्य जागा पाहून ऐनी नदीप्रमाणेंच मोर्चेबंदी बांधून, मोर्चेबंदीच्या आत बंदोबस्तानें बसून त्या बाजूचें पाच सात लाख सैन्य मोकळें करणें जर्मनीला जरूर आहे. अशा माघारीच्या प्रसंग जर रशियावर आला, तर पोलंडमध्यें व पूर्व गॅलिशियामध्यें ऑस्ट्रिया व जर्मनी मोर्चेबंदी केल्याशिवाय रहाणार नाहींत; किंबहुना मनामध्यें आधींच आखून ठेवलेलें मोर्चेबंदीचें सोईस्कर ठिकाण गाठणें हाच जर्मनीचा पोलंडमध्यें महायुद्धात उद्दिष्ट हेतु आहे. अशा रीतीनें मोर्चेबंदीचा आश्रय माघार खाल्लेल्या शत्रूच्या तोंडावर जर्मनीला मिळाल्यास पोलंडमधील मोर्चेबंदी फोडण्याइतकी तयारी करण्यास रशियाला पुन्हा तीन चार महिने तरी लागतील. ह्या अवधींत म्हणजे महायुद्धाच्या पाचव्या सहाव्या महिन्यात जर्मन सैन्याचा काहीं भाग लॉर्ड किचनेर याच्या नव्या अस्त्राचा बंदोबस्त करण्यास बेल्जममध्ये येईल. व काहीं भाग सर्व्हियावर हल्ला करून मॅसिडोनिया घेऊन, लढाईतील ऑस्ट्रियाचा अखेरचा हेतु पाचव्या सहाव्या महिन्यात सॅलेनोंका येथें साध्य करून देईल; म्हणजे ऑक्टोबर नोव्हेंबर महिन्यात पोलंडच्या महायुद्धांत जर रशियाची सरशी झाली तर रशिया हंगेरीमध्यें पाचव्या सहाव्या महिन्यांत शिरून ऑस्ट्रियाचे महायुद्धाचे मूळ मनोरथ सफळ करून घेईल, आणि जर्मनीची सरशी झाली तर जर्मनीहि पाचव्या सहाव्या महिन्यात सर्व्हिया मॅसिडोनियामध्यें शिरून ऑस्ट्रियाचे मनोरथ सफल करील. ह्या दृष्टीनें विचार केलाअसतां पोलंडमधील महायुद्ध हें मुख्य युद्ध असून तेथील लढाया सर्वांत अधिक महत्त्वाच्या आहेत. ह्या लढायात रशियास यश यावें म्हणून व जर्मनीस बेल्जमच्या बाजूनें तंबी मिळावी म्हणून लॉर्ड किचनेर याच्या नव्या सैन्याची तयारी सहा महिन्याच्या ऐवजीं तीन महिन्यातच शेवटास नेल्यावाचून राहणार नाहीं व विस्तीर्ण इंग्रजी साम्राज्याचीहि आटोकाट खटपट सांप्रत याच दृष्टीनें चालू आहे. बेल्जममध्यें ऑक्टोबर व नोव्हेंबर महिन्यातच जर्मनीला तंबी देण्याचा जसा लॉर्ड किचनेर ह्याचा उद्योग सांप्रत जारीनें सुरू आहे त्याप्रमाणें ईशान्य प्रशियावर स्वारी करून तेथें पोलंडवर चाल करून जाणाऱ्या जर्मन सैन्यास पायबंद करण्याचा रशियाचा दुसरा एक उद्योग महायुद्धाच्या प्रारंभापासूनच सुरू आहे. ईशान्य दिशेनें

एक मोठा रशियाचा लोंढा कॅनिंग्जबर्ग किल्ल्यापर्यंत जर्मनीमध्यें घुसला. या रशियन सैन्यास सांप्रत जर्मनीनें मागें परतविलें असून उलट जर्मनी रशियात त्या बाजूला चाळीस पन्नास मैल घुसला आहे. रशियाची राजधानी पेट्रोग्रेड (सेंट पिटर्सबर्ग) येथून वार्साकडे आगगाडीचा एक फाटा जातो तो फाटा ताब्यात घेऊन वार्साचा पेट्रोग्रेडशीं असलेला संबंध तोडण्याचा जर्मनीचा हेतु दिसतो. पण ह्या बाजूचें रणक्षेत्र महत्त्वाचें नसून पोलंडच्या रणक्षेत्राच्या पायबंदीसंबंधाचेंच हें रणक्षेत्र आहे. येथें रशियानें थोडीशी माघार खाल्ली तरी जर्मनी पेट्रोग्रेडवर चाल करून जाऊं शकत नाहीं. कारण पोलंडचें महाक्षेत्र संभाळून पेट्रोग्रेडच्या बाजूला दुसरें महाक्षेत्र थंनविण्याचें सामर्थ्य जर्मनीच्या अंगात मुळींच नाहीं. पेट्रोग्रेडच्या बाजूनें पोलंडच्या महाक्षेत्रास पायबंद करण्यापुरताच जर्मनीचा हा उद्योग आहे. हा पायबंद स्वतःस न बसतां जर्मनीस उलट पायबंद करण्याकरितां ईशान्य प्रशियात घुसण्याचा रशियाचा उद्देश आहे. पोलंडातील क्षेत्रास आपण मुख्य महाक्षेत्र म्हणूं आणि ईशान्य प्रशिया किंवा त्याला लागून असलेला रशियाचा निमेन नदीकांठचा प्रांत यास आपण पायबंदीचें क्षेत्र म्हणूं, ऑक्टोबर प्रारंभाला जर्मनीनेंहि निमेननदी ओलांडून जाण्याचा प्रयत्न केला असून त्या प्रयत्नात जर्मनीस यश न येऊं देण्याची खबरदारी रशियानें घेतली आहे. पायबंदीच्या ह्या उद्योगात बाल्टिक समुद्रांतील जर्मनीचें आरमार जर्मन सैन्यास मदत व्हावी म्हणून निमेन नदीच्या तोंडाच्या जवळील रशियन किनाऱ्याच्या आसपास संचार करूं लागलें आहे. ह्या किनाऱ्यावर कोठें तरी मोठें जर्मन सैन्य उतरून तेथून पायबंदीच्या सैन्यास कुमक करून पेट्रोग्रेड व वार्सा यामधील संबंध तोडण्याचा जर्मनीचा हा दुसरा उद्योग आहे. ह्या दुसऱ्या उद्योगाचा विचार करितांना महायुद्धातील आरमारी लढाईकडे वळणें जरूर आहे.

## इंग्रजांचें अजिंक्य आरमार

निमेन नदी ओलांडून जाण्याच्या जर्मनीच्या प्रयत्नास जर्मनीच्या आरमाराचा उपयोग सांप्रत होत आहे. जर्मनीच्या सरहद्दीपासून रीगाच्या आखातापर्यंत विंडो, लिबा किंवा मेमेल ह्यापैकीं कोठेंतरी सैन्य उतरून निमेन नदीच्या उत्तरेस असलेल्या रशियन सैन्यास तंबी देण्याचा जर्मनीचा घाट दिसतो. ह्या ठिकाणीं जर मोठेंसे सैन्य जर्मनीला समुद्रात उतरवितां आलें, तर निमेन नदीच्या कांठची लढाई रिगाचे आखातावर असलेल्या रिगा बंदरापर्यंत ढकलण्यास हरकत येणार

नाहीं. निमेनच्या उत्तरेस रिगा बंदरापर्यंतच्या द्वीपकल्पांत समुद्राच्या जोरावर लढाई ढकलण्यात जर्मनीचें नुकसान नाहीं. कारण ही लढाई पायबंदीच्या स्वरूपाची आहे. कोठेतरी आगलट आल्यास समुद्राच्या किंवा जमिनीच्या बाजूनें पळ काढण्यास हरकत नाही. म्हणजे रिगाच्या आखातात रिगा, विंडो व लिबा या बंदराच्या द्वीपकल्पात गनिमी काव्याची लढाई समुद्रातून आरमाराच्या जोरावर लवकरच सुरू होईल हे सर्व भाग पेट्रोग्रेडजवळ असल्यामुळे जर्मन लोक जितके सैन्य उतरू शकतील त्याच्यापेक्षा कितीतरी पट अधिक सैन्य रशियाला ह्या बाजूला गुतवून ठेवावे लागेल. व त्यामुळे थोडक्या सैन्यावर पायबंदीचें बरेचसें काम भागेल. रशियाचा सेनासागर या सर्व कल्पनांना पुरून उरून पुन्हा अफाटच्या अफाट शिल्लक रहाण्याइतका विस्तीर्ण असल्यामुळे विंडोच्या आसपासच्या चकमकींना चोरट्या लढाईहून अधिक महत्त्व केव्हाहि येणे शक्य नाहीं. पण ह्या ठिकाणीं असा प्रश्न उद्‌भवतो कीं, साप्रतच्या महायुद्धात रशियाच्या दोस्तापाशीं म्हणजे इग्लडपाशीं अजिंक्य आरमार असताना जर्मनीने विंडोच्या आसपास सैन्य उतरविण्याचा प्रयत्न करावा म्हणजे काय? बाल्टिक समुद्रात रशियाच्या आरमाराशीं तुलना करता जर्मनीचें आरमार मोठें बलाढ्य दिसते ही गोष्ट खरी; पण इग्लडच्या आरमारानें बाल्टिक समुद्रात का येऊ नये ? बाल्टिक समुद्रात सचार करण्यास तरी मुभा जर्मन आरमारास कशी मिळते? याचे उत्तर असें आहे कीं, इग्लडचे अजिंक्य आरमार साप्रत उत्तर समुद्रात कील कॅनॉलमध्यें जर्मनीच्या आरमाराचा कोंडमारा करण्यात गुतलेले आहे. कीलकॅनॉलच्या उत्तरेला डेन्मार्क असून कॅनॉलचें एक तोंड बाल्टिक समुद्रात बाहेर पडतें, तर एक तोंड उत्तर समुद्रात बाहेर पडतें. आतां आपण अशी कल्पना करू कीं, इग्रजी आरमाराला कील कॅनॉलच्या बाल्टिक समुद्रातील तोंडाचाहि कोंडमारा करावयाचा आहे. ह्या तोंडाचा कोंडमारा करण्याकरितां उत्तर समुद्रातून निघून सबंध डेन्मार्क देशाला वळसा देऊन नार्वे आणि स्वीडन याच्या खालून इग्रजी आरमाराला बाल्टिक समुद्रातील कील कॅनॉलच्या तोंडापाशीं आलें पाहिजे. जर्मन आरमार मात्र कील कॅनॉलच्या उत्तर समुद्राकडील तोंडापासून बाल्टिक समुद्राच्या तोंडाकडे कॅनॉलमधून पटदिशीं जाऊं शकतें. उत्तर समुद्रातील व बाल्टिक समुद्रांतील ह्या कॅनॉलचीं दोन्ही तोंडे दुर्भेद्य अशा किल्ल्यानीं सुरक्षित करून ठेविलीं आहेत. तेव्हां समुद्रांत दूरवर आंत उभें राहूनच या तोंडांना

लांबचा आरमारी वेढा देऊन कील कॅनॉलमध्यें जर्मन आरमाराचा कोंडमारा इंग्रजांना करावा लागत आहे. हा असला लांबच्या वेढयाचा कोंडमारा उत्तर समुद्रात तेवढा का, बाल्टिक समुद्रात का नाहीं, ह्याचें उत्तर असें आहे कीं, इंग्रजापाशीं सुमारे तीस ड्रेडनॉट तऱ्हेचीं लढाऊ जहाजे आहेत, तर जर्मनीजवळ वीस ड्रेडनॉट आहेत फ्रान्सची दहा ड्रेडनॉटें इंग्लंडला उत्तर समुद्रात आणतां येणें शक्य आहे, म्हणजे उत्तर समुद्रात इंग्रजाचीं चाळीस ड्रेडनॉटें तर कील कॅनॉलात लपून बसलेलीं वीस जर्मन ड्रेडनॉटें अशी स्थिति होते. ड्रेडनॉट तऱ्हेचीं पहिल्या नंबरचीं लढाऊ जहाजे वगळलीं तर दुय्यम प्रकारची लढाऊ जहाजे इंग्रजापाशीं जर्मनीहून शेकडों अधिक आहेत पण खाशा स्वारीची लठ्ठालठ्ठी होऊन जाईतोपर्यंत ह्या दुय्यम प्रकारच्या जहाजाचा ड्रेडनॉटाच्यापुढें फारसा टिकाव लागत नाहीं. म्हणून कील कॅनॉलमध्यें लपलेल्या वीस जर्मन ड्रेडनॉटाची विल्हेवाट उत्तर समुद्रात असलेल्या इंग्लंड व फ्रान्स यांच्या सुमारें चाळीस ड्रेडनॉटानींच प्रथम लावली पाहिजे ही चाळीस ड्रेडनॉटें बाहेर समुद्रात उभी आहेत; म्हणून त्यांच्या भीतीने इंग्रजाच्या आरमारी खात्याचे मुख्य प्रधान मि. विनसेंट चर्चिल यांनीं परवा म्हटलें त्याप्रमाणें, हे जर्मन वीस ड्रेडनॉटाचे उंदीर कील कॅनॉलच्या बिळांत लपून बसले आहेत. बाहेरच्या चाळीस ड्रेडनॉटांपैकीं वीस ड्रेडनॉट उत्तर समुद्रात, वीस ड्रेडनॉट बाल्टिक समुद्रात अशी वाटणी करून दोहोंकडच्या तोंडांना इंग्रज व फ्रेंच आरमार गराडा का देत नाहीं ? इंग्रजानीं जर आपल्या ड्रेडनॉटाची अशी वाटणी केली तर कोणच्या तरी एका बाजूला वीस किंवा वीसहून कमी ड्रेडनॉटें शिल्लक रहाणार. कील कॅनॉलमधील वीस जर्मन ड्रेडनॉटें मर्जीस येईल त्या तोंडानें समुद्रात बाहेर पडूं शकतात. ज्या तोंडाला वीस किंवा वीसहून कमी ड्रेडनॉटें आहेत त्या तोंडानें वीसच्या वीस जर्मन ड्रेडनॉटें बाहेर पडलीं, आणि आरमारी युद्धास आरंभ केला तर काय ? ड्रेडनॉटाची संख्या जवळ जवळ सारखी असल्यामुळें म्हणजे वीसला वीस पडल्या-मुळें कदाचित् जर्मनीलाहि जय येण्याचा संभव आहे. एकदा पहिला वीस ड्रेडनॉटांचा हप्ता समुद्राच्या तळाला पाठविला, नंतर दुसरा शिल्लक राहिलेला वीस ड्रेडनॉटांचा हप्ता समुद्राला अर्पण केला म्हणजे शिल्लक राहिलेलीं जर्मन ड्रेडनॉटें, सांप्रत इंग्रजी आरमार अजिंक्य म्हणून जसें चोहोंकडे फिरतें, त्याप्रमाणें जगभर फिरूं लागणार;

असला जय मिळण्याची अर्धवट व पुसट संधि तरी जर्मनीला कां द्यावयाची ? आज इतके कोणाचें नडलें आहे कीं, सुखाचा जीव मुद्दाम होऊन कसें होतें काय होते ह्या धगधुगीत अशतः तरी घालावयाचा ? आरमारी लढाईचें धोरण असें निश्चित आहे कीं, कोणच्याहि कारणासाठीं किंवा मोहासाठीं इंग्रजी ड्रेडनॉटाची विभागणी करावयाची नाहीं. जर्मन ड्रेडनॉटाना ज्यावेळीं लढण्याचा प्रसग येईल त्या वेळेला बत्तीसच्या बत्तीस किंवा चाळीसच्या चाळीस इंग्रजी ड्रेडनॉटाशींच लढावें लागेल. वीस किंवा विसापेक्षा कमी अशा ड्रेडनाटाशीं लढण्याची संधीच त्याना केव्हांहि मिळणार नाहीं, अर्थात् कील कॅनॉलच्या बिळात दडून बसण्याशिवाय ह्या उदराना दुसरें तिसरें काम नाहीं. मग बाल्टिक समुद्रात सबंधच्या सबंध इंग्रजी आरमार का येत नाहीं ? सबंधच्या सबंध इंग्रजी आरमारानें बाल्टिक समुद्रात यावे तर कील कॅनॉलमधील 'प्लेगचे' वीस उंदीर उत्तर समुद्रात सचारास बाहेर पडून इंग्रजी व्यापारी जहाजाना व क्रूझरे आदिकरून दुय्यम प्रकारच्या लढाऊ जहाजाना प्लेगची बाधा करण्यास किमपीहि कमी करणार नाहींत अशा स्थितींत इंग्रजी आरमाराला एकच मार्ग मोकळा आहे, तो हा कीं, आस्ते आस्ते उत्तर महासागरातून कील कॅनॉलचें तोंडच आपल्या कबजात घ्यावयाचें. हें तोंड किल्ल्यानीं अत्यंत बळकटीचें केलेलें आहे हें खरें; पण बलाढ्य इंग्रजी आरमार त्या तोंडाचें मालक जरी झालें नाहीं तरी त्या तोंडात महिना दोन महिने न निघेल अशी गुडदी बसविण्यास कमी करणार नाहीं. ही गुडदी बसविण्याचा प्रयत्न करताना कांहीं क्रूझरे व एखादें ड्रेडनॉट नष्ट होण्याचाहि संभव आहे, पण एकदा उत्तर समुद्रांत गुडदी बसली म्हणजे बाल्टिक समुद्रात सचार करून जर्मनीच्या बंदरावर भडिमार करण्यास इंग्रजी आरमाराला अडथळा उरणार नाहीं उत्तर समुद्रात कील कॅनॉलचें तोंड बंद पडेपर्यंत इंग्रजी आरमार बाल्टिक समुद्रात येणार नाहीं, अर्थात तोंपर्यंत जर्मन आरमार रशियाच्या किनाऱ्यासभोंवतीं सचार करीत राहून ठिकठिकाणीं थोडेसे जर्मन सैन्य उतरविण्याचा प्रयत्न करणार; त्यास इलाज नाहीं. ह्या महायुद्धात साधल्यास जर्मनीच्या आरमाराचा फडशा उडविण्याचा इंग्रजाचा हेतु आहे व बिळातले हे उंदीर बाहेर काढण्याचा इंग्रजी आरमारानें आटोकाट उद्योग चालविला आहे. पण हा उद्योग करताना यत्किंचितहि यशाची संधि शत्रूला द्यावयाची नाहीं असे इंग्रजाचे आरमारी धोरण आहे. कारण जर्मनीचें

आरमार थोडावेळ बाल्टिक समुद्रात संचार करीत राहिलें तर लहानसें सैन्य रशियांत उतरविण्यापलीकडे करणार तरी काय ? रशियाच्या सेनासागरापुढें ह्या लहानशा सैन्याची त्रिशाद ती काय ? आणि त्याकरिता जर्मनीला चुकून तरी आरमारी जय येईल अशी संधि तरी का द्या ? ऑक्टोबर महिन्यांत उत्तर समुद्रात कील कॅनॉलच्या तोंडाशीं पहाऱ्याचें काम करीत असतांना जर्मनीच्या समद्रात बुडून चालणाऱ्या छोटया बोटींनीं इंग्लंडचीं तीन क्रूझरें बुडविलीं. इंग्रजांपाशीं क्रूझरें इतकीं पुष्कळ आहेत कीं, असल्या अपघाताचे आणखी कांहीं प्रसंग जरी आले तरी त्याची यत्किंचित्‌हि पर्वा करण्याचें कारण इंग्रजांना नाहीं. इंग्रजी आरमारानें आजपर्यंत जर्मनीचीं सुमारें चारशें व्यापारी जहाजे पकडलीं असून जर्मनीनें इंग्रजाची ऐशीं नव्वदच जहाजें पकडली आहेत. म्हणजे इंग्रजानीं जर्मनीचा समुद्रावरील व्यापार पहिल्या दोन महिन्यातच अगदीं संपुष्टात आणला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. इंग्रजी आरमारानें कील कॅनॉलला गुडदी मारण्याचें काम जरी तडीस नेलें नाहीं व हल्ली आहे ही स्थिति जरी महायुद्धाचे अखेरपर्यंत कायम ठेविली तरी देखील आरमारानें आपली कामगिरी चोख रीतीनें बजाविली असेच होईल.

## हिंदुस्थानची राजनिष्ठा

जर्मनीच्या आरमारानें जीं इंग्रजांची ऐशीं नव्वद जहाजें बुडविलीं म्हणून वर लिहिलें आहे, त्यांत बंगालच्या उपसागराच्या वाटणीला पाच व अरबी समुद्राच्या वाटणीला चार-पाच आलीं आहेत एमडेन नावाचें एक जर्मन पळपुटें क्रूझर सांप्रत हिंदी महासागरात संचार करीत आहे. एमडेन नावाचें एक क्रूझर नसून त्याच नावाचीं दोन क्रूझरें आहेत असाहि कांहींचा तर्क आहे. या क्रूझरनें थोडया दिवसांपूर्वी कलकत्त्याजवळ चारपांच जहाजे बुडविलीं. तीनचार जहाजे पकडलीं म्हणजे एका जहाजावर पकडलेल्या जहाजावरील सर्व इसम घालवावयाचे, पकडलेल्या इसमाना सौजन्यानें वागवावयाचे, आणि कोणच्या तरी जवळच्या बंदराकडे पकडलेल्या इसमाची रवानगी करून देऊन रिकामीं जहाजें मालासकट समुद्रांत बुडवावयाचीं, असा एमडेनचा क्रम आहे. एमडेन जहाजाची रचनाच पळताना तें सर्वांहून अधिक धूम ठोकील अशी केलेली असल्यामुळें इंग्रजी क्रूझरांच्या हातीं लागण्यापूर्वीच आणखी कांहीं थोडीशी वाटमारी हें एमडेन करील असा अंदमास आहे. एमडेननें जाता जाता मद्रास शहरावरहि पंधरा वीस गोळे टाकून, बर्मा-

ऑईल कंपनीच्या बंदरावरील तेलाच्या मोठया सांठयास आग लावली, दहा वीस जखमी करून ठार केले व हायकोर्टासारख्या मोठया इमारतींनाहि थोडासा चाट लावला. एमडेनच्या ह्या असल्या उपद्व्यापामुळे रंगून, कलकत्ता, मद्रास, मुंबई वगैरे ठिकाणच्या व्यापारास थोडासा खार लागला आहे. पण सर्व ठिकाणचे व्यापारी व इतर लोक असल्या ह्या क्षुल्लक गोष्टीकडे लक्ष देत नसून महायुद्धातील अपरिहार्य नुकसान म्हणून दमानें आपले उद्योगधंदे चालवून सरकारास योग्य ती मदत मोठया आनंदानें व उत्साहानें देत आहेत. इंग्रजी आरमाराच्या अजिंक्य शक्तीवर दृढ विश्वास एमडेनसारख्या डासाच्या चाव्यानें यत्किंचित्‌हि उडणें शक्य नाहीं. इंग्रजी राष्ट्राची आरमारी व व्यापारी पत पूर्वीइतकीच महायुद्धाच्या दोन महिन्यानंतरहि का कायम रहाणार नाही ? हें महायुद्ध इंग्रजाच्या अगदीं उलट गेलें अशी जरी कल्पना केली, तरी इंग्रजाचें असें कोणचे नुकसान होणार आहे ? इंग्रजाचे आरमारी वर्चस्व नष्ट होणार नाहीं, इतकेच नव्हे तर इंग्रजाच्या भूमीपैकीं एक कणहि शत्रूच्या हातीं लागणार नाहीं. अमेरिका, जपान, इटली, आशिया खंड, आफ्रिका खंड येथे कोणा युरोपियन राष्ट्राला अल्पव्याजानें कर्ज उभारता येण्यासारखे असले तर ते एकटया इंग्रजाना. कोणास ठाऊक युद्धाच्या अखेर काय होईल ते, अशी दुष्ट शंका मनात घेऊन जर कोणी कोणाचा गैरविश्वास केला तर तो प्रथम ऑस्ट्रियाचा करील, जर्मनीचा करील अगर रशियाचा करील, अगर फार झालें तर फ्रान्सचा करील; पण इंग्रजाचा गैरविश्वास कोणीहि करणार नाहीं, अशी आज इंग्रजाची शक्ति व नीति आहे. लढाईचे अखेरीस जर्मनीस जय मिळाला तरी इंग्रजाचे काही नुकसान होणार नाहीं हें तर खरेच, पण विजयी जर्मनीपासूनहि लॉर्ड किचनेर याचे दुसरें भव्य सैन्य बेल्जमला हिसकावून घेण्यास कमी करणार नाहीं. जर्मनीहि इंग्लंडचें हें बळ ओळखून असावा असे दिसतें. कारण, अँटवर्पचा किल्ला घेऊन बेल्जमपैकीं लीज व अँटवर्प एवढाच पट्टा ताब्यात ठेवून बाकीचा पट्टा सोडावा लागल्यास सोडण्याची तरतूद जर्मनीने एव्हापासूनच आरंभिली आहे. अँटवर्प व लीजचा पट्टा ताब्यात घेऊन बाकीचा बेल्जम पुन्हा स्वतंत्र करण्याचा इरादा जर्मनीचा ह्या तरतूजीवरून जरी दिसत असला, तरी अँटवर्प व लीज हीं ठाणीं इंग्रज जर्मनीला पचूं देणार नाहीत. राजनिष्ठ हिंदुस्थानातून व इंग्रजांच्या वसाहतींतून लाखों सैन्य बेल्जममध्यें उतरेल व लढाईच्या प्रारंभीं लॉर्ड

किचनेर ह्यांनीं म्हटल्याप्रमाणें इंग्रजांच्याच अटी कबूल करून जर्मनीला तह करावा लागेल. हिंदुस्थानची राजनिष्ठा व वसाहतींचें प्रेम ह्याची विलक्षण मदत इंग्लंडला सांप्रतच्या प्रसगीं झालेली आहे, व महायुद्धाचा शेवट होईपर्यंत ती तशीच होत राहील यांत शंका नाहीं. हिंदुस्थानच्या राजनिष्ठेसंबधानें पायोनियरसारख्या पत्रांतून कांहीं कुत्सित शंका काढण्यांत आल्या आहेत. असल्या शंकांनीं इंग्लंडच्या प्रजावात्सल्याच्या व हिंदुस्थानच्या राजनिष्ठेच्या महोदधीवर कितीहि कुत्सित फुंकर घातले, तरी त्याचा काय उपयोग होणार आहे ? हिंदु व मुसलमान संस्थानिक, हिंदु व मुसलमान व्यापारी, व इतर सर्व सामान्य लोक अहमहमिकेनें ह्यावेळीं इंग्लंडला यथाशक्ति मदत करीत आहेत. कारण, त्यांची राजनिष्ठा म्हणजे न समजणारा व समजू देता न येणारा एक अद्भूत मनोविकार नसून शांत विचाराच्या अंतीं स्थिर झालेल्या बुद्धीला आलेलें एक फळ आहे.

---

# आक्टोबर–नोव्हेंबर महिना



महायुद्धाचीं रणक्षेत्रे तीन असून पश्चिमेकडील रणक्षेत्र, पूर्वेकडील रणक्षेत्र व दक्षिणेकडील रणक्षेत्र अशी त्याचीं सामान्यतः नावें आहेत. पश्चिमेकडील रणक्षेत्रात बेल्जम व उत्तर फ्रान्स याचा समावेश होत असून पूर्वेकडील रणक्षेत्रात पूर्व पर्शिया, पोलंड व ऑस्ट्रियाचा गॅलिशिया प्रात याचा समावेश होतो; आणि दक्षिण क्षेत्रात सर्व्हिया व त्याचा आसपासचा प्रदेश यांचा समावेश होत असून या दक्षिण क्षेत्रातच लढाईच्या पहिल्या तोफेचा गोळा पडला! पश्चिम व पूर्व क्षेत्रातील लढायाच्यापुढें दक्षिण क्षेत्रातील लढाई अत्यत फिकी पडणारी असल्यामुळें तेथील डावपेचाचें वर्णन गेल्या खेपेस अगदीं थोडक्यात देण्यात आलें होतें. आक्टोबर महिन्यातहि सर्व्हियाच्या बाजूला विशेष महत्त्वाची गोष्ट घडून आली नाहीं. सर्व्हियाची राजधानी बेल्ग्रेड शहर याजवर ऑस्ट्रियाच्या तोफाचा भडिमार होत होता व आठ दहा आठवडे भडिमार होऊन अर्धेमुर्धे कायतें तें शहर जळले, येवढीच सबंध आक्टोबर महिन्यात सर्व्हिया सबधाची बातमी प्रसिद्ध झालेली आहे. सर्व्हियाचें व माउंट निग्रोचें सैन्य ऑस्ट्रियाच्या बोसनिया प्रातात शिरून बोसनियाच्या राजधानीवर सप्टेंबर महिन्यातच चाल करून गेले; पण अद्याप राजधानीचें शहर त्यानीं हस्तगत केलें नाहीं. सर्व्हिया व माउटनिग्रो याच्याकडून ऑस्ट्रियास विशेष तबी बसण्याचा अता रग दिसत नाहीं. उलट तुर्कस्थान या महायुद्धात जर्मनीच्या बाजूनें सामील झाल्यामुळे दक्षिण रणक्षेत्राची सीमा काळा समुद्र व पूर्व मध्यसमुद्र व इजिप्त येथपर्यंत वाढलेली आहे. तुर्कस्थान जर्मनीच्या बाजूनें होऊन इंग्लड व रशिया याच्याविरुद्ध लढू लागल्यामुळें युरोपला महायुद्धाचें झालेलें करट चिघळलें असून आफ्रिका खडात इजिप्त, ऑशिया खडात ऑशियामायनर, अरबस्थान, इराण, अफगणिस्थान व मध्य एशिया या मुसलमानी राष्ट्रानाहि त्याच्या लसेची बाधा होण्याचा सभव आहे. तुर्कस्थानची राजधानी कॉन्स्टाण्टिनोपल येथे ह्या लसेची प्रयोगशाळा जर्मनीला कशी स्थापन करतां आली व तेथून लढाईचें वीष सर्व मुसलमानी राष्ट्रात जर्मनी कसें फैलवीत आहे, याचें विवेचन

लढाईच्या धोरणाच्या दृष्टीनें फार महत्वाचें आहे. पण त्या विवेचनास सुरुवात करण्यापूर्वी आपण पूर्वेकडील व पश्चिमेकडील रणक्षेत्राची स्थिति प्रथम अवलोकन करू.

## पश्चिम रणक्षेत्र

पश्चिम रणभूमीचें ईशान्य फ्रान्स, उत्तर फ्रान्स व बेल्जम असे तीन विभाग होतात. आक्टोबर महिन्याच्या प्रारंभीं आईन नदीच्या काठीं जर्मन सैन्य तटबदी धरून बसलें होतें, व ह्या तटबदीची फळी फोडण्याचा उद्योग फ्रेंच सैन्यानें आरंभला होता. आक्टोबर महिन्याची ही स्थिति नोव्हेंबर महिन्याच्या प्रारंभींहि जशीच्या तशीच आहे. रोज आईन नदीवर लढाई होते, तोफाचा भडिमार होतो आणि एक पक्ष एक मैल पुढे जातो, तर दुसरा पक्ष मैल अर्धा मैल मागे हटतो, अशा प्रकारे सबध महिनाभर आईन नदीच्या पाण्याला जर्मन व फेंच सैनिकाच्या रक्ताचा तांबडा रग येत होता. आईन नदीवरील ही तटबदीची फळी फोडण्याची धमक नोव्हेंबर महिन्यात जर्मन किंवा फ्रेंच यापैकीं कोणाच्या अगात येईल, असें चिन्ह दिसत नाही. ही फळी फोडण्याची होईल तितकी शिकस्त फ्रेंचानीं आक्टोबर महिन्यात केली. मनुष्यबल जितके खर्ची घालणे फ्रान्सला शक्य होते तितके फ्रान्सनें खर्ची घातले; पण जर्मनीनें आईन नदीची तटबदी इतकी मजबूत केली आहे, व या तटबदीचे सरक्षण करण्याचें काम मनुष्यबलापेक्षा यत्रबलानेच करण्याचा उद्योग जर्मनीनें इतक्या व्यवस्थितपणें आरभिला आहे, कीं ह्या तटबदीवर तुटून पडून एकदम फळी फोडण्याचा नाद फ्रान्सनें जवळजवळ सोडून दिला आहे. फ्रान्स जवळ रिझर्व सैन्य अद्याप लागेल तितके आहे. पण हे लाखो रिझर्व सैन्य आईन नदीवर खर्ची घालणें इष्ट नाहीं. ह्या रिझर्व सैन्याचा उपयोग इतरत्र करणें भाग असल्यामुळे फ्रान्सचे सेनापति जनरल जॉफ्रे आईन नदीवर जर्मनीला नुसते रेटत बसले आहेत. आखाड्यात उतरलेले दोघे पहिलवान उभे असे· तोंपर्यंत चलाखीची व झटापटीची कुस्ती होते. पण ते दोघेहि एकदा मातीत लोळले म्हणजे एकानें आपला खादा दुसऱ्याच्या खाद्याला घाशीत बसावें व रेटारेटीच्या कुस्तीस आरंभ करून त्यात शेवटीं कोण उखडतो याची वाट पहाण्यास प्रेक्षकास ज्याप्रमाणे सांगावें, त्याप्रमाणें आईन नदीवरील युद्धास नुसते रेटारेटीचें स्वरूप प्राप्त झालें आहे. आईन नदीवर ही रेड्याची रेटारेटी तशीच कायम ठेऊन

लासिग्नी, लोयेन व सेट क्विंटीन ह्या मार्गानें, आयीस नदीच्या पश्चिम किनाऱ्यानें चढाई करून जर्मन तटबंदीच्या उजव्या बगलेस वळसा देऊन जर्मनीच्या पिच्छाडीस वळण्याचा इंग्रज व फ्रेंच सेनेनें आक्टोबरच्या प्रारंभी निकराचा प्रयत्न केला, पण या प्रयत्नात यश न आल्यामुळे इंग्रज सेनेनें लोयेन सेट क्विंटीनची दिशा सोडून देऊन लासग्नीच्या उत्तरेस लोयेन ते रुमानियाच्या मार्गाने एकदम सोम नदी ओलाडली व तेथे जर्मनीच्या उजव्या बाजूला वळसा देण्याचा प्रयत्न आक्टोबरच्या पहिल्या आठवड्यात केला. इंग्रजी सैन्य सोम नदी ओलाडून ह्याप्रमाणे वर चढेल अशी अटकळ जर्मनीला नव्हती. इंग्रज व फ्रेंच यानीं ह्यापूर्वी सुमारे तीन आठवडे एकसारखे जर्मन तटबंदीवर निकराचे हल्ले चढविले होते, व त्या हल्ल्यात सैन्याचीहि बरीच खराबी झाली होती.

अशा स्थितींत पेरोनीपासून सोम नदीला धरून सोम नदीच्या मुखापर्यंत जर्मन जर सोम नदी ओलाडून दक्षिणेस येऊ लागले, तर त्याना सोम नदीवर अडथळा करावयाचा येवढयाच धोरणाने इंग्रज सोम नदीवर काही दिवस विसावा घेतील अशी जर्मनीची अटकळ होती पण ही अटकळ अजिबात खोटी ठरली इंग्रजी सैन्य फ्रान्सच्या रणक्षेत्रात उतरल्यापासून आतापर्यंत जवळ जवळ अडीच महिने इंग्रजी सेनेला व फ्रान्सच्या डाव्या बाजूला जनरल फ्रेंच यानी एक क्षणाचाहि विसावा दिला नाही. रात्रदिवस सारखी लढाई सुरू आहे. ना झोप ना खाणेपिणें. सैन्याची एक तुकडी काहीं रात्रीं झोप न मिळाल्यामुळे थकल्यास तिच्या जागीं दुसरी तुकडी उभी करावयाची व आहारादिकाचा योग्य विसावा आपल्या सैनिकास द्यावयाचा, पण क्षणभरहि लढाईत खळ पडू द्यावयाचा नाही, अशा विलक्षण नेटानें व साहसाने आक्टोबर प्रारंभापासून सोम नदी पेरोनी येथे ओलाडल्यानतर इंग्रजी सैन्य जर्मनीशीं लढत आहे. इतक्या निकराच्या लढाईची जरुरी काय? येवढे मोठे साहस करून दिनदिक्कत मनुष्यबळ खर्चीं घालण्याची जरुरी कोणची? जर्मनीला नवीन सैन्याची कुमक येऊन पोचण्यापूर्वी आईन नदीवरील कार-भार जर्मनीच्या उजव्या बाजूच्या बगलेला वळसा देऊन आटपावयाचा होता काय? सामान्य कुमकेहून मोठीशी कुमक जर्मनीला फ्रान्समध्यें आक्टोबरच्या प्रारंभीं येऊन मिळावयाची होती अशातला भाग नव्हता. आक्टोबरमध्येच पोलंडमधील लढाईलाहि ऊत आलेला असल्यामुळे जर्मनी एखादे नवें मोठेसें

सैन्य फ्रान्समध्ये कोठचें पाठवणार होता ? मग सोम नदी ओलांडून पेरोनीच्या उत्तरेस जाऊन जर्मनीच्या उजव्या बगलेवर हल्ले करण्याची याचवेळीं इतकी शिकस्त दमल्या भागलेल्या सैन्याकडून का करविली ? याचें उत्तर असे आहे की, बेल्जमच्या ॲंटवर्प किल्ल्यावरील जर्मनीच्या खऱ्या हल्ल्यास याचवेळीं सुरवात झाली होती व या हल्ल्याचें काम ढिलें पडण्याकरिता पेरोनीच्या उत्तरेस जर्मन सैन्यावर अत्यत निकराचे हल्ले करणें जरूर होतें. जर्मन सैन्याच्या उजव्या बगलेस वळसा घालावयास जर मिळाला तर उत्तमच झाले पण प्रत्यक्ष वळसा जरी घालावयास मिळाला नाहीं तरी इग्रज केव्हा उजव्या बगलेस वळसा घालतील याचा नियम नाहीं अशा तऱ्हेच्या पूर्ण धाकात जर्मन सैन्याला ठेवणे भाग होतें. हेतु इतका कीं, जर्मनीला होईल तितके कमी लोक ॲंटवर्पकडे पाठविता यावे. ॲंटवर्पवरील किल्ल्यास वेढा देऊन मोठ्या तोफा ॲंटवर्पवर रोखण्याची जर्मनीनें ज्यावेळीं तयारी केली त्यावेळीं बेल्जम व उत्तर फ्रान्स यामधील रणक्षेत्राची स्थिति येणेप्रमाणे होती. खुद्द ॲंटवर्प किल्ल्यात बेल्जमचे जवळ जवळ एक लाख सैन्य होतें व ह्या सैन्याला समुद्रातून आस्टेड बदरात उतरून आस्टेड–ब्रुचेस्ट–घेट या मार्गानें लीस नदीच्या डाव्या तटानें इग्लडची कुमक पोंचत होती. आस्टेड–ब्रुचेस–घेट व ॲंटवर्प ह्या एवढया टापूत मिळून बेल्जमचे व इग्लडचे सुमारे दीड लाख सैन्य आक्टोबरच्या प्रारभीं होतें. ॲंटवर्पवर जर्मनीचा जो हल्ला चढला तो पूर्वेकडून, व दक्षिणेकडून लीस नदीच्या पलिकडे म्हणजे डाव्या बाजूला हल्ला चढविण्याचे वेळी जर्मनीला जाता आलें नव्हते. ॲंटवर्पच्या दक्षिणेस व पश्चिमेस मिळून जर्मनीचें आक्टोबरच्या प्रारभीं दोन अडीच लाख सैन्य असावें असा अदाज आहे. ब्रुसेल्स येथे जर्मनीचें चाळीस पन्नास हजार सैन्य यावेळीं होतें.

ब्रुसेल्स येथे जर्मनीचें चाळीस पन्नास हजार सैन्य यावेळीं होतें व या सैन्याची कामगिरी येवढीच होती कीं, आस्टेंड–घेट या टापूतील सैन्यास थोपवून धरावयाचें. खालीं दक्षिणेस सोम नदी उतरून वर चढण्यास पेरोनी येथें इग्रज सैन्यानें सुरवात केली व निकराचे हल्ले करून, ते उत्तरेस डुवेपर्यंत वर चढलें. या सैन्यास मदत करण्याकरिता इग्लडातून कॅलेच्या मार्गानें व फ्रान्समधून अमीन्स, आल्बर्ट–आरास या मार्गानें एकसारखे सैन्य येत होते. फ्रान्समधून व इग्लड-

मधून येणाऱ्या या नव्या सेनाप्रवाहाचा रोख लिलेच्या किल्ल्यावर होता. लिलेचा किल्ला यावेळीं फ्रेंचाच्या ताब्यात होता; व तेथें मोठेसें सैन्य नव्हतें. पेरोनी ते डुवेपर्यंत जर्मनीच्या उजव्या बगलेला वळसा देण्याच्या इंग्रजाच्या प्रयत्नाला आड-काठी घालीत असतानाच जर्मन सैन्यानें लिलेचा किल्ला एकदम गांठला, व तेथें साठ हजार सैन्याचा तळ दिला. अँटवर्पच्या किल्ल्यावर आक्टोबर प्रारंभाला जर्मनीच्या खऱ्या हल्ल्यास सुरुवात झाली. अँटवर्प सारखा मजबूत किल्ला युरोपात दुसरा नाहीं, अशी अँटवर्पची ख्याति; शिवाय महायुद्धाच्या प्रार-भीचे पहिले दोन महिने या किल्ल्याच्या मजबूतीस अधिक बळकटी आणण्याकरिता यथाशास्त्र व यथाविधी खर्च करण्यात आले होते. पैशाची, खेड्याची, जमीनजुमल्याची व इमारतींची कितीहि नुकसानी झाली तरी त्याकडे लक्ष न देता किल्ला झुजण्यास तयार केला होता. किल्ल्यावरील तोफाच्या माऱ्या-पासून स्वतःचा बचाव करण्याकरिता खेड्यापाड्याचा किंवा मोठ्या इमारतींचा आश्रय शत्रूला घेता येऊ नये म्हणून आसपासचीं खेडीं, मोठ्या इमारती व मोठे वृक्ष हीं सर्व जमीनदोस्त करून तोफाच्या गोळ्याची गति निष्कंटक करण्यात आली होती. शिवाय अँटवर्पचा मोठा किल्ला व सभोवतालचे लहान लहान किल्ले ह्याच्या जवळ जर्मन पायदळास जाताच येऊ नये म्हणून समुद्राचे व कालव्याचे बांध फोडून कित्येक मैल सर्व जलमय करण्यात आले होते. हेतु हा कीं अँटवर्प किल्ला केव्हाहि जर्मनीच्या हातीं जाऊ नये निदान आक्टोबर–नोव्हेंबर दोन महिने तरी हा किल्ला जर्मनीशीं झुजत राहील आणि जर्मनीच्या लाख दीड लाख सैन्याचा बळी महिन्या दोन महिन्यात घेईल, असे धोरण आक्टोबरच्या प्रारंभीं बांधण्यात आलें होतें. या धोरणाप्रमाणे अँटवर्पची झुज खरोखर आक्टोबरच्या अखेरपर्यंत निदान राहिली असती, तर लिलेपर्यंत येऊन थडकलेल्या इंग्रजी सेनेनें ब्रुसेल्सच्या रोखानें बेल्जम-मध्यें प्रवेश केला असता. ऑस्टेंड, ब्रुजेस व घेंट येथील सैन्येहि ब्रुसेल्सपर्यंत धडकलीं असतीं, व ब्रुसेल्सच्या दक्षिणपूर्वेस कित्येक मैलपर्यंत सपाट पसरलेल्या मैदानावर जर्मनीला इंग्रजाशीं व फ्रेंचाशीं तोंड देणें भाग पडले असतें. ब्रुसेल्सच्या आसपासचें बेल्जमचें हें मैदान युरोपच्या इतिहासात प्रसिद्ध आहे. हिंदुस्थानच्या इतिहासात सोनपत–पानपतचें मैदान जसे प्रसिद्ध त्याचप्रमाणें बेल्जमचें मैदानहि युरोपच्या इतिहासात प्रसिद्ध आहे. हेंच मैदान त्वरेनें व तातडीनें गांठू, तटबंदीची

व यंत्राची लढाई सुरू करण्यास तेथें जर्मनीला फुरसदहि देणार नाहीं, व अखेरीस प्रत्यक्ष दडाला दंड भिडवून जर्मनीच्या सेनाशकटाचीं हाडें घुसळून काढू, अशा उमेदीनें व निश्चयानें फ्रेंच व इग्रज दक्षिणेंतून व पश्चिमेंतून बेल्जमच्या मैदानाकडे धावत चालले होते. महायुद्धाच्या प्रारभीं नामूर व मान्स येथें अवचित माघार खावी लागली नसती, तर बेल्जमच्या याच मैदानावर मोठी लढाई झुजण्याचा इग्रजाचा व फ्रेंचाचा डाव होता. नामूर व मॉन्स येथील माघारीनें तो डाव आगलट येऊन पारिसपर्यंत व मॉर्न नदीपर्यंत घुसण्यास जर्मन सेनेस सवडसुद्धा मिळाली. मॉर्न नदीवरील जर्मनीच्या पराभवामुळे जर्मनीला मिळालेली सधि फुकट जाऊन पहिल्या डावाच्या सिद्धीकडे पुन्हा पोंचण्यास इग्रज व फ्रेंच याना बल आलें. सप्टेंबर महिन्यात ऐन नदीची तटबदी जरी फोडता आली नाहीं तरी पेरोनी येथे सोमनदी ओलाडून उत्तरेस ब्रुसेल्सच्या मैदानाच्या रोखानें फ्रेंच व इग्रज याना जाता आलें लढाईतील डावपेचाच्या धोरणाच्या दृष्टीनें ही मोठी कामगिरी इग्रज व फ्रेंच सैन्यानें बजावली यात शका नाही. महायुद्धाच्या प्रारभीं लीजचा किल्ला पडल्यानतर नामूर लढत ठेऊन उत्तरेस ॲटवर्पकडून पश्चिमेस ऑस्टेंड-घेटकडून व दक्षिणेस लिली मॉन्सच्या बाजूनें चाल करून जाऊन ब्रुसेल्स सभोंवारच्या इतिहासप्रसिद्ध मैदानावर ह्या महायुद्धाचा सोक्षमोक्ष करून घेऊ, हा जो इग्रजाचा व फ्रेंचाचा मूळचा डाव त्याच डावास आक्टोबरच्या प्रारभाला थोडया फेरानें पुन्हा रग आला. जर्मन सैन्य फ्रान्समध्ये घुसून आईन नदीवर तटबदी करून बसलें, येवढाच काय तो प्रारभींचा व दोन महिन्यानंतरचा म्हणजे आक्टोबरातील डावात फरक होता. आगस्टमधील डावामध्ये बेल्जमच्या दक्षिण बाजूचा नामूरचा किल्ला निदान पधरा वीस दिवस दम धरील अशी अटकळ सेनापतींनीं ज्याप्रमाणें बाधली होती, त्याप्रमाणें ॲटवर्प कित्येक महिने नाहीं तरी निदान आक्टोबर महिना तरी दम धरील असा अदाज होता. आगस्ट व आक्टोबर या दोनहि महिन्यात डावाचें स्वरूप एकच म्हणजे ब्रुसेल्सच्या मैदानावर सोक्षमोक्ष करून घ्यावयाचा, अशा तऱ्हेचें होतें. पहिल्या डावात नामूरचा किल्ला इरेस घातला होता, तर दुसऱ्या डावात ॲटवर्पचा किल्ला इरेस घातलेला होता. नामूर पधरा दिवस लढेल असा अदाज असतांना ते तसें पधरा तासहि लढलें नाहीं; त्याप्रमाणें ॲटवर्पच्या किल्ल्याच्या दमाच्या कालावधीचा अंदाजहि चुकेल अशी शका आक्टोबरच्या प्रारभीं इग्रजाना आली होती, व

या शकेच्या निवारणार्थ आक्टोबरच्या प्रारभी मोठया आरमारावरील अवजड तोफा ऑस्टेंड बदरात उतरून दहा हजार खलाशाची कुमक ऑस्टेंड–ब्रुजेस मार्गानें व लीस नदीच्या डाव्या तीरानें त्यानीं ॲटवर्पकडे पाठविली होती. हा बदोबस्त आरमार खात्याचे प्रधान मि. चर्चिल यानीं स्वतःच्या डोळ्यादेखत केला होता, व ॲटवर्पच्या सभोवारच्या चरानाहि एका रात्रीच्या निवासानें मि. चर्चिल ह्यानीं उत्साही व धैर्यशाली बनविलें होते असे म्हणतात. जर्मनीच्या अवजड व मोठया तोफाचा मारा सुरू झाला म्हणजे बळकट किल्ल्याचाहि टिकाव लागत नाहीं, हा अनुभव लीज व नामूर येथे आला होता. तो अनुभव ध्यानांत घेऊन तोडीस तोड देण्याकरिता जर्मनीच्या मोठया तोफाशीं झुजविण्याच्या इराद्यानें इग्लडच्या अवजड आरमारी तोफा १० हजार खलाशासह समुद्रावरून जमिनीवर ऑस्टेड बदरावर उतरल्या. चपल खलाशी चारपाच तारखेस ॲटवर्पला जाऊन पोंचले, मोठया तोफा येत आहेत ही बातमी त्यानीं ॲटवर्पला दिली, आणि निरुत्साही होऊ लागलेल्या ॲटवर्प शहरात नवा दम इग्रजानीं उत्पन्न केला. अवजड तोफा ऑस्टेड येथून निघून ॲटवर्पच्या मार्गाला लागल्या, आणि त्या लवकर ॲटवर्पला पोचून ॲटवर्प सभोंवारच्या जर्मन तोफा मुक्या करतील असें बेल्जम सेनेस वाटू लागलें. ॲटवर्पहून निघालेली ही आरमारी अस्त्रे जमिनीवर हलू लागून ॲटवर्पच्या दिशेनें धाव घेण्यास त्याची सिद्धता झाली इतक्यात ॲटवर्प आक्टोबरच्या दहा तारखेलाच पडलें.

## बेल्जमचा किनारा व कॅले

ॲटवर्प पडण्याबरोबर बेल्जमचा राजा अवशिष्ट बेल्जम सैन्य व इग्रजी खलाशी बरोबर घेऊन ब्रुजेसच्या मार्गानें आस्टेड येथें येऊन पोहोंचला. लीस नदीच्या डाव्या तीराने ह्या सैन्याने निसटून जाऊ नये म्हणून ॲटवर्पच्या दक्षिणेस लीसनदी जर्मन सैन्यानें ओलाडली. पण दोन हजार इग्रजी खलाशाना हॉलडच्या हद्दींत पळून जाण्यास भाग पाडण्यापलीकडे विशेषसा अडथळा ह्या निसटून जाणाऱ्या सैन्याला जर्मनीला करता आला नाहीं. ॲटवर्प पडण्याबरोबर ब्रुसेल्स येथील जर्मन सैन्यानें घेंटवर हल्ला केला. पण ॲटवर्पच्या कुमकेस निघालेल्या फ्रेंच व इग्रज सैन्यानें घेंट येथें त्यास थोपवून धरलें; त्यामुळें ॲटवर्पचे सैन्य आस्टेंडला सुरक्षित येऊन पोंचलें. ॲटवर्प ताब्यात घेण्याबरोबर ॲटवर्पचा बदोबस्त करण्यांत एखाद दुसरा दिवस घालवून जर्मनीचें दीड दोन लाख सैन्य ब्रुजेसच्या मार्गानें बेल्जम

किनाऱ्यावर येऊन धडकलें; व घेंट, ब्रुजेस, थोरूट, ऑस्टेंड हीं गांवें घेऊन न्यूपोर्टपर्यंतचा बेल्जमचा किनारा सर्व व्यापून टाकला. ह्याचवेळीं लिले येथील जर्मन सैन्यानें कॅलेच्या दिशेनें एकदम चाल केली. हें सैन्य उत्तरेस लीस नदीच्या काठीं असलेले अर्मेंटरीस गाव, व पश्चिमेस लीस नदीचा उजवा किनारा व दक्षिणेस लाब्रासी, लेन्स व आरास येथपर्यंत मुलुख व्यापून कॅलेच्या बाजूनें लीस नदी ओलांडूनहि थोडे पुढे गेलें, पण ह्या ठिकाणीं फ्रेंच व इंग्रज सेनेनें त्यास इतका भयंकर अडथळा केला कीं, अतिशय नुकसान सोसून लीस नदीवरच आक्टोबर अखेर थांबावें लागलें! कॅलेवर हल्ला लिलीच्या बाजूनें ज्याप्रमाणे जर्मन सैन्यानें ॲटवर्प पडण्याबरोबर चढविला, त्याप्रमाणें न्यूपोर्टच्या बाजूने समुद्र किनाऱ्याकिनाऱ्यानें अत्यंत जोराचा हल्ला चढविला लिलीच्या बाजूच्या हल्ल्यापेक्षा न्यूपोर्टच्या बाजूच्या हल्ल्यांत जर्मनीचे अतिशय नुकसान झालें. आक्टोबर पंधरा तारखेच्या सुमारास ऑस्टेंड बंदर जर्मनीच्या ताब्यांत गेल्यापासून इंग्रजी आरमाराने बेल्जम किनाऱ्यावरील जर्मन सेनेवर नोव्हेंबर प्रारंभापर्यंत अत्यंत बिनचूक तोफांचा भडिमार करून जर्मनीचे फार नुकसान केले, जर्मनीचे हजारों लोक या तोफांनी बळी घेतले, व कित्येक मोठमोठ्या तोफा मुक्या केल्या! अशा संकटांत अत्यंत नुकसान सोसून जर्मनीनें ऑस्टेंड येथे मोठ्या तोफा किनाऱ्यावर बंदोबस्तानें बसविल्या, झेपेलीन विमानाकरता आश्रयाची जागा बांधली, व ब्रिजेसजवळच्या किनाऱ्यावर मोठ्या तोफा बसवून पाणबुडी जहाजें काहीं जमिनीवरून व काहीं समुद्रांतून आणून डोअरच्या सामुद्रधुनींत ह्या पाणबुड्या जहाजांनीं संचार करून एक इंग्रजी क्रूझर बुडविलें. न्यूपोर्टच्या बंदरावर समुद्रकिनाऱ्यानें हल्ला करणें फार नुकसानीचें आहे असे अनुभवास आल्यावरून न्यूपोर्टपासून डक्सम्युडपर्यंत इसर नदीवर जर्मनीनें निकराचा हल्ला करून दोन चार ठिकाणीं नदी ओलांडली. ही नदी ओलांडतांना जर्मनीचें फार नुकसान झालें. पण नदी ओलांडल्यापासून विशेष फायदा झाला नाहीं. कारण, न्यूपोर्टपासून कॅलेपर्यंतच्या समुद्रकिनाऱ्याला लागून असलेला चाळीसपन्नास मैल रुंदीचा जर्मनीचा भाग इसर नदीच्या कालव्यांनीं, खाड्यांनीं व समुद्रापेक्षा अधिक खोल असलेल्या पण बांधबंधाऱ्यांनीं शेतकीस लायक केलेल्या शेतांनीं इतका व्यापलेला आहे कीं, पाहिजे तेव्हां हा प्रदेश बांधबंधारे फोडून जलमय करून टाकता येतो. न्यूपोर्ट व डक्सम्युड या

बाजूनें इसर नदी ओलांडून जर्मन आत घुसले खरे, पण पुढील प्रदेश अवचित जलमय झाल्यामुळें इंग्रजी तोफांना व समुद्राच्या पाण्याला हजारों लोकांचे बळी देऊन जर्मनीला इसर नदीच्या पलिकडे परत मुकाटयानें यावे लागलें. हा खोलगट शेताचा प्रदेश सोडून इसर नदीला वळसा देऊन यिप्रेसच्या बाजूनें समुद्र किनाऱ्यावरील जर्मन सैन्य बरेंच आतून कॅलेकडे वळेल ह्या भीतीनें न्यू पोर्टवर समुद्र किनाऱ्यानें जर्मनीचा हल्ला होण्याबरोबर व लिलीच्या बाजूला गडबड दिसण्याबरोबर यिप्रेस गाव इंग्रजी सैन्यानें एकदम ताब्यात घेतला. यिप्रेसपासून अमेटीरीपर्यंत इंग्रज व फ्रेंच सैन्य मजबुतीनें बसलें असून यिप्रेसच्या पुढे जवळ जवळ तीन लाख जर्मन सैन्य यिप्रेस घेऊन कॅलेकडे घुसण्याच्या इराद्यानें सज्ज होऊन उभे ठाकलें आहे. आक्टोबर अखेरला व नोव्हेंबरच्या प्रारंभाला न्यू पोर्टपासून कॅलेपर्यंतचा समुद्र किनारा व समुद्र किनाऱ्याच्या आतील लीस नदीच्या तिरावरील प्रदेश काबीज करण्याकरिता न्यू पोर्ट, डक्सम्युड, यिप्रेस, आर्मेंटरीस व तेथून खाली आरासपर्यंत लीस नदी ह्या प्रदेशावर जर्मन एकसारखे निकराचे हल्ले करीत राहिले असून हे हल्ले मागे परतवून यिप्रेसच्या तोडानें आम्ही बेल्जममध्ये आधीं घुसू व आरमाराच्या जोरावर आस्टेंड, ब्रुसेल्स वगैरे पुन्हा कबजात घेऊन तेथून जर्मनीला रेटून ब्रुसेल्सच्या मैदानावर सोक्षमोक्षाची लढाई देण्यास भाग पाडू, अशा उमेदीने व धोरणानें इंग्रजी सैन्याच्या व इंग्रजी आरमाराच्या हालचाली होत होत्या. ॲंटवर्प जरी पडले, तरी इंग्रज व फ्रेंच सेनेस जर्मनीला बेल्जममध्ये रेटून नेण्यास विशेष स्फुरण आलें होते. ॲंटवर्प पडल्यानंतर आक्टोबर अखेरपर्यंत इंग्रज व फ्रेंच सेनेनें अत्यंत चपळता व साहस दाखवून जर्मनीचें फार नुकसान केलें. सबंध आक्टोबर महिन्यात बेल्जमच्या व उत्तरफ्रान्सातील ह्या लढाईंत जर्मनीला आपण होऊन शत्रूच्या अंगावर तुटून पडावे लागलें. इंग्रजी आरमाराच्या तोफा, जमिनीवरील बंदुकीचा मारा, व बुडत्या शेतातील जलसमाधि, ह्यामुळें जर्मनीचे फारच नुकसान झालें; व इंग्रजी सेनेस आक्टोबर अखेर अशी उमेद चढली कीं, नोव्हेंबर किंवा डिसेंबरमध्यें रेटारेटीचें युद्ध असेच पुढें चालवून नाताळचे सुमारास बेल्जमचा बहुतेक सर्व भाग जर्मनीच्या जबडयातून बाहेर ओढून काढू. पण आक्टोबर अखेरला तुर्कस्थान लढाईंत सामील झाल्यामुळें बेल्जममधील लढाईचें हें स्वरूप एकदम पालटलें आहे.

## अँटवर्प व टर्की

कॅले घेण्याकरितां पंधरा वीस दिवस चाललेल्या ह्या निकराच्या लढाईत जेवढा प्रचंड रक्तपात झाला, तेवढा महायुद्धात गेल्या तीन महिन्यात दुसऱ्या कोणच्याहि लढाईत झाला नाहीं या झटापटींत येवढें प्रचंड नुकसान जर्मनीनें आपलें का करून घेतलें, बेल्जमचा समुद्र किनारा, किंवा कॅलेच्या बाजूचा फ्रान्सचा समुद्र किनारा ही कब्जात घेण्यासाठीं येवढी खटपट का? बरें, जर्मनीनें हा समुद्र किनारा घेण्याला धडपड केली म्हणून लिलेच्या बाजूनें आईन नदीच्या तटबंदीस वळसा देण्याचा प्रचंड उद्योग सोडून न्यूपोर्ट येथे तरी इंग्रजी सैन्यानें येवढी निकराची लढाई का करावी? लष्करी हालचालीच्या दृष्टीने ह्या किनाऱ्याला येवढे महत्त्व आहे काय? जर्मन सैन्य किनारा घेण्यात गुतलें असतांना आरमाराच्या तडाख्याखालीं त्यास चोप देत बसून लिलेच्या खालींच कोठेतरी जर्मनीची फळी फोडण्याचा प्रयत्न अधिक हितावह झाला नसता काय? अँटवर्पला कुमक करणे, घेंट, आस्टेंड व न्यूपोर्ट येथे प्रचंड लढाया झुजत राहाणे यापेक्षा आयनी नदीवरील तटबंदीला वळसा देणें लष्करी धोरणाच्या दृष्टीनें अधिक श्रेयस्कर नव्हते काय? जर्मनीनें बेल्जममध्ये हा किल्ला घेतला, ते शहर घेतलें किंवा ते बंदर घेतलें, म्हणून जर्मन जेथे जाईल तेथे आपणहि पळत जाऊन त्याच्याशीं लढत बसावें हे लष्करी धोरण कोणचे? मार्न नदीवरील जर्मनीच्या पराभवानंतर ज्या लष्करी धोरणास इंग्रजी व फ्रेंच सेनापतींनीं आरंभ केला, व आस्ते आस्ते फलद्रूप होण्याच्या पथाला जे लष्करी धोरण लागलें, ते लष्करी धोरण सोडून देऊन, अँटवर्प, आस्टेंड न्यूपोर्ट येथें जर्मनीबरोबर घिरट्या खात बसण्याचें कारण काय? अँटवर्पला कुमक पाठविण्यात खर्च केलेलें बळ किंवा आस्टेंड–न्यूपोर्टला झालेला रक्तपात मूळ लष्करी धोरणाच्या मार्गानें खर्च झाला असता तर अधिक फलप्रद झाला नसता काय? अँटवर्प घेतल्यानें महायुद्धात जर्मनी काय करणार? आस्टेंड, न्यूपोर्ट हीं बंदरें घेतल्यानें महायुद्धाच्या लष्करी धोरणाच्या प्रवाहावर कसला परिणाम होणार? धिमेपणाने जें धोरण स्वीकारलें त्याच धोरणानें फळी फोडण्याचा किंवा फळीला वळसा देण्याचा आग्रह का दिसून येऊ नये? फ्रान्समधून हलके हलके रेटत नेऊन नंतर बेल्जममध्यें चोप द्यावयाचा या धोरणाच्या दृष्टीनें अँटवर्पची किंवा आस्टेंडची कसली किंमत? या सर्व प्रश्नांना असे उत्तर आहे कीं, केवळ लष्करी

धोरणाने विचार केला असता जर्मनीबरोबर आपणहि आग्रहानें नाचत सुटण्यांत हशील नाहीं. जर्मनीनें अँटवर्प घेतलें, आस्टेड घेतलें किंवा न्यूपोर्ट घेतलें, ते लष्करी धोरणाच्या दृष्टीने नव्हे तर राजकीय धोरणाच्या दृष्टीनें. राजकीय धोरण लष्करी धोरणाहून जरा भिन्न असतें.ज्या प्रदेशाच्या लोभामुळे युद्धास सुरवात झालेली असते, त्या प्रदेशावर हल्ला चढविणें हें राजकीय धोरण होय, व शत्रूचा सेनाशकट मोडून टाकण्याकरिता विशिष्ट गाव किंवा विशिष्ट प्रदेश ताब्यात घेणें किंवा तदनुषगाने सैन्याच्या हालचाली करणे हें लष्करी धोरण होय. या लष्करी धोरणाच्या दृष्टीनें जर विचार केला तर अँटवर्पच्या नादीं लागून आपली उजवी बाजू जरा कच्ची ठेऊन पेरोनी येथे सोम नदी इग्रजाना जर्मनीनें ओलाडू दिली, ही चूक केली असे म्हणावे लागतें. आईन नदीवरील तटबदीचा बदोबस्त होण्याबरोबर सोम नदीच्या दक्षिणेसच इग्रजाना ठेऊन सोम नदीच्या मुखापर्यंत जर्मनीनें आपला उजवा हात पसरावयास पाहिजे होता. सैन्य नव्हते म्हणावे तर अँटवर्पवर ह्याच सुमारास दोन अडीच लाख सैन्य पाठवून दिले. म्हणजे राजकीय धोरणासाठीं लष्करी धोरण जरा मागे टाकून आईन नदीवरील तटबदीची जागा धरून बसलेला सेनासमूह उजवी बगल मारली गेल्यामुळे धोक्यात पडतो कीं काय या चिंतेतच जर्मनीनें दिवस घालविले. बरे, जर्मनीच्या ह्या चुकीचा पूर्ण फायदा घेऊन इग्रज व फ्रेंच यानी तरी जर्मनीच्या उजव्या बाजूला वळसा देण्यात होते नव्हते तें बल खर्च करण्याचे का सोडून दिले ? ज्या राजकीय कारणाच्या लोभाला बळी पडून जर्मनीनें पेरोनी येथे सोम नदीवर चूक केली, त्याच राजकीय कारणाच्या मोहाला इग्रज अखेरीला बळी पडले. अँटवर्प हा इतिहासप्रसिद्ध किल्ला; त्याच्या इतकी मजबुती युरोपात दुसऱ्या कोणत्याहि किल्ल्याला नाहीं, शिवाय शेल्ट नदीच्या तोडाजवळ अँटवर्पची जागा व कॅले, आस्टेड, न्यूपोर्ट हा फ्रान्स–बेल्जमचा किनारा ही इग्लड देशाचे कान उपटण्यास भाऱ्याची जागा होय, अशी युरोपखडाची दोनशे वर्षांची समजूत. ही समजूत आरमाराच्या अर्वाचीन वाढीपूर्वीची होय. लोखडी गलबते, प्रचड तोफा, पाणबुडी जहाजे, समुद्रात टाकावयाचे सुरुग वगैरे अर्वाचीन आरमारी शस्त्रापूर्वी ही समजूत युरोपात दृढ होती, व पूर्वीच्या समजूतींची परपरा आतापर्यंत युरोपखडात बहुजनसमाजात चालत आली आहे. बेल्जमचा किनारा किंवा अँटवर्प हीं लढाईनतर जर जर्मनीच्या ताब्यात राहिली तर त्याला भावी आरमाराच्या दृष्टीनें महत्त्व आहे. पण

महायुद्ध चालू असताना लष्करी धोरणाच्या दृष्टीने त्याला फारसें महत्त्व नाहीं. कॅलेवर बसून जर्मन लोक इंग्लंडला कांहीं वाकुल्या दाखवनील, किंवा आस्टेंडच्या किनाऱ्यातून पाणबुडी जहाजे निघून इंग्रजी दोनचार क्रूझरें बुडवितील, अगर बेल्जम किनाऱ्यावरून उडून जर्मन विमाने लंडन शहरावर बॉंब टाकतील. अशाप्रकारें डासाचे चिमटे घेणें या पलीकडे अँटवर्प–बेल्जमचा किनारा याचा उपयोग जर्मनीला लष्करी धोरणाच्या दृष्टीने काहीहि नाहीं. चिमटे घेणें हा एक क्षुल्लक उपयोग आहे. चिमटे घेण्याकरिता किंवा चिमटे टाळण्याकरिता कोणीहि लष्करी धोरणाचा मुख्य मार्ग सोडीत नाही. इंग्लंडवर हल्ला करण्याचा जर्मनीचा हेतु आहे, असें म्हणावे तर तें अगदी वेडेपणाचें होय. शिडात भरलेल्या वाऱ्याच्या जोरानें ज्यावेळीं लढाऊ जहाजे डोअरच्या समुद्रधुनींतून फिरत होतीं, त्यावेळेला अँन्वर्पची किंवा बेल्जमच्या किनाऱ्याची प्रतिष्ठा इंग्लंडवर स्वारी करण्याच्या कामीं युद्धकाली बरीच होती. पण सांप्रतच्या आरमाराच्या पुढें ही प्रतिष्ठा बिलकूल राहिली नाहीं. मग जर्मनीने राजकीय हेतु तरी कोणता साधला ? चिमटे काढण्यास किंवा वाकुल्या दाखविण्यास जागा मिळणें याला राजकीय हेतु म्हणता येईल काय ? अँटवर्प व बेल्जमचा किनारा यासंबधाने आक्टोबरमध्ये झालेल्या युद्धाला लष्करी धोरणाच्या दृष्टीनें केलेलें हे युद्ध नसून राजकीय हेतूकरता केलेली ही खटपट होय, असें जनरल जॉफ्रे यानीं नाव ठेविलें आहे. हा राजकीय हेतु कोणता ? युरोपच्या इतिहासानें पूर्वकालीन आरमाराच्या स्थित्यनुरूप अँटवर्प व बेल्जमचा किनारा ह्यांना मोठी प्रतिष्ठा दिली असून इंग्लंडशीं प्रतिस्पर्धा करणाऱ्या सर्व युरोपियन सम्राटाच्या महत्वाकांक्षेचे केंद्रस्थान हा प्रदेश होय, असा गवगवा इतिहासकारानीं केला आहे. नवीन आरमारानें ह्या प्रतिष्ठेतील तथ्य काढून घेतलें, पण गवगवा मात्र अद्याप कायम राहिला. इंग्लंडच्या ज्या प्रतिस्पर्ध्यानें अँटवर्प व बेल्जमचा किनारा घेतला, त्यानें युद्धाच्या वेळींहि माऱ्याच्या जागा मिळवून उत्तम प्रकारचे जय मिळविले असे समजावयाचें, हा युरोपच्या इतिहासातील भ्रामक सिद्धांत इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, रशिया वगैरे देशातील बहुजन समाजांत रूढ झालेला आहे. आम्ही अँटवर्प घेतलें, आम्ही बेल्जम किनारा घेतला तेव्हा आम्हाला या युद्धात मोठा जय मिळाला, असे युरोपातील बहुजन समाजास भासविण्याकरितां अँटवर्प व बेल्जमचा किनारा घेण्याचा जर्मनीनें खटाटोप केला

काय ? बहुजन समाजापुढे जर मोठ्या जयाचा भपका करतां आला, तर युद्धातील लष्करी धोरणास त्यापासून पुष्टि मिळते ही गोष्ट खरी; पण इग्लड काय, फ्रान्स काय किंवा जर्मनी काय, अशा भपक्यानें फसला जाण्याइतका अज्ञानी नाहीं; शिवाय अर्वाचीन आरमारामुळे अँटवर्पची पूर्वीची प्रतिष्ठा आता उरली नाहीं, हेंहि इग्लड, फ्रान्स व जर्मनी येथील लोकाना सहज समजण्यासारखें आहे. मग अँटवर्प व बेल्जमचा किनारा घेण्यात जर्मनीचा राजकीय हेतु कोणता ? एखाद्या वेडगळ हेतूनें हें काम जर्मनीनें केलें कीं काय ? वेडगळ हेतूनें केलें असें म्हणावे तर अँटवर्प, आस्टेड व न्यूपोर्ट याच्या सभोंवती जर्मनीबरोबर इग्रज व फ्रेंच यानीं तरी पिंगा का घातला ? या प्रश्नाना उत्तर असें आहे कीं, आपल्या विजयानें इग्लडच्या लोकाना घाबरून सोडण्याकरिता जर्मनीनें अँटवर्प व बेल्जमचा किनारा घेतला नाहीं; फ्रेंच लोकाना चकित करण्याकरिता हें काम जर्मनीनें केले नाहीं, किंवा जर्मनीतल्या बहुजन समाजाकडून वाहवा मिळवावयाची, असाहि जर्मनीचा हेतु नाहीं. अँटवर्प व बेल्जमचा किनारा घेणारा तो मोठा विजयी होय, असा युरोपच्या इतिहासानें शेरा मारून ठेवला आहे, त्याचा उपयोग इग्लड, फ्रान्स किंवा जर्मनी येथें विशेषसा करतां येण्यासारखा जरी नसला, तरी तुर्कस्थानची राजधानी कान्स्टान्टीनोपल येथे त्याचा उपयोग फार होणार होता व तसा झालाहि. जर्मनीनें अँटवर्प घेतलें तें जर्मनीचा प्रताप तुर्की लोकाच्या डोळयात भरावा म्हणून. जर्मनीनें बेल्जमचा किनारा घेतला तो तुर्कांची वाहवा सपादन करून इग्लडची खोड मोडणारा हाच पठ्ठया होय, असे धन्यवाद तुर्कांच्या तोडून सहजगत्या बाहेर पडावे म्हणून. तुर्कस्थानास ह्या महायुद्धात गोंवून टाकण्याचा राजकीय डाव सबध आक्टोबर महिना जर्मनी कॉन्स्टान्टीनोपल येथे खेळत होता. त्या डावात अँन्टवर्पच्या विजयाच्या जादूनें त्यानें तुर्कांचीं मनें भारून टाकलीं व बेल्जम किनाऱ्यावर स्वतःच्या मनाबरोबर तुर्कांचीं मनें आणून आमच्याबरोबर तुम्हींहि इग्लडला वाकुल्या दाखविण्यास हरकत नाहीं, अशा भ्रमाच्या पिशाचानें त्यानें तुर्कांचीं मनें घेरून टाकलीं ! अँटवर्पबरोबर तुर्कांचें मनहि घेतलें व किनाऱ्याबरोबर तुर्की शरीर अर्थात तुर्कांचें आरमार व सैन्य हीं जर्मनीनें काबीज केलीं. जर्मनीचा हा राजकीय हेतु साधू नये म्हणून बेल्जमचा किनारा जर्मनीच्या ताब्यात न जाण्याकरिता लष्करी धोरण सोडूनहि इग्रजांनीं

आपली होईल तितकी शिकस्त केली. पण, अखेरीस तुर्क लढाईत जर्मनीच्या वतीनें सामील झाला व त्यामुळें नोव्हेंबर प्रारंभापासून बेल्जममधील लढाईचें स्वरूपहि बदललें. बेल्जमच्या किनाऱ्यासबधानें हट्टाचा झगडा करीत बसण्याचें आता कारणच उरलें नाहीं. फ्रेंच व इंग्रज यानींहि पालटलेली स्थिति लक्षात आणून सर्व डोव्हरची सामुद्रधुनी दक्षिणेस कॅलेपासून उत्तरेस हॉलंडच्या किनाऱ्यापर्यंत सुरुगानीं व्यापून टाकली आहे. उत्तर समुद्रहि सुरुगानींच व्यापून टाकला असून आता उत्तर समुद्र व इंग्रजी सामुद्रधुनी ह्यात जर व्यापारी जहाजाना प्रवेश करावयाचा असेल तर इंग्रजी आरमाराना माहीत असलेल्या मार्गानेंच प्रवेश केला पाहिजे. याचा अर्थ असा कीं, उत्तर समुद्रातील जर्मनीच्या जहाजाना लपडावाच्या मार्गानीहि बेल्जमचा किनारा गाठता येणें शक्य नाहीं, व एखाद दुसऱ्यानें जर चुकून हा किनारा गाठला तर त्यासहि डोव्हरच्या सामुद्रधुनींत सचारहि करता यावयाचा नाहीं. कारण सचार करण्याचें त्यानीं धाडस केले तर इंग्लडचा किनारा दृष्टीस पडण्याऐवजीं सुरुगावर आपटून समुद्राचा तळच दृष्टीस पडावयाचा ! शिवाय अशारीतीनें डोव्हरच्या सामुद्रधुनीचा सुरुगानीं बदोबस्त करण्यात आल्यामुळें बेल्जमच्या किनाऱ्यावर देखरेख करण्याकरिता, पहारा करण्याकरिता किंवा प्रसग विशेषीं तोफाचा भडिमार करण्याकरितां, लहानमोठीं लढाऊ जहाजें इंग्रजी सामुद्रधुनींत खेळती ठेवण्याचेंहि आतां प्रयोजन उरलें नाहीं. उत्तर समुद्रांत कील कॅनॉलचे तोंडाचे आसपास कील कॅनॉलमध्यें लपून बसलेल्या जर्मन बेडर जहाजाच्या पाळतीवर इंग्रजी बेडर जहाजाचा तांडा उभा ठेवला म्हणजे काम झालें. इतर सर्व लढाऊ जहाजे पूर्व भूमध्य समुद्रात आता आणण्यास हरकत नाहीं. तुर्कस्थानशीं लढाई सुरू झाल्यामुळे पूर्व भूमध्य समुद्रात तुर्कस्थानच्या सीरिया प्राताच्या किनाऱ्यावर इंग्रज व फ्रेंच याना बरेंच सैन्य न्यावें लागेल; आणि तुर्की किनारा आरमाराच्या तोफाच्या माराखालीं होरपळून काढावा लागेल. तुर्की युद्धाच्या ह्या तयारीकरिता इंग्रजांनीं बेल्जमचा व कॅलेजवळचा किनारा सुरुगानीं भरून टाकला आहे या कृत्यामुळें बेल्जममधील व उत्तर फ्रान्समधील लढाईचें स्वरूपहि थोडेसें पालटलें आहे. बेल्जमच्या किनाऱ्यावर आता इंग्रजांचा आरमारी हल्ला व्हावयाचा नाहीं, किंवा त्या किनाऱ्यावर नवीन सैन्य उतरविण्याचा प्रयत्नहि करण्यात येणार नाहीं. न्यूपोर्टपासून कॅलेपर्यंत किनाऱ्याचा मागील प्रदेश जलमय

करता येण्यासारखा आहे. व यापैकीं डकर्क व न्यूपोर्ट या किनाऱ्यामागील प्रदेश म्हणजे इसर नदीनें वेढलेला बेल्जमचा न्यूपोर्टचा प्रांत पूर्ण जलमयहि करण्यात आला आहे. असला जलमय प्रांत हस्तगत करण्याचें काम दुर्घट म्हणून जर्मनीनें त्या बाजूचे आपले प्रयत्नहि सोडून दिले आहेत. कॅलेच्या सभोंवारच्या प्रदेशाच्या बचावासाठीं इंग्रज व फ्रेंच सैन्याचा सांप्रत प्रयत्न असून यिप्रेस हें त्या प्रयत्नाचें मुख्य नाकें आहे. लिली–आरासच्या बाजूनें सोमनदी गाठून सोमनदीच्या तोंडाच्या किनाऱ्यावर म्हणजे कॅलेच्या दक्षिण किनाऱ्यावर पोचण्याचा जर्मनीचा सांप्रत रोख दिसतो. उत्तर फ्रान्स व बेल्जम येथील युद्धाचें धोरण कॅलेचा दक्षिण किनारा गाठणे व उलटपक्षी न गाठू देणें या तट्यासभोंवतींच घुटमळत रहाणार. बेल्जममधून जर्मनीला हटवणे किंवा आईन नदीची फळी फोडून जर्मनीच्या एखाद्या सेनाशकटाचा चक्काचूर करणे या ध्येयावर विशेषशी नजर फ्रान्स व इंग्रज यांच्या सैन्याकडून हिंवाळ्यात ठेवण्यात येणार नाहीं. हिंवाळ्यांत म्हणजे नोव्हेंबर अखेरपासून फेब्रुवारी मध्यापर्यंत रशियाच्या पोलंडच्या बाजूला काय किंवा फ्रान्सच्या रणक्षेत्रांत काय, बर्फाचा मोसम सुरू होऊन लढाईच्या मंदीचे दिवस येतात. फ्रान्स, इंग्लंड व जर्मनी ह्या तिघांच्याहि हालचाली ह्या मंदीच्या दिवसांत ढिलाईच्याच होणार आहेत. तथापि इंग्लंड व फ्रान्स यांच्या बाजूनें तर आइन नदीवर बेल्जमच्या बाजूला संरक्षणाच्या कामात नाहीं, तरी निदान चढाईच्या कामात बरीचशी ढिलाई दिसून येणें अपरिहार्य आहे. एक कडक थंडीमुळे जर्मनीची चढाई ढिली पडेल व त्यामुळे शत्रूच्या चढाईला उलट चढाई करून दाबात ठेवण्याचें तितकेसे प्रयोजन रहाणार नाहीं. दुसरें कारण असे कीं, ह्या मंदीच्या दिवसाचा फायदा घेऊन थंडीचे दोनतीन महिने इंग्रज व फ्रेंच यांना दीड दोन लाख सैन्य पूर्वभूमध्य समुद्रांत नेऊन जर्मनीनें उठविलेलें तुर्की भूत पूर्णपणें गाडून तरी टाकलें पाहिजे किंवा निदान इजिप्तला व सुएझ कॅनॉलला या भुताची बाधा, महायुद्ध चालू असे तों, न होईल असा बंदोबस्त करून टाकला पाहिजे. हिंवाळ्याच्या मंदीच्या वेळीं हा बंदोबस्त करणें इंग्रज व फ्रेंच सेनेला सुलभ आहे. हें मंदीचे दिवस संपून लढाईचा मोसम बेल्जम व फ्रान्समध्ये जारीनें सुरू झाल्यावर बेल्जममधून व फ्रान्समधून जर्मनीला हांकून देण्याचें काम करीत असतांना चढाईच्या वेळीं सर्व मनुष्यबळ फ्रान्स व बेल्जम येथेंच ठेवावें लागेल. तेव्हां त्या वेळेच्या आंत तुर्कस्थानचा बंदोबस्त करण्यासाठीं हिंवाळ्याच्या दिवसांत पश्चिम

रणभूमीवर म्हणजे बेल्जम व फ्रान्समध्यें चढाई करण्याच्या भानगडींत न पडतां आपापलें सांभाळून बसण्यात, व प्रसंग विशेषीं थोडीशी पिछेहाट करूनहि जर्मनी-कडून आपला सेनाशकट छिन्नभिन्न होऊं न देता पुढील मोसमासाठीं सर्व बळ राखून ठेवण्यात इंग्लंड व फ्रान्स यांचें लष्करी धोरण खिळून राहील. हिवाळ्यातील बर्फामुळे जर्मनीलाहि विशेष हालचाली करता यावयाच्या नाहींत हें खरें. तथापि तुर्कस्थान सामील झाल्यामुळें मिळालेला फायदा फेब्रुवारींत जवळ जवळ शून्यच व्हावयाचा असल्यामुळे हिवाळ्यातच त्या फायद्याचा पूर्ण उपयोग करून घेणें जर्म-नीला भाग आहे. इंग्लंड व फ्रान्स हीं राष्ट्रे ज्याप्रमाणें हिवाळ्यांत तुर्कांच्या बाजूला गुतलीं जातील, त्याप्रमाणें रशिया हा तुर्कस्थानच्या बाजूला ओढला जाईल. पोलंडचा बर्फ विशेष कडक, अशावेळीं पोलंडमध्ये हिवाळ्यात रशिया विशेष ढिला पडेल हें उघड आहे. तुर्कस्थानकडे रशिया थोडासा वळल्यामुळे जर्मनी स्वतःसहि बर्फांत गारठून घेऊन रशियावर मोठा जय मिळविण्याच्या भानगडींत पडेल, असें म्हणावे तर सर्व पोलंड प्रांत जरी जर्मनीनें व्यापून टाकिला आणि रशियाचा पोलंडमधील सेनाशकट जरी उध्वस्त केला, तरी असलें कृत्य रशियाच्या धुडाच्या खिसगणतीतहि पडणार नाहीं. रशियाचें स्वरूपच येवढे अवाढव्य व आक्राळविक्राळ आहे कीं, एखाददुसरा प्रांत किंवा एखाददुसरा सेनाशकट गमावूनहि रशिया कित्येक वर्षे झुंजत राहील ! रशियाच्या धुडाला दुसऱ्यावर चढाई करून जाताना बोजड शरिराची हालचाल करणें जरा कठीण जातें. पण कोणी त्याच्यावर चाल करून गेला असता चाल करून जाणारा जसजसा पुढे सरकेल तसतसे रशियाचें बळ अधिकच प्रादुर्भूत होऊं लागतें. रशियाची पाठ भूमीला लागली म्हणजे भीमाप्रमाणें वीसपट त्याचें बल अधिक वाढते! तेव्हा अशा स्थितींत तुर्कस्थानाकडे रशियाचें मन वेधल्यामुळे जो फायदा मिळावयाचा त्याचा उपयोग थंडींत रशियावर हल्ला करून जाण्यात जर्मनी करील असे वाटत नाहीं. बर्फाचे दिवस व तुर्कस्थानची नवी ह्यामुळें रशियन हालचालींत जी ढिलाई उत्पन्न होईल त्याचा फायदा घेऊन पोलंडच्या बाजूचे बरेच सैन्य जर्मनी बेल्जममध्यें व फ्रान्समध्ये आणील; आणि बर्फाचे दिवस असताहि इंग्रजाचा किंवा फ्रेंचाचा सेनाशकट मोडून टाकण्याचा प्रयत्न करील. अशाप्रकारे सेनाशकट मोडल्यानें महायुद्धाची एकप्रकारची परिसमाप्ति फ्रान्समध्येंच होऊं शकते, रशियात होऊं शकत नाहीं. कारण एखादा दुसरा सेनाशकट मोडणें

म्हणजे रशियाच्या अंगावरचा मळ काढून त्याला न्हाऊ घालून अधिक ताजा तवाना करण्यासारखें आहे. सेनाशकट मोडून युद्ध समाप्तीस आणणें हें कृत्य जर कोठें शक्य असेल तर तें फ्रान्समध्येंच शक्य आहे. ह्याच कारणाकरितां युद्धाच्या प्रारंभीं फ्रान्सवर जर्मनीनें तडाक्याचा हल्ला केला; व डाव्या बाजूचा सेनाशकट मोडण्याची आपल्याकडून शिकस्त केली, पण त्यावेळीं जर्मनीला अपशय येऊन मार्न नदीवर जर्मनीचा पराभव होऊन, सेनाशकट मोडून युद्धाची परिसमाप्ति करण्याच्या जर्मनीच्या प्रबल इच्छेचा गाशा मार्न नदीवर गुडाळून ऐन नदीवर अनुकूल कालाची वाट पहात जर्मनीस स्वस्थ बसावें लागलें. तुरुस्थान ह्या लढाईंत जर पडलें नसतें, तर हा अनुकूल काल अशतः तरी पुन्हा दृष्टीस पडण्याची जर्मनीस बिलकूल आशा नव्हती. पण तुर्कस्थानास स्वतःच्या पराक्रमाच्या भ्रामक देखाव्याच्या जादूनें भारून तुर्कांची नवी, विशेष महत्त्वाची नसली तरी निदान दोन तीन महिने टिकणारी तवी इंग्लंड व फ्रान्स याच्यामागे पूर्व–भूमध्य समुद्रात जर्मनीस लावता आली. ह्या तवीचा फायदा घेता यावा म्हणून फ्रान्स व बेल्जममध्यें इंग्रजाचा किंवा फ्रेंचाचा सेनाशकट मोडण्याचा आटोकाट प्रयत्न बफांत सचार करण्याचे हाल सोसूनहि जर्मनीकडून करण्यात येतील. तुर्कांच्या तवीमुळें मिळालेली ही संधि दोन तीन महिन्यानंतर पुन्हा कधींहि मिळणे शक्य नसल्यामुळे जे काय करावयाचें असेल तें ह्याचवेळीं जर्मनीला करून घेतलें पाहिजे. आगस्टमधील जर्मनीचा पहिला उद्योग ज्याप्रमाणें फसला त्याप्रमाणें नोव्हेंबर डिसेंबरमधील दुसरा उद्योगहि फसल्यावांचून रहाणार नाहीं, कारण, इंग्रज व फ्रेंच यांची प्रारंभीहून आता अधिक तयारी आहे; व जर्मनीच्या सर्व युक्त्या आणि डावपेंच त्याना आता समजून आल्यामुळें जर्मनीचे हे नवे प्रयत्न फोल करण्यास दोन महिन्यापूर्वीच्या इतकेहि श्रम त्याना आता पडणार नाहीं.

## जर्मन पिशाचांनीं तुर्कांस पछाडलें

तुर्कस्थान महायुद्धात सामील झाल्यामुळें नोव्हेंबर व डिसेंबर महिन्यात फ्रान्समधील युद्धास कोणचें वळण लागण्याचा संभव आहे याचा येथपर्यंत विचार झाला. आता युद्धाच्या प्रारंभींच तुर्कस्थान का सामील झालें नाहीं व आक्टोबर अखेर कसें सामील झालें या गोष्टीचा आपण विचार करूं. बाल्कन युद्धाच्या अखेरीस तुर्कस्थानची एक प्रकारची अप्रतिष्ठा झाली व ऑड्रियानोपल बल्गेरियाच्या

ताब्यांत गेल्यामुळें तर तुर्कस्थान नामशेष होतें कीं काय, अशीच भीति सर्वांना वाटू लागली ! पण तरुण तुर्कांचे पुढारी एन्व्हरपाशा ह्यानीं त्यावेळचे तुर्की सेनापति नाझीमपाशा याचा खून करून लष्करी सत्ता आपल्या हातात घेतली आणि सर्व्हिया व बल्गेरिया याच्या भाडणाची संधि साधून ॲड्रियानोपल पुन्हा काबीज केले. ॲड्रियानोपल अशारीतीने काबीज केल्यामुळे तुर्कांची प्रतिष्ठा अशतः शिल्लक राहिली, आणि बाल्कन युद्धाच्या अखेरीस तुर्कस्थानची लष्करी सत्ता व राजसत्ता एन्व्हरपाशा व तरुण तुर्क याच्या हातीं कायमची गेली पाच वर्षांपूर्वी तरुण तुर्कांनीं तुर्कस्थानात राज्यक्रांति करून नवीन राज्यव्यवस्था स्थापिली त्यावेळीं त्याचे म्होरके एन्व्हरबे व त्याचें मडळ जर्मनीच्या तालमींत बर्लिन येथे शिकून तयार झालें होते, त्यामुळे जर्मनी त्याच्या गुरुस्थानीं पाचसहा वर्षांपूर्वीपासू-नच होता. पाच वर्षांपूर्वीच्या राज्यक्रांतींतील तरुण तुर्कांना जर्मनीचीच फूस व मदत होती. इटलीच्या लढाईच्या वेळी एन्व्हरबे हे उत्तर आफ्रिकेत गेले होते, व इटलीशीं लढणाऱ्या तुर्की सैन्यास त्याचा मुख्य पाठिंबा होता. पुढे बाल्कन युद्धाच्या अखेरीस अवचित साहस दाखवून पुन्हा परत घेतलेलें ॲड्रियानोपल पचनी पडण्यास एन्व्हरपाशाना जर्मनीचीच मदत झाली, एकदरींनें पहाता पाच सात वर्षांत तरुण तुर्क व एन्व्हर पाशा यानीं महत्त्वाच्या गोष्टी तुर्कस्थानात घडवून आणून कमीजास्त प्रमाणाने प्रत्येक वेळीं यशहि सपादिलें, आणि बहुतेक सर्व प्रसंगीं त्याच्या पाठिराख्याचें काम जर्मनीने केलें. तरुण तुर्क व जर्मनी याचा परस्परसबध अशाप्रकारच असल्यामुळें आणि तरुण तुर्कांच्या हातात सर्व लष्करी सत्ता व राज्य–सत्ता गेली असल्यामुळे महायुद्धाच्या प्रारभीं तुर्कस्थान लढाईत पडणें साहजिक नव्हतें काय ? मग तें का पडलें नाहीं ? याचें उत्तर असेः— इटलीचें युद्ध व बाल्कन युद्ध यामध्ये तुर्कस्थानाची एकदरीनें नाचक्की झाली होती; सैन्याची खराबी झाली होती, जवळचा पैसा सपून बाहेर कर्ज मिळनासें झालें होतें. जुन्या पिढिजात सरदार घराण्याचा तरुण तुर्कांच्या अमलावरील विश्वास उडाला होता, आणि सामान्य प्रजाजनाना, तरुण तुर्कांची ही राज्यव्यवस्थाहि नको व लढायांची ही रोजची कटकटहि नको असें वाटून राजकीय उलाढालींचा पूर्ण कटाळा आला होता तरुण तुर्कांचा गुरु जर्मनी खरा, एन्व्हरपाशा जर्मनीच्या तत्रानें चालणारे ही गोष्ट खरी, आणि बाल्कन युद्ध सपल्यानतर जर्मन सेनापतींचा

मोठा ताडा बोलावून तुर्की सैन्य शिकवणुकीकरिता त्यांच्या हवालीं करण्यांत आलें होतें हेंहि खरें, पण जर्मनीच्या गळ्यात गळा घालून रशिया, फ्रान्स, व इंग्लंड ह्या बलाढय राष्ट्राशीं लढायचें कोणी? तुर्कांच्या लढवय्यात दम कोठें होता? नवीन युद्धात पडण्याइतका उत्साह तुर्की सैन्यात कोठून आणावयाचा ? एन्व्हरपाशाचा आपल्या गुरुकडे ओढा तर तुर्की सैन्य व तुर्की लोक निरुत्साही व हताश झालेले ! बल्गेरिया किंवा ग्रीस याचेशीं लढताना ज्याचें पाय लटलट हालू लागले त्यांच्या मनात रशिया, इंग्लड व फ्रान्स याच्यापुढें उभें रहाण्याची कल्पना तरी येणार कोठची ? अर्थात महायुद्धाच्या प्रारभीं तटस्थवृत्ति स्वीकारणें हेंच योग्य असें तुर्कस्थानास वाटलें, आणि तटस्थवृत्ति जाहीर करून सैन्याचा तेवढा बदोबस्त करण्यास तुर्कस्थाननें आरभ केला. ठिकठिकाणीं सैन्याची जमवाजमव करण्यात तुर्कस्थानचा हेतु एवढाच होता कीं, सर्व्हिया महायुद्धात मूळ कारण होऊन बसलेलें आहे तेव्हा न जाणो महायुद्धाची आग बाल्कन प्रदेशात आपल्या घराजवळ पसरण्याचा सभव असल्यामुळें आपण वेळीं सावध असावें हें बरें. सरक्षणाच्या व सावधपणाच्या दृष्टीनें महायुद्धाच्या प्रारभीं तुर्कस्थाननें सैन्याची जमवाजमव करण्यास सुरुवात केली. पण युद्धात सामील होण्याची बुद्धि त्यावेळीं बिलकूल नव्हती. मग आक्टोबर अखेर ही बुद्धि कोठून आली ? जर्मन भुताचा सचार आक्टोबरअखेर तुर्कस्थानात कसा झाला ? भुतेंखेते झालीं किंवा अतरिक्षात अदृश्यपणें सचार करणारे सत्पुरुष झाले, तरी त्याना अनुकूल पात्र मिळाल्याशिवाय कोठेंहि सचार करता येत नाहीं, अगर सद्‌बुद्धीची प्रेरणा करता येत नाहीं. अनुकूल पात्र नुसते असून चालत नाहीं. अनुकूल स्थळ व अनुकूल काळ याचीहि मदत असावी लागते. भुताना व पिशाचाना उपयोगी पडणाऱ्या दुर्बल मनाचें तेवढे झाड असून चालत नाहीं, तर ज्या बाईस भूत पछाडते त्या बाईस करकरीत तिन्ही साजा ज्या पिंपळावर भूत बसलेलें असतें त्या पिंपळाजवळ जावें लागते. एन्व्हरपाशा व तरुण तुर्क याच्या मनाची स्थिति जर्मन भुताच्या अभिनिवेषास योग्य होती हे वर सागितलेंच आहे. पण—काल प्रदेश याची अनुकूलता प्राप्त झाली नव्हती. महायुद्धाच्या पहिल्या आठवडयातच असा एक चमत्कार झाला कीं, तुर्कस्थान जरी जर्मन भुताजवळ गेलें नाहीं, तरी जर्मन भुताचा एक वड व एक पिंपळ तुर्कस्थानच्या राजधानीजवळ गेला! महायुद्धाच्या प्रारंभीं जर्मनीची गोबेन व ब्रेसला जहाजं

ॲड्रियाटिक समुद्राच्या बाजूला भूमध्य समुद्रात संचार करीत होती. युद्ध सुरू होण्याबरोबर भूमध्य समुद्रातील इंग्रजी व फ्रेंच आरमाराच्या नजरबंदींतून निसटून हीं दोन लढाऊ जहाजें दारदानेलीसच्या सामुद्रधुनींतून आत शिरून मार्मोराच्या समुद्रात कॉन्स्टांटिनोपल येथें आश्रयार्थ दाखल झालीं. ह्याच सुमारास तुर्कस्थानचीं दोन क्रूझरे इंग्लंडात सर्व बांधकाम संपून तयार झालीं होतीं, व तीं क्रूझरें आमची आम्हांस द्या, असें बोलणें तुर्कस्थाननें इंग्लंडपाशीं लावलें होतें. तुर्कस्थानास तीं न देता इंग्लंडनें महायुद्धात स्वतःच्या जरूरीकरिता स्वतःच वापरण्यास सुरवात केली. क्रूझराची किंमत, योग्य नफा, व इतर हरएक प्रकारचा मोबदला जरी इंग्लंडने देऊ केला, तरी तुर्कस्थानच्या मनाचा संतोष झाला नाहीं. उलट तुर्कस्थाननें गोबेन, ब्रॅसला हीं दोन आश्रयास आलेलीं क्रूझरे आपण स्वतः जर्मनीपासून विकत घेतलीं असे जाहीर केलें आणि गोबेनवरील जर्मन अधिकाऱ्याला आपल्या सर्व आरमाराचा मुख्य नेमलें. एन्व्हरपाशा व तरुण तुर्क यांच्या मनाचा जर्मनीकडे सहज ओढा आणि त्यात गोबेन व ब्रॅसला हे दोन जिवंत समर्थ तरुण तुर्कांच्या मांडीस मांडी लावून तुर्की राजधानींत बसलेले, अर्थात जर्मन पिशाचाचा संचार तुर्की रक्तात होतो कीं काय अशी भीति इंग्लंड, फ्रान्स व रशिया यांना उत्पन्न झाली, व आक्टोबर प्रारंभाला इंग्लंड व फ्रान्स यांचें आरमार दार्दानेलीसच्या सामुद्रधुनीवर येऊन उभे राहिलें. एजियन समुद्रात इंग्लंड व फ्रान्स यांचें आरमार येण्याबरोबर दार्दानेलीसची सामुद्रधुनी सुरुंग टाकून तुर्कांनी बंद केली. अर्थात मार्मोराच्या समुद्रात शिरून कॉन्स्टांटिनोपल गाठणें ह्या आरमारास अशक्य झालें. इंग्लंडच्या आरमारानें तुर्की सरकारास निरोप पाठविला कीं तुमच्या राजधानींत जर्मन पिशाचाचे वड व पिंपळ आहेत; ते उपटून तुम्ही बाहेर टाकावेत! तुर्की सरकारनें तसे करण्याचे नाकारलें. दार्दानेलीसची सामुद्रधुनी सुरुंगाच्या सहाय्यानें खुशाल बंद ठेवा त्यात आमचें कांहीं नुकसान नाहीं–तुमचेंच नुकसान आहे, असें तुर्की सरकारला इंग्रजांनीं नीट समजावून सांगितलें. पण, तुर्की सरकारनें उत्तर दिलें, कीं महायुद्धात तटस्थ वृत्तीनेंच वागण्याचा आमचा निश्चय आहे, तथापि गोबेन व ब्रॅसला हीं क्रूझरें सोडण्यास, किंवा जर्मन नोकर काढून टाकण्यास आम्ही तयार नाहीं. इंग्लंडनें जाहीर केलें कीं तटस्थवृत्ति कायम असल्यास आम्हीहि तुमच्याशीं लढत नाहीं.

पण जोंपर्यंत गोबेन व ब्रॅसला हीं क्रूझरें दार्दानेलिसच्या आंत आहेत तोंपर्यंत दार्दानेलिसच्या बाहेर त्याची मार्गप्रतिक्षा करीत उभे रहाणार, मग तुम्ही दार्दानेलिसची सामुद्रधुनी सुरुगानीं खुशाल बंद करून ठेवावी. वड व पिंपळ आम्ही उपटून टाकीत नाहीं असें साफ सांगितल्यानंतरहि दारावाहेर उभा राहिलेला मांत्रिक जेव्हा मंत्राक्षता टाकतो तेव्हा तुर्कांच्या बुद्धीला असा लहानसा भ्रम झाला कीं मांत्रिकापेक्षा पिशाचच अधिक सबल झाले पाहिजे. हा भ्रम होण्याबरोबर पिशाच्च बाधा होण्याची करकरीत तिन्हीसाजा जवळ येत चालली असे जर्मनीला वाटलें; आणि गोबेन, ब्रॅसला हीं क्रूझरें पूर्वेस बास्फरस सामुद्रधुनींतून बाहेर पडून रशियाच्या काळया समुद्रात तुर्कस्थानच्या व्यापारी जहाजाबरोबर पहारेकरी म्हणून हळून फेरफटका करून आलीं. काळ्या समुद्रात तुर्कस्थानच्या तोडीचें किंबहुना तुर्कस्थानहून अधिक बलाढ्य रशियाचें आरमार आहे. पण त्यांत गोबेनच्या तोडीचे एकहि क्रूझर नाहीं. शिवाय रशियाच्या गोलदाजापेक्षा जर्मन गोलदाज दर्यावर्दी युद्धात अधिक पटाईत अशी ख्याती असल्यामुळे काळया समुद्रात फेरफटक्यास निघालेल्या जर्मन समधाच्या दृष्टीसमोर रशियन आरमार आलें नाही. रशियन मांत्रिकापासून आमचें संरक्षण करण्यास जर्मन भुतें काळया समुद्रावर समर्थ आहेत अशी खातरजमा ह्या फेरफटक्यानें तुर्कांच्या मनाची झाली; जर्मन भूत तुर्कस्थानास अधिक पछाडत चाललें. गोबेन, ब्रॅसला जोंपर्यंत आपल्या जवळ आहेत आणि दार्दानेलिसची सामुद्रधुनी सुरुगानी बंद केलेली आहे, तोंपर्यंत काळ्या समुद्रावर आपली सत्ता चालणार, आणि काळया समुद्रावर आपली सत्ता चालली म्हणजे रशियापासून आपणास भीति नाहीं, ही खूणगाठ तुर्कांच्या मनास पटली खरी, पण इंग्लंड व फ्रान्स या जगद्विख्यात बलाढ्य मांत्रिकाची वाट काय ? त्यांचें आरमार तर दाराबाहेर उभें आहे. जर्मन भुताने मोह पाडला कीं आरमार काहीं जमिनीवर चालू शकत नाहीं, आणि भूमध्य समुद्र जरी इंग्लंड व फ्रान्स ह्या जोडीच्या ताब्यात असला तरी बेल्जम व फ्रान्स येथील युद्धात इंग्लंड व फ्रान्सचे सर्व लोक गुतले असल्यामुळें तुर्की किनाऱ्यावर सैन्य उतरून तुर्कांशीं लढण्याला या जोडीपाशीं सैन्यच शिल्लक नाहीं. जर्मन पिशाच्याचें हें म्हणणें तुर्कांना एकाएकीं पटेना. या समयीं एका मोठ्या लाभाचा गोळा जर्मनीनें तुर्कस्थानपुढें उभा केला. एशिया मायनरच्या दक्षिणेस असलेल्या तुर्कांच्या सिरीया प्रांतांत जर

तुर्कांनीं मोठें सैन्य जमा केलें, तर तुर्की सेनेस जरूर लागणारे जर्मन अधिकारी व गोलदाज आम्हीं पुरवू, असें तुर्कस्थानास जर्मनीनें आश्वासन दिलें. लगेच बरेच जर्मन अधिकारी आणि हजारों गोलदाज व कारागीर जर्मनींतून कॉन्स्टाटिनोपल, एशिया मायनर, व सीरिया प्रातात येऊन दाखल झाले. जर्मनी तुर्कस्थानास सांगे, कीं सर्व इंग्रजी व फ्रेंच सैन्य आम्ही बेल्जममध्यें गुतविलें आहे; एशिया मायनर व सीरिया प्रातात तू दहा बारा लाख सैन्य गोळा केलें आहेस, या सैन्यास लागणारे कारागीर, गोलदाज व सेनानायक आम्ही पुरविले आहेत; तुझ्या सीरिया प्रातास लागून असलेला सुएझचा कालवा व इजिप्त देश हीं अनाथ व उघडी वाघडीं पडलीं आहेत, ह्यावेळीं इजिप्तवर स्वारी चढवून इजिप्तचें प्रभुत्व सपादन करून तुर्कस्थानच्या वैभवास लागलेल्या ओहोटीला असल्या साहसानें एकदम भरतीचें स्वरूप देण्याची संधि तू व्यर्थ का दवडतोस ? सर्व पापें लोभमूलक असतात, तेव्हा असला प्रचंड लोभ पुढे उभा करण्यात आला असताना तुर्कस्थानच्या तोंडस पाणी सुटावे यात काहीं नवल नाहीं. सोन्याचा गोळा दृष्टीस पडला खरा पण इंग्रजानीं आपलें अहित काय केलें ? फ्रेंचांनीं आपले कोणते नुकसान केलें ? इंग्लड व फ्रान्स यानीं वेळोवेळीं मदत केली नाहीं काय ? वगैरे सुविचार तुर्कस्थानास सुचावयास पाहिजे होते. तरुण तुर्कांची दृष्टि इजिप्तच्या सोन्याच्या गोळ्यावर तेवढी गेली व इतर सारासार विचार त्याना राहिला नाहीं. तरुण तुर्कांनीं मागचा पुढचा विचार केला नाहीं खरा, पण दहा बारा लाख गोळा झालेल्या तुर्की सैनिकानीं अर्थात् तुर्की जनसमूहानें मागचें पुढचें तारतम्य सोडावयाचें नव्हतें. पण "बुभुक्षितः किं न करोति पाप" या न्यायानें दरिद्री झालेली तुर्की प्रजा इजिप्तचा सोन्याचा गोळा लुटावयास मिळतो आहे असा भ्रम उत्पन्न होण्याबरोबर दैन्य व निरुत्साह टाकून देऊन भराभर सैन्यांत सामील झाली. याच सुमारास अँटवर्प पडून बेल्जमचा किनारा जर्मनीच्या ताब्यात गेला; आणि जर्मनीनें फ्रान्समध्यें मोठा जय मिळविला असा नगारा इस्तबुलच्या किल्ल्यांत वाजविण्यात आला. पोलडची राजधानी वारसा शहर याच्याजवळ पांच सात मैलावर जर्मन जाऊन पोहोंचल्यावर जरी रशियानें पन्नास साठ मैल मागें जर्मनीला हटविलें, तरी जर्मन सैन्याची सावली वारसावर एक क्षण पडली होती, तेवढयाच पराचा वारसा शहर घेतलें असा कावळा करून रशियावरहि आम्हीं जय मिळविला, अशी कोल्हेकुइ तुर्की लोकाच्या कानांत

कानठळ्या बसेतों जर्मनीनें मुद्दाम केली. ॲंटवर्प घेतलें, बेल्जमचा किनारा घेतला, पोलंडची राजधानी घेतली, झालें, करकरीत तिन्हीसांजाची वेळ प्राप्त झाली आणि जर्मन पिशाचानें तुर्की झाडास पुरे पछाडलें! लगेच ऑक्टोबर अखेरीस काळया समुद्रात तुर्कांचें आरमार शिरून रशियाच्या प्रख्यात आडेसा बंदरात कांहीं व्यापारी जहाजे व कांहीं किरकोळ रशियन क्रुझरें बुडवून तुर्कस्थाननें रशियन भूमीवर भडिमार करण्यास सुरवार केली! क्रिमीयाच्या पूर्वेस असलेल्या आझोगच्या समुद्राचें तोंड बंद करण्याकरिता तेथें सुरुंग टाकले, व काळ्या समुद्राच्या पूर्व किनाऱ्यावरील रशियाच्या काकेशियन प्रांतांत सैन्य उतरण्यास सोयीचीं असलेलीं बंदरे कबजात घेण्याचा उद्योग तुर्की आरमाराने आरंभिला. तुर्कांनीं अशी अवचित चढाई जर्मन पिशाचाला बळी पडून सुरू केल्यामुळें नाइलाजानें इच्छा नसता इंग्लंड, फ्रान्स व रशिया यानाहि नोव्हेंबरच्या पहिल्या तारखेस तुर्कस्थानशीं लढाई जाहीर करणें प्राप्त झाले.

## तुर्की युद्ध

तुर्कांशीं युद्ध सुरू झाल्यामुळें पूर्व रणभूमींतील म्हणजे पूर्व प्रशिया, पोलंड व गॅलेशिया येथील रशियाच्या युद्धास कांहीं काळ विशेष महत्त्व उरलेलें नाहीं. आक्टोबर प्रारंभाला रशियानें आस्ट्रियाचा गॅलिशियन प्रांत बराचसा काबीज केला होता. लेंबर्कचा किल्ला घेऊन प्रेसबिसलला वेढा देऊन कार्पेथियन पर्वत ओलांडून जाण्याचे घाटहि रशियानें ताब्यात घेतले होते. पण आक्टोबर प्रारंभाला जर्मनीचें दहा पंधरा लाख नवें सैन्य पोलंडवर निरनिराळ्या दिशेनें चाल करून गेल्यामुळें व आस्ट्रियानेंहि नवीन सैन्य आणिल्यामुळें आक्टोबर अखेरला आस्ट्रियानें रशियास कार्पेथियन पर्वतापासून मागें हटविलें व प्रेसबिसलचा वेढा उठवून प्रेसबिसलच्या उत्तरेस सेन नदी ओलांडूनहि आस्ट्रियन सैन्य पलीकडे गेलें. या गॅलिशियाच्या उत्तरेस पोलंडमध्यें आक्टोबर पंधराच्या सुमारास वार्सापर्यंत व्हिश्चुला नदीच्या कांठचा प्रदेश जर्मनीनें गाठला. म्हणजे सर्व व्हिश्चुला नदी किंवा पश्चिमेकडचा पोलंडचा अर्धा भाग जर्मनीनें पंधरा दिवसांत व्यापून टाकला असें म्हणण्यास हरकत नाहीं. आक्टोबरच्या दुसऱ्या पंधरवड्यात रशियानें वार्सापासून जर्मनीस पन्नास पाऊणशें मैल पश्चिमेला, दक्षिणेला व उत्तरेला मागें हटविलें व आक्टोबर अखेरहि मागें हटविण्याची क्रिया चालूच होती. नोव्हेंबर-डिसेंबर.

मध्यें रशिया जर्मनी–आस्ट्रियाला त्याच्या स्वतःच्या पोलंडमधून बाहेर काढू शकेल. ह्यापलीकडे विशेष कांहीं करील असें दिसत नाहीं. गॅलिशियांत आस्ट्रिया जोरांत लढत असून रशियन आस्वळाच्या मिठींतून आस्ट्रियानें आपणास बरेंच मुक्त करून घेतलें आहे. व त्यामुळे आस्ट्रियाची दाणादाण होते कीं काय, अशा तऱ्हेची भीति जर्मनीस नोव्हेंबर प्रारंभाला उरली नाहीं. पोलंडमधून जर्मनीच्या सरहद्दीपर्यंत रशिया आला तर लष्करी धोरणाच्या दृष्टीनें त्यात जर्मनीस अनिष्ट कांहीं नाहीं. जर्मनीच्या सरहद्दीवर जर्मनीच्या स्वतःच्या इतक्या आगगाड्या आहेत कीं सरहद्दीचा सर्व प्रांत एक प्रकारचें आगगाडीचें जाळेंच झालें आहे. रशियाचें धूड मोठें; आपल्या अजस्र ओझ्याखालीं तो जर्मनीला चिरडून टाकावयाचा; अशा अगडबंब सेनेपासून जर जर्मनीला स्वतःचा बचाव करून घ्यावयाचा असेल तर तो बचाव चपलतेच्या यंत्रसामग्रीच्या जोरावरच करता येईल. आगगाड्या, मोटारगाड्या वगैरेचें सहाय्य असल्यावाचून चपलतेनें सैन्याच्या हालचाली करता येत नाहींत; मोटारगाड्याना उपयोगी पडणारे रस्ते फारच थोडे; नद्याना पूल नाहींत; आणि ठिकठिकाणीं जंगलें आणि दलदलीचीं रानें कित्येक मैलपर्यंत पसरलेलीं; असा प्रदेश जर्मन चपलतेस बिलकूल अनुकूल नाहीं. जर्मनीच्या सरहद्दीवर स्वारी करून जाण्यास रशियाला सुद्धा हा प्रदेश वाईटच; म्हणून युद्धाचे पहिले दोन महिने रशियानेंहि हा प्रदेश टाकून गॅलिशियात आपला मोठा सेनासमूह आस्ट्रियाच्या अंगावर घातला. आस्ट्रियाच्या बाजूचा हा रशियन सैन्याचा प्रवाह स्वतःकडे पोलंडमधूनच ओढून घेण्याकरिता जर्मनीनें पोलंडवर वार्सापर्यंत स्वारी केली. वार्साशहर जर्मनीच्या हस्तगत झाल्यास इभ्रत जाते म्हणून रशियालाहि आपल्या सैन्याचा प्रवाह वार्साकडे फिरवावा लागला. आक्टोबरच्या दुसऱ्या पंधरवड्यात जर्मन सैन्यानें हा रशियन सैन्याचा प्रवाह स्वतः मागें हाकीत जर्मन सरहद्दीपर्यंत आणून सोडण्याचा उद्योग आरंभला आहे. असला उद्योग करतांना कांहीं वेळा पुढें चाल करून जावें लागतें व कांहीं वेळा मागें हटून जावें लागतें, हें उघड आहे स्वतःच्या अंगावर रशियाला खेंचून घेण्यात हेतु काय ? हेतु इतकाच, आस्ट्रिया रशियाच्या मिठींतून सुटून तुर्कस्थानास रशियाशीं युद्ध सुरू करण्यास प्रोत्साहन मिळावें. आक्टोबर अखेर आस्ट्रिया पुनः आपल्या पायावर उभा राहिला आहे, व तुर्कस्थाननेंहि युद्ध सुरू केलें आहे. नोव्हेंबर महिन्यांत किंबहुना सर्व हिंवाळ्यांत

आस्ट्रियाच्या वाट्याला रशिया विशेषसा जाणार नाहीं, आस्ट्रियाला पुढे सरकूं देणार नाहीं इतकेंच. जर्मन सैन्याचा व रशियन सैन्याचा आता पोलंडमध्ये हस्तस्पर्श झाला असल्यामुळे महायुद्धातील खऱ्या लढाया आस्ट्रियाच्या बाजूला न लढता पोलंड व जर्मनी यांच्या सरहद्दीवरच लढण्याचें जर्मनीचें लष्करी धोरण रशियालाहि स्वीकारणें भाग पडलें आहे. म्हणून सर्व हिंवाळा रशियाला पोलंडचा बंदोबस्त करण्यांत व जर्मनीच्या सरहद्दीवरील लढायाची आगाऊ व्यवस्था करण्यात घालवावा लागेल. हिंवाळ्यात पोलंडमध्ये काहीं महत्त्वाच्या लढाया होतील हें खरें, पण त्या लढायाचें महत्त्व उपोद्घाताच्या स्वरूपाचें असल्यामुळें ज्या लढायांच्यामुळे महायुद्धाची परिसमाप्ति रशिया करूं शकेल त्या लढाया हिंवाळ्यानंतर जर्मनीच्या सरहद्दीवरच रशियास लढाव्या लागतील. आक्टोबरच्या पूर्वी परिसमाप्तीच्या ह्या लढाया आस्ट्रियाच्या बाजूला लढण्याचें रशियाचे धोरण होतें. आक्टोबर महिन्यांत जर्मनीनें हें धोरण बदलविण्यास रशियास भाग पाडले, आणि पोलंडमधील आपली सरहद्द ही परिसमाप्तीच्या चढायाची जागा ठरवून तेथे रशियास खेंचून आणलें. आक्टोबरमध्ये झालेल्या लष्करी धोरणातील हा फेरफार महत्त्वाचा असून त्यामुळें सर्व हिंवाळा रशियास पूर्व तयारींत व पूर्वतयारीच्या लढाया लढण्यात घालवावा लागेल अर्थात् रशियाच्या बाजूच्या या रणक्षेत्रात पूर्वतयारीच्या या लढाया रशिया कसकशा जिंकतो व ह्यासंबंधाच्या हालचालींत कसकसे यश संपादन करतो, हें पहाण्यापलिकडे विशेषसें लक्ष वाचकानीं पोलंडच्या रणक्षेत्रात घालण्याचें कारण नाहीं. जर्मनी व आस्ट्रिया ह्यांना ह्या बाजूला जरा विसावा मिळावयाचा असल्यामुळें नोव्हेंबर–डिसेंबरांतील महत्त्व फ्रान्सच्या बाजूचेंच होय. नोव्हेंबर डिसेंबरांतील फ्रान्सचें रणक्षेत्र मूलाधार स्वरूपाचें असल्यामुळें अंशतः परिसमाप्तीच्या स्वरूपाच्याहि काहीं लढाया ह्या रणक्षेत्रात नोव्हेंबर–डिसेंबरांत होण्याचा संभव आहे. या क्षेत्राच्या खालोखाल तुर्कांचें युद्धहि नोव्हेंबर–डिसेंबरांत महत्त्वाचें समजलें जाईल. तुर्कांचें युद्ध शाखा स्वरूपाचें आहे, मुळ स्तंभाच्या स्वरूपाचें नव्हे. या शाखा वाढल्या तर मूलस्तंभाला म्हणजे जर्मनीला जोर येईल, पण अखेरीस रशियाच्या अजस्त्र ओझ्याखालीं जर्मनी चिरडून जाण्याची जेव्हा वेळ येईल तेव्हा तुर्की युद्धाच्या शाखाहि मध्यंतरी जरी कितीहि वाढल्या तरी आपोआप गळून पडतील. बरें; मध्यंतरी या शाखा जर वाढल्या नाहींत किंवा अजिबात त्यांना तोडून टाकता

आलें, तरी मुळस्तभास पुन्हा तोडण्याची क्रिया करणें भाग आहेच. अर्थात जर्मनी जगला तरच टर्की जगणार, नाहीं तर मध्यतरी कितीहि जरी सोन्याच्या गोळयासभोंवती तुर्कस्थाननें विळखे घेतले, तरी अखेरीस जर्मनीबरोबर टर्कीलाहि दातीं तृण धरून जीवदान मागणे भाग आहे. अशी जरी स्थिति असली तरी मूल स्तभाला जोर पोंचू नये ह्मणून हिवाळयात टर्कीच्या युद्धाच्या या शाखा तोडून टाकणें फ्रान्स, रशिया व इग्लड याना भाग आहे. शाखा तोडण्याचे हें काम नोव्हेंबर–डिसेंबरात कसे करण्यात येईल, याचा आता आपण विचार करू. तुर्की युद्धाच्या रणक्षेत्राचे चार भाग होतात. पैकीं दोन जमिनीवरचे व दोन भाग समुद्राचे. जमिनीवरच्या भागात इजिप्तवर तुर्कस्थानचा डोळा असल्यामुळें सुएझचा कॅनॉल व त्या कॅनॉलच्या उत्तरेस असलेला सिरीया प्रात हाच टापू तुर्की युद्धातील मुख्य होय. सिरीया प्रातातून दोन तीन लाख तुर्की सैन्य इजिप्तवर स्वारी करील असा अदाज आहे. या दोन तीन लाखात चाळीस पन्नास हजार सैन्यच अर्वाचीन पद्धतीनें तयार केलेलें असणार, व तेवढया सैन्यास सिरीयाच्या सरहद्दीवर थोपवून धरण्याचे सामर्थ्य इजिप्त व सुएझ कॅनॉल येथील इग्रजी सैन्याच्या अगात आजच आहे. ताबडया समुद्राच्या बाजूचे आकाबाचें आखात व आकाबा शहर इग्रजी आरमारानें साप्रत ताब्यात घेतले असून ताबडया समुद्रातून सिरीयास शह देण्यास सुरुवातहि केली आहे. शिवाय नोव्हेंबर–डिसेंबर महिन्यात इग्लड, फ्रान्स व हिंदुस्थान येथून लाख दीड लाख नवें सैन्य पॅलेस्टाईनच्या किनाऱ्यावर व आकाबाचे बदरावर उतरण्यास हरकत येणार नाहीं. या नव्या सैन्यापुढे तुर्कांचा निभाव लागणें कठीण आहे. तेव्हा पहिल्या धडकीसरसें तुर्कांना इजिप्तमध्ये जर घुसता आले नाहीं, तर हिवाळयात ताबडया समुद्रावरील प्रात व भूमध्य समुद्रावरील प्रात व भूमध्य समद्रावरील सिरीया प्रात या मुलखाना तुर्कस्थानाला मुकावे लागेल. इजिप्तमधील सरदारानीं बड करूं नये म्हणून इग्रजी सेनापतीनें सर्व इजिप्तचा प्रात आपल्या स्वतःच्या लष्करी अमलाखालीं घेतला आहे, आणि इजिप्तच्या सरदारानींहि राजनिष्ठेचें व मदतीचें पूर्ण आश्वासन इग्रजास दिलें आहे. तुर्की युद्धातील दुसरें रण म्हणजे काळा समुद्र व कास्पियन समुद्र याच्यामध्यें ज्या प्रदेशात तुर्कस्थान व रशिया याची सरहद्द एकमेकास मिळते तो भाग होय. या भागाकडे तुर्कस्थानच्या लोभाची वस्तू कोणचीच नाहीं, तेव्हा रशियास थोडासा आत घेऊन आपला मुलुख साभाळण्यापलिकडे तुर्कस्थान

या बाजूला विशेष गडबड करील असें चिन्ह दिसत नाहीं. तथापि काकेशियस ातातील रशियाचें मोठें सैन्य ह्या बाजूला उतरून इराणचे सरहद्दीवरील तु कस्थानचे सर्व प्रात काबीज करण्याचा उद्योग रशिया हिवाळ्यात करील. ढाईच्या सुरवातीलाचे रशियन सैन्य तुर्की प्रातात शिरले असून मुलूख काबीज करण्याच्या त्याच्या कामास सुरवात झाली आहे. येथे तुर्कांचें जरी मोठें सैन्य नसलें तरी हिंवाळा सपण्याच्या आत तुर्कांचा व त्याबरोबरच इराण, अफगाणिस्तान व कास्पियन समुद्राकडील रशियन–तुर्कस्थान वगैरे मुसलमानी राष्ट्राचाहि पक्का बदोबस्त करणे रशियास भाग आहे सर्व मुसलमानी राष्ट्रानीं एकजूट केली पाहिजे या तत्त्वाचे पुरस्कर्ते तरुण तुर्क असून तरुण तुर्कांचे हेर सर्व मुसलमानी देशातून व समाजातून सर्व मुसलमानाची जूट या भपकेदार नावाखालीं सर्व मुसलमानाना चिथवून देण्याकरिता चहूकडे फिरत आहेत. गोबेन व ब्रॅसला हीं क्रूझरे कॉन्स्टाटिनोपलजवळ दाखल झाल्यामुळे ज्याप्रमाणें जर्मन पिशाच्चाचा सचार तुर्कांत होणें शक्य झाले त्याप्रमाणें जर्मन सेनापतीना जर दहा–वीस हजार तुर्की सैन्य इराणात नेता आले तर मुसलमानाची जूट या भपकेदार समधाचाहि सचार तेहरान, काबूल, व बुखारा वगैरे राजधानींत होऊ लागेल. विषाचा प्रसार बद पाडण्याकरिता इराणच्या सरहद्दीवरील तुर्कस्थानचे सर्व प्रात रशियाला एकदम कबजात घेणें भाग आहे. रशियाच्या या प्रयत्नास काळ्या समुद्राच्या पूर्व किनाऱ्यावर नोवोरसी बदरापासून खालीं तुर्कस्थानच्या हद्दीपर्यंत साधेल तेथे बरेंच मोठें सैन्य उतरून, कास्पियन समुद्र व काळा समुद्र याच्या मधील टापूत गनिमी काव्याचा धुमाकूळ घालण्यास तुर्कस्थान प्रवृत्त होईल असा अदाज आहे. असल्या धुमाकुळानें रशियास पायबद बसून तेहरान, काबूल व बुखारा येथे भ्रामक खोट्या जयाचें पीक पिकविण्यास तुर्की हेराना सधि आहे. असली सधि मिळू नये ह्मणून काळ्या समुद्रावरील सर्व बदरावर रशिया कडेकोट बदोबस्त ठेवील. काळ्या समुद्राच्या उत्तरेस असलेल्या आजोबच्या समुद्रात रशियन आरमार सांप्रत सुरक्षित बसलें आहे. या आरमारावरील गोलदाज जर्मनीच्या बरोबरीचे नसल्यामुळें रशियन आरमार गोबेनशीं दोन हात करण्याकरिता जरा कचरत आहे असे म्हणतात. हा दोष दूर करण्याकरिता इग्लडांतील कुशल कारागीर व गोलदाज साप्रत रशियाकडे सर्व्हिया रुमानियातून रवाना केले असून नोव्हेंबर अखेरला किंवा डिसेंबरमध्यें काळ्या समुद्रावर आरमारी लढाई होईल असा अदाज आहे. पूर्व भूमध्य समुद्रात इग्लड

व फ्रान्स याचें आरमार तुर्कस्थानचीं सर्व बंदरें झोडपून काढील; व पॅलेस्टाईन किनाऱ्यावर उतरणाऱ्या इंग्रज फ्रेंच सेनेस मदत करील. सांप्रत दार्दानेलीसच्या सामुद्रधुनीवर इंग्रजी आरमाराचा भडिमार सुरू असून इतर आरमाराची व दहा वीस हजार सैन्याची कुमक येऊन पोचल्यावर दार्दानेलीसची सामुद्रधुनीहि ताब्यात घेऊन मार्मोराच्या समुद्रात शिरून इस्तंबूलचा किल्ला उडवून देण्यास इंग्रज कमी करणार नाहीं. एवंच पहिल्या धडकीसरशी जर इजिप्त तुर्कस्थानास काबीज करतां आला नाहीं आणि हिंवाळ्यात तुर्कस्थानचा गुरु जो जर्मनी त्याला फ्रान्सवर मोठा जय मिळविता आला नाहीं तर हिंवाळ्याच्या अखेरीस तुर्कस्थान चारी बाजूनें ग्रासला जाऊन महायुद्धाच्या शेवटीं जर्मनीबरोबरच तुर्कस्थानचा विनाश होईल, असा रंग दिसत आहे.

## मुसलमानांची राजनिष्ठा

तुर्कांशी युद्ध सुरू झाल्यामुळे इजिप्तमध्यें व हिंदुस्थानमध्ये मुसलमान गडबड करतील असा जर्मनीचा कुतर्क आहे, पण या कुतर्कास काडीचाहि आधार नाहीं. आगाखान व हैद्राबादचे निजामसाहेब यानीं पूर्ण राजनिष्ठेनें हरएकप्रकारची मदत करण्यास सुरवात केली आहे, व सर्व मुसलमानानीहि तसेंच करावे असें त्याचे सर्व मुसलमानाना आग्रहाचे सांगणे आहे. इजिप्तमधल्या सरदारानीहि यावेळीं राजनिष्ठाच दाखविली आहे. मक्का, मदिना आदि करून मुसलमानाचीं जीं यात्रेचीं ठिकाणें व धर्मस्थानें आहेत, त्यास आपण बिलकूल हात लावणार नाहीं असे इंग्रजानी व रशियानें जाहीर केल्यामुळे हिंदुस्थानातल्या सर्व प्रांतातल्या मुसलमान लोकानीं पूर्ण राजनिष्ठा व्यक्त केली आहे. एमडेनने हिंदी महासागरात आक्टोबर महिन्यात लखदीव मालदीवच्या बाजूला पांच सात व्यापारी जहाजे, व पूर्वेस पिन्यांगच्या बाजूला एक रशियन क्रूझर बुडविलें, पण एमडेन सारख्या हडळानें हिंदुस्तानाभोंवतीं कितीहि घिरट्या घातल्या तरी हिंदी लोकाच्या राजनिष्ठेवर त्याचा यत्किंचित्‌हि परिणाम होणे शक्य नाहीं, हें निर्विवाद आहे. आज गुरखे व शिख लोक जिवाची पर्वा न करता ज्याप्रमाणें लढून बेल्जममध्ये जर्मनीलाहि हिंदी सैन्य म्हटलें कीं भ्यावयास लावत आहेत, त्याचप्रमाणें इंग्रजसरकारचें मुसलमान सैन्यहि प्रसंग पडल्यास तुर्कांवरहि तुटून पडण्यास कमी करणार नाहीं, असा हिंदुस्थानास पूर्ण भरवसा वाटत आहे.

---

# महायुद्धाचा नोव्हेंबर–डिसेंबर महिना

## पश्चिम रणभूमीची कुचंबणूक

फ्रान्स व बेल्जम यामधील रणभूमीसंबधानें नोव्हेंबर महिना विशेष महत्त्वाचा गेला नाहीं आक्टोबर महिन्याच्या अखेरीस ह्या रणभूमीची जी स्थिति होती ती स्थिति नोव्हेंबर महिन्याच्या अखेरीसहि कायम राहिली. युद्धाच्या वार्ता वाचणारे वाचक व युद्धासंबधानें लिहिणारे लेखक या दोघांच्याहि दृष्टीनें बातम्यांच्या बाबतींत हा महिना दुष्काळाचा गेला असे म्हणण्यास हरकत नाहीं. फ्रान्समध्यें युद्ध चाललें आहे ते वर्तमानपत्रांना किंवा मासिकांना चटकदार बातम्या पुरविण्याकरिता नव्हे ही गोष्ट खरी. तथापि रोजच्या रोज कालची स्थिति आजहि कायम आहे असा शेरा मारण्याचें रोजचे काम दैनिक पत्रांना नोव्हेंबर महिन्यात फारच कटाळवाणें वाटलें. नोव्हेंबरच्या प्रारंभीं फ्रान्सचें पंधरा–वीस लाख सैन्य ऐन नदीच्या काठीं होते, इंग्लंडचें तीन चार लाख सैन्य यिप्रेसच्या आसपास होतें, व बेल्जमचे चाळीस पन्नास हजार लोक न्यूपोर्टच्या दक्षिणेस होते. ह्या प्रचंड सेना सागराला तोंड देऊन सुमारे पंधरा लाख जर्मन उभे होते. अशा रीतीनें तीस–चाळीस लाख सैन्य समोरासमोर उभे असतांना रणभूमींत युद्धाचा कोणताच चमत्कार कसा दृष्टीस पडला नाहीं ? हे चाळीस लाख लोक एकमेकाकडे टकमक पहात व फावल्यावेळीं चणे कुरमुरे फाकत सबंध नोव्हेंबर महिना कठीत होते काय ? चाळीस लाख सैन्य हातघाईला येणें आणि रणभूमीवर कोणताच चमत्कार दृष्टीस न पडणे, हें शक्य तरी आहे काय ? पश्चिम रणभूमीची ही वाझेचा अवस्था पाहून नाव घेण्यासारखा सेनापति जर्मनी, फ्रान्स किंवा इंग्लंड यांचेपाशीं उरलेला नाहीं, असे काहींनीं उद्गार काढलेले आहेत. कसेहि असो; सबंध एक महिन्यात परिस्थिति पालटली नाहीं ही गोष्ट खरी आहे, आणि या वाझपणाबद्दल दोष जर्मन सेनापतींकडे विशेष लावणें भाग आहे. नोव्हेंबरच्या प्रारंभाला कॅलेवर चालून जाण्याकरिता न्यूपोर्ट, डिक्सम्यू, यिप्रेस, लिले, लाब्रासी व आरास ही येवढी फळी फोडण्याचें काम जर्मनींनें नेटानें सुरू केलें होतें व फ्रेंच लोक जर्मनीची ऐन नदीची फळी फोडण्याच्या उद्योगात होते. जर्मनीला इंग्रजाची फळी फोडता आली नाहीं व फ्रेंचांना जर्मनीचीहि फळी फोडता आली नाहीं.

न्यूपोर्ट, डिक्सम्यु व यिप्रेसच्या उत्तरेस पाच सात मैलावर असलेलें विक्सच्यूट ह्या तीन ठाण्याच्या ठिकाणीं जर्मनीनें इंग्रजाची फळी अर्धवट फोडून जर्मन सैन्य काहीं ठिकाणीं चार पाच मैल आत घुसले; पण न्यूपोर्ट, डिक्सम्यूर व विक्सच्यूट या फळीच्या मागे सर्व प्रदेश कालव्यानीं, नद्यानाल्यानीं व समुद्राच्या खाड्यानीं व्यापलेला असून जमीन पाणीबुड आहे. बाध फोडून टाकून सर्व भूमि जलमय करण्यात आली व पाण्याकडून प्राण जाण्याचा प्रसग टाळण्याकरिता जर्मन सेनेला पुन्हा पूर्व ठिकाणीं परत जावे लागलें. खुद्द यिप्रेस व दक्षिणेस आरासचा टापू या ठिकाणीं जर्मनीला इंग्रजी सेनेबरोबरच पाणीबूड जमिनीवरच पसरणाऱ्या समुद्राच्या किंवा कालव्याच्या पाण्याशीं झुजण्याचा प्रसग नव्हता, पण तेथे इंग्रजी सैन्य चग बाधून लढण्यास उभे होते. यिप्रेस व आरास याच्या सभोंवती आक्टोबर पधरापासून नोव्हेंबर वीसपर्यंत अत्यत निकराची लढाई झाली. इंग्रजाची फळी फोडण्याचा जर्मन सेनेनें अट्टाहास केला. प्रशियन गार्ड नावाचें जर्मनीचें शेलके सैन्य या ठिकाणीं हल्ला चढवीत होतें. साहस, मृत्यूला धिक्कारणारा हट्ट व शत्रूवर तुटून पडण्याची चपळाई या गुणाबद्दल हेंच शेलके जर्मन सैन्य फार नावाजलें असून कैसर बादशहाच्या हातातील तें अमोघ अस्त्र समजलें जातें. हें अमोघ अस्त्र जर्मनीनें यिप्रेस व आरास या दोन्ही ठिकाणीं सोडलें; व या सैन्याची मृत्यूबद्दलची बेपर्वाई इंग्रजाच्या पूर्ण अनुभवास आली. इंग्रजाचे महत्त्वाचे चर जर्मनीनें काहीं काहीं वेळा घेतले; पण इंग्रजानीं कुमक येऊन पोंचताच तितक्याच धिटाईनें व साहसानें उलट हल्ले चढविले व प्रशियन गार्डला परतवून लावले ! एकेप्रसगीं तर अशी स्थिति झाली कीं, प्रशियन गार्ड इंग्रजाच्या तळात शिरले, व त्याना तोंड देण्यास कोणीच वीर हयात राहिला नाहीं. निकरानें लढणारी सर्व सेना मृत्युमुखीं पडली व कुमक येऊन पोंचण्यास काहीं तास अवकाश होता. प्रशियन गार्ड जर जरा अधिक आंत शिरले असते तर यिप्रेस जवळचा सर्वच बाजार आटपला असता. सैन्य मात्र नाहीं, सेनानायक तेवढे शिल्लक; अशी विलक्षण स्थिति झाली ! समयसूचक इंग्रजी सेनानायकांनीं स्वयपाक घरातील सर्व आचारी पाणके बाहेर काढले, आणि त्याच्या हातात बदुका देऊन शत्रू ज्या दिशेला होता त्या दिशेकडे बदुकाची फैर झाडत रहाण्यास त्यांना सागितलें. प्रशियन गार्डोना वाटलें कीं, इंग्रजी सैन्य हट्टानें लढत आहे; आणि रणागणावरील इंग्रजी सेनेच्या

ह्या हट्टी स्वभावाच्या प्रदर्शनावरच कुमक येऊन पोंचेपर्यंतची वेळ इंग्रजी सेनानायकाना मारून नेता आली. हट्टाच्या लढाईंत यिप्रेस व आरास येथे इंग्रज व जर्मन या दोघाच्या रक्तानें रणभूमि माखून गेली. न्यूपोर्ट, डिक्सम्यूर व विक्सच्यूट ह्या ठिकाणीं रणभूमि जर पाण्याखालीं बुडन गेली तर यिप्रेस व आरास येथे रणभूमि वीराच्या रक्ताखालीं बुडून गेली असे म्हणावयास हरकत नाहीं! अशा रीतीनें रणभूमि रक्ताखालीं बुडून जर्मनीनें आरासच्या पश्चिमेस पाच दहा मैलपर्यंतच हल्ला चढविला, आणि यिप्रेस गावाच्या जवळ तोफा आणून यिप्रेस गाव नोव्हेंबर बावीस तेवीसच्या सुमारास जाळून पोळून फस्त केले. सहा आठवडे इतकी निकराची लढाई यिप्रेस व आरास येथे करण्याचें कारण काय? आपलें पाऊल विशेष पुढें पडत नाहीं असें आठ दहा दिवसाच्या लढाईनें अनुभवास येताच ऐन नदीवरील तटबदीसारखी तटबदी यिप्रेसच्या बाजूला निर्माण करून जर्मन सैन्य स्वस्थ का बसलें नाहीं? मार्न नदीवरच्या पराभवामुळे पारिस शहर हातीं लागत नाहीं असे समजताच जर्मनीनें जसा तो नाद सोडून दिला, त्याप्रमाणें यिप्रेस व आरास येथे विशेष पुढे पाऊल पडत नाहीं असे पहाताच जर्मनीनें कॅले बदराकडे जाण्याचा नाद का सोडला नाहीं? कॅलेवर एवढा कटाक्ष का? कॅले किंवा कॅलेच्या दक्षिणचा फ्रान्सचा किनारा हीं घेतल्यानें जर्मनीला असा कोणता मोठा फायदा आहे कीं त्याच्याकरिता लाखों लोकाचें रक्त रणभूमीवर शिंपडण्यास जर्मनीने तयार व्हावे?

## चिमटयांचा त्रास

कोणी म्हणतात कॅले घेऊन इंग्लडवर स्वारी करण्याचा जर्मनीचा विचार आहे. इंग्लडवर स्वारी करण्यास इंग्लडच्या आरमाराचा प्रथम पराभव केला पाहिजे. जोंपर्यंत जर्मनीचें आरमार कील कॅनालमध्यें दडून बसलेलें आहे, तोंपर्यंत इंग्लडवर स्वारी करण्याच्या कल्पना फोल होत. थडी पडून धुक्याच्या पाघरूणांत लपून राहून जर्मन ड्रेडनॉट जहाजें डिसेंबर जानेवारींत अवचित हल्ला करून जय मिळविणार आहेत, व या काल्पनिक जयानंतरच्या इंग्लडवरील स्वारीकरता कॅले घेण्याची ही खटपट होती, असें म्हणावे तर तेंहि जुळत नाहीं. कारण जर्मन आरमारानें जर इंग्रजी आरमारावर जय मिळविला, तर कॅलेच्या आसपासच्या समुद्र किनाऱ्यावरूनच इंग्लडवर चाल कशाला करावयाला पाहिजे? ऑस्टेंडच्या बाजूचा बेल्जमचा

किनारा जर्मनीनें आपल्या ताब्यात घेतलाच आहे. तेथून इंग्रजी किनारा साठ सत्तर मैलावरच आहे. इग्रजी आरमाराचा नाश केल्यावर ऑस्टेंड किंवा ॲंटवर्प येथून हा हां म्हणता लाखो सैन्य इंग्लडच्या किनाऱ्यावर उतरविता येणें शक्य आहे. मग कॅलेकरता धडपड का? ज्याला इंग्लंडवर स्वारी करायची त्यानें इंग्लडच्या आरमाराचा पराभव करण्याची प्रथम खटपट केली पाहिजे. बर्फाची कडक थंडी व धुक्याचा अंधकार याचा फायदा घेऊन जर्मनीचीं काहीं जहाजें इंग्लडच्या आरमाराची फळी फोडून अटलांटिक महासागरात धिंगाणा घालण्याकरिता बाहेर पडू शकतील. कील कॅनालमध्यें कोंडल्या गेलेल्या जर्मनीच्या जहाजाचा समुद्राचा मार्ग रोखून बसलेल्या इंग्रजी आरमारावरील खलाशी कडक थंडीमुळे पहारेकऱ्याच्या कामात ढिलाई दाखवितील, किंवा धुक्यामुळे फळी फोडून बाहेर पडणारीं जर्मन जहाजे त्याच्या दृष्टीसहि पडणार नाहींत, हें खरे; पण उत्तर समुद्रात अशा रीतीनें जर्मनीच्या जहाजाचा चोरटा संचार सुरू होणें म्हणजे इंग्रजी आरमाराचा पराभव करणे नव्हे. असल्या चोरट्या संचारामुळे उत्तर समद्रातील इंग्रजी व्यापाराला थोडा धक्का बसेल ही गोष्ट खरी, पण असल्या धुक्यातील चोरट्या संचाराचाहि बंदोबस्त इंग्रजी आरमार खात्यानें आगाऊच केलेला आहे; इंग्रजी आरमाराला ठाऊक असलेल्या मार्गाशिवाय इतर सर्व ठिकाणीं उत्तर समुद्रात इंग्रजी आरमारानें सुरुंग टाकले आहेत. अर्थात् ह्या सुरुंगाच्या भीतीमुळे धुक्याचा फायदा घेऊन उत्तर समुद्रात संचार करणें जर्मन जहाजांना धोक्याचें झालें आहे. कडक थंडींत व धुक्याच्या अंधारात जर्मनीला एकच गोष्ट करता येण्यासारखी आहे. ती ही कीं, मासे मारणाऱ्या मचव्याकडून समुद्रात सर्व ठिकाणीं सुरुंग टाकून इंग्लंडनें मोकळा ठेवलेला समुद्राचा भागहि धोक्याचा करावयाचा. हा क्रम जर्मनीनें गेले तीन महिने चालविलेलाच आहे. कडाक्याच्या थंडींत व धुक्यात समुद्रावर वावरण्याची सवय जर्मन खलाशांना इंग्रजांपेक्षा अधिक असल्यामुळें थंडीच्या मोसमात इंग्रजी सुरुंगाबरोबरच जर्मन सुरुंगहि स्कॉटलंडच्या उत्तरेस व स्कॉटलंडच्या पश्चिमेस आयर्लंडच्या किनाऱ्यापर्यंत जारीनें येऊन पोंचतील असा अंदाज आहे. समुद्रावर इंग्रज आरमार बलाढ्य असल्यामुळे जर्मनीचे हे सुरुंग व्यापारी जहाजाच्या मार्गावरून झाडून टाकणें इंग्लंडला शक्य आहे, व आजपर्यंत गेले तीन महिने ही झाडलोट इंग्रजी आरमारानें केलेली आहे. उत्तर समुद्रातील ह्या सुरुं-

गाच्या काटेरी कुपणाचा त्रास इंग्लडपेक्षा जर्मनीलाच अधिक होणार आहे, हें वर सांगितलेंच आहे. हिंवाळयाच्या धुक्यांत सुरुंगाची पेरणी उत्तर समुद्रांत भरपूर करून त्या सुरुंगांना इंग्रजी व्यापारी जहाजाच्या नाशाचें पीक आल्यास पहावे, हा जर्मनीचा डाव आहे. पण हा डाव म्हणजे इंग्रजी आरमाराचा पराभव नव्हे. मग कॅलेचा किनारा जर्मनीला कशाला पाहिजे? इंग्रजी आरमाराचा जर पराभव करता येत नाहीं, तर इंग्लडवर स्वारी तरी कसची करणार? जर इंग्लडवर स्वारी करता येणें शक्य नाहीं तर कॅलेचा किनारा जर्मनीच्या हातीं लागू नये म्हणून आचारी पाणक्याच्या हातांत बंदुका देण्याची पाळी येण्याइतका वीरपुरुषाचा संहार इंग्लडनें तरी का करून घेतला? या प्रश्नाचें उत्तर असें आहे कीं, इंग्लडच्या स्वारीच्या भीतीनें कॅलेच्या किनाऱ्याचें संरक्षण इंग्लडनें केलें नसून सुरुंगाची व पाणबुडया जहाजाची ब्याद उत्तरेप्रमाणें इंग्लडच्या दक्षिण किनाऱ्यालाहि येऊन पोंचेल, या भीतीनें इंग्लड इतक्या हट्टानें जर्मनीशीं यिप्रेस व आरास येथें लढले, आणि डिसेंबरांत पुन्हा तसा प्रसंग आल्यास सदर भीतीमुळेंच तितक्याच हट्टानें पुन्हा लढण्यास कमी करणार नाहीं. कॅले व कॅलेच्या दक्षिणेचा किनारा जर जर्मनीच्या हातीं गेला तर इंग्लिश चॅनॅलमध्यें इंग्लण्डच्या दक्षिणेस सर्व समुद्र जर्मन मचवे सुरुंगमय करतील, दक्षिणेकडून आयर्लंडच्या किनाऱ्यापर्यंतहि या सुरुंगाचें कुंपण जाऊन पोंचेल, शिवाय या टापूंत जर्मनीच्या पाणबुडयाचाहि सुळसुळाट सुरू होईल. अर्थात् सर्व इंग्लडच्या सभोंवार सुरुंगाचें एकप्रकारचें कुंपण पडण्याचा संभव आहे. मार्गावरचे हे सुरुंग झाडून टाकण्याची शक्ति इंग्रजी आरमाराच्या अंगांत पूर्णपणें आहे ही गोष्ट खरी, पण मचव्यानीं सुरुंग टाकावयाचे व आरमारानें झाडावयाचे असला हा मुंगीनें हत्तीच्या कानांत शिरून सतावण्याचा उपद्व्याप असल्यामुळें कॅलेचा किनारा जर्मनीच्या ताब्यांत गेल्यास जर्मनीला रोजच्या रोज बारीकसारीक इंग्लडचे चिमटे घेतां येणें शक्य आहे. असले चिमटे त्या त्या वेळेपुरते महत्त्वाचे नसले तरी एकदरीनें राष्ट्राला चैन पडूं देत नाहीं, आणि चैन पडत नसल्यास वर्षानुवर्ष युद्ध चालविण्याचें सामर्थ्य खालावत जातें. चिमटे काढणें द्विगुणित व्हावें म्हणून जर्मन कॅलेवर जाऊं पहात आहेत, आणि हा चिमटयाचा त्रास चुकविण्याकरितां इंग्लड जर्मनीला नेटानें अडवीत आहे.

## पोलंडमधील तडकाफडकीची कुस्ती

चिमटे काढण्याच्या उपद्व्यापाकरिता जर जर्मनीला कॅले व कॅलेच्या दक्षिणेचा समुद्र किनारा ह्रीं ठाणीं पाहिजे आहेत, तर यिप्रेस व आरास येथील युद्ध नोव्हेंबरच्या शेवटच्या आठवड्यात जर्मनीनें थंड का पाडलें ? जर्मनीनें आपण होऊन थंड पाडलें का त्याला थंड पाडणें भाग पडलें ? जर भाग पडलें, तर इंग्रजाच्या नेटाच्या प्रतिकारामुळे भाग पाडलें, का इतर कांहीं कारणामुळें भाग पडलें ? या प्रश्नाचें उत्तर असें आहे कीं, अंशतः नेटाच्या प्रतिकारामुळे व अंशतः इतर कारणामुळे हें युद्ध थंडावलें. यिप्रेसच्या आसपास दीड महिना जे युद्ध चाललें होतें त्या युद्धात शत्रूचा हल्ला परतविण्याच्या दृष्टीनें इंग्रजी सेनेस चांगलें यश आलें, यात संशय नाहीं, किंबहुना अशा रीतीनें हल्ले परतविण्याचीं जीं तुमुल युद्धें इतिहासात प्रसिद्ध आहेत त्यात यिप्रेसच्या युद्धाला इतिहासकार अग्रस्थानहि देतील. यिप्रेसच्या फळीवर जर्मन सैन्य जे घाव मारीत होतें, त्या घावानीं फळी फुटली नाहीं, उलट घाव मारणाराचे हात मात्र खिळखिळे झाले. ही गोष्ट जरी खरी असली तरी ज्या पवित्र्यावर उभा राहून जर्मन खिलाडी इंग्रजी पोलादावर घाव मारीत होता, तो पवित्रा प्रतिकाराच्या प्रत्याघाताने बिलकूल हाललेला नाही. म्हणजे जर्मनीचे हात खिळखिळे झाले खरे, पण पाय जमिनीला धरून आधारस्तंभाप्रमाणें अद्याप ताठ यिप्रेसच्या आसपास उभे आहेत. पाय जर उभे आहेत तर हलके हलके घाव का मारीत नाहीं ? चिमटे काढण्याचा उपद्व्याप आज जरूर नाहीं, डिसेंबरात, जानेवारींत केव्हाहि सिद्ध झाला तरी चालणार आहे. शूर, मानी व चिकाटी धरण्यात पटाईत असलेला इंग्लंड देश सांप्रत इरेस पेटलेला आहे आणि बेल्जममधील जर्मनीचे पायहि आम्ही बाहेर फेकून देऊं अशी इंग्लंडनें प्रतिज्ञा केली असून, नवे दहा लाख सैन्य उभारण्याची व रोज दीड कोट रुपयाप्रमाणे वर्षानुवर्ष युद्धाकरिता कित्येक अब्ज रुपये खर्च करण्याची मंजुरी मुख्य प्रधान मि. आस्क्विथ यांच्या प्रधानमंडळानें मिळविली आहे, आरमाराची व्यवस्था अत्यंत दक्षतेनें पहाण्यात मि. चर्चिल हे चूर झालेले आहेत; आणि सैन्यात नवी उमेद, नवें साहस, नवा उल्हास उत्पन्न करण्याकरिता युवराजासह बादशहा पंचम जॉर्ज यांची खुद्द स्वारी रणांगणावर गोळीबाराच्या टप्प्याच्या जागीं संचार करीत आहे ! इंग्लंडच्या या आटोकाट उद्योगात व चिकाटींत ढिलेपणा उत्पन्न करण्या-

करिता व इंग्लडमधील सामान्य जनसमूहास चिमटयाच्या भीतीनें सतावून सोडून जनसमूहाच्या औदासिन्याच्यामार्फत इंग्रजांच्या राजकार्यधुरंधर मंडळीचा तेजोभंग करण्याकरिता जर्मनीला कॅले व कॅलेच्या दक्षिणेचा समुद्र किनारा पाहिजे आहे. हें कार्य आज घडून आलें तरी जर्मनीला नको आहे असे नाहीं, तरी पण लष्करी डावपेंचाच्या दृष्टीनें आजच ह्या कार्याची जरुरी तितकी जाज्वल्य नाहीं. पार्लमेंटनें दहा लाख सैन्याची मंजुरी दिली म्हणजे लागलेंच नवें सैन्य लढण्यास सुरुवात करतें अशांतला भाग नाहीं. लोक जमा झाले पाहिजेत, त्यांना लष्करी शिक्षण मिळालें पाहिजे, हत्यारापात्यांची सिद्धता झाली पाहिजे, आणि मग नवें सैन्य रणभूमीवर उतरणार ! हें नवें सैन्य गर्भावस्थेत आहे व त्याचा जन्म होण्यास सृष्टिनियमाप्रमाणें जरी नऊ महिने नाहीं, तरी काहीं महिने हे लोटलेच पाहिजेत. या नवीन वीराचा जन्म होण्यापूर्वी चिमटयाचा उपद्व्याप जर्मनीस सुरू करतां आला तर तें लष्करी धोरणाच्या दृष्टीनें जर्मनीला पुरेसें आहे. इंग्रज लोक नेटानें लढत आहेत, कॅले घेण्याचें काम दोन दिवस पुढे ढकललें तरी भागणारें आहे, तेव्हां थकल्या भागलेल्या सेनेला काहीं काल विश्रांति देऊन ताजीतवानी करावी या आरामाच्या दृष्टीनें जर्मनीनें यिप्रेसची लढाई थंड पाडली काय ? नाहीं; नाइलाजाच्याहि दृष्टीनें बंद पाडली नाहीं, विश्रांतीच्याहि दृष्टीनें बंद पाडली नाहीं, किंवा आरामाच्या दृष्टीनें बंद पाडली नाहीं. कॅले व कॅलेच्या दक्षिणेचा किनारा हीं आपणास घेतलीं पाहिजेत अशी जरुरी जर्मनीस अद्याप वाटत आहे; हीं ठाणीं आपण घेऊं शकूं असली घमेंड जर्मनींत अद्याप जागी आहे, आणि थंडी किंवा ऊन, वारा किंवा पाऊस, निद्रानाश किंवा उपासमार असल्या गोष्टींनीं शरिराच्या होणाऱ्या त्रासाला न जुमानतां सोक्षमोक्ष होईतों सतत लढण्याची रग जर्मनीची कायम आहे. मग जर्मनीनें यिप्रेसच्या बाजूची लढाई थंड कां पाडली ? ह्याचें उत्तर असें आहे कीं, पोलंडमध्यें रशियानें नोव्हेंबरच्या पहिल्या व दुसऱ्या आठवडयांत जर्मनीला चांगली तंबी दिली, म्हणून जर्मनी–बेल्जममध्यें ढिला पडला. आक्टोबर महिन्यांत जर्मनीनें थॉर्न पोसन ह्या सरहद्दीवर आठ दहा लाख सैन्य जमा करून पोलंडची राजधानी जें वार्सा शहर त्यावर स्वारी करण्याच्या रोखानें पोलंडवर हल्ला चढविला; व आक्टोबरच्या तिसऱ्या आठवडयांत वार्साच्या तटबंदीजवळ जर्मन सैन्य गेलें. जर्मनीच्या ह्या हल्लयामुळें आस्ट्रियावरील रशियाची दृष्टि मंद झाली,

आणि रशियन सेनेचा मुख्य ओघ वार्सांकडे वळला. मुख्य प्रवाह आपल्या अंगावर येत आहे असे पाहून जर्मनी मागे हटत चालला. मागे हटताना रस्ते, पूल वगैरे सर्व साधनांचा विध्वंस पोलंडमध्ये जर्मनीनें केला. जर्मनीची अटकळ अशी कीं, आपल्या अंगावर आलेल्या या महाप्रवाहाची गति असल्या कृत्यांनीं मंद होईल व हिंवाळ्यांत दोन दोन चार चार फूट उंचीचे बर्फ पोलंडमध्ये पडूं लागलें म्हणजे जर्मनीची सरहद्द गांठून जर्मन सेनाशकट मोडण्याइतकी ताकद रशियांत रहाणार नाहीं. अशा रीतीनें हिंवाळ्यापुरती रशियाची विल्हेवाट आपण लावूं असा जर्मनीला भरंवसा होता. ह्या भरंवशाच्या जोरावरच कॅले घेण्याचा निकराचा उद्योग जर्मनीने बेल्जमच्या बाजूला आरंभला, आणि सर्व सर्व्हिया पादाक्रांत करण्याकरितां आस्ट्रियाची प्रचंड सेना सर्व्हियामध्ये घुसली. हिंवाळ्याच्या तीन चार महिन्यांत रशिया थंडीनें काकडत राहून जर मंदगति झाला तर तेवढ्या अवधींत एका बाजूला कॅले घेऊन इंग्लंडला चिमटे काढण्याचा उपक्रम जर्मनीने करावयाचा, दुसऱ्या बाजूला आस्ट्रियाने सर्व्हिया घशांत टाकून बल्गेरियाच्या मार्फत तुर्की सरहद्दीशीं आपली सरहद्द भिडवावयाची, आणि तुर्की राजधानींत, जर्मनी व आस्ट्रिया येथील फालतु अनावश्यक किंवा दुय्यम दर्जाच्या बंदुका, काडतुसें, तोफा, गोळे भरपूर लोटून दिल्यावर तुर्कांच्या हातांत त्या दिवट्या देऊन त्यांना इजिप्त, इराण, बुखारा वगैरे सर्व मुसलमानी प्रदेशांस आग लावीत फिरावयास सांगावयाचें. असा दुतोंडी खेळ खेळण्यास हिंवाळ्याच्या प्रारंभापासूनच जर्मनी व आस्ट्रिया ह्यांनीं सुरुवात केली. रशियापाशीं कोटी सैन्य आणि इंग्लंडपाशीं कोट-खर्व-निखर्व परार्ध रुपये, ह्या दोघांचें संमेलन झाल्यास जर्मनीचे शास्त्रीय ज्ञान व सेनाशकटाची तयारी त्यांच्या पुढे किती दिवस टिकणार ? वर्षदोन वर्षांत जर्मनी मेटाकुटीस आलाच पाहिजे, हें अगदीं उघड आहे ही मेटाकुटीची स्थिति वर्ष दीड वर्षापेक्षा पुढे ढकलता यावी, व "कः कालः फलदायकः" ह्या आशेनें तीन चार वर्षें तरी रणभूमीची सेवा करावयास सांपडावी म्हणून जर्मनी कॅले घेऊन चोहोबाजूंनीं इंग्लंडला चिमटे काढून इंग्लंडच्या जहाजांतील धन समुद्रांत बुडविण्याचा प्रयत्न करणार आणि तुर्कस्थानामार्फत सर्व मुसलमानी जगाला आग लावून देऊन रशियाचें कांही सैन्य ती आग विझविण्याच्या कामांत गुंतविण्याचा उद्योग आस्ट्रिया करणार हेंहि तितकेंच खरें आहे. नोव्हेंबर प्रारंभाला यिप्रेसवर जर्मनीचा निकराचा हल्ला झाला. अर्धामुर्धा

सर्व्हिया आस्ट्रियानें खाऊन टाकला व तुर्कस्थान आग लावण्याचें काम करण्यास सिद्ध झाला. अशारीतीने शत्रूचा डाव साधत असताना रशिया बर्फाच्या थंडी-करता स्वस्त कसा बसेल ? रशिया काकडून जाईल हा शत्रूचा अदाज खोटा ठर-विण्याचा रशियाने निश्चय केला आणि थडीमुळे पाऊल मद न टाकता दुप्पट जोराने जर्मनी व आस्ट्रिया यांवर हल्ला चढविण्यास सुरुवात केली. पोलडची रणभूमि सबध नोव्हेंबर महिन्यात महत्त्वाच्या व निकराच्या लढायानीं दुमदूमून गेली होती बेल्जममध्ये जर सैन्याची व सेनानायकाची कुचबणूक झाली तर पोलडमध्ये सैन्याच्या हालचाली अत्यत जलदीच्या होऊन सेनानायकाना लोक आश्चर्यचकित होतील अशारीतीनें लढाया लढाव्या लागल्या. बेल्जमला नोव्हेंबर महिना कुचबणुकीचा गेला तर पोलडला तडकाफडकीचा गेला. पोलडमध्ये एकदा सोक्षमोक्ष करून घेऊ म्हणजे सर्वच महायुद्धाचा बाजार आटपला, अशा निश्चयानें रशियन सैन्याच्या हालचाली सुरू झाल्या. पोलडमधील नोव्हेंबरच्या युद्धाचे महत्त्व या महायुद्धात बेल्जमच्या लढायाहून अधिक असल्यामुळे किंबहुना मुख्य गड्डयाच्याच ठिकाणाच्या या लढाया असल्यामुळें पोलडच्या रणभूमीचे सामान्य तीन विभाग करता येतात. उत्तर पोलड, मध्य पोलड व दक्षिण पोलड. विश्चुला नदीचा विळखा पोलडच्या अर्ध्या भागाला पडलेला आहे, हें पोलडच्या नकाशावरून वाचकाचे ध्यानात येईल. विश्चुला नदी पोलडच्या दक्षिणेस क्रॅकोच्या जिल्ह्यात उगम पावून पोलडच्या दक्षिण सरहद्दीनें सन्डोमीरपर्यंत पूर्ववाहिनी होते. सन्डोमीरपासून वार्सापर्यंत ही उत्तर वाहिनी होऊन वार्सापासून थॉर्नपर्यंत पश्चिम वाहिनी होते व थॉर्नपासून उत्तर वाहिनी होऊन समुद्रास मिळते. समुद्राच्या तोंडापासून वार्सापर्यंत या नदींत मोठमोठीं जहाजें जाऊ येऊं शकतात. वार्सापासून थॉर्नपर्यंत विश्चुला नदी पश्चिम वाहिनी ज्या भागात झाली आहे, त्या भागाच्या उत्तरेकडील पोलड हें उत्तर रणक्षेत्र होय. या रणक्षेत्रातून जर्मनीस वार्सावर उतरता येऊ नये म्हणून रशियानें पूर्व प्रशियावर हल्ला केला, आणि नोव्हेंबरच्या पहिल्या आठवड्यातच लीक शहर ताब्यांत घेऊन आस्पेरोडच्या खालची प्रशियाची सरहद्द रशियानें गाठली. लीक ते आस्पेरोडपर्यंत जर्मनी रशियास सांप्रत थोपवून धरीत आहे. वार्साचे पश्चिमेस विश्चुलाच्या उत्तर किनाऱ्यानें प्लोक ते थॉर्न या रस्त्यानें रशिया

निम्मा मार्ग आक्रमून जर्मनीच्या सरहद्दीजवळ तीस चाळीस मैल नोव्हेंबरच्या पहिल्या आठवड्यात जाऊन धडकला. उत्तर पोलडची ही स्थिति नोव्हेंबरच्या पहिल्या आठवड्यात होती व रशिया थॉर्नच्या बाजूनें जर्मनींत घुसतो कीं काय अशी जर्मनीला भीति उत्पन्न झाली होती. नोव्हेंबर अखेरला जर्मन सैन्य रशियाला मागें हटवीत प्लोकपर्यंत येऊन पोंचलें आहे. व्हिश्चुला नदीच्या उत्तरेस झालेल्या सैन्याच्या या हालचाली लढाईतील मोठ्याशा यशामुळें किंवा अपयशामुळें झालेल्या नसून मध्य पोलडातील लढायामुळेंच या हालचाली झालेल्या आहेत. मध्य पोलडातील रणक्षेत्र वार्साच्या थेट पश्चिमेस असून व्हिश्चुला नदी, पिलिट्झा नदी व वार्टना नदी या तीन नद्यानीं तें क्षेत्र वेष्टिलें आहे. पोलडच्या या मध्य रणक्षेत्रात आक्टोबरच्या तिसऱ्या आठवड्यात वार्साच्या जवळ आठ दहा मैलावर जर्मन सैन्य गेलें होतें. त्या सैन्यास व्हिश्चुलाच्या दक्षिण किनाऱ्यानें रशियानें जें मागे रेटलें तें नोव्हेंबरच्या पहिल्या आठवड्यातच पोसेन-थॉर्न जिल्ह्याची सरहद्द दाखविली, वार्टना आणि व्हिश्चुला या दोन नद्यामधील टापूत जर्मन सैन्य मागें रेटलें गेलें व जर्मनीच्या मुख्य जिल्ह्यावरच रशिया तुटून पडतो कीं काय अशी भीति सर्व जर्मनीला वाटून बर्लिन शहर गागरून गेलें. बेल्जम मधली लढाई ढिली पडली आणि स्वतःच्या घरादाराचें सरक्षण करण्याकरिता बेल्जममधील बरेंच सैन्य पोलडकडे नेणें भाग पडलें. जर्मनीनें मोठी सेना विश्चुला व वार्टना या नद्याच्या प्रातात जमा केली आणि रशियाशीं निकराची लढाई देण्यास आरभ केला. व्हिश्चुला व वार्टना या दोन नद्यामध्यें जर्मनीच्या सरहद्दीपर्यंत रशिया गेला खरा, पण वार्साच्या पायापासून तो फार पुढे गेला होता. मार्गांतील सर्व पूल वगैरे जर्मनीनें पूर्वीच मोडून टाकले होते व अवजड युद्धसामग्री आघाडीच्या सैन्यापर्यंत पोचलेली नव्हती. अशा स्थितींत खालून वार्टनाच्या बाजूनें व वरून व्हिश्चुलाच्या बाजूनें जर्मनीनें रशियावर हल्ला करून मोठी लढाई लढण्यास भाग पाडलें.

## वार्टना-व्हिश्चुलाची लढाई

थॉर्न-पोसनच्या जर्मन सरहद्दीच्या जवळ लढाईस सुरवात झाली, त्यावेळीं ही सामान्य चकमकीच्या स्वरूपाची लढाई आहे असें प्रथम रशियास वाटलें. जर्मन लोक आपल्या सरहद्दीच्या आंत जाऊन सरहद्दीवरील किल्ल्याच्या व रेल्वेच्या

आश्रयानें लढतील असा रशियाचा अदाज होता. पण रशियाला घरात घुसू द्याव-याचें नाहीं असा जर्मनीचा निश्चय असल्यामुळे पोक्त सरजामानिशीं लढाईस सुरवात जर्मनीनें केली. वार्टना-व्हिश्चुलाची लढाई एक आठवडा निकरानें चालून अखेरीस रशियन लोक मागें सरून वार्साच्या पश्चिमेस चाळीस मैलावर लोवीज शहर व शहराजवळील ब्झारा नदी येथे सुरक्षित जागी तळ देऊन बसलें. पोक्त सरजाम व अवजड तोफा बरोबर नसल्यामुळे आपणास सुरक्षित जागीं लढाई देण्याकरिता मागें जावे लागलें, असे रशियाचें या लढाईसबधाने म्हणणे आहे. जर्मनीचे उलट असे ह्मणणें आहे कीं, वार्टना व्हिश्चुलाच्या लढाईत आपणास मोठा जय मिळाला व पोलडमधील युद्धाची परिसमाप्ति करण्याची सधि आपणास प्राप्त झाली असून वार्साचे आसपास रशियाचा सेनाशकट मोडून टाकल्यावाचून आपण रहाणार नाहीं. या मोठ्या जयाबद्दल जर्मनीनें बर्लिन शहरात ॲन्टवर्प घेतल्याच्या वेळेसारखा मोठा आनदोत्सवहि केला. या फुशारकी सबधानें रशियाचें असें उत्तर आहे कीं, व्हिश्चुला वार्टनाची लढाई सामान्य स्वरूपाची होती, व ब्झारा नदीवर जर्मनीस आम्ही ओढून आणले आहे ते मृत्यूच्या खड्डयात लोटण्याकरिताच ओढून आणलें आहे. ब्झारा नदीवर रशियाचा सेनाशकट मोडावा या हेतूनें जर्मनीनें वीस नोव्हेंबरच्या सुमारास लोवीजच्या रोखानें हल्ला चढविला, व तेव्हापासून आतापर्यंत लोवीजचा भाग व उत्तरेस पश्चिम वाहिनी व्हिश्चुला नदीचा दक्षिण किनारा या टापूत सोक्षमोक्ष करून घेण्याच्या इराद्यानें रशिया व जर्मनी या दोघाची उभी लढाई चालू आहे. खडी लढाई याचा अर्थ असा कीं, चर खणून चरात लपून बसून बैठी लढाई ऊर्फ चराच्या तटबदीची लढाई व्हिश्चुलाच्या दक्षिणेस अद्याप सुरू झाली नाहीं. तसली बैठी लढाई सुरू झाली म्हणजे दोन्ही पक्ष एकमेकास समबल समजू लागले असे ओळखावें. व्हिश्चुलेच्या दक्षिण किनाऱ्यावर आपणांस थोडका जय मिळाला असून आठ दहा हजार सैन्य कैद करून आम्ही पुढे पाऊल टाकीत आहों, असें जर्मनीनें जाहीर केलें आहे. रशियाचें म्हणणें असें आहे कीं, व्हिश्चुलेच्या दक्षिणेस जरी जर्मनीचा तितका पराजय करिता आला नाहीं, तरी लोवीजच्या नैऋत्येस ग्लोजच्या आसपास आम्ही जर्मनीस चागला मारा दिला आहे. ब्झारा नदीवर रशियाचें जें मुख्य सैन्य उभें आहे, त्याचा डावा हात ग्लोजपर्यंत

जर्मनीनें प्रयत्न केला, व लाख दीड लाख सैन्य ग्लोजच्या पूर्वेस आंत शिरलेंहि; अशा रीतीनें फळी फोडण्यात जर्मनीचे दोन हेतू होते. एक झारा नदीवरील रशियन सैन्याच्या मागे जावें, व दुसरा पिलिट्झा नदीच्या डाव्या बाजूनें खालीं दक्षिणेंत उतरणाऱ्या रशियन सैन्याची व वार्सा येथील मुख्य सैन्याची ताटातूट करावी. लाख दीड लाख सैन्य आत शिरलें खरें, पण पिलिट्झेच्या काठचें सैन्य रशियानें लगेच आखडून धरलें व दुसऱ्याचा कोंडमारा करण्याकरिता नेलेले लोक स्वतःचाच कोंडमारा करून घेऊन मृत्युमुखीं पडतात कीं काय अशी भीति जर्मनीस उत्पन्न झाली. नेपोलियनलाहि मिळाला नाहीं असला मोठा जय रशियाला या ठिकाणीं मिळणार असे रशियन सैन्यास वाटत असताना जर्मन सेना ग्लोजच्या उत्तर–पूर्वेस अत्यंत हट्टानें लढली, व दगडाखालीं सापडलेला लाख सव्वा लाखाचा हात या सैन्यानें बरेच नुकसान सोसून कसाबसा काढून घेतला. नोव्हेंबर अखेरीस अडचणींत सापडलेल्या जर्मनसेनेनें ग्लोजपासून लोविजपर्यंत चर खणून आपली जागा सुरक्षित धरून रशियाशीं लढण्यास सुरुवात केली आहे. जर्मनी जरी चरात शिरला असला, तरी त्याची याठिकाणीं खोड मोडून वार्टना व्हिश्चुलाच्या लढाईचा पुरा वचपा काढण्याच्या इराद्यानें रशिया जर्मनीवर तुटून पडत आहे. मध्य पोलंडमधील रशियन सेनेचा उजवा हात व्हिश्चुला नदीचे काठीं मध्य लोविज येथे आहे, व डावा हात ग्लोजच्या दक्षिणेस आहे. रशियाच्या डाव्या हातास उमेद वाटते आहे कीं, आपल्या समोरील जर्मनीचा उजवा हात आपण तोडून टाकू, व्हिश्चुला नदी काठच्या जर्मनीच्या डाव्या हातास उमेद वाटते आहे कीं, आपल्या समोरच्या रशियाचा उजवा हात आपण तोडून टाकू. डिसेंबरच्या प्रारंभाला शें दीडशे मैलाच्या पट्टयावर दोन्ही प्रचंड वीर सोक्षमोक्ष करून टाकण्याकरिता उभे ठाकले आहेत. आपला उजवा हात किंचित् लुला आहे असे जर्मनीला आढळून आल्यावरून लिसा प्रातातील जर्मन सैन्य कॉलिक्सा शहर ओलांडून लोजच्या दिशेनें जर्मनीच्या उजव्या हातास मदत करण्याकरिता चाल करून जात आहे. या नवीन सैन्याचा मारा फोल व्हावा म्हणून रशियानें पश्चिमेकडचे म्हणजे सेंग्स्टेचोव्हाच्या बाजूनें आपलें सैन्य मागें घेतलें आहे. अर्थात क्रॅकोवरचा व जर्मन सॅलेशियावरचा रोख कमी पडला असून रशियाला सर्व बळ वार्साच्या सभोंवरच्या लढाईस खर्च करावें लागत आहे. व्हिश्चुला नदी, झारा नदी, ग्लोज, ग्लोजचा दक्षिण भाग येथें पोलंडमधील

तीनहि रणभूमीचें सार निघालें असून रशिया व जर्मनी यांचे खरे लढवय्ये लोक एकमेकासमोर उभे आहेत. ही लढाई महायुद्धातील आजपर्यंतच्या सर्व लढायाहून अधिक महत्त्वाची असून येथे महायुद्धाची परिसमाप्ति तरी होईल किंवा निदान महायुद्धाच्या पुढील सहामाहीचा प्रवाह आखला तरी जाईल. डिसेंबरच्या पहिल्या पधरवडयात निदान डिसेंबर अखेरीस या वार्साच्या लढाईचा शेवट लागेल. जर्मनीस जर रशियाचा सेनाशकट या ठिकाणीं मोडता आला तर महायुद्धाचा अखेर शेवट जर्मनीच्या तर्फेनें होण्याची अंधुक आशा या जागीं उत्पन्न होईल, रशियानें जर जर्मनीचा सेनाशकट मोडला तर रशियाच्या तर्फेची या महायुद्धाची परिसमाप्ति ताबडतोब दृष्टीस पडेल. कोणासच पक्का जय न मिळता दोन्ही सैन्ये जर चर खणून जमिनींत स्वतःस गाडून घेऊन तटबंदीची लढाई लढू लागली, तर ऐन नदीवरील कुचबणूक पोलडमध्ये दृष्टीस पडून, महायुद्धास चिमटयाचें, आगलावी पसाऱ्याचें, व रेडे झुंजीच्या विलयाचें स्वरूप प्राप्त होईल. पोलडमधील ही लढाई केंद्रस्थानची लढाई असून तिकडे वाचकानीं डिसेंबर महिन्यात विशेष लक्ष द्यावे अशी इशारत देऊन तुर्की युद्धाकडे आता आपण वळू.

## तुर्कांची रणभूमि

महायुद्धात तुर्कस्थान सामील होऊन एक महिना झाला, पण अद्याप महत्त्वाची कोणचीच गोष्ट तुर्की रणभूमींत घडून आली नाहीं. काळया समुद्रावर तुर्कांचें असलेलें वर्चस्व कमी करण्याकरिता रशियन आरमारानें नोव्हेंबरच्या दुसऱ्या आठवडयात गोबेन जहाजावर हल्ला केला, पण लढाई न देता गोबेन जहाज पळून गेले; त्यानतर तुर्की व रशियन आरमाराची गाठ काळया समुद्रात पडली नाहीं. जमिनीवर तीन जागीं लढाईकरिता तुर्कांचें सैन्य रशियाच्या व इंग्लडच्या सैन्याच्या जवळजवळ जात आहे. या तीन जागा म्हणजे काळा समुद्र व कास्पियन समुद्र याच्यामध्यें असलेल्या कॉकेशस पर्वताच्या दक्षिणेकडील तुर्कांचा आर्मिनियन प्रांत, इराणी आखाताला लागून असललेला बगदाद प्रांत, व सुएझ कॅनॉलच्या उत्तरेचा सीरिया प्रांत या जागा होत. तुर्की युद्धास आरंभ होण्याबरोबर रशियाच्या कॉकेशस परगण्यातील सैन्यानें जलदीनें तुर्की सरहद्द ओलांडून आर्मिनियात प्रवेश केला. आत घुसलेल्या या सैन्यास चारी बाजूने वेढण्याचा तुर्कांनीं उद्योग आरंभिला पण त्यात तुर्कस्थानास यश न येतां ज्या घाटानें रशियन सैन्य आर्मिनियात उतरलें ते

घाट रशियास स्वतःच्या ताब्यांत ठेवतां आले असून त्या घाटांच्या दोन्ही बगलांस चिकटून राहू पहाणाऱ्या सैन्याचा पुरा मोड रशियानें नोव्हेंबर अखेर केला आहे. आत शिरण्याकरिता जे रस्ते ताब्यांत पाहिजेत त्यांच्या सुरक्षितपणाबद्दलच्या या चकमकी असून नोव्हेंबर महिन्यांत रशियास या सर्व चकमकींत यश आलें आहे. पश्चिमेस काळ्या समुद्रावर बाटूमपासून पूर्वेस कास्पियन समुद्र व टिफलीस येथपर्यंत या चकमकी नोव्हेंबर महिन्यात होत होत्या. नोव्हेंबरात रशियानें आपला रस्ता खुला करून घेतला आहे, व डिसेंबर-जानेवारींत आर्मिनियातील तुर्कांच्या मुख्य सेनेची व रशियन सेनेची गाठ पडेल असा अदाज आहे. युद्धास सुरुवात होण्या-बरोबर रशियानें उत्तरेस कॉकेशस जिल्ह्यातून दक्षिणेकडे उतरण्यास जसा आरभ केला, त्याप्रमाणें इग्लडनेंहि इराणी आखाताच्या वरच्या टोकाचे ठिकाणीं फायो येथे हिंदी सैन्य उतरून उत्तरेकडे जाण्यास सुरुवात केली. पधरा नोव्हेंबरच्या सुमारास हिंदी सैन्य फायो येथें उतरले, व एक आठवड्यात त्यानें बसरा शहर घेतलें. बसराहून उत्तरेस हें सैन्य जात असून वरून खालीं उतरणाऱ्या रशियन सैन्यास मिळण्याचा या सैन्याचा उद्देश आहे. वरून रशिया व खालून इग्लड या रीतीनें दोहो बाजूनें चाल करून जाऊन इराणच्या सरहद्दीवर असलेले तुर्कस्थानचे सर्व परगणे कबजात घेणें इग्लड व रशिया दोन राष्ट्रास भाग आहे. एखाद्या ठिकाणीं आग लागली असता ती आग लाब दूरवर पसरू नये म्हणून आगीवर पाणी शिंपडण्याचें काम चालू असतानाच आग न लागलेलीं घरें जशीं पाडण्यात येतात त्याप्रमाणे तुर्कांची आग इराण, बुखारा व अफगाणिस्तान वगैरे मुसलमानी प्रदेशाना लागू नये म्हणून आर्मिनिया व बगदादचे जिल्हे काबीज करण्यात येत आहेत. तुर्की सैन्य अगावर चाल करून येण्याच्या पूर्वीच इराणच्या आखातातून व कॉकेशस जिल्ह्यातून रशिया व इग्लड आपण होऊन चाल करून जात आहेत. याचें कारण आर्मिनिया किंवा बगदाद परगण्याच्या गड्डयाचा लोभ त्यांना आहे असें नसून आगीचा पसारा होऊ नये म्हणून घरें पाडण्याच्या कृती-सारखेंच त्याचें हें लष्करी धोरण आहे या धोरणानें स्वारी करीत असतांना इग्लडच्या सैन्याला महत्त्वाचा अडथळा तुर्कांकडून होईल असा रग दिसत नाहीं. कारण एशियामायनरमधून निघणारी बगदाद रेल्वे अद्याप बगदाद शहरापर्यंत येऊन पोंचली नसून बगदादच्या वायव्येस दोनशें-अडीचशें मैलांवर येऊन

पोंचलेली आहे. आर्मिनिया प्रांतांत मात्र काळ्या समुद्राच्या पश्चिम किनाऱ्यानें पाहिजे तितके सैन्य तुर्कस्थानास नेता येणें शक्य असल्यामुळें रूस व तुर्क यांच्या महत्त्वाच्या लढाया आर्मिनियांत होतील असा अदाज आहे.

## इजिप्त व तुर्क

आर्मिनियांत तुर्कस्थानचे जें सैन्य जाईल त्याचा उद्देश रूसाशीं दोन हात करून रशियाचें काहीं सैन्य त्या बाजूला गुतवून टाकून व तितक्याप्रमाणानें पोलंडमधील मुख्य युद्धात रशियास बलहीन करणे हा असून, साधल्यास युद्धाचे निखारे तेहरान, काबूल व बुखारा या शहरावर टाकण्यासहि तुर्क कमी करणार नाहींत. रशियाच्या मुसलमानी प्रजाजनानीं पूर्ण राजनिष्ठा प्रदर्शित केली असून तेहरान व काबूल येथील सरकारांनीहि तटस्थ वृत्ति जाहीर केली आहे. दुर्दैवानें आर्मिनियात जर तुर्कांची सरशी झाली तर युद्धाचे प्रत्यक्ष निखारे वरील तीन राजधान्यावर येऊन पडल्यावाचून राहाणार नाहींत व अशा प्रत्यक्षत्वाच्या प्रसगीं मुसलमानी राष्ट्राची किंवा प्रजाजनाची तटस्थ वृत्ति न डळमळणें हें मनुष्यस्वभावास सोडून आहे. आग पसरविणें यात खुद्द तुर्कस्थानास काहींच फायदा नसला तरी रशियास व इग्लडास त्या योगानें पायबद पोंचत असल्यामुळें जर्मनीचा फायदा होणार आहे. वर्षानुवर्ष लढाई चालल्यास जर्मनीस थकवा येईल व या थकव्यामुळें जर्मनी अखेरीस मरून जाईल. हा थकव्याचा मृत्यु जर चुकवावयाचा असेल, तर आग पसरवून इग्लड व रशिया यानाहि सतावण्याचा डाव जर्मनीला खेळला पाहिजे हा हेतु साधण्याकरितां जर्मनीने प्रथम आर्मिनियाच्या बाजूला तुर्की सेनेची अधिक तयारी करविलेली दिसते, व हा हेतु साध्य होईतों इजिप्तवर चाल करून जाण्यास जर्मनी तुर्कस्थानास प्रोत्साहन देणार नाहीं असे काहींचें म्हणणें आहे. नोव्हेंबर महिन्यात इजिप्तच्या बाजूला तुर्की लढाईस तोंड न लागता आर्मिनियाच्या बाजूला तोंड लागलें, यावरून रूस व तुर्क यामधील लढायांचा शेवट लागेतोंपर्यंत तुर्क इजिप्तच्या बाजूला वळणारच नाहींत, असें मात्र म्हणतां यावयाचें नाहीं. जर्मनीच्या कार्याकरितां ज्याप्रमाणें आर्मिनियांत चकमकी चालल्या आहेत, त्या प्रमाणें तुर्कांच्या कार्याकरितां इजिप्तच्या सरहद्दीवर लढाया झाल्यावांचून राहणार नाहींत. महायुद्धाचा शेवट कसाहि होवो, कोणतीहि बाजू जिंको, किंवा कोणतीहि मरो, युरोपखंडात हातपाय पसरण्यास सवड मिळणें तुर्कांना शक्य नाहीं; महायुद्धात

सामील झाल्याबद्दल कांहीं मोबदला मिळणें जर कधींकाळीं शक्य झालें तर तो मोबदला इजिप्तच्याच बाजूला मिळणें शक्य आहे. रशियाच्या कॉकेशस परगण्याच्या लोभानें तुर्क महायुद्धात सामील झाला नसून इजिप्तच्या अलोट संपत्तीच्या लोभानें सामील झाला आहे हें विसरता कामा नये. मग इजिप्तच्या सरहद्दीवर नोव्हेंबर महिन्यात लढाईस तोंड का लागलें नाहीं ? याचें उत्तर असें आहे कीं, सुएझ कॅनालच्या उत्तरेस दीडशे मैलापर्यंतचा मुलुख अगदीं ओसाड असून वाटेंत मोठ्या फौजेस पिण्यासहि पाणी जागजागीं मिळावयाचें नाहीं. नेपोलियननें या ओसाड प्रदेशातूनच आपली सेना इजिप्तमध्यें नेली होती. वाटचालीच्या पाच सात दिवसापुरती पिण्याच्या पाण्याची कशीबशी व्यवस्था करतां येईल, पण पाचसात दिवसानतर पाण्याच्या मुलखात जाऊन पोंचण्याची खात्री पाहिजे ना ? आपण अशी कल्पना करू कीं सुएझ कॅनालपासून एक मजलेवर तुर्की सैन्य आल्यानतर तेथें इग्रजानीं लढाईस तोंड दिलें आणि तीन चार आठवडे लढाई चालू राहिली तर वाटचाली पुरते आणलेलें पाणी आठवडेच्या आठवडे कसें पुरणार ? अन्नाच्या सामग्रीबरोबरच पाण्याची सामग्रीहि रोजच्यारोज शेंपन्नास मैलावरून माणसांकडून किंवा उटावरून किंवा तात्पुरती छोटी रेल टाकून वाहून नेण्याची तयारी केल्याशिवाय इजिप्तवर चढाई करणें तुर्कस्थानास शक्य नाहीं. तुर्की साम्राज्याच्या नकाशाकडे पाहिलें असतां बगदाद रेल्वेशीं सांधा जुळलेला नाहीं हें वाचकाचे ध्यानात येईल. हा सांधा थोड्या अवधींत जुळविता येणें शक्य आहे, किंबहुना नोव्हेंबर महिन्यांत हा सांधा जुळला गेलाहि असेल. म्हणजे आता कॉन्स्टेटिनोपलपासून इजिप्ताच्या सरहद्दीपर्यंत आगगाडी येऊन पोंचली आहे असे समजण्यास हरकत नाहीं. शें सवाशें मैल रुंदीचा बिनपाण्याचा टापू कसा आक्रमावयाचा व या बिनपाण्याच्या टापूतच कित्येक आठवडे तळ देऊन बसण्याचा प्रसग आल्यास मोठ्या सेनेस पाण्याचा पुरवठा कसा करावयाचा ही तुर्कस्थानास मोठी अडचण असून, सर्व शास्त्रीय युक्त्या हाताशीं खेळत असल्या शिवाय दूर करतां येणें तुर्कस्थानास शक्य नाहीं. शास्त्रीय युक्त्या व आयत्यावेळीं टाकावयाच्या छोट्या बड्या आगगाड्या जर्मनीपाशीं आहेत, तुर्कांच्यापाशीं नाहींत. हीं शास्त्रीय साधनें जर्मनी आस्ट्रियातून निघून कॉन्स्टंटिनोपलला दोन मार्गांनीं पोंचतात. ऑस्ट्रियांतील एक आगगाडीचा फाटा रोमानिया–

बल्गेरियातून कॉन्स्टांटिनोपलला येतो. व दुसरा फाटा सर्व्हियाच्या बेल्ग्रेड-नीश या दोन शहरातून जाऊन बल्गेरियात शिरून कॉन्स्टांटिनोपलला पोंचतो. महायुद्धांत तुर्क सामील झाल्यापासून रोमानियाचा कल रशियाच्या बाजूला झाला असून आपल्या प्रदेशातून युद्धाची सामग्री कॉन्स्टांटिनोपलकडे पाठविण्याची मनाई रोमानियानें केली आहे. रोमानियानें तटस्थ वृत्ति स्वीकारली आहे खरी, पण ही तटस्थ वृत्ति तुर्क व जर्मनी यांच्या संबंधानें अनिष्टवादी आहे, इष्टवादी नाहीं. रोमानियाप्रमाणें बल्गेरियानें ही तटस्थ वृत्ति स्वीकारली आहे खरी, पण ती तुर्कसंबधानें इष्टवादी असून अनिष्टवादी नाहीं. याचा अर्थ असा कीं बल्गेरिया जरी तुर्कांकरिता हातांत शस्त्र धरण्यास तयार नाहीं, तरी युद्ध सामग्रीनें भरलेले जर्मनीचे अग्निरथ तुर्कस्थानकडे पोंचवून तुर्कांच्या सारथ्याचें काम करण्यास बल्गेरिया तयार आहे, पण मध्यें सर्व्हियाची धोंड आहेना? नोव्हेंबर महिन्यात ऑस्ट्रियानें सर्व्हियाचा पराभव केला असून बेल्ग्रेड शहर ताब्यात घेतलें आहे. निम्मा अधिक सर्व्हिया सांप्रत ऑस्ट्रियाच्या कबजात गेला असून डिसेंबरात बेल्ग्रेड-नीशचा सर्व मार्ग ऑस्ट्रियाला व तुर्कस्थानला खुला होईल, असा अंदाज आहे. मार्ग खुला झाल्यानंतर इजिप्तच्या बाजूच्या लढाईला जोरानें प्रारंभ होईल असे वाटतें. बेल्ग्रेड-नीश मार्ग ऑस्ट्रियाच्या ताब्यात जाऊ नये, आणि जर्मनी, ऑस्ट्रिया व तुर्कस्थान यांच्यामध्यें आगगाडीचा संबंध उत्पन्न होऊ नये म्हणून ऑस्ट्रिया व जर्मनी यांना तंबी देण्याकरिता पोलंडमध्ये दोन दोन चार चार फूट उंचीचे बर्फ पडत असताहि जर्मनीशीं अत्यंत निकरानें रशिया लढत आहे. मूळच्या म्हणजे पोलंडातील युद्धाच्या परिणामावरच सर्व्हियन युद्ध, तुर्की युद्ध व बेल्जममधील युद्ध हा शाखाविस्तार अवलंबून असल्यामुळें पोलंडमध्यें डिसेंबरात महायुद्धाला कोणचें वळण लागतें तें पाहून पुढील अंदाज बांधला पाहिजे. अर्थात पोलंडमधील युद्धाकडे सर्व डिसेंबर महिना जगाची दृष्टि लागून राहाणार हें उघड आहे.

---

# महायुद्धाचा डिसेंबर-जानेवारी महिना

## फ्रेंचांची चढाई

नोव्हेंबर महिन्याप्रमाणें डिसेंबर महिन्यांतहि महायुद्धाचें केंद्रस्थान पोलंडची रणभूमीच होती व हिंवाळा संपेतोंपर्यंत म्हणजे जानेवारीचा सबंध महिना व फेब्रुवारीचा पहिला पंधरवडा, पोलंडची रणभूमीच महत्त्वाची जागा होऊन बसेल असा अंदाज आहे. डिसेंबर महिन्यात पोलंडमध्ये झालेल्या लढाया महत्त्वाच्या असून इतर रणभूमींतील लढायाचें स्वरूप पोलंडातील युद्धाला धरून पालटलेलें आहे. नोव्हेंबरच्या दुसऱ्या पंधरवड्यापासून पोलंडमधील युद्धास विशेष महत्त्व आलें आहे; कारण त्या वेळेपासून रशिया व जर्मनी यांची मुख्य सैन्यें एकमेकास भिडली. डिसेंबर महिन्यांत रशिया व जर्मनी यांची पोलंडमधील कुस्ती बऱ्याच अशी तडकाफडकीची झाली. पोलंडमधील काही भागात ऐन नदीच्या काठच्या लढायाप्रमाणें चराच्या तटबंदीची लढाई सुरू झाली आहे, तथापि अद्याप बऱ्याच मोठ्या भागावर दोहो बाजूचे वीर आपापल्या पायावर उभे असून स्वतःस जमिनीत गाडून घेऊन न लढता उभ्यानें लढत आहेत, व उभ्यानें लढण्याच्या या टापूत जानेवारींत तुमुल युद्ध होईल असा अंदाज आहे. पोलंडमधील या केंद्रस्थानाकडे वळण्यापूर्वी फ्रान्स व बेल्जम येथील रणक्षेत्राची स्थिति प्रथम अवलोकनात आणली पाहिजे. यिप्रेसची फळी फोडण्याचें काम नोव्हेंबर २० चे सुमारास जर्मनीनें सोडून दिले. त्यानंतर थोडे दिवस या पालटलेल्या स्थितीचा विचार करून जर्मन सेनेवर उलट हल्ले चढविण्याचा इंग्लंड व फ्रान्स यानी निश्चय केला. यिप्रेसच्या युद्धात इंग्रजानी जरी जर्मन सेनेला पुढे येऊ दिलें नाही; तरी लढाईचा मुख्य बोजा इंग्रजांना सोसावा लागल्यामुळे इंग्रज सेनेची बरीच खराबी झाली होती. नोव्हेंबर महिन्यात फ्रेंच सेनेस जवळ जवळ विश्रांतीच मिळाली होती असे म्हणण्यास हरकत नाहीं. शिवाय फ्रेंचांच्या नव्या लष्कराचीहि जमवाजमव नोव्हेंबर अखेरीस पुरी झाली होती. अशा स्थितींत फ्रेंचानी इंग्रजाचा बोजा थोडा हलका करण्यास तयार रहावें हें साहजिक होय. आरास—लाबासी, लिली, यिप्रेस, न्यूपोर्ट एवढा टापू व्यापून इंग्रज जर्मनीशी लढत होते. या टापूपैकी आरासपासून यिप्रेसपर्यंतचा भाग फ्रेंचानीं आपल्या ताब्यांत घेतला, आणि डिक्सम्यूरपासून इसर नदीपर्यंतचा भाग इंग्रजाच्याकडे ठेविला. लहानशा भागांत इंग्रज सेना गोळा

झाल्यामुळे जर्मन सेनेवर चाल करून जाण्याची ताकद इंग्रजी सेनेच्या अंगांत आली, आणि यिप्रेसपासून सोमनदीपर्यंत आणि सोम नदीपासून ऐन नदीची तटबंदी धरून जर्मनीच्या दक्षिण सरहद्दीपर्यंत जर्मन सेनेवर चाल करून जाण्यास फ्रेंच सेनाहि समर्थ झाली. न्यूपोर्टपासून स्वित्झर्लंडपर्यंत दोनतीनशे मैलांच्या हद्दीवर इंग्लंड व फ्रान्स यांनी डिसेंबर प्रारंभापासून चढाई करण्यास सुरवात केली. सर्व डिसेंबर महिन्यांत न्यूपोर्टपासून डिक्सम्यूरपर्यंत इंग्रजी सेनेनें इसर नदी ओलांडून जर्मन सेनेची थोडी थोडी पिछेहाट केली, तथापि इंग्रजी चढाईस अद्याप यावें तसें स्वरूप आलेलें नाही, व हिंवाळा संपेतो म्हणजे जानेवारी महिना निघून जाईतो चांगलेसें रूप येणार नाहीं. याचें कारण असें आहे की, हिंवाळ्याच्या धुक्यांत इंग्रजी सेनेला इंग्रजी आरमाराचा जितका उपयोग व्हावयास पाहिजे तितका होऊं शकत नाहीं. बेल्जमचा किनारा इंग्रजी आरमारानें तोफांच्या गोळ्याखालीं झोडपून काढावा व असा भडिमार होत असतांना समुद्रकिनाऱ्याच्या वाळवंटावाळवंटानें इंग्रजी लष्करानें वर सरकावें असा इंग्रजी चढाईचा डाव आहे. बेल्जमच्या समुद्रकिनाऱ्याचा जर्मनीनें आपल्याकडून पक्का बंदोबस्त केला असून तेथें सब्मरिन म्हणजे पाणबुड्या बोटीहि आणलेल्या आहेत. मोठ्या लढाऊ जहाजाच्या जवळ जाण्यास हिंवाळ्यांतील धुक्याची मदत पाणबुड्या बोटींना फार होते; त्याचप्रमाणें किनाऱ्यावर जर्मन सेना कोठें गोळा झाली आहे, हें धुक्यामुळें स्पष्ट दिसत नसून आरमारी भडिमार व्हावा तितका फलदायक होत नाही. इंग्रजी चढाईला धुक्यानें अडथळा केला आहे इतकेंच नव्हे, तर उलट जर्मन चिमट्यांना डिसेंबर महिन्यांत धुक्यानें थोडीशी मदतहि केली आहे. धुक्याचा फायदा घेऊन जर्मनीनें स्कालबरो, व्हिटबी व हार्टपूल या इंग्रजी बंदरावर अर्धापाऊण तास भडिमार केला. जर्मन क्रूझरें सूर्योदयापूर्वींच इंग्लंडच्या किनाऱ्याजवळ आलीं, व वरील तीन बंदरांत त्यांनी एकाएकीं गोळे सोडले. कित्येक घरें पडलीं, गॅसच्या खजिन्याला आग लागली, बायकामुलांना अंथरूणांतून उठून रस्त्यांतून पळ काढावा लागला व बरेच लोक प्राणास मुकून तीनचारशें इसम जखमी झाले! अर्धा तास असा धुमाकूळ घालून इंग्रजी क्रूझरें दृष्टीस पडतांच जर्मन क्रूझरांनीं पळ काढला, व धुक्यामुळें त्यांना निसटून जातां आलें. या चिमट्याचा हेतु इंग्रज लोकांना भयभीत करण्याचा होता, पण, महायुद्धांत होणारा हा असला त्रास अपरिहार्य आहे अशीच इंग्रजांची प्रारंभापासूनची समजूत असल्या-

मुळें जर्मनीचा हेतु सफल झाला नाहीं. जर्मनीनें चिमटे काढले तर धुक्याच्या सबबीवर आपण स्वस्थ असणें इष्ट नव्हे, हे इंग्रजी आरमाराच्या तेव्हांच ध्यानांत आले. चिमटा काढणारास आम्हीं उलट चिमटा काढतों असे सिद्ध करून देण्यासाठीं काही इंग्रजी क्रुझरे विमानाना बरोबर घेऊन नाताळच्या पूर्वी हेलिगोलँड बेटाजवळ गेलीं, व तेथून कील कॅनालच्या तोंडाजवळच्या कॅक्स हॅवन बदरावर वैमानिकांकडून त्यानी बॉम्बगोळे टाकविले. सुमारे तीन तास इंग्रजी क्रुझरे हेलीगोलॅंडच्या उप-सागरात उभी होती. जर्मन विमानांनीं व जर्मन पाणबुड्या बोटीनी त्याच्यावर हल्ला केला, पण एका जागी स्तब्ध उभे न रहाता एकसारखे फिरत रहाणाऱ्या इंग्रजी जहाजावर नेमके गोळे जर्मनाना टाकता येत नाहीत; इतकेंच नव्हे तर उलट जहाजा-वरील तोफाना डोक्यावर घिरट्या घालीत असलेल्या विमानाना हुसकून लावतां येते येवढी महत्त्वाची गोष्ट या हल्ल्यामुळे सिद्ध झाली. कॅक्सहॅवन बदरावर बरेच गोळे टाकून इंग्रज वैमानिक परत येत असता जर्मन विमानानी त्याजवर हल्ला केला, पण एकदोन वैमानिक शिवाय करून बाकी सर्व परत आले. या विमानी बॉबचा उलट वचपा काढण्याकरिता जर्मन विमानांनीं डकर्क बदर, डोव्हर व थेम्स नदी येथे बरेच बॉंब टाकून नाताळच्या सणाचा विरस केला. डिसेंबर अखेरीस इंग्लिश चॅनलमध्ये एक लढाऊ जहाज पाण्यातील सुरुगानीं म्हणा किंवा पाणबोटीनी म्हणा, कसल्या तरी चिमट्यानी बुडविले. या असल्या चिमट्यांचा महायुद्धाच्या मुख्य धोरणावर फारसा उपयोग होणार नाहीं, तथापि ‘थेंबे थेंबे तळे साचे’ या न्यायानें जर लढाई दोनतीन वर्षे चालली, तर लोकाचीं मनें त्रस्त करण्याच्या कामी त्यांचा उपयोग होणार आहे. आणि याच दृष्टीनें दोन पक्ष सवडीप्रमाणें एकमेकास चिमटे घेत आहेत.

## चरांचा चक्रव्यूह

हिंवाळ्यांतील धुक्यामुळें चिमट्याच्या बाजाराला डिसेंबरांत तेजी होती व जानेवारीतहि ही तेजी तशीच राहील हें उघड आहे. हिंवाळा सपून धुके नाहीसे झाल्यावर बेल्जम किनाऱ्यावर इंग्रजी आरमाराचा खरा भडिमार सुरू होईल व त्याच सुमारास इंग्लडात तयार होत असलेलें नवें दहा लाख सैन्य रणभूमीवर उतरण्यास सज्ज होऊन बेल्जममधून जर्मनीला हाकून लावण्याच्या खऱ्या उद्योगास आरंभ होईल. आरासपासून न्यू पोर्टपर्यंत व वर उत्तरेस सर्व बेल्जमचा किनारा

येवढा टापू बेल्जममधून जर्मनीच्या होणाऱ्या हकालपट्टीचें रणक्षेत्र आहे व हें रणक्षेत्र हिंवाळ्यानतर कापावयाचें असल्यामुळे जानेवारीत एका दृष्टीनें थडच रहाणार हें उघड आहे. पोलडमधील युद्धाकरितां या बाजूनें बरेंच सैन्य जर्मनीनें नेलें असल्यामुळें या रणक्षेत्रात जर्मन सेना बरीच क्षीणबल झाली असेल, या आशेनें यिप्रेस, लाबासी व आरास या तीन जागीं चार चार पाच पाच दिवस फ्रेंचानीं जर्मन सेनेवर निकराचे हल्ले केले. ऑक्टोबर नोव्हेंबरात यिप्रेसच्या आसपास जसे निकराचें युद्ध झालें, त्याचप्रमाणें निकराचे युद्ध या तीनहि जागी चार दिवस झाले, पण जर्मन सेना वाटले होते तितकी क्षीण झालेली नाही असें आढळून आले. व्हिम्स, व्हर्डून या बाजूवरहि आईन नदीच्या काठीं फ्रेंचानी बरेच निकराचे हल्ले चढविले; पण शत्रूचे काही चर घेण्यापलीकडे फळी फोडण्याइतके यश या बाजूलाहि फ्रेंच सैन्याला मिळालें नाही. आल्सासचे बाजूला म्हणजे फ्रान्सच्या पूर्व सरहद्दीवर मात्र फ्रेंचाचे पाऊल थोडें थोडे पुढे पडत चालले आहे; व ह्याच बाजूला फ्रेंच सेनेचा मोठा जमाव जनरल जॉफ्रे यानी केला असून जानेवारी महिन्यात या बाजूने जर्मनीला चागली तबी देण्याचा फ्रेंचाचा विचार दिसत आहे. चराच्या तटबदीच्या युद्धामध्ये चढाई करून जाणे फार मुष्कीलीचे काम असते; व थडीच्या दिवसानतर धुक्यामुळें चाल करून जाणाराची गति आपोआपच कुठित होते. बर्फ आणि पाऊस यामुळे सर्व रणभूमि अत्यत कष्टप्रद झाली आहे. चिखल तुडवीत मेटाकुटीस आलेलें व बर्फानें गारठलेलें असे सैन्य चोहोकडे दृष्टीस पडत आहे. पूर्वी ज्या ठिकाणी दोन चराच्या चार रागा होत्या, त्या ठिकाणीं एक दोन मैल गेले तरी जर्मन चराच्या रागा एकसारख्या दृष्टीस पडू लागल्या आहेत! जर्मनीने असा विशेष बदोबस्त गेल्या दोन महिन्यात केल्यामुळे, हिंवाळ्याच्या वादळात बर्फाच्या पावसात चिखल तुडवीत काटेरी कुपणें चुकवून एका चरामागून दुसरा चर, दुसऱ्या चरामागून तिसरा चर, अशा रीतीनें मैलामागून मैल चराची तटबदी ओलाडून जावे तेव्हा जर्मन फळी फुटण्याची आशा! तीन चारशें मैलाच्या सरहद्दीवर दोन दोन तीन तीन चार चार मैल रुदीची चराच्या रागाची तटबदी तयार करणें हा विशेष चमत्कार या महायुद्धामध्यें दृष्टीस पडलेला आहे. एकामागून एक चर अशा रागा दोन तीन मैलपर्यंत पसरलेल्या असल्या तरी पुढच्या चरातून मागच्या चरांत जाण्यास जमिनींतूनच वाटा केलेल्या असतात, यामुळें निकराचा हल्ला करून तोंडाचा

चर घेतला, तरी हल्ला करणाराचे विशेष नुकसान करून तोंडाच्या चरातील लोक या वाटांनी निसटून जाऊन मागच्या चरात जाऊन बसतात. तोफखान्यालाहि चराच्याच मार्गानें मागेपुढे किंवा बाजूला जाता येते. जमिनीवर कोणाचे डोकें दिसणार नाही इतक्या बेताचे हे चर खोल असतात. बातम्या पोचविणारे, अन्नपाणी, औषध व दारूगोळा पोचविणारे,ह्या सर्वांचे व्यवहार चरातून सुरळीतपणें चालतात. विमानात उंच जाऊन दहा वीस मैलाचा जर टापू पाहिला, तर असे दिसते की, दोन चार मैल आत एकामागून एक चर खणले आहेत, व हे चर एकमेकांशी चराच्याच वाटांनी जोडलेले आहेत. दोन चार मैल रुदीचें व वीस मैल लांबीचे चराचे जाळे तेवढे वैमानिकाच्या दृष्टीस पडते ! चराच्या आत सर्व लोक वाकूनच व्यवहार करीत असल्यामुळे या वीस मैल लांबीच्या व तीन मैल रुदीच्या टापूत सैन्याच्या हालचाली कशा होत आहेत, अधिकाऱ्याचे मुख्य ठाणें कोठे आहे, तोफखाना कोठे उभा केला हे टेहळणी करणाराला काहीं समजत नाही. जणू काय सर्व व्यवहार भूमीच्या पोटातूनच होत आहे ! चराचा हा चक्रव्यूह जिवत आहे का मेलेला आहे, हे प्रत्यक्ष हल्ला चढवि-ल्याशिवाय ध्यानात येत नाही !! यामुळे आपल्यासमोर असलेल्या दहा वीस मैलाच्या तोंडाशी झुंजणाऱ्या सेनापतीला तेवढयाच टापूत सैन्याची विशेष चला-खीनें हालचाल करून दाखविण्याची बुद्धिमत्ता उपयोगातच आणता येत नाही ! चरावर हल्ला करावा, चर निर्जीव असल्यास पुढच्या चरावर चाल करावी, आणि सजीव असल्यास आपल्या आवाक्याबाहेर शत्रू आहे की नाही ते पाहून वरिष्ठ सेनापतीस कळवावे या पलीकडे दहा दहा पाच पाच मैलाच्या तोंडावरील सेनाप-तींना विशेष काहीच कौशल्य दाखविता येत नाही ! चराचा चक्रव्यूह अशारीतीने तीनतीनशे मैलपर्यंत एकसारखा पसरला असल्यामुळे छोटया सेनापतींची कल्पकता, चपलता व धडाडी एकतऱ्हेने अगदी निरुपयोगी झालेली आहे. हाताला हात भिडवून, दंडावर दंड थोपटून व छातीवर छाती आपटून सैनिक जिवावर उदार होऊन लढत राहतील येवढयाच गोष्टीकडे काय ते छोटया सेनापतींना लक्ष पुरवावें लागते. इतर सर्व अकलेच्या व हुषारीच्या गोष्टी मुख्य सेनापतीच्या हातांत राहून बाकीचे सेनानायक चराच्या चक्रव्यूहामुळे केवळ सागकामे बनले आहेत. सेना-नायकाच्या बुद्धिमत्तेचा व हुषारीचा ऱ्हास या चरांनी जितका केला आहे तितका

कशानेहि आतापर्यंत झाला नाही. चराचे चक्रव्यूहात लाखो सैन्य व्यवस्थेनें जमिनीत ज्यावेळी गडप होऊन बसते, त्यावेळी शत्रूकडील सेनानायकानाहि आपली अक्कलहुषारी जमिनीतच गाडून ठेवावी लागते ! जिवावर उदार व्हा आणि 'हस्ताहस्ती केशाकेशी' युद्ध करून एका चरामागून दुसरा चर काबीज करीत सुटा, आपण संख्येनें अधिक असलो तरच चराच्या पलीकडे पार पडून जाऊ, नसलो तर आपणहि चर खणून जमिनींत लपून बसू, एवढेच कायते हुकूम आपल्या हाताखालील लोकाना सामान्य सेनापतींना देता येतात. बरें, व्यक्तिशः सैनिकाला तरी काही अक्कल दाखविता येते म्हणून विचारावें, तर तेथेहि अकलेचे काम चालत नाही. चराच्या लढाईत अचूक निशाणबाजीची पूर्वीइतकी जरुरी नाही. चपलतेनें एकेकट्यानें चाल करून जाऊ म्हटलें तर नावलौकिक मिळविण्याइतकी कशीहि संधि मिळत नाही. जो सैनिक भुकेनें लवकर व्याकूळ होत नाही, जो सैनिक कित्येक दिवस झोंप मिळाली नाही तरी आजारी पडत नाही, थंडी, वारा, चिखल, बर्फ व पाऊस याचे परिणाम ज्या सैनिकाच्या अस्थींवर व चर्मावर रानटी मनुष्याप्रमाणे तावडतोब होत नाहीत, चराच्या घाणींत व्यवहार करीत असता रानवटाप्रमाणे ज्या सैनिकाला कोणत्याहि प्रकारचा किळस वाटत नाही आणि इतकें असूनहि जो बेगुमान शत्रूच्या चरात उडी घेऊ शकतो, तोच सैनिक या चराच्या चक्रव्यूहात उत्तम ठरतो. या चराच्या चक्रव्यूहाच्या चरकात आरबी घोडे सापडले असता थोड्याच अवकाशात त्याचें रूपांतर होऊन आरबी घोड्याच्या ऐवजी राकट खेचरें दृष्टीस पडतात. चराच्या चक्रव्यूहामुळे लढाई मद्दड झाली आहे. ( War has become stupid ) असें सांप्रतच्या युद्धाचें वर्णन तज्ज्ञानी केलें आहे. सर्व युद्धाला बेसूर व राकट स्वरूप देणारा हा चराचा चक्रव्यूह फ्रेंच लोक फोडणार कसा ? दहा वीस मैलाच्या टापूत शत्रूचे लोक जितके असतील त्याच्याहून तिप्पट, चौपट, पाचपट सैन्य गोळा करून दहावीस मैलातील सर्व चर आक्रमून टाकून लाख दोन लाख सैन्य आत सहज घुसेल एवढें भगदाड दोन चार ठिकाणीं पाडावें, तेव्हा चराचें हे चक्रव्यूह मोडणार आणि बैठी लढाई ऊर्फ मद्दड लढाई संपून खऱ्या ऊर्फ हुषारीच्या लढाईस प्रारंभ होणार. तीनशे मैल लांबीच्या जर्मन पार्टीत तीन चार ठिकाणी दहा वीस मैल रुंदीची मोटमोठीं भगदाडें पाडण्याचे काम जनरल जॉफ्रे याजवर सांप्रत येऊन

पडलें आहे. फ्रान्स व इंग्लंड या दोन्ही देशाचा असा पूर्ण भरवसा आहे की, जानेवारी महिन्यात या मोठ्या उद्योगाची पूर्ण तयारी जनरल जॉफ्रे यांचे हातून पुरी होईल, फेब्रुवारी व मार्च एप्रिलात फ्रान्समधून व बेल्जममधून जर्मनसेनेची हकालपट्टी करण्यात येईल. जानेवारी महिन्यात या प्रचंड कामाची पूर्व तयारी जनरल जॉफ्रे कशी करणार ? डिसेंबर महिना शत्रूच्या निरनिराळ्या जागा कुरतडून काढून कोठे घट्ट आहे व कोठे मऊ आहे हे हुडकून काढण्यात जनरल जॉफ्रे यांनी घालविला. यिप्रेस, लाबासी व आरास येथे चढाईचे काम पुढे चालविण्यास हरकत नाही, पण शत्रू घट्ट आहे असे त्यांना आढळून आले. र्‍हीम्स, व्हर्डून या आईन नदीवरील टापूमध्ये शत्रू टणकहि नाही व मऊहि नाही असे त्यांना दिसून आलें आणि अप्पर अल्साकचे बाजूला म्हणजे फ्रान्सच्या पूर्व सरहद्दीवर शत्रू मऊ आहे असे कुरतडताना निष्पन्न झाले. लगेच जनरल जॉफ्रे यांनी शत्रूच्या मऊ जागी म्हणजे मर्मस्थानी मोठे सैन्य पाठविले व जोराची चढाई करण्यास प्रारंभ केला. जानेवारी महिन्यात बेल्जम किनारा यिप्रेस, लाबासी व आरास या टापूंत कुरतडण्याचे काम जोराने सुरू राहील, र्‍हीम्स व्हर्डूनच्या बाजूला म्हणजे मध्यावर मध्यम जोराची चढाई होईल, आणि उजव्या बाजूस म्हणजे फ्रान्सच्या सरहद्दीवर निकराच्या लढाया होतील. या निकराच्या लढायांत जर जनरल जॉफ्रे यांना चांगले यश आले तर फ्रेंच सैन्य एकदम जर्मनींत घुसेल, आणि त्यामुळे बेल्जममधील व आइननदीवरील जर्मनीच्या चराचे चक्रव्यूह निर्जीव होतील. जरी नावाजण्यासारखे यश आले नाही तरी देखील फ्रेंच जर्मनींत घुसतील या भीतीने जर्मनीला मोठे सैन्य फ्रान्सच्या पूर्व सरहद्दीवर आणावे लागेल. पोलंडमधील सैन्य आणावे तर पोलंडातील युद्ध निकरावर आलेले. अर्थात् बेल्जममधून व आईन नदीपासूनच ही भरती करावी लागेल. याचा परिणाम असा होईल की, फेब्रुवारी महिन्यात बेल्जममधील व आईन नदीवरील चक्रव्यूह मऊ होतील, आणि इंग्लंडच्या नव्या दहा लाख सैन्याचे दोन तीन गोळे सर्वांत मऊ अशा दोन तीन जागी जर एकदम फेकण्यात आले, तर जर्मन फळीला दोन तीन मोठीं भगदाडे पडल्यावाचून रहाणार नाहीं. आपल्या उजव्या बाजूला जोरानें रेटावयाचें व डाव्या बाजूने व मध्यानें शत्रूला कुरतडत रहावयाचें आणि त्यायोगानें इंग्रजांच्या दहा लाखाची तयारी होण्याचे वेळी मध्यावर किंवा डाव्या बाजूला निदान दोन चार ठिकाणीं शत्रूला जवळ जवळ मृतप्राय करून सोडावयाचें,

असे लष्करी धोरण जनरल जॉफ्रे यानी डिसेंबर अखेरीस स्वीकारले आहे. हिंवाळ्यानतर भगदाडे पाडून हकालपट्टी करण्याच्या खऱ्या उद्योगास इंग्रजाचें नवें दहा लाख सैन्य आरभ करणार असल्यामुळे यिप्रेसच्या बाजूला व आईन नदीवर जानेवारीत कुरतडण्याच्या झटापटी होतील व उजव्या बाजूला म्हणजे फ्रान्सच्या पूर्व सरहद्दीवर ज. जॉफ्रे जर्मनीत घुसण्याचा प्रयत्न करीत असताना जानेवारीत महत्त्वाच्या लढाया होतील असा अदाज आहे.

## पोलडमधील पेच

फ्रान्समधील चराच्या चक्रव्यूहाच्या लढाईच्या राकट रद्दडपणावरून दृष्टि काढून पोलडकडे वळविली असता तेथे लढाईचा थाट निराळ्या तऱ्हेचा दृष्टीस पडतो. दोनहि दले समानबल झाली म्हणजे चराच्या चक्रव्यूहात दडून बसतात. फ्रान्समध्ये ही समान बलाची स्थिति उत्पन्न झाली आहे, पोलडमध्ये तशी स्थिति नाही. ऑक्टोबरच्या अखेरीस रशियाने वार्सॉच्या बाजूला व्हिश्चुला नदीच्या दोन्ही काठांनी जर्मनीवर हल्ला चढविला व व्हिश्चुलाच्या मार्गाने रशिया जर्मनीत शिरतो की काय अशी भीति उत्पन्न झाली. याच सुमारास दक्षिण पोलडच्याखाली क्रॅकोच्याजवळ रशियाने भले मोठे सैन्य आणिले व क्रॅकोचा मजबूत किल्ला घेऊन दक्षिणेस ऑस्ट्रियात व पूर्वेस जर्मनीत शिरण्याचा उद्योग आरभिला. पूर्वी एकदा जर्मन सैन्य वार्सापर्यंत गेले होते, त्यावेळी ऑस्ट्रियाच्या बाजूनेहि ऑस्ट्रियाचे सैन्य व्हिश्चुला ओलाडून इव्हगोरोडपर्यंत जाऊन गॅलिशियामध्ये प्रिजमिसलचा वेढा ऑस्ट्रियाने उठविला होता, पण ऑक्टोबर अखेरच्या व नोव्हेंबर प्रारंभीच्या स्वारीत रशियाने प्रिजमिसलला पुनः वेढा दिला, प्रिजमिसलच्या दक्षिणेच्या कार्पेथियन पर्वतावरून खाली दक्षिणेत हगेरियामध्ये उतरण्यास प्रारभ केला, व क्रॅकोच्या मार्गाने ऑस्ट्रिया व जर्मनी या दोनहि देशात घुसण्याची जगी तयारी चालविली. नोव्हेंबर प्रारंभाला हगेरिया रशियाच्या भीतीनें घाबरला होता, ऑस्ट्रियाचा दम सुटला होता व जर्मनीची सर्व पूर्व सरहद्द रशिया ओलाडतो की काय अशी खुद्द जर्मनीस दहशत बसली होती. हगेरियामध्ये घुसून सर्व्हियाशी सलग्न होणे हे रशियाचे सेनापति ग्रँड ड्यूक निकोलस याच्या लष्करी धोरणाचे ध्येय असल्यामुळे कार्पेथियनच्या बाजूला आपल्या लष्कराचें मुख्य वजन त्यानी फेकले होतें. क्रॅकोच्या बाजूनें ऑस्ट्रिया व जर्मनी याच्याशीं चागले दोन हात करण्याची त्याची तयारी होती व व्हिश्चुला व वर्टा या

दोन नद्यामधील जर्मन सरहद्दीला तबी देऊन क्रॅकोकडे आपले सैन्य जर्मनीला झुकविता येऊ नये अशी त्यानी व्यवस्था केली होती. लष्करी धोरणाच्या दृष्टीनें विचार करताना ग्रँड ड्यूक निकोलस यानी हा रशियाचा डाव उत्तम रीतीने आखला होता असेच म्हणावे लागते, व या आखणीबद्दल सर्व युरोपियन राष्ट्रे त्याची प्रशसाच करीत आहेत. या आखणीप्रमाणे नोव्हेंबर प्रारभाला चागले यशहि आले. प्रिजमिसलला त्यानी वेढा दिला, कार्पेथियनचे घाट ओलाडले, क्रॅकोच्या मुलुखात मोठी सेना दड थोपटून उभी केली व व्हिश्चुला–वर्दाच्या मार्गाने जर्मनीस त्याच्याच सरहद्दीत रेटले! रशियन सेनापतीचा असा अदाज होता की, वर्दा–व्हिश्चुलाच्या सरहद्दीवर चराचा चक्रव्यूह करून जर्मनी आत्मसरक्षणाची लढाई लढत राहील. क्रॅको सिलेशिया येथे हा टापू मर्मस्थानाचा असल्यामुळे ऑस्ट्रिया व जर्मनी मिळून रशियावर उलट चाल करतील. या उलट चालीचा प्रतिकार करण्याची किंबहुना क्रॅकोच्या मुलुखातच जर्मनीची हाडे मोडण्याची ग्रँड ड्यूक निकोलस याची तयारी होती आणि अशा रीतीने क्रॅकोच्या टापूत जर्मन सैन्याची रग जिरविल्यावर हगेरियात एकदम जोराने घुसून सर्व्हियाशी सलग्न होऊन महायुद्धाची परिसमाप्ति करण्याचा रशियाने घाट घातला होता. रशियाच्या या प्रचण्ड सेनेशी व मोठ्या चतुराईच्या डावाशी कोणत्या युक्तीनें लढून जर्मनीने आजचे मरण उद्यावर टाकले? त्यावेळीं जर्मन सेनापति फॉन हिंडेनबर्ग यानी जर्मन सैन्याची हालचाल करण्यात जी चपलता दाखविली ती जर दाखविली नसती तर हगेरियात व क्रॅकोच्या टापूतच महायुद्धाची परिसमाप्ति रशियाचे तर्फेनें झाली असती. नोव्हेंबर व डिसेंबर महिन्यात सेनापति फॉन हिंडेनबर्ग यानी कोणची कुशलता दाखविली? नोव्हेंबरच्या प्रारभाला ग्रँड ड्यूक निकोलस याचे नाव युरोपखडात सर्वतोमुखी झाले होते; डिसेंबरच्या अखेरीस जर्मन सेनापति व्हॉन हिंडेनबर्ग याचे धन्यवाद सर्व जर्मन राष्ट्र गाऊ लागलें; इतकेच नव्हे तर, खुद्द इग्लडनेहि जर्मनीने या सहा महिन्यात नावाजण्याजोगा असा निदान एक तरी सेनापति निर्माण केला असे उद्गार काढले! इग्लडची ही प्रशसा जनरल फॉन हिंडेनबर्ग याना भूषणावह तर खरीच, पण या स्तुतीवरून इग्लडची गुणग्राहकता जगाच्या निदर्शनास विशेषेकरून येते, असे म्हटल्यावाचून कोणाच्यानेहि राहवणार नाही! जनरल फॉन हिंडेनबर्ग यांनी असें काय केलें म्हणून इग्लडनें त्याची एवढी स्तुति करावी? ऑस्ट्रिया व जर्मनी यांना मृत्यूच्या सकटातून नोव्हेंबर

डिसेंबर महिन्यात त्यानी वांचविले व हिंवाळा सपून जाईतो म्हणजे मार्च एप्रिल-पर्यंत आणखी तीन महिने सुखाने जगण्याची व पुढील मृत्यु टाळण्याकरिता व्यवस्था करण्याची त्यानी तीन महिन्याची सुटी मिळवून दिली. रशियाचे ग्रहण उन्हाळ्यापर्यंत कसे सोडविले ? रशियाचा सेनासागर फार मोठा व या सेनासागराला नुसत्या सेनेच्या संख्येच्या जोरावर थोपवून धरता येणे शक्यच नव्हते. संख्येच्या बलाने जर थोपवून धरणे शक्य नाही, तर चराच्या चक्रव्यूहाचा आसरा निर्माण करून जर्मनी व ऑस्ट्रिया स्वस्थ बसतील असा रशियाचा किंबहुना सर्व युरोप खंडाचा अदाज होता. शत्रूच्या पेचात अशा रीतीने सापडले असताना चराचा चक्रव्यूह रचणे ही गोष्ट आत्मसंरक्षणास उपयोगी पडते खरी, पण त्यामुळे मरण टळण्याचे स्वास्थ्य सेनेस व राष्ट्रास कधीच मिळत नाही. मरणाशी रोज झुंजणे निराळे व मरण टाळणे निराळे. चराच्या चक्रव्यूहाने रोगी मरत नाही पण मृत्यूहि जवळचा दूर जात नाही. सेनापति व्हॉन हिंडेनबर्ग यानी मृत्यूची चिठी मागे परतविली व हिंवाळ्याची तीन चार महिन्याची फुरसद जर्मनीला देऊन थंडीच्या दिवसात शक्तिवर्धक औषध घेण्याची संधि जर्मनीला पैदा करून दिली. जर्मनी सांप्रत चाळीस लाखाची नवी सेना उभारीत असून उन्हाळ्यात ही सेना रणभूमीवर पाठविण्याचा विचार जर्मनीने केलेला आहे. कोणचें औषध देऊन सेनापति हिंडेनबर्ग यानी मृत्यूची चिठी मागे परतविली ? शक्तिवर्धक पाक घेण्यास अवसर मिळेल इतका मागे मृत्यु कसा लोटला गेला ? रशियाच्या बळाला बळ भिडवून जर्मनीने रशियाला मागे हटवला काय ? रशियाएवढी सेना जर्मनीपाशी पूर्वीहि नव्हती, आजहि नाही व पुढेहि दिसणार नाहीं. जर्मनी हिकमतीने लढला, बलाने लढला नाही व या हिकमतीबद्दल सेनापति व्हॉन हिंडेनबर्ग याचे नाव सर्वतोमुखी झाले आहे. ही हिकमत कोणती ? चराच्या चक्रव्यूहाची ही हिकमत होती काय ? चराच्या चक्रव्यूहाच्या लढाईला मद्दड लढाई असे नाव तज्ज्ञ देतात, चराच्या चक्रव्यूहाना हिकमत कोणीहि म्हणत नाहीं. मग व्हॉन हिंडेनबर्ग याचें कौशल्याचें धोरण ते कोणतें ? मुख्य सेनापतीचें कौशल्य म्हणजे शत्रू सर्वांत अधिक असेल त्या ठिकाणी शत्रूला न समजेल इतक्या चपलतेनें आपलें मोठें बल नेऊन सोडावयाचें व शत्रूच्या या मर्मस्थानीं घाव घालीत असतांना शत्रूच्या मोठ्या सेनेस नुसतें थोपवून धरावयाचें. या युक्त्या शत्रूला न समजतील अशा रीतीनें पार पाडणें, हें मुख्य सेनापतीचें काम आहे. कार्पेथियन ओलांडून

रशिया हंगेरियात घुसत होता. या ठिकाणी व्हॉन हिंडेनबर्ग यांनी म्हणण्यासारखा अडथळा केला नाही. मोठया सेनेस कार्पेथियन पर्वत ओलांडणे हेच काम बऱ्याच कालावधीचे आहे व अवजड सामान घेऊन रशिया कार्पेथियन पर्वताच्या डोक्यावर येईपर्यंत रशियाकडे त्या बाजूला डोळेझाक करण्यास हरकत नव्हती. कार्पेथियन पर्वताच्या अवघड वाटावर भिस्त ठेऊन त्या बाजूला नोव्हेंबर महिन्यात सेनापति व्हॉन हिंडेनबर्ग झोपी गेले. आमच्या घरादारावरहि रशियाची आग आली म्हणून हंगेरियन लोकांनी बरीच ओरड केली. पण सेनापतीने त्याजकडे जाणूनबुजून दुर्लक्ष केले, व रशियाने कार्पेथिअन पर्वताचे घाट रोखून धरले. जर्मनी कोठे आपणाशी लढणार याची वाट रशिया पहात होता. क्रॅकोच्या बाजूला जर्मनी व ऑस्ट्रिया यांनी मिळून रशियन सेनेवर हल्ला चढविला. हेच खरे रणमैदान होणार असे रशियास वाटले. क्रॅकोचा टापू हेच रणमैदान व्हावयास रशियास पाहिजे होते व या अंदाजासंबधाने रशियाला जर्मनीने चकविले. ऑक्टोबर अखेरीस व नोव्हेंबरच्या प्रारंभाला क्रॅकोच्या मुलुखात ऑस्ट्रिया व जर्मनी यांची मुख्य सेना गोळा झाली ही गोष्ट खरी. ज्याअर्थी मुख्य सेना या ठिकाणी गोळा झाली त्याअर्थी खरें रणकंदन याच टापूंत होणार असा रशियाने अंदाज बांधल्यास त्यात कोणते नवल? लढाईला सुरुवात झाली, गोळीबार होऊं लागला, म्हणजे जर्मन लोक तोफांच्या माराखाली प्रतिपक्षास प्रथम चिरडण्याचा प्रयत्न करतात, असा जर्मनीच्या लढाईच्या पद्धतीचा गवगवा चोहोंकडे झाला आहे. जर्मनीच्या या तोफांना मुके ठरविता यावे म्हणून रशियाने क्रॅकोच्या मुख्य रणमैदानावर आपल्या अवजड तोफा नेल्या. सर्व नोव्हेंबर महिनाभर आगीचा खेळ क्रॅकोच्या बाजूस दृष्टीस पडेल असा रशियाचा अंदाज होता. क्रॅकोच्या टापूंत जर्मनीने अशा प्रकारची लढाई चालविली कीं याच जागी मुख्य सेना आमच्यावर चाल करून येणार असा रशियास भास व्हावा. दोन दोन तीन तीन दिवस चाल करून जाऊन रशियन सेनेवर तुटून पडावे, एकाददुसरा दिवस रशियाशी निकराने लढावे, या निकराच्या लढाईंत जणु काय आपला पराभव झाला असे रशियाला दाखवून आपल्या अंगावर रशियन सेनेला ओढून घ्यावें आणि रशियन सेना अंगावर आली असता पुन्हा दोन दिवस निकराने लढून पुनः मागे परतावे, असा मागेपुढे सरकण्याचा खेळ जर्मनीनें क्रॅकोच्या टापूंत आरंभिला. मागेपुढे सरकून हूल दाखविण्याच्या या हालचाली सुरू असतांना निकराने लढणे

चालूच होतें. ज्या टापूत ही हूल दाखविण्यात येत होती त्या टापूच्या मागच्या बाजूस चराचा चक्रव्यूह तयार होता. व या चक्रव्यूहाच्या मागे म्हणजे जर्मनी व ऑस्ट्रिया याचे सरहद्दीचे आत जर्मनीचे मोठे लष्कर सर्व ठिकाणावरून जमा होत होते. निकराने लढणे व माराच्या बाजूस लष्कराची जमवाजमव करणे या दोन बाबीच अशा स्वरूपाच्या आहेत की त्यामुळे मागे सरकण्याची हालचाल ही केवळ हूल आहे, थोताड आहे, खरा पराभव नव्हे, हे बिंग प्रतिपक्षास ओळखता येणेच मुष्किलीचे होते रशियास वाटे, की जर्मनीच्या आघाडीचा आपण पराभव करीत आहो व मुख्य सेनेशी झुंजण्याकरिता पुढे पाऊल टाकीत आहो. मुख्य सेना या आघाडीच्या मागे गोळा झाली आहे ती कशाकरिता ? अर्थात लढण्याकरिता. ही मुख्य सेना आपल्याशी लढणार, आघाडीचा आपण पराभव केला आहे, पुढेहि आपण मुख्य सेनेवर जय मिळवू या उमेदीने रशियाने क्रॅकोच्या टापूत कडेकोट बदोबस्त केला. पण ज. व्हॉन हिंडेनबर्ग याच्या मनात या टापूत आपल्या मुख्य सेनेला रशियाशी लढावयाचे नव्हते. मग एवढी जमवाजमव त्यानी क्रॅकोच्या बाजूला का केली ? मागे सरकण्याची हूल व खरा पराभव यामधील भेद रशियन सेनापतीच्या ध्यानात येऊ नये म्हणून "निर्विषेणापि सर्पेण क्रीयता महति फणा". कारण, हा खटाटोपच भयकर असतो. या न्यायाने जर्मन सेनेचा नाग नुसती फणा वर करून क्रॅकोच्या टापूत बसला होता. असला मोठा खटाटोप केल्याशिवाय प्रतिपक्षी चकत नाही. जर्मन नागाची फणा पाहून रशियाचे सर्व लोक हत्यारे घेऊन या नागाला वेढण्याकरिता व मारण्याकरिता क्रॅकोच्या टापूत धावले. रशियाचे सर्व हत्यारबद लोक मुख्यतः जमले आहेत, रशियाच्या बदुका येऊन पोंचल्या आहेत, रशियाच्या तोफा येऊन पोचल्या आहेत,रशियाचें खाण्यापिण्याचे सर्व सामान येऊन पोंचले आहे, रशियाची सर्व सिद्धता क्रॅकोच्या टापूत झाल्यावर या नागोबानी एकाएकीं रात्रीच्या अधारांत तेथून पळ काढला. नागोबानी बसल्या बसल्या रणभूमीवर निरनिराळ्या ठिकाणीं स्वतःकरिता बिळे तयार करून ठेवलेलीच होतीं. चर व चराचे चक्रव्यूह तयार झाले, आघाडीच्या सेनेला बरेंचसे मागे परतविल्यावर सुरक्षितपणे बसून रहाण्याइतकी जागा झाली, आणि जर्मन नाग सर्कन अंधारातून निघून गेला. रशियन आले, सर्व जमवाजमव झाली आणि मोठें तुमुल युद्ध माजणार म्हणून बातमीदार देवदूतांची गर्दी उसळली. इतक्यात सेनापति व्हॉन हिंडेनबर्ग यांनीं क्रॅको व

सैलेशिया या टापूंतील जर्मन सेना आगगाड्याच्या सहाय्यानें एका रात्रींत उचलून उत्तरेस वर्दी व्हिश्चुला नद्याच्या सरहद्दीवर नेली.

## सैन्याच्या जलदीच्या हालचाली

एका ठिकाणीं जमवाजमव करावयाची व शत्रूला नकळत भलत्याच ठिकाणीं निघून जाऊन अकस्मात लाब दूरवर प्रकट व्हावयाचें हें साधते कसें? लढाई नसताना म्हणजे शांततेचे वेळीं प्रत्येक राष्ट्रापाशीं किती सैन्य आहे, लढाई सुरू झाल्यावर प्रत्येकाला किती नवे सैन्य जमविता येते, कोणच्या रणभूमींत कोणी किती सैन्य जमविलें आहे, निरनिराळ्या रणभूमीकडे येणारे जाणारे आगगाडीचे व इतर रस्ते कोणचे व किती आहेत याची बातमी मुख्य सेनापतीना सविस्तरपणें कळत असते. शत्रूच्या देशातून हेराचा सचार चाललेला असतो. शिवाय असल्या बातम्या काढण्यात विमानाचा या युद्धात विशेष उपयोग करण्यांत येत असल्यामुळे, रण-भूमीच्या मागें शे सवाशे मैल उड्डाण करून कोणत्या दिशेला किती आगगाड्या चालल्या आहेत याचा अदाज काढून सैन्याच्या जमवाजमवीचा रोंख कोणत्या बाजूला आहे तेहि सेनापतीला कळत असते. अशा स्थितीत क्रॅकोच्या बाजूला झालेली जमवाजमव रशियन सेनापतीला न कळत कशी मोडता आली? या प्रश्नाचे उत्तर पोलडच्या नकाशाकडे पाहिले असता वाचकाच्या नीट ध्यानात येईल. पोलडच्या सरहद्दीच्या पलीकडे जर्मनीच्या व ऑस्ट्रियाया हद्दीत जर्मनीनें आगगाड्याचें जाळेंच पसरलेलें आहे. सरहद्दीजवळून दुहेरी तिहेरी आगगाडीचे फाटे जात असून ठिक-ठिकाणीं हे फाटे एकमेकास जोडलेले आहेत. किंबहुना आगगाडीच्या चार पाच रस्त्याची चार पाच दोराची पेडी वेणी घालून भल्या मोठ्या दोरखडाने पोलडला जर्मनीने वेढले आहे असे म्हणण्यास हरकत नाही. मुख्य रशियातून तर वार्सा व इव्हनगोरोड या मध्यावरच्या पोलडातील दोन मुख्य शहराकडे म्हणजे व्हिश्चुला नदीच्या मध्याकडे तीनच फाटे येतात. जर्मनी व ऑस्ट्रियातून एकदर पाच फाटे जातात. उत्तरेस म्लामा-वार्सा हा फाटा, ईशान्येस व्हिश्चुला नदी पश्चिमवाहिनी झाल्यानतरच्या व्हिश्चुलाच्या उत्तर किनाऱ्यानें वार्सा-प्लॉक-थॉर्न हा दुसरा फाटा, वार्साच्या पश्चिमेस कालिक्स-सिराझ-लोज-वार्सा हा फाटा, नैऋत्येस क्रॅको-कीस-रॅडम-इव्हनगोरोड आणि घेन्स्टोको-पेट्रोको-वार्सा हे दोन फाटे. असे पाच फाटे वार्सा व इव्हनगोरोड या टापूतून जर्मन सरहद्दीकडे येतात. शिवाय कार्पेथियन

पर्वताच्या उत्तरेच्या बाजूनें क्रॅको, पिजमिसल व लेंबर्ग असा फाटा जातो. नोव्हेंबरच्या पूर्वी जर्मन व ऑस्ट्रियन सैन्य इव्हनगोरोड व वार्सा या दोन ठाण्यापर्यंत गेले होते व त्या सैन्याला मागे रेटीत रेटीत जर्मन सरहद्दीपर्यंत रशियाने मागे रेटले होते. जर्मन सैन्याने मागे जाताना आगगाड्या व पूल यांचा त्यांनी विध्वंस केला होता. तथापि कामापुरती दुरुस्ती करून रशियन सैन्य वार्सा, थॉर्न, घेन्स्टोको—वार्सा—व इव्हनगोरोड रॅडम, कील्स, क्रॅको या मार्गाने क्रॅकोच्या रणमैदानावर उतरले व या दोन रस्त्यानींच क्रॅकोच्या प्रांतातून मोठ्या सेनेस सामानसुमानाची, अन्नपाण्याची व इतर कुमकेची मदत होत होती. शिवाय प्रिजमिसलपासूनहि खर्कीच्या रस्त्याने क्रॅकोकडे सैन्य जातच होते. क्रॅकोच्या टापूतील रशियाच्या सैन्याच्या पिछाडीला आगगाडीचे दोनच फाटे व त्याच टापूतील जर्मन सैन्याच्या पिछाडीला आगगाड्यांच्या बुजबुजाटाचे जाळे, ही स्थिति पोलंडमधील सैन्याच्या हालचाली समजून घेताना बिलकूल विसरता कामा नये. एका आगगाडीच्या फाट्यावर रशिया प्रत्येक दिवशी म्हणजे चोवीस तासात अठ्ठेचाळीस वेळा म्हणजे अर्ध्या तासाला एकदा आगगाडी हालवू शकतो. एका स्टेशनावरून चोवीस गाड्या जातात व चोवीस येतात. फ्रेंच लोकांची आगगाडीची व्यवस्था अधिक चलाखीची असल्याने रशियाहून तिप्पट काम फ्रेंच लोक एक फाट्यापासून करून घेतात, व जर्मन लोक टापटिपीत सर्वांत पुढे गेले असल्यामुळे त्यांचे काम रशियाच्या चौपट होते. अंधःकार पडला असताना लाख दोन लाख सैन्य चटदिशी आगगाड्यांच्या डब्यात भरून रात्रीच्या बारा तासांचे आत म्हणजे टेहळणी करणाऱ्या विमानांना समजू शकण्याच्या पूर्वी जर्मन लोक दोन तीनशे मैल पलीकडे नेऊ शकतात. जर्मन सेनेच्या या विशेष चपलतेमुळे जर्मन सेनेस नागीण असे म्हणण्यास हरकत नाही. आगगाड्या व मोटार गाड्या यांच्या सहाय्यामुळे ही चपलता जर्मन सेनेंत उत्पन्न झाली आहे. रशियापाशी असंख्यात लोक आहेत, पण पोलंडकडे नेणारे आगगाडीचे फाटे थोडे आहेत. यामुळे रशिया पोलंडमध्ये हत्तीसारखा दिसतो आणि उलट बाजूला जर्मनी वाऱ्याप्रमाणे चपल वारूसारखा दिसतो. जर्मन सेनापति फॉन हिंडेनबर्ग यांनी या जर्मन सेनेच्या चपलतेवर भिस्त ठेवून नोव्हेंबर महिन्यात ओढवलेल्या भीषण संकटाचें निवारण करण्यास आरंभ केला. क्रॅकोच्या बाजूला त्यांनीं भला मोठा खटाटोप आरंभिला आणि नोव्हेंबर पंधरा वीस तारखेच्या सुमाराला ज्यावेळीं रशियन फौजेनें जर्मनीच्या वर्दा व व्हिश्चुला

या दोन नद्यांमधील सरहद्द दाखविली त्यावेळीं क्रॅकोच्या बाजूचें व इतर ठिकाणचें सैन्य रातोरात त्याच्यापुढे नेऊन उभे केलें. रशियाला वाटलें होतें आपल्या इतकेच फार तर थोडे जास्ती लोक सरहद्दीवर आपल्यासमोर उभे रहातील, फार फार म्हणजे दिढीनें लोक अंगावर चालून येतील. तेव्हा सरहद्दीवर आयत्या वेळी चर खणून बसण्यास हरकत नाहीं. या मोहाने रशिया व्हिश्चुलाच्या दक्षिणेकडे जर्मन सरहद्दी-पर्यंत चाल करून गेला. पण तेथे पहातो तो तिप्पट चौपट जर्मन त्याच्यापुढे उभे ! मागच्या बाजूला आगगाडी नाही, तातडीने कुमक येऊन पोंचण्याचा संभव नाहीं, शत्रू तर तिप्पट, चोपट पाचपट मोठा ! आपला सेनाशकट मोडू न देता लढत लढत वार्सापासून पश्चिमेस चाळीस पन्नेचाळीस मैलाजवळ झुरा नदीवर रशियास नोव्हेंबर-मध्येच माघार घ्यावी लागली. झुरा नदीवर आल्यावर रशियन सैन्याला सुरक्षितपणा वाटला. या माघारीत रशियाचा सेनाशकट मोडला नाही, पण अवजड साहित्याचें बरेच नुकसान झाले. झुरा नदीवर सुरक्षित स्थळीं रशियन सैन्य येऊन पोचल्यावर लोजच्या बाजूने त्या सैन्याची डावी बगल ओलांडण्याचा जर्मनीने प्रयत्न चालविला. जर्मनीचा हा प्रयत्न रशियन सेनापतीना मूर्खपणाचा वाटला. वार्सापासून घेन्स्टोकोकडे जाणाऱ्या आगगाडीच्या टापूतच हा प्रयत्न असल्यामुळे जर्मनीचे लाख दीड लाख सैन्य या बाजूला धुमाकूळ घालण्यास आले तर त्याला आपण सहज गिळून टाकू असे रशियाला वाटले. लोजच्या बाजूने लाख दीड लाख सैन्य गिळून टाकू, मग झुरा नदीपलीकडील जर्मन सेनेला वेढा देऊन व व्हिश्चुलेच्या उत्तर काठानेहि जर्मनीला परत जाता येणार नाही असा बंदोबस्त करून नेपोलियनलाहि मिळाला नाहीं असला मोठा जय ग्रॅंड ड्यूक निकोलस मिळविणार असे रशियन सेनेला वाटू लागलें. क्रॅकोच्या बाजूने रशियन हल्ले चालूच होते व जर्मनीच्या मूर्खपणामुळे झुरा नदी व लीज येथे हे आयते ताट वाढून आलें असे सर्वांना वाटले. पण त्यावेळीं जर्मन सेनापति फॉन हिंडेनबर्ग याचे धोरण पूर्णपणे प्रकट झाले नव्हते. वर्दा व व्हिश्चुला या दोन नद्यांच्या मधून जर्मन सैन्य पोलंडात घुसून जरा पुढे जाण्याबरोबर उत्तरेस लाबा–वार्साच्या फाटयाने एक मोठी जर्मन सेना पोलंडमध्ये घुसली व त्याच वेळी थॉर्न प्लॉक रस्त्यानें दुसरी जर्मन सेना पोलंडमध्ये घुसून तिनें प्लॉक शहर घेतलें. या दोन सेना अकस्मात आल्यामुळे वार्साच्या बाजूने झुरा नदी व लीज नदी येथील रशियन सेनेस कुमक मिळणें शक्य झाले नाहीं. वार्साच्या

इशान्येचा व उत्तरेचा बदोबस्त करण्याकरिता रशियातून नवीन येणारे सैन्य तिकडेच पाठवावें लागले. अर्थात लीजच्या बाजूला जर्मन सैन्याला तोंड देण्यापुरता वार्सा–घेन्स्टोको या आगगाडीच्या फाट्यानें पुढे गेलेले रशियन सैन्य लोजच्या बाजूला मागें आखडून घ्यावें लागलें. त्यामुळे डिसेंबरच्या पहिल्या आठवड्यात लोज शहर सोडून देऊन लोजच्या पूर्वेकडून जाणारा वार्सा–क्रॅको हा आगगाडीचा फाटा सुरक्षित करण्याचा उद्योग रशियन सेनेनें आरंभिला. कारण हा फाटा जर जर्मनीच्या हातता गेला तर क्रॅकोच्या सैन्याची निम्मे पिछाडी फुकट गेली असे रशियाला वाटले. लोज शहर ज्यावेळी रशियाने सोडले त्यावेळी जर्मनीचे पुढे पाऊल आता पडणार नाही असे रशियास वाटले. पोलंडमध्ये वार्साच्या खालोखाल लोज शहराची योग्यता आहे. या शहराची लोकसंख्या पाच सहा लाख असून पोलंडचे मँचेस्टर असा या शहराचा लौकिक आहे. हे शहर जर्मनीच्या हाती पडले त्यावेळी जर्मनीला रशियाचा सेना-शकट मोडता आला नाही व रशियाने बदोबस्ताने व व्यवस्थितपणें माघार घेऊन आगगाडीच्या फाट्याचे सरक्षण करीत सुरक्षित जागी आपले सैन्य नेले. जर्मनीला लूट बरीच मिळाली, पण रशियन सैन्याची खराबी झाली नाही. जर्मन सेनापतीचा डाव डिसेंबरच्या पहिल्या आठवड्यात येथेच संपला नाही. डिसेंबरच्या पहिल्या आठवड्यात क्रॅकोजवळ चार पाच मैलावर रशियन सैन्य जाऊन थडकले. खुद्द क्रॅकोच्या किल्ल्यावर रशियन तोफाचा भडिमार सुरू झाला आणि एकदा का क्रॅको घेतलें म्हणजे जर्मन सेना वार्साच्या लोभानें झुरा नदीवर गुतली असल्यामुळें क्रॅकोच्या दाराकडे आपणास अडथळा करण्यास कोणीच उरले नाही असे रशियास वाटले. क्रॅकोकडे फॉन हिंडेनबर्ग यानी दुर्लक्ष केले होते काय ? कारण क्रॅको गेल्यावर झुराच्या बाजूला वार्साकडे चाल करून जाण्यात तरी कोणता फायदा ? मग क्रॅकोचा बदोबस्त त्यानी कोणता केला होता ? क्रॅकोच्या बदोबस्ताचें धोरण डिसेंबरच्या दुसऱ्या आठवड्यात दिसू लागलें. क्रॅकोच्या बाजूला रशियन सैन्याशी तोंडास तोंड देऊन लढण्याचा त्यांचा इरादा नव्हता. पण क्रॅकोच्या पिछाडीवर जाण्याचा त्यांनीं घाट घातला. क्रॅकोकडून दोन आगगाडीचे फाटे पोलंडकडे जातात. एक इव्हन-गोरोडकडे व एक वार्साकडे. पैकीं वार्साकडे जाणारा फाटा प्रथम ताब्यांत घेऊन इव्हनगोरोडकडे जाणाऱ्या फाट्यावर हल्ला करता यावा म्हणून जर्मनीची चौथी मोठी सेना कॅलिक्स शिराजच्या फाट्यानें पोलंडमध्ये शिरून वार्सा व घेनस्टोको या

फाटयावरच्या मध्यावरच्या पेट्राको शहरावर चाल करू लागली व लगेच त्यानें तें पेट्राको शहर हस्तगत केले. अर्थात् वार्सा–क्रॅको याचा संबध तुटला. वार्सा–क्रॅको व इव्हनगोरोड–क्रॅको या दोन आगगाडीच्या फाटयामधून फिलिफा नदी वहात जाऊन वार्सा व इव्हनगोरोड या दोन शहराच्यामध्यें फिलिफा नदी व्हिश्चुलेला मिळते. फिलिफा नदीच्या डाव्या काठावर जर्मन सैन्य येऊन पोंचण्याच्या सुमारास डिसेंबरच्या दुसऱ्या आठवडयात जर्मनीची पाचवी सेना नोव्होसेडाफ, डुक्ला व युसाक या घाटाने कार्पेथियन पर्वत ओलाडून क्रॅकोच्या पश्चिमेस डोनाझी नदीच्या मार्गानें वर चढू लागली. कार्पेथियन पर्वताच्या मागच्या बाजूला एवढी मोठी सेना गोळा करून कार्पेथियन पर्वत ओलाडण्याचा येवढा मोठा अट्टाहास जर्मनी व ऑस्ट्रिया करील ही गोष्ट अटकळीच्या बाहेरची होती. कार्पेथियन पर्वताचे घाट ऑस्ट्रियन सेना ओलाडत आहे असे ज्या दिवशी प्रथम समजले त्यावेळीं रशियन सेनेला वाटले की लहान लहान तुकडया खाली उतरत आहेत. या तुकडया खालीं उतरल्या म्हणजे आपणाला आयते भक्ष मिळाल्यावाचून रहाणार नाही. पण चार पाच दिवस एकसारखे ऑस्ट्रियन व जर्मन सैन्य कार्पेथियन पर्वताच्या घाटातून खाली उतरतच राहिले. त्यावेळी सर्वांना समजले की लहान लहान तुकडया उतरत नसून मोठी सेना उतरत आहे. पोलडमध्ये एक मोठी जर्मन सेना पेट्रॅको येथे वार्सा–क्रॅको आगगाडीचा फाटा ओलाडून क्रॅको–इव्हनगोरोड या फाटयाकडे जात आहे व त्याच सुमारास कार्पेथियनचे घाट ओलाडून डोनाझी नदीच्या मैदानावर दुसरी सेना उतरत आहे, हे पहाण्याबरोबर जर्मन सेनापति फॉन हिंडेनबर्ग यांचें धोरण रशियन सेनेच्या ध्यानात आले. क्रॅको–इव्हनगोरोड हा जर आगगाडीचा फाटा तुटला तर पोलडात परतण्याची पिछाडी नष्ट झाली व डोनाझी नदीचें मैदानहि शत्रूनें व्यापल्यामुळे पूर्व गॅलिशियाकडेहि परतण्याला मार्ग नाहीं. क्रॅकोच्या टापूत गुन्तविलेली मोठी सेना पिछाडी मागून कोडण्याचा उद्योग सेनापति फॉन हिंडेनबर्ग यानी आरंभिला आहे व तो उद्योग बराच रगरूपास येऊन खुला असलेला क्रॅको–इव्हनगोरोड मार्ग याचाहि गळा आवळण्यास सुरुवात झाली आहे हे ध्यानात येण्याबरोबर क्रॅकोच्या बाजूच्या सेनेनें व्यवस्थितपणें माघार घेऊन निकरानें लढून जर्मनीच्या फासातून आपली सुटका करून घेतली व दक्षिण पोलडातील निडा नदी ओलाडून सुरक्षित जागा गाठली. ही माघार रशियाला घाइघाईनें घ्यावी लागली व

त्यामुळे अवजड तोफा वगैरे बरेंच सामान क्रॅकोच्या टापूत टाकावें लागलें. क्रॅकोच्या टापूंतला सेनाशकट आपण पार मोडला अशी वृथा घमेंड त्यावेळी ऑस्ट्रियानें मारली खरी, पण लगेच ऑस्ट्रियाच्या समजूतदार वर्तमान पत्रानी कबूल केलें कीं जरी मोठी लूट मिळाली तरी सेनाशकट शाबूत ठेऊन रशिया फासातून निसटला. झाले! जर्मनीचे सेनापति फॉन हिंडेनबर्ग यानी मोठ्या चपलाईच्या हाल्चाली करून जे काय मिळविले ते एवढेच मिळविले. क्रॅकोच्या बाजूने जर्मनी व ऑस्ट्रिया याना यावयाचा मृत्यु दोन तीन महिने लाबणीवर त्यानी टाकला. डिसेंबर पधराच्या सुमारास मृत्यु टाळण्याचे काम त्याना साधता आलें. क्रॅकोच्या टापूतले रशियन सैन्य नीडापार गेल्यानतर क्रॅकोच्या टापूतील जर्मन सैन्यानेहि डिसेंबरच्या दुसऱ्या पधरवड्यात दक्षिण पोलडात नीडा नदीच्या प्रातात त्याचा पाठलाग चालविला. मध्य पोलडात घुसलेल्या जर्मन सेनेनें पिलिफा नदी उतरून रॅडम कीसच्या टापूवर हल्ला चढवून त्याच्या पिछाडीस त्रास देण्यास सुरुवात केली, व झुरा–लोज प्रातामधील जर्मन सैन्यानेहि दक्षिण पोलडमधील सैन्यास वरून कुमक पोचू नये म्हणून झुरा नदी ओलांडण्याचा प्रयत्न केला. झुरेच्या काठच्या या लढायामध्ये तीन आठवड्यात मिळून दीड दोन लाख सैन्य बळी दिले, तरी झुरा नदीची रशियाची फळी फोडणें जर्मनास शक्य झाले नाही. नोव्हेंबर महिन्यात यिप्रेस येथे इंग्रजाची फळी फोडताना जर्मनीची जी गत झाली तीच गत डिसेंबर महिन्यात झुरा नदीवर झाली. तथापि झुरा नदीच्या दक्षिणेस असलेली रावाका नदी ओलाडून रावा शहराच्या ईशान्येस डिसेंबर अखेरीस जर्मन सैन्याने रशियाची फळी फोडण्याचा प्रयत्न चालविला आहे. झुरा नदीप्रमाणे याहि बाजूला, म्हणजे वार्सोच्या पश्चिमेप्रमाणें दक्षिण कोपऱ्यावर ४०–५० मैलावर, रशियन लोक चराच्या चक्रव्यूहात बदोबस्तानें बसले असल्यानें या बाजूनेंहि वार्सोकडे जर्मनाचें पुढें पाऊल पडणार नाहीं असें तज्ज्ञाचें निश्चित मत आहे. डिसेंबर अखेरीस वार्सोचे उत्तरेस वार्सो–म्लावा आगगाडीच्या बाजूनेंहि जर्मनीनें पुन्हा जोर केला आहे, व म्लावा शहर पुन्हां हस्तगत केलें आहे. वार्सो शहर जर्मनीच्या हस्तगत झालें असतां पोलडांत लष्करी दृष्टीची रशियाची इज्जत जाणारी असल्यामुळें वार्सोच्या उत्तरेसहि रशियाचा मोठा जमाव जर्मनी थोपवून धरण्यास सज्ज आहे. सेनापति फॉन हिंडेनबर्ग याच्या चपलतेच्या हाल्चालीमुळें रशियन सैन्याची पूर्वीची

माण्डणी बदलावी लागून घाईघाईनें निराळी माडणी करावी लागली आहे. ही घाईघाईची निराळी माडणी ग्रॅंड ड्यूक निकोलस यानी मोठ्या शिताफीनें व चातुर्याने केली असून त्याच्या योग्यतेचा सेनापति जर रशियास लाभला नसता तर रशियाला एखाद दुसऱ्या सेनाशकटास यावेळी मुकावे लागलें असते. पण, ग्रॅंड ड्यूक साहेबाच्या आटोकाट चतुराईने सैन्याची खराबी न होता रशियाने नवी माडणी पुरी केली आहे, आणि उगीच इकडून तिकडे कराव्या लागणाऱ्या पळापळी पलीकडे जर्मनीच्या पदरात डिसेंबर महिन्यात खरा तथ्यांश काहीच पडला नाही. उलट झुरा नदीवर धावपळीत जर्मन सैन्याचें मात्र कल्पनेबाहेर नुकसान झाले असे तज्ज्ञाचे मत आहे.

• आता येवढी गोष्ट खरी, की रशियन सैन्याची नवी माडणी चालली असताना जी थोडीशी अव्यवस्था साहजिकपणें झाली असेल तिचा फायदा घेऊन उत्तर पश्चिम व दक्षिण या तीनहि बाजूनी वार्सापासून चाळीस पन्नास मैलावर वार्सा गाठण्याकरिता जर्मन लोक जानेवारी महिन्यात हल्ले चढवतील, पण वार्साचा टापू म्हणजे दुसरा यिप्रेसचा टापू असेच त्याच्या प्रत्ययास आल्यावाचून रहाणार नाही. वार्सा सभोंवारच्या चराच्या चक्रव्यूवहावर डोके आपटून घेत असताना फिलिफा नदीच्या उजव्या बाजूनें चाल करून इव्हनगोरोड घेण्याचा जर्मन लोक जानेवारींत जोराचा प्रयत्न करतील असा अदाज आहे. वार्सा घेणे राजकीय दृष्ट्या महत्त्वाचें असले तरी लष्करी धोरणाच्या दृष्टीने वार्साहूनहि इव्हनगोरोडचें महत्त्व अधिक आहे. कारण, इव्हनगोरोड घेऊन लब्लिन प्रातातील रशियाच्या आगगाडीचा जर्मनीला विध्वस करता आला तर कार्पेथियन पर्वतावरील रशियाचा दाब आपोआप हलका होण्याचा सभव आहे. प्रिसमिसल प्रातात रशिया आस्ट्रियाला अद्याप मागे सरकवीत आहे. दहा बारा दिवस लढून युझाक घाटाचें तोंड रशियानें ऑस्ट्रियाकडून पुनः परत घेतले आहे; व डोनाझी नदीवरील जर्मन सैन्यालाहि गॅलिशियात पुढे पाऊल टाकता येणे डिसेंबर अखेरीस अशक्य झालें आहे. वार्साच्या बाजूला जर्मनी रशियास गुन्तवून ठेवील व इव्हनगोरोडच्या बाजूला जोर देऊन इव्हनगोरोड घेऊन सर्व दक्षिण व्हिश्चुला नदी दोन्ही काठाने ताब्यात घेण्याचा प्रयत्न करील. उत्तर व्हिश्चुला, झुरा, रावाका व फिलिकेचा डावा काठ या चार नद्यांच्या मधील रणभूमि जानेवारीत अर्धवट जागती राहून दक्षिण व्हिश्चुला डोनाझी व

प्रिसमिसलची सॅननदी येथील रणभूमि जानेवारी महिन्यांत पूर्णपणें जागी राहील असा अंदाज आहे. रशियाच्या धादलीचा जर कोठें जर्मनीला फायदा मिळावयाचा असेल तर दक्षिण व्हिश्चुलाच्या आसपास तो शक्य आहे; व तसा फायदा मिळाल्याशिवाय जर्मन सेनेची नोव्हेंबर डिसेंबर महिन्यातील चलाखी फोल होणारी असल्यामुळे, सेनापति फॉन हिंडेनबर्ग हे तो फायदा मिळविण्याकरिता शक्य ती धडपड करण्यास कमी करणार नाहीत हे उघड आहे. जानेवारीत हा फायदा जर्मनीस रशिया मिळू देणार नाही, पण यदा कदाचित् मिळाल्यास क्रॅकोच्या टापूप्रमाणे मध्य गलिशियाचेंहि म्हणजे प्रिसमिसलचे मरण आजचें उद्यावर ढकललें जाण्यापलीकडे रशियाचे विशेषसे त्यात नुकसान नाही. कारण थंडीच्या अखेरीस प्रिसमिसलचे जरी ग्रहण सुटलें तरी रशिया उन्हाळयाच्या प्रारभीं ताजातवाना होऊन सर्व व्हिश्चुला नदीच्या काठीं जर्मनीच्या उरावर एकास दोन येवढे मोठे सैन्य आणण्यास सर्वतोपरी समर्थ आहे. नोव्हेंबर डिसेंबरातील धादलीनें अवजड साहित्यासंबधानें रशियाचें नुकसान झालें आहे हें खरें, पण जपाननें आरमारी तोफा रशियास पुरविण्याचें स्नेहभावानें कबूल केले असल्यामुळे अवजड साहित्यातहि उन्हाळ्याच्या प्रारभीं रशियाची न्यूनता दिसणार नाहीं. शिवाय उन्हाळयाच्या प्रारभीं आपली सरहद्द सोडून पोलंडमध्ये आता जर्मनी व्हिश्चुलाचे आसपास उभा रहाणार असल्यामुळे आगगाडीच्या जाळ्याच्या सहाय्यानें जी चपलता नोव्हेंबर डिसेंबरात जर्मनीस साधली ती चपलता उन्हाळ्याच्या प्रारभी स्थानभेदानें मिळणार नाहीं. स्वतःच्या सरहद्दीजवळ जर्मन सैन्य पवनचपल वारू होय, पण व्हिश्चुलेच्या काठीं मद्द रेडा होय! उन्हाळ्यात रशिया अंगावर चाल करून आला असता हा मद्द रेडा मागच्या पायानें आस्ते आस्ते मागें सरकेल व सरहद्दीजवळ येण्याबरोबर आगगाडीच्या जाळ्याचा फायदा घेऊन मद्द रेडयाचे रूप टाकून चलाख तट्टू होऊन जर्मनीस फसवील असे म्हणावे तर तेंहि शक्य नाहीं. कारण या युक्तीनें रशियन हत्ती एकदा फसला, तेव्हा ग्रॅंड ड्यूक निकोलस हे उन्हाळ्याच्या प्रारभीं व्हिश्चुलाच्या काठच्या जर्मन रेडयास अशारीतीनें गाठतील कीं, हत्तीच्या सोंडेनें रेडयाचे मागचे पाय धरून त्याला उलथापालथा करून हत्तीच्या मोहऱ्यात दाताखालीं त्याचीं हाडें चुरडून नतरच रशियन सेना जर्मन सरहद्द पाहील. उन्हाळा येऊन रशियन हत्तीची सर्व व्यवस्था यथास्थित लागेपर्यंत दोन दिवस जर्मनीची मृत्यूची

चिठ्ठी मागे परतली आहे. ह्या अनर्थीन फारशी माणसे खर्च न करता वार्सोच्या बाजूला मोठया तोफांच्या माऱ्याच्या जोरावर जर्मनी पुढे सरकण्याचा प्रयत्न करील व इव्हनगोरोडपासून प्रिसमिसलपर्यंत सैन्याच्या हालचालीची लढाई सुरू ठेवील. पोलडमध्ये जानेवारीत होणाऱ्या या युद्धाचे महत्त्व डिसेंबरातील युद्धाइतकेच किंबहुना त्याहून काकणभर जास्त असल्यामुळे वाचकानी या रणभूमीकडे जानेवारी-मध्ये लक्ष ठेवावे असे सुचवून तुर्कांकडे आपण वळू.

## तुर्की युद्ध

नोव्हेंबर महिन्याच्या अखेरीस ऑस्ट्रियाने सर्व्हियाचे बेलग्रेड शहर घेतलें होते, व सर्व्हियाची दुय्यम राजधानी जे नीश शहर ते घेऊन बेलग्रेड-नीश मार्गानें कॉन्स्टांटिनोपलशी संलग्न होण्याचा प्रयत्न ऑस्ट्रिया डिसेंबरात करील असा त्यावेळी अंदाज होता, पण डिसेंबरात सर्व्हियाने ऑस्ट्रियाचा पराभव करून बेलग्रेड शहर पुन्हा हस्तगत केले. जानेवारी प्रारंभाला ऑस्ट्रियानें स्वतःच्या सरहद्दीन बेलग्रेड शहरावर तोफांचे गोळे टाकण्यास पुन्हा सुरुवात केली आहे; म्हणजे महायुद्धाच्या प्रारंभी पहिल्या दिवशी जी परिस्थिति होती तीच स्थिति १९१५ सालच्या पहिल्या दिवशी कायम आहे असे म्हणण्यास हरकत नाही. चिमुकल्या सर्व्हिया देशास रशिया, रुमानिया, ग्रीस, इंग्लंड वगैरे देशातून स्वयं-सेवकाच्या रूपाने व इतर रूपाने जरी एकसारखी मदत मिळत असली तरी गेले पाच महिने स्वतःच्या हिंमतीवर लढाईमध्ये शौर्य, दृढनिश्चय आदिकरून जे गुण त्यानी दाखविले त्याची बरोबरी बेल्जमशिवाय इतर कोणत्याहि राष्ट्रात या महायुद्धात दिसत नाही. नगाऱ्याचेपुढे टिमकीचे काय या न्यायानें बेल्जम आणि सर्व्हिया यांच्या कर्तबगारीकडे लोकाचे दुर्लक्ष होणे साहजिक आहे, पण महा-युद्धाचा कोणत्याहि तर्फेने शेवट झाला, तरी बेल्जम व सर्व्हिया यांची वाहवा जाणते इतिहासकार केल्यावाचून राहणार नाहीत. हंगेरियात शिरून सर्व्हियाशीं संलग्न होणे हा रशियाचा मुख्य डाव महायुद्धात आहे, आणि जर्मन सेनापति फॉन हिन्डेनबर्ग यानी कितीहि चलाखी दाखविली तरी कार्पेथियन पर्वताला मिठी मारून किंवा वळसा देऊन हंगेरियात उतरण्याचा रशियाचा उद्योग यत्किंचितहि ढिला झालेला नाही. पोलंडात व्हिश्चुला नदीच्या काठची वार्सो व इव्हनगोरोड ही दोन मुख्य ठाणी जर जर्मनीला लवकर काबीज करता आली, तर

कार्पेथियन पर्वताची मिठी थोडीशी ढिली पडण्याचा संभव आहे. उत्तरेस क्रॅकोच्या बाजूनें कार्पेथियन पर्वताला वळसा देणे काही दिवस लांबणीवर पडले तर दक्षिणेस रुमानियाच्या उत्तर सरहद्दीने हंगेरियात घुसण्याचा प्रयत्न रशियाने जानेवारीच्या आरंभाला सुरू केला आहे. अशा स्थितीत बेलग्रेड–नीश हा आगगाडीचा फाटा ताब्यात घेण्याचा दीर्घ उद्योग ऑस्ट्रियाकडून जानेवारींत नेटाने होईल असा रंग दिसत नाही. तुर्कस्थानच्या कान्स्टान्टिनोपलचा संबंध नीश–बेलग्रेड ह्या आगगाडीने ऑस्ट्रिया–जर्मनीशी जोडला गेल्याशिवाय तुर्की युद्धास मोठेसे नावरूप प्राप्त होणे शक्य नाही. सुवेझ कालव्याच्या पूर्वेस असलेल्या निर्जल व निर्जन सिनाई प्रांताच्या पलीकडे तुर्की सैन्याची जमवाजमव चालूच आहे. पण इजिप्तवर चाल करण्याइतके सामर्थ्य या सैन्यात अद्याप आलेले दिसत नाही. सिनाईचा निर्जल व निर्जन प्रांत तुर्कांना अडथळा करीत आहे. सिनाई प्रांत तुर्कांनाहि ओलांडता येत नाही व इंग्रजांनाहि ओलांडता येत नाही. सुवेझच्या कालव्यावर जय्यत तयारीने इंग्रज तुर्कांची वाट पहात बसले आहेत, व या इजिप्त प्रांताचाहि त्यांनी आता पूर्ण बंदोबस्त केलेला आहे. इजिप्तचे खेदीव लढाई सुरू होण्याच्यापूर्वी कान्स्टांटिनोपल येथे होते, व लढाई सुरू झाल्यावर इजिप्तला परत न येता जर्मन लोकांना उघडरीतीने मदत करण्यास त्यांनी सुरवात केली. इजिप्तच्या खेदीवाचे हे बंडाळीचे वर्तन पाहून इंग्रज सरकारने त्यास खेदीवाच्या गादीवरून पदच्युत करून, इजिप्तवरील तुर्कस्थानची कागदोपत्रीची साम्राज्यसत्ता विलयास नेऊन, त्याठिकाणी इंग्लंडची संरक्षक सत्ता स्थापून खेदीवाच्या गादीवर बडखोर खेदीवाचे चुलते हुसेनसाहेब यांना सुलतान या पदवीसह स्थापन केले. सुलतान हुसेन हे इजिप्तात लोकप्रिय असून इजिप्तची ही राज्यक्रांति इजिप्तला अखेरीस श्रेयस्कर होईल असे इजिप्तच्या प्रधानमंडळाकडून संतुष्ट मनानें जाहीर करण्यात आले आहे. पूर्वीचे खेदीव पदच्युत झाल्यानें ते अधिक संतप्त होऊन तुर्की लोकांना इजिप्तवर स्वारी अधिक त्वेषानें करण्याच्या भरीस घालतील असा अंदाज आहे. पण सुवेझच्या बाजूने इंग्रजांचें उलट भय तुर्कांस नसल्यामुळें रशियानें तुर्कांवर केलेल्या कॉकेशिस पर्वताच्या प्रांतातील स्वारीकडे तुर्कांना प्रथम लक्ष पोहोचविणें भाग पडेल. डिसेंबरात तुर्की युद्धाचें केंद्रस्थान काळा समुद्र व कास्पियन समुद्र यांच्या मधील कॉकेशस प्रांत होता, व जानेवारी महिन्यातहि ह्याच प्रांत केंद्रस्थान

होऊन बसेल असें लक्षण दिसत आहे. कॉकेशस पर्वताच्या दक्षिणेला व्हान सरोवराचे मुलुखांत तुर्कस्थान, इराण व रशिया याच्या सरहद्दी एकमेकास मिळतात. इराण व तुर्कस्थान याना एकमेकापासून दूर करणे जरूर असल्यामुळे तुर्की युद्धास प्रारंभ होण्याबरोबर कॉकेशस प्रातातून रशियाने एकदम तुर्कस्थानावर स्वारी केली व त्या बाजूचे मुख्य ठाणे जे अर्झरूम शहर त्याच्या उत्तरेच्या टेकडीपर्यंत रशियन सैन्य नोव्हेंबर महिन्यात दाखल झाले, इतकेच नव्हे तर व्हान सरोवराच्या पूर्वेकडील मुलूखहि रशियन सैन्याने व्यापून टाकला. हा जोराचा हल्ला असाच पुढे चालून तुर्कांचा आर्मेनियन प्रात ओलाडून आर्मेनियन प्राताच्या दक्षिणेकडून जाणारी बगदाद रेल्वे घेऊन पलेस्टाईन प्राताचे उत्तर तोंड गाठणें हा रशियाचा रोख होता. या रोखाने जर रशियाचे पाऊल पुढे पडत चाललें असते तर इजिप्तवर केवढाहि जरी जोर तुर्कस्थानने केला असता तरी त्याची पिछाडी सकटग्रस्त झाल्यामुळे देठात कुजलेल्या फळाप्रमाणें गळूनच पडला असता. रशियाचे हे लष्करी धोरण ध्यानात येऊन सुवेझ कॅनालपेक्षा कॉकेशसकडे तुर्कस्थानने डिसेंबर महिन्यात अधिक लक्ष पोंहोचविले. पाच सहा आर्मीकोअर म्हणजे अडीच लाख नवे सैन्य तुर्कांनी अर्झरूमच्या बाजूला नोव्हेंबर अखेरीस गोळा केले. खुद्द एन्व्हरपाशा त्या सैन्याचे सेनापति झाले. डिसेंबर प्रारंभाला अर्झरूमच्या उत्तरेस व व्हान सरोवराच्या मुलुखात रशियन सैन्यावर हल्ला चढविण्यास त्यांनी प्रारंभ केला. तुर्की सेना संख्येने फार मोठी असल्याने रशियन सेना स्वतःचे नुकसान न होऊ देता व्यवस्थिपणे डिसेंबरच्या पहिल्या पधरवड्यात मागे सरू लागली. रशियन सेना काही ठिकाणी चाळीस पन्नास मैल तर काही ठिकाणी शेसवाशे मैल तुर्कस्थानात शिरली होती. ती स्वतःच्या मुलुखात परत जाऊन अर्झरूमच्या उत्तरेस रशियन मुलुखात वीस पचवीस मैलावर असलेल्या सराई कामिस गावी व व्हान सरोवराच्या उत्तर सरहद्दीपलीकडे रशियन मुलुखात असलेल्या अदाहान गावाजवळ डिसेंबर अखेरीस व जानेवारीच्या प्रारंभी तुबळ युद्ध झाले. या प्रदेशात बर्फ एकसारखे पडत असल्यामुळे व कॉकेशस पर्वत बर्फमय झालेला असल्यामुळे रशियन सैन्याला कॉकेशस पर्वताच्या पलिकडून जलदीनें कुमक येऊन पोचत नाही. यामुळे डिसेंबरात तुर्कांना थोडेसे फावले. तथापि, सराई कामिसच्या लढाईत आठदहा दिवसाच्या निकराच्या हातघाईनतर

रशियानें तुर्कांच्या एक आर्मी कोअरचा म्हणजे चाळीस हजार सैन्याचा फडशा उडविला. अर्थात या बाजूनें रशियाचे पाऊल जानेवारीत पुढे पडू लागेल असा अदाज आहे. अदाहानचे गाव आपण काबीज केले असे तुर्कांचे म्हणणे आहे. पण काळ्या समुद्रामध्ये तुर्की आरमारानें रशियन आरमारावर जय मिळविला या बातमीप्रमाणे अदाहन काबीज केल्याची बातमी निराधार आहे असे रशियाचेतर्फे प्रसिद्ध झाले आहे. तुर्कांचे डिसेंबरात थोडे फावल्यामुळे तुर्कांनी लढाईची आग इराणलाहि लावण्याचा प्रयत्न आरंभिला आहे. इराणी सरकारने त्या युद्धात पूर्ण तटस्थवृत्ति स्वीकारली असून तुर्कांच्या चाळ्यानी आपल्या धोरणापासून इराण यत्किंचत्‌हि चळणार नाही अशी सर्वांस खात्री वाटत आहे. इराणी सरकार अचल आहे असे आढळून आल्यावर सरहद्दीवरील इराणी कूर्ड लोकाना तुर्कांनी चेतविले व साप्रत इराणी कूर्ड तुर्कांना मिळाले असून या इराणी कूर्ड सैन्याने व तुर्की सैन्यानें इराण सरकारची तुर्की सरहद्दीवरील जकातीची नाकी ताब्यात घेऊन तेथील इराणी अधिकाऱ्याना कैदेत टाकले आहे. या बडाळीच्या कृत्याबद्दल इराण सरकारनें तुर्की सरकारकडे जोराचा निषेधाचा खलिता पाठविला आहे. या इराणी प्रकरणामुळे कॉकेशस बाजूच्या युद्धालाहि एक तऱ्हेचें नवीन महत्त्व प्राप्त झाल्यामुळे जानेवारी महिन्यात एन्व्हरपाशाच्या बाकी राहिलेल्या चार पाच आर्मीकोअरांचा दीड दोन लाख सैन्याचा बीमोड करण्याचा उद्योग रशियाकडून झाल्यावाचून राहणार नाहीं, हे उघड आहे.

---

# महायुद्धाचा जानेवारी–फेब्रुवारी महिना

## भंडावून सोडण्याचा प्रयत्न

युरोपखंडात वसंतकालास सुरुवात झाल्यानंतर म्हणजे मार्च महिन्याच्या दुसऱ्या पंधरवड्यापासून इंग्लंड व रशिया यांचे नवें अवाढव्य सैन्य रणभूमीवर उतरावयाचें आहे. हे उतरल्यानंतर पूर्वेकडून व पश्चिमेकडून दोन्हीबाजूने जर्मनीला स्वतःच्या हद्दीत रेटून दाती तृण धरून शरण आणावयास भाग पाडण्याचा प्रचंड उद्योग करण्यात येईल. त्यानंतर इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी व रशिया या सर्वांच्याच लष्करी धोरणात महदंतर दिसून येईल. या नव्या सैनिकांशी टक्कर देण्याचें सामर्थ्य स्वतःच्या अंगात यावे म्हणून जर्मनीने जानेवारी महिन्यात आपल्या लष्करी धोरणात व सैन्याच्या हालचालीत बरेच फेरफार केलेले आहेत. रशियानेहि नव्या महत्त्वाच्या हालचाली वसंतकालापूर्वीच मोठ्या जोराने सुरू केल्या आहेत. वसंतकालचे हें संकट इंग्लंडच्या दृढनिश्चयाने द्रव्यसहाय्याने व दहा लाखाच्या नवीन सैन्यानें आपणावर येऊन पडत आहे असे जर्मनीस कळून चुकले असल्यामुळे इंग्लंडला उलट भंडावून सोडण्याचा उद्योग जर्मनीने सुरू केला आहे. भंडावून सोडण्याची हीं नवी नवीं सोंगे जसजशी रणभूमीवर येत आहेत तसतसें इंग्लंडचें धैर्य अधिकच वाढत आहे हें पाहून जर्मनी चिडून जाऊन हातपाय अधिक जोरानें आपटूं लागला आहे व या चिडलेल्या स्थितीत कार्य व अकार्य, धर्म व अधर्म, युद्ध व खून यामधील भेदग्रहण करण्याची माणुसकी जर्मनींत नष्ट होत चालली आहे. गेल्या सहामाहीत जर्मनीचा व्यापार इंग्रजी आरमारानें नाहींसा केला आहे. इटली, हॉलंड व अमेरिका यांच्या जहाजानीं परदेशाचा माल इटालीच्या किंवा हॉलंडच्या किनाऱ्यावर उतरविल्यानंतर हॉलंड व इटली यांच्या सरहद्दीपासून खुष्कीच्या मार्गानें तेथील व्यापारी जेवढी देवघेव जर्मनीशी करतील तेवढीच काय ती आता शिल्लक आहे. या देवघेवीवरहि इंग्लंडचा आरमारी पाश अप्रत्यक्षरीतीनें पाडण्यास चुकत नसल्यामुळे जर्मनीचें फारच नुकसान झाले आहे. यासंबधानें इटालीच्या व्यापारात आपण ढवळाढवळ करणार नाही असे इंग्लंडनें जाहीर केलें आहे. कारण इटली जर्मनीशीं जरी व्यापार करीत असला तरी युद्धास प्रोत्साहन मिळेल अशातऱ्हेचें स्वरूप ह्या

व्यापारास इटाली देणार नाहीं अशी इंग्लंडास खात्री वाटत आहे. शिवाय निष्कारण ढवळाढवळ करून इटलीस असंतुष्ट केल्याने महायुद्धाच्या प्रवाहावर अवचित भलताच परिणाम होण्याचा संभव असल्यामुळे इटालीच्या व्यापारी ओघालाहि भलतेंच वळण कोणीहि देऊं इच्छित नाही. हॉलंड, स्वीडन वगैरे देशांची गोष्ट तशी नाही. हॉलंडातील लोकांचा ओढा साहजिकरीत्या जर्मनीकडे आहे. हॉलंडातून जर्मन सैन्याच्या हालचाली हरहमेश होतात. हॉलंडच्या व्यापाऱ्यांची पूर्ण मदत जर्मनीला; आणि धाकट्या माशाच्या नशिबी मोठ्या माशाच्या पोटांत पचलें जाणे जर विधात्याने कायमचें लिहिले असले तर छोट्या डच लोकांनी मोठ्या डच लोकांच्या पोटात म्हणजे जर्मनीच्या पोटांत शिरणे हेंच यथायोग्य होय, अशी हॉलंडातील लोकांची समजूत. या कारणामुळे हॉलंडच्या व्यापारावर दक्षतेने नजर ठेवणे इंग्लंडला भाग आहे. हॉलंडची नैसर्गिक मैत्री आहे त्याप्रमाणे स्वीडनचें रशियाशी स्वाभाविक वैर आहे. म्हणून स्वीडनच्या व्यापारावरहि इंग्लंडच्या आरमारानें बारीक नजर ठेवलेली आहे. हॉलंड व स्वीडन या दोन्ही देशांनी आपल्या लष्करी सामर्थ्याची जुळवाजुळव केली असून प्रसंग पडल्यास महायुद्धांत सामील होण्यास आपण कमी करणार नाही असे जाहीर केले आहे. यावरून असे सिद्ध होते की इंग्लंडच्या आरमाराचा विळखा जर्मनीच्या व्यापाराच्या गळ्याभोंवती रोजच्या रोज घट्ट आवळला जात असून जर्मनीची गुदमरल्यासारखी स्थिति झाली आहे. नाकातोंडाने जर व्यापारी श्वास जाण्याचें बंद झाले तर नरडी-सभोंवारच्या हॉलंडास भोके पाडून आपला श्वासोच्छ्वास सुरू ठेवणे जर्मनीस भाग पडेल अशी चिन्हें दिसत आहेत. गुदमरून गेल्यामुळे जर्मनीत तांब्याचा पत्रा तिप्पट चौपट महाग झाला आहे, व तांब्याच्या पत्र्याच्या अभावी तोफांचे मोठमोठे गोळे करण्यास हरकत येत आहे. अन्नसामुग्रीहि वर्षानुवर्ष आपणास पुरेल की नाही या विषयींहि चिंता जर्मनीत उत्पन्न झाली असून गव्हाची रोटी कोणी व किती खावी याविषयी कडक नियम जर्मन सरकारने अमलांत आणले आहेत. इंग्लंडांतहि गव्हाचे भाव दिढीदुपटीनें वाढले आहेत ही गोष्ट खरी. पण सर्व जगाशी इंग्लंडचा व्यवहार पूर्वीप्रमाणें चालू असल्यामुळे अल्पकाळाने हे भाव खालीं येतील निदान उपासमार इंग्लंडांत कोणाची होणें शक्य नाही अशी इंग्रजी साम्राज्याची ख्याती आहे. वर्ष दीड वर्ष पुरेल इतकी अन्नसामग्री जर्मनीत आहे; पण त्यापुढें जर्मनीची

उपासमार होईल. कित्येक वर्षे लढाई चालली तरी इग्लंडची उपासमार कधींहि व्हावयाची नाही. प्रसगाप्रसंगानें अन्नाचे भाव मात्र चढत जातील, पण त्यास इलाज नाही. जर्मनीत उपासमार होऊन जीव गुदमरून जाईल, इग्लडात फार झाले तर मोठी महागाई होईल. स्वतःचा जीव गुदमरत असताना इग्लडातील महागाई तीव्र करण्याचा उद्योग जर्मनीने साप्रत सुरू केला आहे. महायुद्धाचे प्रारभी एम्डेनसारख्या क्रुझरानी इग्रजी व्यापारास अडथळा करण्याचा उद्योग केला. पण इग्रजी आरमारानें या चाच्यानाहि कठस्नान घातले. इग्लडच्या आरमाराचे महत्त्व कमी करण्याच्या हेतूने जर्मनीने डिसेंबर महिन्यात इग्रजी किनाऱ्यावर चोरटा हल्ला केला. या हल्ल्यात जर्मनीस थोडेसे यश आले. पण या हल्ल्यात फारसा तथ्याश नाही असे जानेवारीत सिद्ध झाले. कारण जानेवारीत तसला हल्ला करण्याचा उद्योग ज्यावेळीं जर्मनीनें आरभिला त्यावेळी इग्रजी आरमाराची दक्षता व शक्ति जर्मन क्रुझराच्या अनुभवास येऊन उत्तम क्रूझर समुद्रास अर्पण करून स्वतःच्या आरमाराचा कमकुवतपणा सिद्ध करून घेऊन जर्मनीस माघार खावी लागली. या दिशेने युद्ध सपेपर्यंत जर्मनी फारशी चळवळ करील असे आता दिसत नाही. झेपेलिन विमानाची स्वारीहि जानेवारीत इग्लडावर झाली, व काही बायकामुले मारलीहि. पण असल्या हल्ल्याने शत्रूचा तेजोभग न होता जगात आपले हसे अधिक होतें असे जर्मनीस दिसून आले. इग्लडातील तटबदीवर, तोफखान्यावर किंवा हत्याराच्या कारखान्यावर बॉब टाकण्याचे सामर्थ्य जर्मन विमानात दिसून आले नाही. कारण, इग्लडातील असल्या सर्व महत्त्वाच्या जागा आकाशाकडे तोंड केलेल्या तोफानी सुरक्षित केलेल्या आहेत. या तोफाचे गोळे सहा हजार फूटपर्यंत वर जातात. सहा हजार फुटाहूनहि अधिक उचीवरून आमचीं झेपेलिन विमाने बॉब टाकू शकतात अशी जर्मनी प्रौढी मिरवीत आहे. पण ही प्रौढी अद्याप शब्दातच आहे, कृतीत दिसून आली नाही. झेपलीनची प्रतिष्ठा प्रस्थापित होत नाही असें पाहून फेब्रुवारीच्या प्रारभापासून इग्रजी व्यापारास जर्मनीनें पाणबुडया बोटीकडून चावे घेण्यास सुरुवात केली आहे. जर्मनीनें नव्या तऱ्हेच्या पाणबुडया बोटी तयार केल्या आहेत. ह्या बोटी समुद्रावर दर तासास पधरा मैल व पाण्याखाली बुडून दर तासास दहा मैल या वेगानें चालतात. आपलें बदर सोडल्यापासून अडीच हजार मैलाचा प्रवास करण्याची शक्ति म्हणजे इग्लडच्या सर्व प्रदेशास प्रदक्षणा घालून पुन्हां जर्मनीच्या बदरांत येऊन

पोचण्याची शक्ति या बोटीच्या अंगी आहे. इंग्रजी आरमार पाहील अशी भीति असली म्हणजे समुद्राच्या तळाशी दिवसा बुडून रहावयाचे व रात्री वर येऊन अंधारात गुपचूपपणे प्रवास करून इंग्रजी आरमाराच्या टेहेळणीच्या टापूबाहेर जावयाचे व तेथे निराश्रित व्यापारी जहाजावर टार्पेडो सोडून त्याना बुडवावयाचें, असा या पाणबुड्या बोटीचा क्रम आहे. अडीच हजार मैलाचा प्रवास करण्याइतकी व वरील क्रमानें चौदा पधरा दिवस समुद्रात कंठण्याइतकी सामग्री या पाणबुड्या वामनमूर्तींच्यापाशी असते या वामनमूर्तींनी इंग्लडच्या पूर्व किनाऱ्यावर इंग्रजाची एक दोन ' ड्रेड नॉट ' क्रूझरे गेल्या तीन महिन्यात बुडविली. इंग्रजी आरमाराच्या महापुरापुढे जर्मन आरमाराच्या क्रूझराचे मोठमोठे वृक्ष मुळासकट उपटून पडले खरे, पण या वामनमूर्ति बोटीच्या अंगी लव्हाळ्याप्रमाणे अदृश्य स्थळी समुद्राच्या तळास चिकटून रहाण्याची शक्ति असल्यामुळे महापुरातहि या लव्हाळ्याना थोडीशी कामगिरी करून दाखविता आली. जर्मन किनारा सोडून या वामनबटूना दूरवर जाता येणें इतक्या दिवस शक्य नसल्यामुळे एकदोन महिन्यानी एखादे इंग्रजी क्रूझर बुडवावे हेच काय ते ह्याना इतके दिवस करता आले. पण या चिमुकल्याचें रांगणें व फरफटणे पचवीस हजार मैल लांबीचे, याचे जेवण एक पधरवडा पुरणारे व बुडी मारण्याच्या वेळचा दम इतक्या अवधीत टिकणारा, अशी नवी योजना झाल्या-मुळे या पाणबुड्यावाल्यानी फेब्रुवारीचे प्रारंभी मँचेस्टर व लिव्हरपूल या बाजूनें म्हणजे इंग्लडच्या पश्चिम किनाऱ्याजवळ व फ्रान्सच्या पश्चिम किनाऱ्याजवळ पाच सहा व्यापारी बोटी बुडविल्या. द्वाड कार्टी दगड मारू लागली म्हणजे तावदानाची भिंगे आहेत की लाकडी फळ्या आहेत या सबधाचा भेदाभेद ज्याप्रमाणे पहात नाहींत त्याप्रमाणे एकदोन प्रसंगी तर व्यापारी जहाजावरील खलाशाना प्राण वाच-विण्यास इशाऱ्याची फुरसद या अदृश्य चाच्यानी दिली नाही. लहान मुलाना एक कानशिलात चांगली भडकावली, म्हणजे जशी ती गप्प बसतात त्याप्रमाणे पाण-बुड्या बोटीवर जर व्यापारी जहाजानें आपली नाळ जोराने आपटले तर ती बोट फटकन फुटून जाते. पाणबुड्याचा हा दुबळेपणा ध्यानात घेऊन किंवा त्याची गति दहा पधरा मैलाहून अधिक नसल्यामुळे ती रांगत असता जलदीने पाय उचलण्यास मोठ्या जहाजाना शिकवून जर्मनीच्या या नव्या सुसरींच्या जबड्यातून इंग्रजी व्यापारी हत्तींना वाचविण्याची युक्ति इंग्रजी आरमार खात्याचे प्रधान मि. चर्चिल

हे सांप्रत काढीत आहेत. अशा सुसरी जर्मनीनें इंग्लडावर सोडल्या आहेत यावरून जर्मनीचा व्यापार पुरा गुदमरला गेला आहे हे सिद्ध होत असून दाती तृण धरून जर्मनी तह करण्यास तयार होईतों आपली आरमारी पकड आपण क्षणभरहि ढिली करणार नाही असे मि. चर्चिल यानी जाहीर केले.

### तह केव्हां होईल

एकमेकास उगाळून झिजविण्याच्या घासाघासीशिवाय महत्त्वाच्या लढाया जानेवारी महिन्यात झाल्या नाहीत. तथापि डिसेंबरात जर्मन सेनापति मार्शल फॉन हिंडेनबर्ग याच्या चलाखीच्या हालचालीमुळे रशियन सैन्यास खाव्या लागणाऱ्या माघारीचा फायदा जर्मनीने घेऊन एकट्या रशियाशी तहाचे बोलणे बोलण्यास सुरुवात केली होती. महायुद्धाच्या प्रारंभी जेव्हा बेल्जममध्ये घुसून शत्रू तडाख्यानें पारिसपर्यंत आला, त्यावेळीं एकट्या फ्रान्सशी तह करण्याचा उद्योग जर्मनीने आरंभिला होता. फ्रेंच लोक फार थोर मनाचे, त्याची संस्कृति मोठी, आपले व फ्रान्सचे बिलकूल वैमनस्य नाही, फ्रान्सचा मुलख किंवा फ्रान्सची खडणी घेण्याचा आपला हेतु नाही, अशा प्रकारचा मंत्र जर्मनीने त्यावेळीं फ्रान्सच्या कानात फुंकण्यास सुरुवात केली होती. हेतु हा की, पडत्या काळी फ्रान्सने त्रिकूटीतून सुटून अलग रहाण्यास राजी व्हावे. एकाला फोडून बाकीच्याना पायाखाली तुडवावे, असा हा जर्मनीचा डाव होता. पण फ्रान्समधील मुत्सद्यानी तो तत्काळ ओळखला. इंग्लड, फ्रान्स व रशिया यानी तत्काळ असा नवा तह केला, की कोणीहि एके-कट्याने तह करू नये. डिसेंबर महिन्यातहि मार्शल फॉन हिंडेनबर्ग याच्या क्षणैक सरशीमुळे पूर्वीचाच तहाचा डाव रशियाशी खेळण्यास जर्मनीने आरंभ केला. जर्मनीच्या पक्षाच्या रशियातील वर्तमानपत्राने अशी काहूर केली की, या महायुद्धात इंग्लडपासून रशियास विशेष मदत होण्याचा संभव नाही. या काहुरीचा मथितार्थ असा होता की, जर जर्मनी रशियाशी सन्मानाने व बरोबरीच्या नात्याने तह करू इच्छित आहे, आणि फ्रान्सचा मुलूख किंवा खडणी घेण्याचे जर जर्मनीच्या मनांत नाही, तर इंग्लडच्या नादी लागून रशियाने आपल्या वीराचा नाश कां करून घ्यावा? रशियातील इंग्लडच्या वकीलसाहेबानी या काहुरीस लागलेच उत्तर दिले; व इंग्लडचें आरमार व त्याची नवी सेना यानी महायुद्धात कोणती कामगिरी बजावली, याचे उत्तम चित्र त्यानी रशियन लोकापुढे रेखाटले. फ्रान्सचे मुत्सद्दी

जनेवारी महिन्यात मुद्दाम म्हणून लॉर्ड किचनेर याची नवी सेना पहाण्यासाठीं इंग्लंडात गेले होते. या सेनेची वीरवृत्तीची सुरत पाहून ते फार खूष झाले, व अखेरपर्यंत लढून जर्मनीचा नक्षा उतरविण्याच्या इंग्लंडच्या दृढनिश्चयास फ्रान्सच्या मुत्सद्दी मंडळानें दुजोरा दिला. त्याचवेळी रशियन सरकारने जाहीर केले की, स्वतःच्या प्रतिज्ञेशी व स्वतःच्या स्नेह्यांशी रशिया कधीहि बेइमानपणे वागणार नाही. एकट्या फ्रान्सला किंवा एकट्या रशियाला फोडण्याचा जसा जर्मनीचा प्रयत्न जानेवारींत चालू होता, त्याप्रमाणे एकट्या ऑस्ट्रियाशी तह करण्यास रशिया व फ्रान्स हे पहात होते. महायुद्धात ऑस्ट्रियाने बराच मार खाल्ला आहे, व ऑस्ट्रियन प्रजेचेहि विशेष हाल होत आहेत. एकट्या आस्ट्रियाशी किंवा ऑस्ट्रिया जर्मनीशी मिळून कोणत्या अटीवर तह करण्यात येईल, हे ऑस्ट्रियास कळविण्यात आले, व लगेच ऑस्ट्रियाच्या मुख्य प्रधानानें जर्मन बादशहा कैसर विल्यम याची भेट घेतली. या भेटीचा निर्णय तेवढा प्रसिद्ध झाला आहे. त्यावरून तहाच्या अटीविषयी थोडेसे अनुमान काढण्यास संधि मिळत आहे. कुस्ती बरोबरीची झाली, अशा धर्तीचा तह करण्यास इंग्लंड, फ्रान्स व रशिया याची हरकत नाही. जर्मनीला विरुद्ध अशी अट एवढीच की, आरमारी शक्ति वाढविण्याचे जर्मनीनें तहानंतर बंद केले पाहिजे. समुद्रावरची इंग्रजाची सत्ता निरंतर कबूल करावी अशा अर्थाचे हे कलम असून जर्मनीच्या सर्व किनाऱ्यावर त्यामुळे इंग्रजाचे वर्चस्व प्रस्थापित होईल, असा शेरा मारून जर्मनीने या तहाच्या अटी नाकबूल केल्या. आरमारी महत्त्वाकांक्षा ऑस्ट्रियाची नसल्यामुळे त्याला या अटी कबूल कराव्याशा वाटल्या, पण जर्मनीची रग जिरली नसल्यामुळें तीस चाळीस लाख नवे सैन्य वसंतकाळाच्या आंत उभारतो, आणि पूर्व-पश्चिम दक्षिण चोहोंकडे वसंतापूर्वी व वसंताच्या वेळी धुमाकूळ उडवून देतो, अशी जर्मनीने ऑस्ट्रियापाशीं उत्साहजनक प्रतिज्ञा केली! अर्थात तहासंबंधाचे बोलणें ऑस्ट्रियानें सोडून दिले. जर्मनीच्या पाणबुड्या बोटींनी इंग्रजाचीं काही व्यापारी जहाजे बुडविल्यानंतरहि मि. चर्चिल यांनी असे ठासून जाहीर केले आहे की, तह करा, करा, म्हणून जर्मनी आपण होऊन मागे लागेतो. इंग्लंडचे आरमार जर्मनीचा गळा दाबण्यास कधीच कमी करणार नाही. इंग्लंडचा दृढनिश्चय हा अशा प्रकारचा आहे! फ्रान्सचा दरबार इंग्लंडास पूर्ण मदत करीत आहे. बरोबरीच्या नात्यानें तह झाल्यास हरकत नाही, अशी अस्पष्ट लाट रशियावर

जरी उसळली असली तरी दोस्तास सोडून देण्याइतके कोणचेंच कारण रशियाच्या दृष्टीनेंहि उत्पन्न झालेले नाही. दरबाराच्या दृष्टीनें जर विचार केला, तर कोणीतरी कोणास तरी खरपूस चोपल्याशिवाय दरबारी लोक तह करण्यास तयार होणार नाहीत हे उघड दिसते. वसतकाळात आम्ही एकमेकाना चोपू, असे या दरबाराना वाटत आहे. अर्थात वसतकाळाच्या म्हणजे मार्च एप्रिल महिन्यातील लढायाचा शेवट लागेतोपर्यंत कोणताच दरबार तहाच्या वाटाघाटीविषयी सन्मुखच होणार नाही. लढाईला सहा महिने होऊन गेले. कोणी कोणालाच बेदम मारले नाही. आणि या सहा महिन्याचा अनुभव जर पाहिला, तर येत्या वसतातच कोणी कोणाला मारील, असा काहीना रग दिसत नाही. किचनेर याची दहा लाख फौज रणभूमीवर जरी उतरली, फ्रेंच सरकारचे शिल्लक सैन्य जरी युद्धात सामील झालें व रशियाचे लाखों वीर जरी सरहद्दीवर जमा झाले, तरी जर्मनी व ऑस्ट्रिया यांचे चाळीस पन्नास लाख सैन्य वसत काळातच गोळा व्हावयाचे असल्यामुळे रणभूमीचे साप्रतचे स्वरूप विशेषसे पालटेल असे काहीना वाटत नाही. मेट्सच्या सरोवराच्या आरगोन प्राताचा नकाशा व फ्रान्सची सरहद्द याच्या नकाशाकडे पहाताच फ्रान्स-मधून जर्मनीत घुसावयाचे म्हणजे कसला डोंगराळ मुलुख ओलाडून जावा लागेल, हे वाचकाच्या लक्षात येईल. पावलोपावली टेकडी आहे, व टेकडीला किल्ल्याचे स्वरूप देण्यात आलेले आहे. जर्मनी हल्ली जितका उगाळला गेला आहे व घासला गेला आहे, त्याहून अधिक घासला जाऊन उपासमारीमुळे ज्यावेळी खरोखर दमात उखडेल त्यावेळी मात्र फ्रान्स व इग्लड याना जर्मनीत घुसता येईल. ही दमात उखडण्याची स्थिति येत्या वसतकाळच्या वेळची नसून महायुद्धाच्या तिसऱ्या किंवा चौथ्या सहामाहीच्या अखेरची आहे. दुसऱ्या सहा माहीच्या अखेरचा विचार करताना उपासमारीचा व दमात उखडण्याचा प्रसग हिशेबात घेण्याचे कारण नाही. वसतकाळच्या लढाया निकराच्या न होता नुसत्या रेटारेटीच्याच जर झाल्या तर तिसऱ्या किंवा चौथ्या सहामाहीच्या अखेरीशिवाय तहाविषयी बोलणे चालणे सुरू होणार नाही. दरबारी लोकाच्याबद्दलचा हा प्रश्न झाला. युद्धात गुतलेला सर्व देशातील सामान्य जनसमूह दरबारी लोकाच्या तत्राने या पहिल्या सहामाहीत पूर्ण-पणे वागला आहे. दुसऱ्या सहामाहीतहि हा जनसमूह तसाच दरबारच्या कह्यात राहील, याविषयी शका नाही. पण तिसऱ्या व चौथ्या सहामाहीत या जनसमूहाची

वृत्ति कितपत अढळ राहील हे मात्र आज सांगता येत नाही. तह करा, तह करा, असे म्हणणारा एक पक्ष जर्मनीत उत्पन्न झाला आहे. रशियात, ऑस्ट्रियात व फ्रान्समध्ये तहाविषयी उत्सुकता आहे. जनसमूहाची वृत्ति पराभवाने गारठून जाते, जयाने उल्हसित होते, व सामान्य हालअपेष्टानी कटाकूल जाते, या गोष्टी खऱ्या आहेत. जय मिळविण्याचा खटाटोप किंवा जय मिळविला असे भासविण्याचा खटाटोप दरबारी याच करिता करीत असतात. पराजय टाळण्याचा किंवा दुसऱ्या एखाद्या जयाने पराजय दिपवून टाकण्याचा विशेष उद्योग याचकरता दरबारकडून होत असतो, व प्रजेच्या खाण्यापिण्याचे हाल होणार नाहीत अशी खबरदारी दरबारकडून याच कारणाकरिता घेण्यात येत असते. या सर्व गोष्टीचा विचार करून तिसऱ्या किंवा चौथ्या सहामाहीच्या अखेरपर्यंत दरबारी लोक लढाईचे प्रकरण लाबवत नेतील हेहिं खरे, पण मनुष्यस्वभावाचा असा आणखी एक भाग शिल्लक आहे की, जेथे दरबारी लोकाचे दक्षतेचे किंवा कर्तबगारीचे काही चालत नाही. मुत्सद्दीपणा, वीरवृत्ति व दूरदर्शीपणा या सर्वाना एका बाजूला ठेऊन मनुष्य-स्वभावाचा हा भाग वर डोके करू शकतो. किंबहुना वीरवृत्ति किंवा मुत्सद्दीपणा याचा अतिरेक होऊन या सद्गुणाना दुर्गुणाचे रूप येऊ नये, म्हणूनच मनुष्य-स्वभावाच्या या भागास परमेश्वर भरते आणतो, असे म्हणण्यास हरकत नाही. नाताळच्या सणाचे वेळी रणभूमीवर मनुष्यस्वभावाचा हा भाग मूर्तिमत दृष्टीस पडला. नाताळचे सणात खिस्ति सैन्यानीं एकमेकाशी लढू नये अशी सूचना पोप साहेबानी केली. पण निरनिराळ्या दरबारात यासबधाने एकवाक्यता न झाल्याने सणापुरते लढाई बद करण्याचे दरबाराकडून नाकारण्यात आले. पण जी गोष्ट दरबारने केली नाही, ती सैनिकानीं व्यक्तिशः केली. फ्रान्समध्ये हाके दीड हाकेच्या अतरावर दोन्हीपक्षाचे चर आहेत. नाताळच्या सणाच्या दिवशी चरातून ओरडून सणाचे वेळी लढावयाचे नाही असे एकमेकानी एकमेकास कळविले. तहाची हाक एकमेकाची एकमेकास पोचल्यानतर दोन जर्मन चराच्या बाहेर आले व दोन फ्रेंच चराच्या बाहेर गेले, आणि एकमेकास भेटून एकमेकाची विडी काडी घेऊन यानीं खाजगी रीतीने ठरविले की, सणाच्या वेळी गोळीबार करावयाचा नाही. दरबारच्या व सेनानायकाच्या हुकमाना एका बाजूला ठेवणारा हा खाजगीपणा कोठचा ? सणाच्या वेळची गोष्ट तर राहू द्याच, पण इतरवेळीहि

आतां आम्ही जेवतो आहों, आता आम्ही कॉफी पितों आहों, असे म्हणून तास अर्ध्या तास पुरती लढाई बंद ठेवण्याची एक पद्धत अलिकडे चराच्या चक्रव्यूहात पडलेली आहे. नाताळचे सणात फ्रेंचाचे एक कंपनीला समजलें की, आपल्या समोर असलेल्या चरातील जर्मन कंपनीचा कप्तान जर्मनीतील एक राजपुत्र आहे. हा राजपुत्र आदल्या दिवसाच्याच लढाईत मोठ्या शौर्यानें लढला होता. त्या शौर्याबद्दल नाताळच्या सणात आम्ही बॅंड वाजवून, गीत गाऊन त्याचा सन्मान करणार आहोंत असे एका कागदावर लिहून तो कागद दगडा सभोंवती बांधून तो दगड जर्मन चरात जोरानें फेंकून दिला. फ्रेंच कंपनीचे कप्तान, संगितपटु होते, त्यांनी राजपुत्राच्या थोरवीचें गीत तयार केले. कंपनीच्या बॅंडकडून ते बसविले व नाताळच्या दिवशी लढवय्याच्या ऐवजी संगीत ताफा जर्मन राजपुत्रापुढे उभा राहिला! बंदूक एका बाजला ठेऊन फ्रेंच कप्तानानें ब्यांड मास्तरची छडी घेतली व काडतुसाची पेटी खाली ठेऊन फ्रेंचाच्या हातानी सनया उचलल्या. लगेच जर्मन लोकहि चरातून बाहेर पडले. जर्मन राजपुत्र मोकळ्या हातानी बाहेर पडून फ्रेंचाच्या बॅंडची सलामी घेत होता, व जर्मन सेनाहि फ्रेंचाप्रमाणे गीत वाजवीत होते! जे वीर बारा तासापूर्वी एकमेकावर गोळ्या घालून एकमेकाचे प्राण घेण्यात शिकस्त दाखवीत होते, तेंच वीर संगीत ताफ्यात समील होऊन सेनानायकाचा हुकूम नसताना, दरबारचा हुकूम नसताना, लढाई बंद पडली नाही हे पक्के माहीत असताना, एकमेकाशेजारी आनंदानें कसे नाचू गाऊ लागले? मनुष्याचा स्वभाव असा आहे की, कोणत्याहि गोष्टीची हौस त्याला नियमित काळपर्यंतच असते, व तो काळ लोटल्यानंतर आपोआपच त्याला त्या गोष्टीचा वीट येऊ लागतो. साखर गोड म्हणून पाहिजे तितकी कोणीहि खाऊ शकत नाही. गोड पदार्थाचीहि मिठी बसावयाचीच, त्याचप्रमाणें कितीहि वीरश्रीनें वीर नटलेले असले, तरी चार सहा महिने गेले, म्हणजे आवडत्या वीर वृत्तीचाहि कटाळा नकळत यावयाचा. तीन वर्षांचे युद्ध, पांच वर्षांचे युद्ध, सात वर्षांचे युद्ध, बारा वर्षांचे युद्ध, असली युद्धे इतिहासप्रसिद्ध आहेतच; पण चार चारशे पांच पांचशे मैलाच्या पट्टीवर अहोरात्र एकमेकासमोर चरात बसून कित्येक महिने गोळीबार करावयास लागणारे युद्ध सांप्रतहून दुसरे इतिहासात नाही! नेपोलियनच्या युद्धात सुद्धा शत्रूशी गांठ पडल्यानंतर शत्रूशी लढत रहाण्याचा भाग फार थोडा वेळ पर्यंत टिकणारा होता. इंग्लंड पंधरा वर्षे नेपोलियनशी लढत होते खरे, पण या

पधरा वर्षांत वर्ष सहा महिनेच काय ते प्रत्यक्ष युद्धाचे, व बाकीचे दिवस घरीं बसून तयारी करण्याचे किंवा या देशातून त्या देशात मसलती करीत फिरण्याचे. रोमन सेनापति ग्यारिबाल्डि याचे असे मत आहे की, कोणाचाहि सैनिक एकसारखे सहा महिने लढत राहिला म्हणजे लढण्याची शिसारीच आपोआप त्याला येते. काही काळ त्याला घरी पाठवून त्याच्या मनाचा वीट इतर व्यासगाने धुऊन जाईतो रणभूमीवर त्याचा चागला उपयोग कधीहि होत नाही. मराठयाचा इतिहास वाचला म्हणजे हाच मनुष्यस्वभाव दृष्टीस पडतो. फ्रान्समध्ये किंवा रशियामध्ये हल्ली लष्करी कायद्याबर-हुकूम ज्याप्रमाणे प्रत्येक गावाला आपले तरुण युद्धाला पाठवावे लागतात, त्याच-प्रमाणे महाराष्ट्रातहि पेशवाईतील पथकाच्या वाटणीप्रमाणे गावकऱ्याना लढाईला जावे लागे. पण या गावकऱ्याची एक अट नेहमी पाळली जात असे. ही गावकऱ्यान्ची सेना पावसाळा सुरू झाला की, घरी परत यावयाची. हैदरवरील एका मोहिमेत हैदरचा पराभव केला असताहि पराभवाचे फळ माधवराव साहेबाच्या पदरात पडले नाही. कारण येवढेच की, पावसाळा आला म्हणून गावकरी याचे सैन्य मागे परतले. " मेघालोके भवति सुखिनोऽप्यन्यथा–वृत्ति चेता । कठाश्लेषप्रणयिनि जने किं पुन-र्दुरसस्थे " अशा प्रकारच्या रगेल वृत्तीला बळी पडून वीर पुरुष रणभूमि सोडून घरी येतात, असे जरी नसले तरी वीर वृत्तीलाहि सीमा असून वर्ष सहा महिन्यात त्या वृत्तीतील गोडीची मिठी बसते, व त्या वृत्तीशिवाय इतर गोष्टी आपोआप मनाला आठवू लागतात. घरदार आठवते, बागबगीचा दिसू लागतो, शेतवाडीवर नजर जाते, बायकामुलाचे आवाज ऐकू येऊ लागतात, घरातील कामकाजातील कल्पना मनात घोळू लागतात, व पूर्वी उपभोगिलेली सुखे पुनः हृदय व्यापून टाकतात. वीर वृत्तीचा कटाळा आला हे ओळखण्याचीं लक्षणे अशा प्रकारची आहेत. असा कटाळा जर आला नसता, तर फ्रेंच कप्तानाला सगीतहि सुचलें नसते, आणि जर्मन राजपुत्राला सलामीही आठवली नसती. वसतकाळच्या वेळच्या लढयात जर रणभूमीवरच निर्णय झाला नाही, तर महायुद्धाच्या तिसऱ्या सहामाहीत वीरवृतीचा हा नैसर्गिक कटाळा मुत्सद्याना व दरबार याना आपला अहकार व ताठा एका बाजूस ठेवावयास बऱ्याच अशी भाग पाडील, हें उघड आहे.

## फ्रान्सांतील चक्रव्यूहाचा भंग

वसतकाल जोरावर आल्यानतर महायुद्धाचा सोक्षमोक्ष करून घेण्याची तयारी

दोन्ही पक्षानी जारीनें सुरू केली असल्यामुळे फ्रान्समध्ये जानेवारी महिन्यात व फेब्रुवारीच्या प्रारभी चक्रव्यूहाचा भग योग्य अशा कोणत्या ठिकाणीं करता येईल, हे ठरविण्याकरिता जागा चाचपडून पहाण्यातच गेला. नोव्हेंबर अखेरपासून जवळ जवळ अडीच महिने कुरतडण्याचे काम फ्रेंच सेनापति जनरल जाफ्रे हे करीत आहेत, व मार्च अखेरपर्यंत हे काम असेच चालून मार्च अखेरीस किंवा एप्रिल महिन्यात जर्मनाचा चक्रव्यूह फोडण्यात येईल, आणि मे महिन्यात जर्मनीस जर्मनीत हाकलून देऊन महायुद्धाच्या दुसऱ्या सहामाहीच्या अखेरीस इग्रज व फ्रेंच जर्मनीच्या खास मुलखात शिरतील फ्रान्स व इग्लड या दोन देशातील युद्धाची तयारी वरील धोरणानेच चाललेली आहे. मार्च अखेरीस इग्लड व फ्रान्स आपल्या व्यूहाचा चक्काचूर करणार हे जर्मनी ओळखून आहे, व गदेच्या प्रहाराचा प्रतिकार करण्याची तयारी जर्मनीने चालविली आहे. दहा दहा पाच पाच लाख सैन्याची गदा ज्या जागी आपल्या अगावर आपटेल त्या जागी स्वतःचे दोन चार लाख लोक आणून ठेवण्याची ताकद अंगी यावी म्हणून एकदर पन्नास लाख नवे सैन्य जर्मनी व ऑस्ट्रिया या दोन देशात उभारले जात आहे. या पन्नास लाखापैकीं मार्चअखेर पधरा लाख फ्रान्सचे बाजूला यावयाचे असून जानेवारीच्या दुसऱ्या आठवड्यापासूनच यापैकी काही भाग फ्रान्समध्ये येऊन पोचू लागला आहे. नोव्हेंबर दहा बारा तारखेला जर्मनीने आपले सैन्य फ्रान्स बेल्जममधून काढून रशियन हद्दीकडे पाठविण्यास सुरुवात केली. नतर दोन महिन्यानी म्हणजे जानेवारी दहा बारा तारखेच्या सुमाराला जर्मन लोक पुन्हा फ्रान्सकडे वळले. या दोन महिन्यात जनरल जॉफ्रे याचे कुरतडण्याचे काम अव्याहत चाललेलें होतें. पूर्वेच्या सरहद्दीवर कुरतडत कुरतडत फ्रेंच सैन्य मुल्हहुसेनच्या दिशेने स्टिनबॅक-पर्यंत पोचले. स्टिनबॅक हे एक लहानसे जरी खेडे आहे तरी मुल्हहुसेनच्या रस्त्यावर लष्करी दृष्टीने त्या खेड्याची जागा महत्त्वाची असल्याने स्टिनबॅक येथे जोराची लढाई झाली. या लढाईत फ्रेंचाना यश मिळून मुल्हहुसेनकडे सरकण्याचा त्यांचा मार्ग खुला झाला. चक्रव्यूहाचे मध्यावर आईन नदीच्या उत्तरेसहि याप्रमाणें कुरतडत कुरतडत फ्रेंच सैन्याचे रोज एक एक पाऊल पुढे पडत चालले. चक्रव्यूह आईन नदी सोडून सोमनदीजवळ ज्या ठिकाणी येतो, त्या ठिकाणीं चक्रव्यूहाची राग उत्तरवाहिनी होते हे वाचकाच्या लक्षात असेलच. आईन नदीवर जर एकेक

पाऊल पुढे पडत चालले तर ज्या रस्त्यानी व आगगाडीच्या फाट्यानीं वायव्य प्रातातील जर्मन चक्रव्यूह पोसला जातो ते रस्ते व ते फाटे आपोआप फ्रेंचाच्या ताब्यात जाऊन आईन नदीपासून यिप्रेसपर्यंतचा चक्रव्यूहाचा डोलारा पायापासून निसटून आपोआपच डळमळल्याशिवाय रहाणार नाही. फ्रेंचाचें हे कुरतडणे म्हणजे आळसाचे लोळणे नसून लोळत लोळत जिने चढून माडीवर पोचण्याचा हा साधाभोळा क्रम आहे हे जर्मनीच्या तेव्हाच लक्षात आले, व जानेवारीच्या दुसऱ्या आठवड्यात या लोळण्याला आळा घालण्याचा त्यानी उद्योग आरभिला. स्टिनबॅक येथे जर्मन सेनेस कुमक पाठविण्यात आली, व फ्रेंचाचे पाऊल पुढे पडण्याचे बद झाले. मेट्ज व आर्गोन या प्रातात जर्मनीची नवी चळवळ सुरू झाली, व आईन नदीच्या साईसन्सच्या उत्तरेस फ्रेंचावर जर्मनीने निकराचा हल्ला केला. याठिकाणी जोराची लढाई होऊन आईन नदीचा उत्तर किनारा सोडून दक्षिण किनाऱ्यावर येऊन बसणे फ्रेंचाना भाग पडले. आईन नदीचा असा बदोबस्त केल्यावर लिले व आरास या दिशेने फ्रेंचाची फळी फोड-ण्याचा उद्योग जर्मनीने जानेवारीअखेर जोराचा चालविला. लाब्रासि–वेथ्यूज याठिकाणी जर्मनीने आणखी एक हल्ला करून एकदोन मैल लाबीचे चर ताब्यात घेऊन आत घुसण्याचा प्रयत्न केला. पण इग्रजाना व फ्रेंचाना कुमक योग्यवेळी येऊन पोचल्यामुळे फार नुकसानी करून घेऊन आत घुसविलेले सैन्य जर्मनीला परत माघारे ध्यावे लागले. यिप्रेस–न्यूपोर्ट येथेहि तोफखान्याचे हल्ले जर्मनीने जोराने सुरू केले आहेत. डिसेबरात फ्रेंच हल्ले चढवीत होते व जर्मनी जागा धरून होता. जानेवारीमध्ये फ्रेंच व जर्मन या दोघानी हल्ले चढविले. फ्रेंचानी जर्मनाचा काही भाग घेतला. मिळून फिटासफिट होऊन लढाईचा वेताळ पूर्वस्थळी कायम राहिला. मार्चमध्ये जी जगी गदा अगावर येऊन पडणार आहे ती चुकविण्याकरिता नाक्याच्या जागा ताब्यात घेण्याचा जर्मनीचा उद्योग फेब्रुवारीत सुरू झाला आहे. कॅले जर जर्मनीला गाठता आले तर ही गदा बऱ्याच अशानें जर्मनीस चुकविता येईल. लष्करी धोरणाच्या दृष्टीने विचार केला असता आक्टोबर नोव्हेंबरची चढाई इतक्या जोराची नाही तरी बऱ्याच नेटानें कॅले घेण्याचे यत्न फेब्रुवारी मार्चमध्ये करण्यात येतील असा रग दिसतो. फ्रान्सच्या बाजूला लढाईस पुन्हा तेज जर्मनीकडून उत्पन्न करण्यात येत आहे यातील धोरण असे आहे की, लॉर्ड किचनेर

याच्या दहा लाख सैन्याच्या गदेचा टोला मार्च अखेरीस एकदम व एका जागीं मारता येऊ नये इतक्या तातडीनें इंग्लंडला आगाऊ भडावून सोडावयाचें. कॅलेवर जर हल्ला झाला तर तो परतविणें किंवा त्यासंबंधानें सर्व इंग्रजी साम्राज्याला निर्धास्त राखणें हे लॉर्ड किचनेर याचें कर्तव्य आहे. कॅलेच्या दृष्टीनें फेब्रुवारींत जे जर्मनीचे हल्ले होतील, त्या हल्ल्यामुळे चाळीस पन्नास हजाराचे ल्हान ल्हान-अपक्व सैन्यच-जर घाईघाईनें रणभूमीवर पाठविणें लॉर्ड किचनेर याना भाग पडले, तर मार्च एप्रिलातील दहा लाखाच्या गदेचा टोला आपोआपच हलका केल्यासारखे होणार आहे. फ्रान्समधील चक्रव्यूहाच्या लढाईला सांप्रत असें स्वरूप प्राप्त झाले आहे की, जो पक्ष एकावेळीच एका जागी पांच दहा लाखाचा गोळा आणू शकेल, तो चक्रव्यूह फोडू शकेल व तोच अखेरीस विजयी होईल. हें सामर्थ्य इंग्रजी साम्राज्याचे अंगी आहे. पण ते प्रकट होण्यास अजून थोडासा अवकाश आहे. इंग्रजांची हडी शिजत आहेत. जानेवारी फेब्रुवारींतील उद्योग ही हडीं कच्ची उतरविण्यास इंग्लंडला भाग पाडण्याकडे आहे. लॉर्ड किचनेर यांनीं इंग्लंडांत मोठी भट्टी लावली आहे, व नव्या सृष्टीतील नवी कणखर भांडी बाहेर काढू इच्छिणाऱ्या या धोरणी सृष्टिकर्त्या लष्करी कुंभकर्णाचा आवा कच्चा रणांगणावर आणण्याचा जर्मनीचा हेतु आहे. दुसरा हेतु असा दिसतो की, फेब्रुवारीच्या आरंभालाच इजिप्त व सर्व्हिया या दोन रणक्षेत्रांतहि लढायास प्रारंभ झालेला आहे, तेव्हा इंग्लंडच्या विस्तृत साम्राज्यातून येणारी मदत त्या रणक्षेत्रांत न पोंचता कॅलेच्या रणक्षेत्राकडेच आकर्षण करून घेतली जावी. फेब्रुवारींत कॅलेचे रणक्षेत्र जर्मनी पेटवून ठेवणार. अर्थात् इंग्लंडचे बरेच सामर्थ्य या रणक्षेत्रात खर्ची घालण्यास लॉर्ड किचनेर याना जर्मनी भाग पाडणार. जर नवे सामर्थ्य खर्ची घातले नाही तर कॅले घेण्यासाठी इतक्या जोराचे हल्ले आरासपासून यिप्रेसपर्यंत फेब्रुवारींत होतील असा अंदाज आहे. जानेवारींत व फेब्रुवारीच्या प्रारंभी पाऊस व चिखल यानी फ्रेंच सैन्याला अतिशय त्रास दिला. फेब्रुवारीच्या अखेरीस ही वादळी स्थिति शिल्लक रहाणे शक्य नाही. मार्च अखेरीस लॉर्ड किचनेर याची दहा लाखाची गदा तयार व्हावयाची आहे. फ्रेंच सैन्याची तयारी आजच पुरी झालेली आहे. तेव्हा हिंवाळी पाऊस संपून शेतातील चिखल नाहीसा होण्याबरोबर आईन नदीच्या उत्तरेस व पूर्व सरहद्दीवर फ्रेंचाची जोराची चढाई सुरू होईल हे उघड आहे. फेब्रुवारी व मार्च प्रारंभाला

फ्रेंचाची लढाई रगांत येईल व मार्च अखेरीस किंवा एप्रिल महिन्यांत लॉर्ड किचनेर यांची गदा जर्मनीच्या डोक्यावर आदळून मध्यतरी चक्रव्यूह फुटेल. कॅले घेण्याचा अट्टाहास करून ही गदा चुकविण्याचा डाव जर्मनीकडून खेळण्यात येईल.

## पोलडांतील धडपड

डिसेंबर–जानेवारी महिन्याप्रमाणे जानेवारी–फेब्रुवारी महिन्यातहि महायुद्धाच्या माराहाणीचे वसतिस्थान पोलड देशच होता. जर्मन सेनापति फॉन हिंडेनबर्ग याच्या चपलतेच्या हालचालीमुळे क्रॅकोचे ग्रहण सुटले, इव्हनगोरोडच्या अर्ध्या रस्त्यावर जर्मनीने तळ दिला, व वॉर्सा शहरच्या पश्चिमेस तीस मैलावर जर्मन तोफखाना येऊन धडकला, या गोष्टी खऱ्या, पण रशियाच्या लष्कराचा मोड झाला नाही. जानेवारीच्या तीनहि टापूत जर्मन व रशियन सैन्य चर खणून आपापली जागा मजबूत करून स्वस्थ बसले. फ्रान्स–बेल्जममधील चराचा चक्रव्यूह पोलडातहि दृष्टीस पडला. नोव्हेंबर–डिसेंबरात केलेल्या चलाखीच्या हालचाली शिखरास पोचून लष्करी धोरणाचे काम तडीस न्यावयाचे असल्यास जर्मनानी वार्सा–इव्हनगोरोड ही दोन्ही शहरे ताब्यात घेऊन उत्तर वाहिनी व्हिश्चुला नदी आपली सरहद्द करून या टापूच्या दक्षिणेस असलेल्या प्रिजमिसल किल्ल्याचा रशियाचा वेढा उठवून कार्पेथियन पर्वताकडून प्रिजमिसलकडे जाण्याची वाट म्हणजे यूझाक घाट हा स्वतःच्या कबजात घेतला पाहिजे येवढा टापू ताब्यात घेऊन तेथे चराचा चक्रव्यूह निर्माण केल्याशिवाय रशियाच्या प्रचड सेनेपासून जर्मनी व ऑस्ट्रिया या देशाचे सरक्षण होणे शक्य नाही. वसतकाली ज्या मोठ्या लढाया व्हावयाच्या आहेत त्यावेळी इग्रजाशी व फ्रेंचाशी लढण्याकरिता जर जर्मनीत ताकद उत्पन्न व्हावयाची असेल तर वार्सा इव्हनगोरोड–प्रिजमिसल–यूझाक हा पट्टा जर्मनीच्या चक्रव्यूहाने व्यापला गेला पाहिजे. ‘ महायुद्ध कधी सपेल ’ ह्मणून लॉर्ड किचनेर याना प्रश्न विचारला गेला असताना ‘ केव्हा सपेल हे मला सागता येत नाही, पण, एप्रिल–मे महिन्यात महायुद्धास सुरुवात होईल ’ असे लॉर्ड किचनेर यानी उत्तर दिल्याचें प्रसिद्ध झाले आहे. एप्रिल–मे महिन्यात एकदर तीस लाख सैन्य इग्रजाचे तयार व्हावयाचे आहे, व त्याच्या कचाट्यातून जर्मनीस सुटावयाचें असेल तर जर्मनीनें रशियासबधानें स्वतःस प्रथम निर्धास्त केलें पाहिजे. उलटपक्षी या तीस लाखाना जर्मनीत घुसावयास मिळावें म्हणून क्रॅकोच्या मार्गानें त्याच सुमारास जर्मनीवर चढाई करण्याची रशियाची

कडेकोट तयारी पाहिजे. एप्रिल–मेमधील या लष्करी धोरणाच्या दृष्टीनें जानेवारी–फेब्रुवारी महिन्यात पोलंडमध्ये रशियाच्या व जर्मन सैन्याच्या हालचाली सुरू आहेत. क्रॅकोच्या पूर्वेस पन्नास मैलावर प्रिजमिसल व टार्नो या दोन किल्ल्याच्या टापूत ह्मणजे डुक्ला व युझाक या दोन घाटाच्या उत्तरेस रशियाने पुन्हा प्रचंड सेना गोळा केली आहे. या सेनेनें, ऑस्ट्रियाच्या सेनेने ताब्यात घेतलेले टारनो किल्ला व डुक्ला घाट ही ताब्यात घेतली आहेत, आणि टारनोच्या पश्चिमेस क्रॅकोच्या दिशेने कुरतडण्याचे काम रशियाचे चालू असून डुक्ला घाटाने दक्षिणेस हंगेरींत उतरून तेथे स्वैर संचार करण्यास संधि मिळते की काय याची टेहळणी सांप्रत रशिया करीत आहे. क्रॅकोवर पूर्वीप्रमाणे पुन्हा विघ्न येऊ नये म्हणून डुक्ला घाट पुन्हा ताब्यात घेण्याचा उद्योग ऑस्ट्रिया–जर्मनीने आरंभिला असून रशियाच्या मुख्य सेनेच्या तोंडास तोंड न देता पिछाडीच्या मर्मस्थानी अवचित सेना आणून तेथे लढाई देऊन मुख्य सेनेस पिकलेल्या फळाप्रमाणे गळून पाडावयाचे या फॉन हिंडेनबर्ग याच्या युक्तिप्रमाणे युझाक घाट व डेस्को घाट या दोन घाटांनी प्रिजमिसल व लॅंबर्ग या टापूत उतरून प्रिजमिसलचा वेढा उठविण्याचा उद्योग ऑस्ट्रिया–जर्मनी करीत आहे. युझाक व डेस्को या दोन्ही घाटावरून मोठी जर्मन सेना जानेवारीच्या अखेरीस उतरली असून फेब्रुवारीच्या पहिल्या आठवड्यात प्रिजमिसलच्या दक्षिणेस तुम्बळ युद्ध सुरू झाले आहे. फेब्रुवारीअखेर मार्च प्रारंभापर्यंत हे युद्ध सुरू राहून वसंतकाळापूर्वी त्या बाजूचा सोक्षमोक्ष करून घेण्याचा उद्देश ऑस्ट्रिया–हंगारीचा दिसतो. प्रिजमिसलच्या किल्ल्याला आज तीन महिने रशियानें सक्तीचा वेढा दिला असून अद्याप तो किल्ला रशियाच्या ताब्यात गेला नाही. इतक्या दिवस व इतक्या नेटानें किल्ला लढल्याचे महायुद्धात प्रिजमिसलचेंच पहिले उदाहरण आहे, आणि प्रिजमिसलचा वेढा जर वसंतकाळापूर्वी ऑस्ट्रियास उठवता आला तर महायुद्धातील ऑस्ट्रियाची अब्रु प्रिजमिसलच्या किल्लेदारानें राखिली असे सर्व इतिहासकार म्हणतील. प्रिजमिसलच्या किल्ल्यासभोवारच्या रशियाच्या सेनेंत कमकुवतपणा उत्पन्न होण्याकरिता इव्हनगोरोड, पिलिका नदी व नीडा नदी या टापूवर जर्मनीचे हल्ले सुरू आहेत. दक्षिण पोलंडातील व्हिश्चुला नदी जर जर्मनीच्या ताब्यात गेली तर प्रिजमिसलला उजवेकडूनहि कुमक पोचविता येणें शक्य आहे. रशियन सेनापति ग्रॅंड ड्यूक निकोलस याच्या ध्यानात हे धोरण येऊन त्यानी नीडा नदी व पिलिका नदी यांच्यामधील

टापूत चरांचा चक्रव्यूह निर्माण केला असून या चक्रव्यूहापलिकडे जर्मन सेने स्वस्थ बसविले आहे. जानेवारी महिन्यात जर्मनीने पोलंडमध्ये बरीच मोठी नव सेना पाठविली. या नव्या सेनेने पिलिका नदी ओलांडून इव्हनगोरोडच्या दिशे रशियाचा चक्रव्यूह फोडण्याचा प्रयत्न का केला नाही ? याचे उत्तर असे आहे क पोलंडमध्ये चक्रव्यूहाच्या सहाय्याने बंदोबस्ताने बसूनच ग्रँड ड्यूक निकोल थांबले नाहीत; त्यांनी वार्सोच्या उत्तरेस वार्सा–म्लावा या टापूत मोठी सेना जम करून व्हिश्चुलेच्या उत्तर किनाऱ्याने जर्मनीवर हल्ला करण्यास सुरवात केली.

जानेवारी महिन्याच्या अखेरीस ही नवीन मोहीम सरहद्दीवर असलेल्य जर्मनीच्या थॉर्न किल्ल्याच्या पूर्वेस पाच पचवीस मैलावर जाऊन थडकलेली आहे वार्सा, थॉर्न व म्लावा या त्रिकोणात रशियाचे मोठे सैन्य जमा झालेले असून वार्सा-म्लावा ही रेषा या सैन्याचा पाया आहे, थॉर्नकडे या सैन्याचे तोंड वळलेले आहे आणि वार्सा, म्लावा व थॉर्न या त्रिकोणातील व्हिश्चुलेच्या उत्तरेकडच्या टापूत य सैन्याचे मुख्य वजन कललेले आहे. सैन्याचे मुख्य वजन व्हिश्चुलेला धरून कलं असल्यामुळे उत्तरेकडून पूर्व प्रशियातून या सैन्यास उपाधि जर्मनीकडून पोचण्याच संभव आहे. ही उपाधि पोचू नये म्हणून रशियाने ईस्ट प्रशियावरहि एक स्वतः मोहीम जानेवारीच्या तिसऱ्या आठवड्यात सुरू केली आहे. ही स्वतंत्र मोहीम जर विशेष महत्त्वाची नसली, जर्मनीच्या केनिंग्जबर्ग किल्ल्यापर्यंत येऊन पोचण्यापलि कडे या मोहिमेच्या हातून विशेषसे कार्य सिद्धीस जाण्यासारखे जरी नसले, तरी वार्सा थॉर्न व म्लावा या त्रिकोणास उत्तरेकडन त्रास न देता येण्यासारखा व्याप य मोहिमेमुळे उत्तरेकडील जर्मन सैन्याच्या मागे लागणार आहे. जर्मन सेनापति फॉ हिंडेनबर्ग याचे मुख्य कौशल्य म्हणजे पिछाडीवर अवचित हल्ले करणे होय. जर्म सेनेच्या चलाखीच्या हालचालीची अद्दल डिसेंबर–जानेवारी महिन्यात ग्रँड ड्यूव निकोल्स यांनी पूर्ण घडलेली असल्यामुळे पूर्वीच्या चुक्या त्यांच्या हातून होणे आत शक्य नाहीं. मागचा पुढचा पूर्ण विचार करूनच ते पुढे पाय टाकीत आहेत पिछाडीचा व बगलाचा पूर्ण बंदोबस्त केल्याशिवाय रशियन मुख्य सेना पुढे चाल करून केव्हाहि जाणार नाहीं. डिसेंबर–जानेवारींत दोन चार ठिकाणी माघार घ्यावं लागली असताहि व जर्मन सेनापतींचा चोहोकडे जयजयकार चालला असताहि नव्य मोहिमांचें धोरण जर्मनीवर रशियास लादता येऊ लागले आहे; यावरून सरहद्दीव

आलेल्या रशियन सैन्याच्या मागे रशियाचे पोटात केवढ्या मोठ्या सेनासमुद्राचा विस्तार अदृश्य रीतीनें संचार करीत आहे, हे वाचकाचे ध्यानात येईल ! उत्तर पोलडात पूर्व प्रशियावर केलेली मोहीम हे केवळ उपाग असून थॉर्नवरील मोहीम हे मुख्याग आहे. या मोहिमेचा उद्देश काय ? थॉर्नचा किल्ला घेऊन जर्मनीत घुमण्याचा उद्देश या सेनेचा आहे, असे म्हणावे तर थॉर्नकडे चाल करून जाणारी रशियाची सेना मुख्य सेना नव्हे. मुख्य सेनेशिवाय जर्मनीत घुमण्याचा प्रयत्न व्यर्थ होय. थॉर्नजवळील सेनेच्या पिछाडीला आगगाडीचे अनुसधान नाही व आगगाडीच्या अनुसधानाशिवाय मुख्य सेनेची मोहीम व्यर्थ होय. मग या मोहिमेचा उद्देश काय ? थॉर्नच्या सरहद्दीकडे जर्मनीचें बरेचसे लष्कर अडवून ठेवणे व प्रसग पडल्यास सधि साधून व्हिश्चुला नदी ओलांडून वार्साजवळच्या जर्मनीच्या मुख्य सेनेच्या पिछाडीवर हल्ला करणे, हा या मोहिमेचा उद्देश आहे. सधि साधून पिछाडीवर हल्ला करता येणे शक्य आहे काय ? व्हिश्चुला नदीच्या डाव्या किनाऱ्यावर जर्मन सेना भरभक्कम असून अशा प्रकारच्या हल्ल्याला तोड देण्यास समर्थ आहे. जर्मन सेनेत पगूपणा उत्पन्न झाल्याशिवाय असला पिछाडीवरचा हल्ला फोल होणार आहे. मग असल्या हल्ल्याला रशियाला सधि तरी केव्हा मिळणार ? रशियन सेनापति ग्रँड ड्यूक निकोलस याचा अदाज असा दिसतो की, थॉर्नकडे रशियन सेना बरीच दूर गेली असे पाहून वार्सा शहर घेण्याकरिता आटोकाट उद्योग करण्याचा मोह जर्मनीला पडेल. डिसेंबर अखेरीस व जानेवारीच्या प्रारभी झुरा नदी ओलाडून वार्साकडे जाण्याचा जर्मनीने जो निकराचा प्रयत्न केला त्या प्रयत्नात जर्मनीचे दोन अडीच लाख लोक गारद झाले. थॉर्नकडे चिमटा घेऊन जर्मनीला पुन्हा उभा करावा म्हणून जानेवारी अखेरपर्यंत रशियाने थॉर्नकडे झपाट्याने चाल केली. फेब्रुवारी प्रारभाला जर्मनीने वार्सा घेण्याचा प्रयत्न पुन्हा जोराने सुरू केला आहे. वार्सा शहरापासून पश्चिमेकडे झुरा व रावाका या नद्याकडे दोन आगगाडीचे फाटे जातात, एक झुरा नदीवर सोचाक्झू येथे जातो व दुसरा फाटा रावा नदीच्या पलीकडे स्कॅर्नव्हिसकडे जातो. वार्सापासून सोचाक्झू-पर्यंत जाण्याच्या आगगाडीच्या फाट्याचे मध्यावर म्हणजे वार्सापासून सुमारें पधरा मैलावर ब्लोनी गाव असून ब्लोनीचें ठिकाण रशियाने फारच मजबूत तयार केले आहे. ब्लोनीचे ठिकाण व उत्तरेस व्हिश्चुला नदी याच्यामध्ये दलदलीची जागा

आहे; सोचाक्र्च्या उत्तरेस झुरा नदी ओलाडून दलदलीची जागा गाठून ब्लोनी-वर हल्ला चढविण्याच्या इराद्याने डिसेबरात झुरा नदीवर जर्मनीने भयकर हल्ले केले, या हल्ल्यात जर्मनीचा हेतु सफल न होऊन लाख लोक वाया गेले ! तेव्हा दक्षिणेस रावा शहर घेऊन रावा नदीच्या उजव्या बाजूस रशियन सैन्यास वळसा देऊन जानेवारी प्रारभाला जर्मनीने स्कॅर्नव्हिस व सोचाक्रू याच्यामधील बोलीमो गाव घेतले. अशारीतीने रावा नदी पूर्णपणे जर्मनीच्या ताब्यात गेली. पण सोचाक्र्च्या उत्तरेच्या झुरा नदीची जागा जर्मनीच्या ताब्यात गेली नाही. बोलीमो घेतल्यानतर पुढील ह्प्त्याची तयारी करण्यात जानेवारी महिना जर्मनीने घालविला. बोलिमोपासून ब्लोनीपर्यत पधरा सोळा मैलाचे अतर असून बोलिमोच्या वायव्येस दोन चार मैल झाडी आहे. ही झाडी घेतली असता ब्लोनीचा मार्ग आपणास खुला होईल असे वाटून, जानेवारी अखेरीस बोलीमोच्या जवळ जर्मनीने सहाशे तोफा आणल्या. सोचाक्र्च्या पश्चिमेलाहि व झुरा नदीवरहि मोठे तोफखाने आणून उभे केले, व फेब्रुवारीच्या प्रारभाला सोचाक्रू व बोलीमो येथे भयकर टक्कर सुरू झाली ! फेब्रुवारीच्या पहिल्या आठवड्यात ही टक्कर रात्रदिवस सुरू राहून कोणचाच पक्ष हार गेला नाही. सबध फेब्रुवारी महिना वार्सा घेण्याकरिता जर्मनी एकसारखी धडपड करील, असा अदाज आहे. जर्मनीच्या अधिकाधिक तोफा रोज बोलीमोकडे येऊन पोचत आहेत. ह्या प्रचड तोफखान्याला तोड देण्याची रशियाची पूर्ण तयारी झाली असून अॅटवर्पसारखे किल्ले ज्या तोफानी घेतले, त्या तोफाच्या तोडीस तोड देणारे साहित्य रशियाशीं भरपूर आहे. बोलिमोपासून ब्लोनीपर्यत फार झालें तर जर्मनी पुढे सरकेल. अशा रीतीने पुढे सरकण्यासच लाख दीड लाख लोकाची आहुती द्यावी लागेल, व ब्लोनी येथे चार पाच लक्ष बळी दिल्याशिवाय वार्सा जर्मनीच्या दृष्टीस पडणार नाही असे रशियन लष्कराचें मत आहे; इतके लोक बळी देण्यास जर्मनीपाशी मोठे सैन्य नाहीं हे उघड आहे. तथापि तोफाच्या जोरावर पुढे पाऊल टाकण्यास जर्मनी उद्युक्त झाला आहे. तोफाच्या जोरावरच जर जर्मनीला वार्सा शहर गाठता आले तर थॉर्न-पर्यंत पसरलेली रशियन सेना कमरेंत ढासळलेल्या म्हाताऱ्याप्रमाणे आपोआप लवून वार्सास पोंचलेल्या जर्मन सेनेच्या पायां पडेल ! बरें, बोलीमो व ब्लोनी येथील रशियन खडकावर जर जर्मन सैन्य डोकें आपटल्यामुळे हतवीर्य झालें, तर व्हिश्चु-लेच्या उत्तर किनाऱ्यावरील रशियन सेना जर्मन पिछाडीवर येण्यास चुकणार नाहीं.

वार्सा शहर घेऊन उत्तर पोलडातील व दक्षिण पोलडातील सेना आयती गिळकृत करण्याचा मोह जर्मनीस उत्पन्न झाला आहे, व तोफाच्या जोरावर वार्सा हस्तगत करू अशी फील्ड मार्शल फॉन हिंडेनबर्ग याना घमेंड झालेली आहे! वार्साचा आपण पक्का बदोबस्त केला आहे, जर्मन मोठ्या तोफाच्या बागुलबुवासमोर जपानी आरमारी मोठ्या तोफा आपण आणून ठेविल्या आहेत, इग्रजी आरमारावरील मोठ्या तोफा अँटवर्प येथे वेळेवर न पोचल्यामुळे जी चूक झाली ती वार्सा येथे होण्याचा सभव नाही, अशा तऱ्हेच्या निर्धास्तपणाने दक्षिण पोलडात व उत्तर पोलडात सैन्याची तयारी करून वार्सा येथे डोके आपटलेल्या जर्मन सेनेवर डाव्या व उजव्या बगलेने लाथ मारून त्याचे कबरडे वारसासमोर मोडण्याचा डाव ग्रँड ड्यूक निकोलस खेळत आहेत. फील्ड मार्शल फॉन हिंडेनबर्ग म्हणतात, जर्मन तोफा वार्सा शहर गट्ट करून दक्षिणेचें व उत्तरेचे रशियन सैन्य भाजीपाल्याप्रमाणे व चटण्या कोशिंबिरीप्रमाणे खाऊन टाकतील! ग्रँड ड्यूक निकोलस ह्मणतात, वार्साच्या खडकावर जर्मनीचे डोके फुटले, की रशियाने जर्मनीचे हातपाय कापण्यास आरभ केलाच! वार्सा सोचाक्रू व स्कॅर्नव्हीस ह्या ल्हानशा त्रिकोणात फेब्रुवारीत होणाऱ्या लढाया म्हणजे पोलडमधील आजपर्यंतच्या युद्धाचे शिखर होय! फेब्रुवारी मार्च महिन्यात या कळसाकडे नीट नजर ठेवण्याची वाचकास सूचना करून आपण आता दक्षिण कार्पेथियन पर्वताकडे वळू.

## हगेरियावरचें प्राणसंकट!

पोलडमध्ये जर्मनीच्या सैन्याचा चक्काचूर करण्याचा, निदान मोठ्या जर्मन सैन्यास अडकवून पाडण्याचा उद्योग रशियाने कसा आरभला आहे हे वाचकाच्या ध्यानात आलेच असेल. जर्मन सैन्याचा जर चक्काचूर झाला नाहीं, तर क्रॅको व सॅलिसिया ह्या बाजूने ऑस्ट्रियात व जर्मनीत घुसण्याचा मोठा उद्योग रशियाकडून होणार नाही. जर चक्काचूर झाला तर क्रॅकोच्या दिशेने पुनः रशियाची मोहीम जर्मनीवर व ऑस्ट्रियावर होईल. पोलडमध्ये जर जर्मन सेनेस अडकवूनच नुसतें ठेवता आले, तर क्रॅकोच्याहि बाजूला जर्मनीस दहशत असावी म्हणून रशियानें प्रिजमिसल-टार्नो या पट्ट्यात मोठी फौज जमा केली आहे; वार्सा व प्रिजमिसल ही दोन शहरे आपल्या कबज्यात घेतल्याशिवाय ऑस्ट्रिया-जर्मनीस लागलेलें रशियाचें ग्रहण सुटणार नाही. जानेवारीत ऑस्ट्रियाने प्रिजमिसलचा वेढा उठविण्याचा

आटोकाट यत्न केला, पण रशियाने जानेवारीचे अखेरीस डुकला घाट ताब्यात घेऊन कार्पेथियन पर्वताच्या पूर्वेस असलेला हंगेरीचा बुकोविना प्रांतहि सर्व व्यापून टाकला. बुकोविना ते प्रिजमिसलपर्यंत कार्पेथियन पर्वताच्या पूर्व उत्तरेकडे जाणारे एकंदर पांच आगगाडीचे फाटे आहेत, एक फाटा लुपकौ येथून डुकला घाटाने प्रिजमिसलकडे जातो. दुसरा फाटा आगवाट शहरावरून युझाक घाटाने प्रिजमिसलकडे जातो. तिसरा मनकाज शहरावरून स्ट्राई घाटाने लॅंबर्ककडे जातो; चवथा मारेमाखास शहरावरून जब्लोनिटस घाटाने कोलोमियाकडे जातो; पांचवा काराब्ला घाटाने बोकोवियामध्ये उतरतो. डिसेंबर जानेवारी महिन्यामध्ये हे पांचीहि घाट आपल्या ताब्यात घेऊन सर्व कार्पेथियन पर्वत हस्तगत केल्याचे श्रेय रशियाने संपादिले होते. पण हंगेरिया यास जर्मनीची मदत वेळेवर मिळाल्यावर डुकला घाट शिवाय करून बाकीच्या चारी घाटांनी हंगेरियन व जर्मन फौज हंगेरियन पर्वताच्या पूर्वेकडील भागांत उतरली आहे. फेब्रुवारीचे प्रारंभी बुकोविनामध्ये रशियन सैन्य बरेंच मागे हटलें असून प्रिजमिसल–युझाक घाटाजवळहि रशियाला थोडीशी माघार खावी लागली आहे. प्रिजमिसलचा वेढा जर हंगेरियाला उठविता आला, तर कार्पेथियन पर्वताच्या पलीकडून हंगेरियावर येणारें संकट बऱ्याच अंशी टळल्या सारखे होईल. प्रिजमिसलचा किल्ला फेब्रुवारींत घेण्याचा रशियाने जारीनें उद्योग आरंभिला असून हा किल्ला जर रशियाचे ताब्यांत गेला, तर युझाक घाट व त्याच्या खालचा ट्रीई घाट हे रशियाच्या ताब्यांत तेव्हांच जातील, व हंगेरियावर मोहीम करण्यास रशियास सुलभ होईल. वसंतकाळी सर्व कार्पेथियन पर्वत ओलांडून हंगेरियन प्रांत आक्रमून टाकण्याचा रशियन सेनेचा उद्देश आहे. पोलंडमध्यें जर्मन सेनेचा जरी चक्काचूर करतां आला नाहीं, तरी मुख्य जर्मन सेनेला आपण अडकवून पाडूं अशी रशियास खात्री वाटत आहे. वसंतकाळापासून प्रिजमिसल घेऊन क्रॅकोला शह दिल्याने अवशिष्ट राहिलेले जर्मन सैन्य क्रॅकोसभोंवार धडपडत राहील अशी रशियाची अटकळ आहे. तेव्हां वसंतकाळी बेल्जममधून इंग्रजी सैन्य व आईन नदी ओलांडून फ्रेंच सैन्य चाल करून जात असतांना कार्पेथियन पर्वत ओलांडून हंगारीची नरडी आपण धरावी अशी रशियाने तयारी चालविली आहे ! या तयारीस दुजोरा येण्याकरितां मार्च–एप्रिल महिन्यांत रुमानियासहि रशियाच्या तर्फेने महायुद्धास सामील करून घेण्याचा प्रयत्न चालू आहे, व मार्च–एप्रिलांत

रुमानिया हंगारियावर स्वारी करील, अशी रशियास खात्री वाटत आहे. जानेवारी महिन्यात रुमानियाने लढाईची बरीच तयारी केली असून इंग्लंडपासून बरेच कर्जहि घेतले आहे. फेब्रुवारी मार्च महिन्यात रुमानियाची तयारी पुरी होईल असा अंदाज आहे. रुमानिया जर लढाईंत सामील झाला तर ग्रीस देशहि सर्व्हियास मदत करण्यास चुकणार नाहीं. रुमानिया व ग्रीस हे देश लढाइंत पडल्यानंतर बल्गेरिया अलिप्त राहील असे म्हणता येत नाहीं. बल्गेरियाचा ओढा जर्मनी व टर्की यांच्या बाजूस आहे. आणि वार्सा व प्रिजमिसल येथे फेब्रुवारी महिन्यात चाललेल्या लढायांत जर रशियाची सरशी झाली तर तटस्थ वृत्ति स्वीकारून बल्गेरिया स्वस्थ बसेल असा अंदाज आहे. वार्सा व प्रिजमिसल येथे फेब्रुवारी महिन्यात चाललेल्या लढाया विशेष महत्त्वाच्या आहेत, या लढयांत जर जर्मनीची सरशी झाली, तर महायुद्धांत रशियाचा वर हात चढण्याचा संभव नाहीं असे बाल्कन राष्ट्रांस वाटून रुमानिया व ग्रीस दोघेहि महायुद्धापासून अलिप्त रहातील. पण जर का फेब्रुवारींत रशियाची सरशी झाली तर हंगेरी प्रांत रशिया व सर्व्हिया यांच्यामध्ये वाटला जाणार अशी खात्री मनाला पटून रुमानियाला लागून असलेल्या हंगेरीच्या ट्रान्सिल्व्हानिया प्रांताच्या लोभानें रुमानिया लढाईंत सामील होणारच. हंगेरियाच्या बाजूला काही प्रदेश ग्रीसला मिळणे जरी शक्य नसले तरी अखेर रशियाचा हात वर चढणार अशी खूणगाठ ग्रीसच्या मनाला पटली तर तुर्कस्थानच्या आशियामायनरमधील काहीं प्रदेशाच्या लोभानें ग्रीसहि टर्कीशीं दोन हात करण्यास कमी करणार नाहीं. महायुद्धांत अखेर जयाचा वांटा कोणच्या बाजूस वळणार हे वार्सा व प्रिजमिसल येथील लढायांच्या यशापयशावरून बाल्कन राष्ट्रे ठरविणार आहेत. वार्सा जर जर्मनीला घेता आला नाही आणि उलट क्रॅकोव्ह रशियानें पुन्हा वेढा दिला तर मार्च-एप्रिलमध्ये रुमानिया हंगरीवर तुटून पडेल, व ग्रीसची मदत घेऊन सर्व्हियाहि हंगारीवर स्वारी करण्यास उद्युक्त होईल. म्हणजे वसंतकाळीं उत्तर, पूर्व व दक्षिण दिशांनीं हंगारीवर दहापांच सैन्याच्या स्वाऱ्या होऊन हंगारीचा फडशा होईल, व हंगारीच्या विनाशानें महायुद्धाची रशियाच्या तर्फेची परिसमाप्ति होईल. जर्मनीनें नवें चाळीस लाख सैन्य उभारले आहे खरें; या सैन्याच्या बळावर इंग्लंड, फ्रान्स व पोलंडच्या बाजूनें रशिया यांना फार झालें तर जर्मनी थोपवून धरू शकेल. पण त्याचवेळीं हंगारीच्या शरीराचे तिन्ही बाजूंनीं

जे शतशः लचके तोडण्यात येतील त्याचा विचार काय ? वसतकाळात हगारीवर येणाऱ्या या प्राणसकटाचें निवारण जर्मनीचा पक्ष खालील उपायानीं करू पहात आहे:–(१) वार्सा फेब्रुवारींतच घेऊन पोलटमध्ये रशियास बेइज्जत करायचे (२) फेब्रुवारींतच प्रिजमिसल घेऊन क्रॅकोच्या टापूला कायमचे भयमुक्त करावयाचे (३) बुकोविनातून रशियास हाकून देऊन प्रसगविशेषीं रुमानियावर स्वारी करण्याचा प्रसग आलाच तर बुकोविनाच्या बाजूच्या मैदानाचा मार्ग आपणास मोकळा करून ठेवून रुमानियाच्या उत्तर बाजूच्या प्राताात ऊर्फ सेरेट नदीच्या प्राताात लढाई नेऊन टाकण्यास आपला मार्ग मोकळा ठेवावयाचा. कर्मधर्म सयोगानें जर वार्सा–प्रिजमिसल येथे जर्मनीची सरशी झाली आणि जर्मनी व ऑस्ट्रिया हे दोन प्रात रशियाच्या भीतींतून जर कायमचे मुक्त झाले तर हगारीच्या सरक्षणाच्या दृष्टीनेच नव्हे, तर कार्पेथियन पर्वताच्या पूर्वेकडून रशियावर उलट हल्ला चढवून काळा समुद्र व ओडेसा बदर गाठण्याच्या दृष्टीनें बुकोविना हा प्रात फारच महत्त्वाचा आहे. आपण क्षणभर असे समजू कीं, वारसा व प्रिजमिसल हे दोन्ही किल्ले जर्मनीनें घेतले व रशियास तेथून मागे पाय घ्यावा लागला, असे झाले तरी रशियाने तह करण्यास तयार व्हावे असे रशियाचे त्यात कोणचे मोठे नुकसान होणार आहे ? पोलड देश जरी जर्मनीच्या ताब्यात गेला तरी रशिया जर्जर होणार नाहीं ! पक्वान्नानीं भरलेल्या मोठया पानाच्या जवळ पडलेल्या थोडयाशा आहुती माजराने जरी खाल्ल्या तरी पानावर बसलेला मनुष्य जसा गागरत नाहीं, त्याप्रमाणें पोलड देश जरी जर्मनीनें खाल्ला, तरी रशिया यत्किञ्चित्‌हि डगमगणार नाहीं पाच सहा महिने रशियाची थोडीशी तारांबळ होईल इतकेच. तरी वारसा घेतल्यानतर सहा महिन्यानतर रशिया पूर्वीप्रमाणें पुनः युद्ध सुरू करील ! रशियाच्या ह्या अफाट व अतर्क्य सामर्थ्याला मर्यादित कसे करावयाचें ? जर्मनीला काहीं सवलती मिळतील अशारीतीने रशियाने तह करावा, अशी जर जर्मनीची इच्छा असली, तर जर्मनीने कोणता पराक्रम करून दाखविला पाहिजे ? वार्सा प्रिजमिसल घेऊन जर्मनी जर बुकोविनाच्या पूर्वेस चाल करून जाऊन काळा समुद्र गांठील व ओडेसा बदर घेईल, तरच रशिया सवलतीच्या तहास राजी होईल. वार्सा व प्रिजमिसल येथें जर जर्मनीला जय मिळाला तर बुकोविनाच्या आग्नेयेस दोन अडीचशे मैल चाल करून जाऊन काळा समुद्र गाठणें

जर्मनीला व ऑस्ट्रिया याच्या शक्तीच्या बाहेरचें नाहीं. अशारीतीनें वसत काळाच्या-पूर्वी किंवा वसत काळात जर काळासमुद्र जर्मनीला गाठता आला, तर तुर्कस्थानास पूर्ण मदत करण्याचा मार्गहि खुला होऊन रशियाचे काहीं तरी चागले नुकसान केल्यासारखें होणारे आहे. स्वसरक्षणाच्या दृष्टीने ह्मणा, किंवा रशियास जेरीस आणण्याचे दृष्टीने ह्मणा, बुकोविना प्रात हगेरियाने स्वतःचे ताब्यात ठेवणे जरूर आहे. ( ४ ) प्राण सकटापासून हगरियाला बचावण्याचा चौथा उपाय ह्मणजे सर्व्हियावर स्वारी करून वसत काळापूर्वी किंवा रुमानिया युद्धात सामील होण्या-पूर्वी सर्व्हियाचा पराभव करून टाकणे हा होय. या हेतूने बेलग्रेडच्या उत्तरेस असलेल्या हगारीच्या तेमेश्वर प्रातात जर्मनी व हगेरिया याचें पाच सहा लाख सैन्य गोळा झाले असून डॅन्यूब नदीला आलेला महापूर उतरल्याबरोबर आरसोवा शहराच्या बाजूने म्हणजे रुमानिया, सर्व्हिया व हगारी या तिन्ही सरहद्दी ज्या शहरा-जवळ मिळतात त्या शहराच्या बाजूने सर्व्हियावर चाल करून जाण्याचा या सैन्याचा हेतु आहे. आरसोव्हाचे दक्षिणेस दहा बारा मैल जर हे सैन्य उतरले, तर रूमानिया व सर्व्हिया ही एकमेकापासून अलग होतील; व हगेरियाला बल्गेरियन सरहद्द गाठता येऊन बल्गेरियाच्यामार्फत सामानसुमानाची मदत टर्कीकडे सहज पाठवता येईल. तेमेश्वरच्या दक्षिणेस गोळा झालेले पाच सहा लाख हगेरियन–जर्मन सैन्याने आर्सो-व्हाच्या दक्षिणेचा दहा पधरा मैलाचा पट्टा व्यापून टाकल्यानतर वार्सा व प्रिजमिसल जर जर्मनीच्या ताब्यात गेली तर सर्व्हियाचा प्रथम समाचार न घेता जर्मनी बुको-विनाकडे वळेल, व काळा समुद्र गाठण्याचा प्रयत्न करून रशियाच्या बाजूच्या युद्धास एक प्रकारची पूर्तता आणील. हगारीवरील सकट, सर्व्हियावरील मोहीम, रुमानियाचे महायुद्धास सामील होणे, बुकोविनाचे बाजूने काळ्या समुद्रापर्यंतची चाल वगैरे सर्व लष्करी धोरणाच्या गोष्टी वार्सा व प्रिजमिसल येथील लढा यावर अवलबून आहेत. त्या लढाया ज्या पक्षाच्या तर्फेच्या होतील, त्या पक्षास कार्पेथियन पर्वताचे टापूत व बाल्कन पर्वताचे टापूत अखेर यश मिळणार आहे.

## इजिप्तवर तुर्कांची मोहीम

इजिप्तवर तुर्कांची मोहीम होणार म्हणून दोन तीन महिने गाजावाजा होतां होता शेवटीं फेब्रुवारीचे पहिल्या आठवड्यात तुर्कांनी सुएझच्या कालव्यावर आपला पहिला हल्ला चढविला. कांतारा, इस्मालिया व सुएझ या तीन ठिकाणावर बारा

हजार तुर्की सैन्य चाल करून आले, व एकदोन जागी त्यानी कालव्यामध्ये ताफे व होडया टाकून कालवा उल्लंघन करण्याचा प्रयत्नहि केला! पण इंग्रजाच्या बंदोबस्तापुढे त्याचे काही न चालता दोन तीन हजार लोकाची खराबी करून घेऊन कालवा सोडून वीस मैल आत त्याना परत जावे लागले! या हल्ल्याच्या वेळीं काहीं होडया, कालव्यावर आयत्यावेळी टाकावयाचे पुलाचे सामान, सहा तोफा व एक मोठी तोफ इतके अवजड सामान तुर्कांनी बरोबर आणले होते. या पहिल्या हल्ल्याचे वेळीं कालव्याजवळ आलेले हे बारा हजार लोक तुर्की सैन्याची बिनी असून इजिप्तवर चाल करून येत असलेले एकदर सैन्य लाख दीड लाख आहे असे म्हणतात. सुएझ कालव्याच्या पूर्वेस असलेल्या शे सवाशे मैल रुदीच्या वाळवटाच्या पट्ट्यात अन्नाबरोबर पाण्याचाहि पुरवठा या येवढया मोठया सैन्यास कसा होणार? शभर सवाशे मैलापैकी पन्नास साठ मैल तुर्कांनी नवी आगगाडी केली आहे म्हणतात, व मुख्य सैन्य जसे जसे पुढे येईल, तसतशी तुर्की आगगाडीहि कालव्यापर्यंत येईल, अशी एक बातमी प्रसिद्ध झाली आहे. काहींचें म्हणणें असे आहे की, या आगगाडीचे बातमीत काहीं तथ्य नसून मुख्य लष्कर मजल दरमजल पुढे चाल करून येत असताना मोटार गाडयाना उपयोगी पडेल अशी सडक या बिनपाण्याच्या जगलात तयार करण्यात येईल, शिवाय तुर्कांच्या पाशी बिनपाण्याच्या वाळवटात सुखाने सचार करणाऱ्या तीन चार हजार उटाचाहि जमाव आहे. इजिप्तच्या लोभाने या युद्धात तुर्कस्थान पडलेलें असल्यामुळे कालवा ओलाडून कैरो शहर घेण्याकरिता ते जिवापाड मेहनत करतील, हे उघड आहे. कालव्यावर इंग्रजाचा बदोबस्त इतका मजबूत आहे की इंग्रजी बदुकाना व तोफाना हें तुर्की सैन्य बळी पडण्याकरताच येत आहे, अशी इजिप्तला खात्री वाटत आहे! डिसेंबर अखेरीस व जानेवारीच्या प्रारभाला काकेशियस प्रातात तुर्की सैन्याचा जसा पुरा पराभव झाला तसा सुएझच्या कालव्यावरहि तुर्कांचा झाल्यावाचून राहणार नाही, असे इजिप्तचें मत आहे. जानेवारीचे अखेरीस रशियन लोकानीं सर्व तुर्की सेनेला स्वतःच्या मुलुखातून बाहेर हाकललें असून तुर्कांनीं इराणात सुरू केलेल्या गडबडीचा बदोबस्त करण्याकरिता रशियन सेनेने इराणातील तैब्रीस शहर हस्तगत केलें आहे. एवच, वसतकाळाच्या सुमारास, इंग्रजांच्या व रशियाच्या विरुद्ध आपलें काहीं चालणार नाहीं, हें सर्व तुर्कस्थानला कळून चुकेल; व कॉन्स्टांटिनोपल येथें एन्व्हर

पाशाचा पक्ष निस्तेज होऊन तुर्कस्थान सर्वांच्या अगोदर तहास राजी होईल असा अदाज आहे. तुर्की डोलारा अशारीतीने कोसळू नये म्हणून सर्व्हिया काबीज करून बल्गेरियाच्या मार्फत किंवा बोकेविनातून अग्नेयेस काळ्या समुद्राचा किनारा गाठून काळ्या समुद्रामार्फत तुर्कांशी सलग्न होण्याचा उद्योग जर्मनी लवकरच करणार आहे. इराणातील गडबड, काकेशियस प्रातातील चढाई व इजिप्तवरील हल्ला या सर्व उलाढाली, जर्मनी तुर्कस्थान ही जर सलग्न झाली नाहीं तर, आपोआपच मावळून जाणाऱ्या आहेत. रशियाच्या पेचातून जर्मनी–ऑस्ट्रिया निर्धास्तपणे मुक्त होतील तेव्हा मग तुर्कस्थानशीं सलग्न होण्याच्या वार्ता! वार्सा व प्रिजमिसल हीं शहरे जर जर्मनीला फेब्रुवारी–मार्चमध्ये घेता आली नाहींत तर पाच सहा महिन्यापुरतेहि रशियाकडून येणारे प्राणसकट टळत नाहीं, हे सिद्ध आहे.

---

# महायुद्धाचा फेब्रुवारी-मार्च महिना

## अन्नाची माती करणारी चांचेगिरी

महायुद्धाचे इतिहासात फेब्रुवारी महिना बऱ्याच महत्त्वाचा गेला. तत्काळ फळ देणाऱ्या, काही दिवसानी फळ देणाऱ्या आणि वर्ष दीड वर्षांनी फळ देणाऱ्या अशा तिन्ही प्रकारच्या गोष्टी या महिन्यात घडून आल्या. जर्मन सेनापति फॉन हिंडेनबर्ग याच्या चलाखीच्या तडाख्यापैकी एक महत्त्वाची मुसंडी पूर्व प्रशियावर चाल करून जाणाऱ्या रशियन सैन्याला सोसावी लागली. त्याचा तत्काळ काही परिणाम झाला आहे व थोडया दिवसानी काही होणार आहे. फेब्रुवारीचे अखेरीस डार्डानेलिसची सामुद्रधुनी घेण्याचा उद्योग इंग्रजी आरमाराने यथाशास्त्र व यथाविधी सुरू केला. याचेहि काही तत्काळ परिणाम होणारे असून चार सहा महिन्यानंतर महायुद्धाचे समाप्तीचे वेळी त्याचे महत्त्वाचे परिणाम झाल्यावाचून रहाणार नाहीत. फेब्रुवारीच्या १८ तारखेपासून इंग्लंड देशाच्या किनाऱ्याला पोचणाऱ्या व तेथून निघणाऱ्या सर्व बोटी पाणबुडया बोटीच्या मार्फत आपण बुडवू असे जर्मनीने जाहीर करून या चांचेगिरीस नेमल्या दिवसापासून प्रारंभ केला ! व्यापारी बोटीवरील खलाशी किनाऱ्यावर सुरक्षितपणे पोचतील अशी आपणास खबरदारी घेता यावयाची नाही किंवा महायुद्धात सामील नसलेल्या अमेरिकेसारख्या राष्ट्राची ही बोट आहे किंवा कसे हेहि पहात बसण्यास आपणास सवड मिळणार नाही, असे जर्मनीने जाहीर केले आहे. जर्मनीच्या या चांचेगिरीमुळे हॉलंड व अमेरिका या दोन राष्ट्रांच्या व्यापाराचे विशेष नुकसान होण्याचा संभव आहे. या तटस्थ राष्ट्रांचे म्हणणे असे आहे की, युद्धाला लागणारे सामानसुमान जर आमच्या बोटी वहात असतील तर त्या बुडविण्याचा अधिकार जर्मनीला आहे खरा, पण युद्धात न पडणाऱ्या नागरिकांना लागणाऱ्या संसाराच्या सामान्य वस्तू आमच्या बोटी जर तिकडे नेत असतील तर त्या बुडविण्याचा अधिकार जर्मनीला खात्रीनें नाही. इंग्रजांच्या बोटी हॉलंडचे किंवा अमेरिकेचे निशाण, पळून जाण्यास मिळावे म्हणून, संकट समयी दाखवितात, आणि पाणबुडया छोटया बोटी जर ते निशाण खरें कोणाचें खोटे कोणाचें याची मीमांसा करण्यात वेळ घालवू लागल्या तर त्यांचें भक्ष त्यांचे हातून तेव्हांच

निमटून जाईल, अमेरिकेनें अशी खबरदारी घ्यावी की, त्यांच्या निशाणाचा दुरुपयोग इंग्रजी जहाज करणारच नाही, अशाप्रकारची खबरदारी जर अमेरिकेनें घेतली तरच अमेरिकेच्या निशाणाच्या बाजूला जर्मन पाणबुड्या बोटी जाणार नाहीत, असे जर्मनीचे उत्तर आहे. जर्मनीच्या या उत्तरावर इंग्लंडचें असे म्हणणे आहे की स्वसंरक्षणासाठी पाहिजे त्या देशाचे निशाण दाखविण्याचा हक्क इंग्लंडची जहाजे कधीहि सोडणार नाहीत, व्यापार बुडवण्यात त्या बाबतीतले धर्मयुद्ध म्हटलें म्हणजे शत्रूची व्यापारी बोट असली तर ती थांबवून वरील खलाशांचे जीव वाचविण्याची व्यवस्था करून पाहिजे तर ती बोट बुडवावी किंवा धरून आपल्या बंदरांत न्यावी, शत्रू शिवाय इतरांची बोट असेल तिला पकडून बंदरातच नेली पाहिजे, आणि ती करीत असलेला व्यापार युद्धास विघातक आहे असे त्यासंबंधी चौकशी करणाऱ्या न्यायाधिशापुढे सिद्ध करून नंतर ती बोट व ती मालमत्ता जप्त करावयाची. धर्मयुद्धाचे हे स्वरूप जर्मनी पाळणार कसे ? बोटी धरणे, बंदरात नेणे, न्यायाधिशापुढे त्यातील मालाची चौकशी करणे असले धर्मविधि विजयी आरमारच करू शकते ! जर्मनीचें आरमार लपून बसलेले, उघड्या समुद्रावर ते येणार कोठून, बोटी पकडणार कोठून आणि मालाची चौकशी करण्याची ब्याद करणार कसली ? सर्व खेळ पाणबुड्या बोटी मार्फत जर्मनी खेळणार. पाणबुड्या बोटीचा व्यवहारच गुप्त, याची हालचाल अदृश्य, घराचे मालकाला त्रास देणाऱ्या एखाद्या वात्रट भूताने घरात ज्याप्रमाणे वावरावे त्याप्रमाणे समुद्रात या पाणबुड्यांचा संचार ! भूत जरा दिसते न दिसते तो नाहिंसे होते, आपल्या मागचा वरवंटा उचलून त्यानें डोक्यात घातला, म्हणून आपण दोन पावले पुढे सरकावे तो लोणच्याचे गाडगे पायावर आदळलेंच ! पाघरुणाची आग विझवावी तो कागदपत्र जळून खाक, अन्नात राख, राखेत अलंकार, दागिन्यांच्या डब्यात केर ! असे खेळ नकळत करून मांत्रिकाला त्याची छाया मात्र केव्हा केव्हा दृष्टीस पडावयाची. पाणबुड्या बोटींच्या चेष्टा अशाच प्रकारच्या आहेत. धर्माधर्म त्या पाळणार कोठून ? मांत्रिकाच्या अक्षता ईशान्य कोपऱ्यावर पडताहेत तो आग्नेयेकडे गुप्तपणानें ही पाणबुडी पिशाचे निघून जाणारीं आहेत ! पिशाचाचे हातून घराचे खांब पडत नाहींत, भिंती पडत नाहींत किंवा घरावरील कौलारहि हालत नाहीं; लहानशा मर्कटाच्या मनगटात जेवढी शक्ति असते तेवढीहि शक्ति पिशाच्याच्या अंगात नसते. माणसांना जर पिशाचें पकडतां आलीं, तर चिमणीची

मुडी मुरगळण्याला जेवढी शक्ति लागते तेवढया शक्तीनें चुटकी वाजविण्यास लागणाऱ्या वेळात पिशाचांची चटणी माणसे करू शकतील ! पण, पिशाचे दिसत नाहीत आणि त्यामुळे पिशाचाना नारळ फोडून किंवा कोंबडे देऊन किंवा दहिभात जेवू घालून मनुष्याना स्वसंरक्षण करून घ्यावे लागते. जर्मन पाणबुडया म्हणतात, आम्ही पिशाचे आहोत, धर्म–अधर्म आम्हाला माहीत नाही, किंबहुना अधर्मानेंच वागण्याकरिता आमच्या योनीची योजना झाली आहे. तुम्ही येथे जेवता खाता, पूर्वजन्मी म्हणजे समुद्र किनाऱ्यावर असताना आमची उपासमार झाली, आणि त्या उपासमारीच्या यातना सोसण्याचे वेळी आम्ही हा पिशाच देह धारण केला, आमच्या समुद्र किनाऱ्यावर गव्हाची पोती व बकऱ्याचे कळप ही पोचवून जर तुम्ही जर्मनीची उपासमार कमी केली, तरच आम्ही तुमच्या अन्नात माती टाकण्याचे कमी करू. जर्मन पिचाच्याना अशाप्रकारे बलिदान देण्याचे इंग्रजी मुत्सद्यानी साफ नाकारले असून इंग्लडचे मुख्य प्रधान मि. अस्क्विथसाहेब यानीं असे जाहीर केले आहे की, जर्मन किनाऱ्याला कोणच्याहि देशाची कोणचीहि बोट आम्ही यापुढें पोहोचू देणार नाही ! इंग्रजी आरमारानेहि या चाचेगिरीचा कडेकोट बंदोबस्त आरंभला असून इंग्रजी मात्रिक हजर नाहीत अशा थोड्याशा जागा अधारामध्ये समुद्रावर शिल्लक राहिल्या आहेत. पाणबुड्या बोटींना दररोज दहा बारा बळी घ्यावयास सापडतील असा जर्मनीचा तर्क होता, पण अठरा तारखेनतरच्या आठ दहा दिवसाच्या हकीकतीवरून एखाद दुसऱ्याहून अधिक बळी जर्मन पाणबुड्याना मिळणार नाही असे म्हणण्यास प्रत्यवाय उरलेला नाही. पाच हजार इंग्रजी जहाजें व्यापाराकरिता समुद्रावर फिरत आहेत आणि रोजचे एखाद दुसरे जहाज जर्मनीनें जरी बुडविले तरी शेकडा वीस पचवीस जहाजे नष्ट होण्यास दीड दोन वर्षांचा अवधि सहज लागणार आहे. अर्थात् जर्मन चाचेगिरीचा परिणाम दीड दोन वर्षांनतर दृष्टीस पडणार आहे. महायुद्धाच्या या दुसऱ्या सहामाहीवर त्याचा प्रत्यक्ष परिणाम काहीच होणार नाही हे उघड आहे. बरें, इंग्रजानीं जर्मनीच्या किनाऱ्याशीं व्यापार कोणालाहि करू दिला नाहीं तर त्याचा तरी परिणाम केव्हा दृष्टीस पडावयाचा ? त्याचाहि परिणाम या दुसऱ्या सहामाहीत काहीच दृष्टीस पडणार नाही. इंग्लड काय, फ्रान्स काय किंवा जर्मनी काय, या तिन्ही देशात महायुद्धातल्या पहिल्या चार महिन्यात परदेशाहून नेहमींपेक्षा चौपट पांचपट अन्न–सामग्री जाऊन पोचली आहे.

अमेरिकेचे जर या चार महिन्याचे व्यापारी आंकडे पाहिलें तर असें आढळून येईल कीं, धान्यासंबंधानें दीड वर्षांचा व्यापार या चार महिन्यांतच अमेरिकेनें उरकून घेतला आहे. हॉलंडसारख्या चिमुकल्या देशाशीं तर या चार महिन्यांत अमेरिकेचा व्यापार नेहमींहून दहा बारापट अधिक झाला; लढाई युरोपांत, व अन्नाची महागाई अमेरिकेत अशी स्थिति आली ! ' देवी रानांत व नायटे गावांत ' असल्या स्थितींतला अनुभव शेतकीचा व्यवहार करणाऱ्या सर्व राष्ट्रांना आजकाल आलेला आहे. अर्थात् जर्मनी काय, फ्रान्स काय किंवा इंग्लंड काय, कोणाचाहि देश तीन किंवा चार सहामाही उलटून जाईतों अन्नान्नगत होऊन तह करण्यास राजी होणार नाही अशी अन्नसामग्रीची स्थिति त्या त्या देशात आहे. इंग्लडमध्ये व जर्मनीमध्ये जर अन्नाचे साठे अजून एवढे मोठे तर इंग्लडच्या अन्नात माती कालविण्याचा पिशाच्चाचा अधर्म जर्मनीनें आज का सुरू करावा ? ह्याला उत्तर असे आहे की, मुत्सद्याच्या दृष्टीनें हे युद्ध कदाचित् दोन वर्षांत न सपता तिसऱ्या वर्षांत, चौथ्या वर्षांत किंबहुना पांचव्याहि वर्षांत चालण्याचा संभव आहे ! मुत्सद्याची दृष्टि सामान्य लोकाच्या दृष्टीहून फार पुढे जाते, व पुढचीं संकटे टाळण्याची व्यवस्था करण्यास ते उद्युक्त होतात. तिसऱ्या चौथ्या वर्षांत जर्मनीला जी भूक लागावयाची आहे तिच्या वेदना आजच जर्मनीच्या मुत्सद्यांना होऊं लागल्या आहेत, जर्मनीचें प्रधानमंडळ पांच पचवीस महिने आगाऊच उपासमारीनें तळमळूं लागलें आहे. " बुभुक्षितः किं न करोति पापं, क्षीणा नरा निष्करुणा भवन्ति । " ह्या न्यायानें जर्मन मुत्सद्यांनीं आपल्या भुकेचा वांटा थोडासा तरी इंग्लडला द्यावा म्हणून धर्माधर्म न पहातां खलाशाच्या जीवाची पर्वा न करिता पाणबुड्या बोटींकडून व्यापारी चाच्येगिरीस सुरुवात केली आहे. रोजची एखाद दुसरी बोट बुडविण्याच्या ह्या चाचेगिरीचा चालू सहामाहीवर काही परिणाम होणें शक्य नाहीं, हें ध्यानांत धरून जमिनीवरील युद्धाकडे आपण आतां वळूं.

## आगगाडीची चाल व चरांची ढाल

इंग्लंड, फ्रान्स व रशिया या तीन देशांचें लष्करी सामर्थ्य जर्मनी व ऑस्ट्रिया या दोन देशांच्या सामर्थ्याच्या दुप्पट आहे, जर्मनी व ऑस्ट्रिया एक कोट लोक रणांगणावर उभे करू शकतात, तर रशिया, फ्रान्स व इंग्लंड हें त्रिकूट दोन कोट

लोक रणांगणावर आणू शकतात. दोन अडीच वर्षेपर्यंत लढाई चालवण्याचें द्रव्य-दृष्ट्या सामर्थ्य जर्मनी व ऑस्ट्रिया ह्यास आहे. तर दुसऱ्या बाजूस एकटे इंग्लंड पांच वर्षेपर्यंत, एकटा फ्रान्स तीन वर्षेपर्यंत तिन्ही राष्ट्रांचा लढाईचा खर्च करूं शकेल. द्रव्यबल व मनुष्यबल ह्या दोन्ही बळांची इंग्लंडच्यातर्फेची बेरीज जर्मनीच्या द्रव्यबलाचे व मनुष्यबलाचे बेरजेच्या तिप्पट आहे. असे असतांना पहिल्या सहामाहीतच जर्मनीचा नाश कसा झाला नाही? उन्हाळ्यांत किंवा उन्हाळ्यानंतर म्हणजे दुसरी सहामाही संपावयाच्या वेळेला महायुद्धास खरा रंग येईल असे उद्गार इंग्रजी मुत्सद्यांचे तोंडून कां निघावे? सातव्या आठव्या महिन्यांतहि धिंगाणा घालण्यास जर्मनीस सवड कोठून मिळाली? मनुष्यबलांत जर्मनी कमी, द्रव्यबलांत फारच कमी, मग कोणच्या बलाचे जिवावर जर्मनी आज सहा महिने तडाख्यानें लढत आहे, व पुढेहि निदान वर्ष सहा महिने टिकाव धरून बसण्याची जर्मनीत ताकद दिसत आहे? मनुष्यबलांतील व द्रव्य बलांतील कमीपणा जर्मनीनें बुद्धि-बलानें भरून काढला आहे. एखादा नवीन रंग शोधून काढणे, तो रंग व्यापाराच्या उपयोगी पडेल इतक्या स्थितींत त्याला नेऊन पोंचविणे, आणि व्यापारी चढाओढींत जगांतील इतर रंग आस्ते आस्ते नामशेष करून आपल्याच रंगाच्याच्या उद्योगधंद्याचें साम्राज्य चोंहोंकडे स्थापणे, ही व्यापारी गोष्ट ज्या बुद्धिकौशल्यानें ज्या व्यापक रचनाचातुर्यानें व दुसऱ्याच्या सुखदुःखाविषयीं पूर्ण निष्ठूर असलेल्या ज्या धिमेपणानें जर्मन लोक अमलांत आणतात, त्याच बुद्धिकौशल्यानें, त्याच रचनाचातुर्यानें, व त्याच निष्करुण वृत्तीनें जर्मनीने या महायुद्धाची तयारी केली, युद्धास आरंभ केला, व युद्धाचें धोरण मुक्रर ठरविलें! जर्मनीच्या युद्धाच्या पद्धतीचें वरील तऱ्हेचें धोरण इंग्लंडचे फडणीस लॉइड जॉर्ज यांनीं नुकतेंच केलें आहे. हे वर्णन वाचलें म्हणजे जर्मनीच्या शक्तीची गुरुकिल्ली कोठें आहे, हे चटदिशीं ध्यानांत येते. जर्मनीनें आज चाळीस वर्षे लढाईची तयारी चालविली आहे. तोफा, बंदुका, काडतुसे व गोळे यांचा साठा महायुद्धाच्या दोन तीन वर्षांला पुरेल एवढा मोठा करून ठेवला आहे. तीनतीनशें पांच पांचशे मैल लांबीचे चरांचे चक्रव्यूह निर्माण होतील, आणि काडतुसांची व गोळ्यांची आतषबाजी रोजच्या रोज ह्या चक्रव्यूहांना दाखवावी लागेल, हें स्वप्न जर्मनीला पूर्वीच पडलें होतें. तोफा, बंदुका, काडतुसे व तोफांचे गोळे यांची उणीव आज इंग्लंड, फ्रान्स व रशिया

यांना भासत आहे. लोक कमी नाहींत, बी, ए, एम. ए. झालेले इंग्लडांतील सुशिक्षितहि दहा पांच हजार पुढें आले आहेत; हातात बदुका घेऊन सामान्य शिपायांप्रमाणें चरातील हालअपेष्टेंत पडून राहाण्यास इंग्लडचा श्रीमत व विद्वान देशाभिमान तयार झाला आहे ! पण मुख्य प्रधान मि. ॲस्क्विथ म्हणतात, कीं ह्या सर्वांना शस्त्रास्त्रे कोठून पुरवावीं ? युद्धसामग्री भरपूर कोठे आहे ? महायुद्धाला अमके-तमके-स्वरूप येईल, रोजचा दारूगोळा इतका लागेल अशा तऱ्हेचे अदाज प्रमुख शहाण्यांनीं करून ठेवले होते. ह्या अदाज–पत्रकांतील अत्यंत सढळ व उधळपट्टीचा जरी आकडा घेतला, तरी तो रोजच्या दारूगोळ्याच्या खर्चाहून फारच कमी पडत आहे. इंग्लड व फ्रान्स येथील कारखाने ही उणीव भरून काढण्याकरिता रात्रदिवस खपत आहेत. जपान व अमेरिका येथील कारखान्यातहि दारूगोळयाची व इतर युद्धसामग्रीची रोज खरेदी सुरू आहे, आणि इंग्लडला पूर्ण भरवसा आहे की, वसतकाळी निदान उन्हाळयात ही उणीव भरून येईल. युद्ध सामग्रीची तयारी ज्याप्रमाणें जर्मनीने चाळीस वर्षें केली त्याप्रमाणें महायुद्धाकरतांच आज चाळीस वर्षें आगगाडयाचीहि तयारी चालविली होती. एकदा पश्चिमेस फ्रान्सच्या सरहद्दीवर, तर लगेच पूर्वेस रशियाच्या सरहद्दीवर असें आळीपाळीनें आपणास लढावे लागेल, हें जर्मनी ओळखून होता. फ्रान्स व रशिया या दोन राष्ट्रांशीं मिळून आपणास एकटयानें लढण्याचा प्रसग लवकरच येणार आहे, असें जर्मनीचा इतिहास जर्मनीस स्पष्टपणें सांगत होता. प्रसगामुळे अक्कल सुचते; व जर्मनीवरील हा प्रसग जर्मनीच्या मुत्सद्यानीं पूर्वीपासून ओळखला असल्यामुळें त्यात सांप्रतच्या महायुद्धातील अक्कल आपोआप सुचली. एकदा एकाशीं लढावें, त्याला थोपवून धरून दुसऱ्यावर चाल करून जावें, दुसरा हिंमत बांधून अगावर आला असता त्याला थोपवून धरून पुनः पहिल्याच्या पाठीस लागावें; अशा तऱ्हेची ही सांप्रतच्या महायुद्धातील जर्मनीची अक्कल आहे ! ही अक्कल सांगणें सोपें; पण त्याप्रमाणें हातानें कसे घडून आणावयाचें ? प्रथम एकवार चाल करावी हा मत्र महत्त्वाचा खरा, पण ही पहिल्यावर चाल चालू असतांना दुसरा काय थोडाच केळीं खात बसणार ? बरें दुसरा अगावर चालून आला म्हणजे पहिल्याला थोपवून धरून दुसऱ्याची तगडी ओढण्याकरितां धांवत सुटावें, हा उपदेश शब्दसृष्टींत बरोबर आहे; पण थोपवून कसे धरावयाचें ? थोडा वेळ थांब म्हटल्यानें पहिला थोडेंच

एकपार आहे ? मग एकाला थोपवून दुसऱ्याची तगडी ओढण्याकरितां धांवावयाचें कसे ? ह्या युद्धकलेमध्ये दोन महत्त्वाच्या गोष्टी आहेत. एक थोपविण्याची कला व दुसरी अंगावर चालून येणाऱ्याच्या तोंडाला बोळा देऊन मागे पिछाडीकडे किंवा बगलाकडे धावत जाण्याची कला; थोपविण्याची किंवा बोळा देण्याची कला ही चांगली अवगत असली पाहिजे, आणि पिछाडीला किंवा बगलेला धूमहि ठोकता आली पाहिजे. थोपवावयाचें कसे ? थोपविण्याची कला जर्मनीने या महायुद्धात ऐननदीवर प्रथम जगाच्या प्रत्ययास आणून दिली. एंजिनानी शेकडो मैल लांबीचे चर खणावयाचे आणि यंत्र सहाय्यानेच चरात कॉंक्रीटचे बुरूज निर्माण करून असंख्यात तोफांची मदत या चराना द्यावयाची अशी चक्रव्यूहाची कला आहे. अंगावर चालून आलेल्या शत्रूला थोपविण्याचें काम पूर्वीच्या युद्धात किल्ले करीत असत, विमाने, मोठया तोफा व बंदुका या नवीन शास्त्रीय युद्धसामग्रीमुळे पूर्वीची किल्लयाची युक्ति निष्फळ झाली आहे हे जर्मनीनें प्रथम ओळखले. पूर्वी किल्लयाच्या भिंती जे काम करीत असत तेच काम चराच्या रांगा आज करतात, किल्लयावरील बुरुजाच्या तोफा जे काम पूर्वी करीत असत, तेच काम कांक्रीटच्या पायावर चरात लपून बसलेला तोफखाना आज करतो. किल्लयाच्या भिंती बांधण्यास मनुष्यबळ व द्रव्यबळ फार खर्च होते, शिवाय कालहानि तर कित्येक वर्षांची ! इंजिनाच्या साहाय्यानें कितीएक मैल लांबीचे चक्रव्यूह एका रात्रीत तयार होतात आणि बड्या तोफाच्या बुरुजाचे पूर्ण पाठबळ एका आठवड्यात त्यास मिळू शकते. नुसत्या चरानी हलक्या तोफानीं एका रात्रीच्या अवधीत कितीएक मैल लांबीवर पसरलेल्या शत्रूच्या तोंडात आठ दहा दिवस तो बोलणार नाही एवढा बोळा घालता येतो, आणि या आठ दहा दिवसाच्या अवधीत चराच्या चक्रव्यूहाचे मागे कांक्रीटच्या पायावर चरात लपून बसलेला तोफखाना उभा राहून चराच्या चक्रव्यूहाला पूर्वीच्या किल्लयाचें सामर्थ्य प्राप्त होते. असे सामर्थ्य प्राप्त झालें म्हणजे महिना दोन महिने शत्रूचा सेनासागर आपोआप थोपविला जातो. चराच्या चक्रव्यूहानी व तोफाच्या अदृश्य बुरुजानीं एका बाजूच्या शत्रूला थोपवून धरल्यानंतर दुसऱ्या बाजूच्या शत्रूच्या पिछाडीवर किंवा बगलेवर अवचित कसे धावून जावयाचें ? डुकराच्या मुसंडीसरसे धावून गेलें, तरच शत्रूची तगडी मोडता येणार. हें धावून जाण्याचे काम जर्मनीच्या आगगाड्या करतात. फ्रान्स बेल्जमच्या सरहद्दीपासून रशियाच्या

सरहद्दीपर्यंत धांवणाऱ्या जर्मन आगगाड्यांच्या नकाशाकडे पाहिलें म्हणजे अशा मुसड्या वरच्यावर मारतां याव्या म्हणूनच या आगगाड्याची योजना केली आहे असें स्पष्ट दिसून येतें. पूर्वेकडून पश्चिमेकडे व पश्चिमेकडून पूर्वेकडे असें जर्मन सैन्याचें एकसारखे आंदोलन सुरू आहे. शत्रूला थोपवून धरलें, म्हणजे तोफांच्या व चराच्या हवालीं युद्ध करून निम्याहून अधिक सैन्य दुसरीकडे नेण्यास हरकत येत नाहीं. चक्रव्यूहाचे किल्ले जसे सात आठ दिवसात पूर्णतेस नेतां येतात त्याप्रमाणें फ्रान्सच्या सरहद्दीवरील लाखो सैन्य रशियाच्या सरहद्दीवर तीन दिवसांत, पांच दिवसांत निदान एका आठवड्यांत कोठेहि नेता येते. थोपवून धरणाऱ्या चक्रव्यूह स्वरूपी किल्ल्याची कला व चपल आगगाड्याची मुसडी या दोन गोष्टीतच जर्मनीचें बुद्धिबल विशेष दिसून येतें. या बुद्धिबलाचे पूर्ण स्वरूप इंग्लड, फ्रान्स व रशिया याच्या ध्यानात आले असून या बुद्धिबलाचे तोडीस तोड देण्याची त्रिकुटाची व्यवस्था उन्हाळ्यात पूर्णतेस जाणारी आहे. थोपवून धरण्याची कला किंवा चक्रव्यूहाची किल्ल्यांची कला इंग्लड व फ्रान्स या दोन देशाना या सहा महिन्यात पूर्णपणें उमजली आहे; रशियालाहि ही कला समजली आहे. पण इंजिनें व तोफा याची थोडीशी तूट असल्यामुळे वारसासारख्या मुख्य मुख्य केंद्रस्थानाशिवाय इतर लांब दूरवरच्या रणक्षेत्राचे ठिकाणी ही कला अमलात आणण्यास रशियास सांप्रत अडचण पडत आहे. युद्धसामग्रीची शास्त्रीय मदत इंग्लड व फ्रान्समधून रशियास एक-सारखी पोंचविण्यात येत आहे, तेव्हा उन्हाळ्यात रशिया या बाबतीतहि सर्वांग परिपूर्ण होईल, हे उघड होय.

## वार्सोला वळसा

महायुद्धाच्या प्रारंभीं आगगाडीच्या चलाखीच्या चालींनीं बेल्जम व उत्तर फ्रान्स हे देश जर्मनीनें हस्तगत केले. व लगेच चराचा चक्रव्यूह निर्माण करून फ्रान्स व इंग्लड याच्या सैन्याला थोपवून धरलें. ही थोपविण्याची क्रिया फेब्रुवारी महिन्यांतहि जशीच्या तशीच चालू होती. कांहीं केल्या आपलें नवें दहा लाखाचें सैन्य पूर्ण तयार होईतों उपयोगात आणावयाचें नाहीं, असा शहाणपणाचा निश्चय इंग्लडनें केलेला असल्यामुळे फेब्रुवारीं महिन्यात फ्रान्स–बेल्जममध्यें विशेष महत्त्वाची गोष्ट घडून आली नाहीं. फ्रेंच सेनापति जनरल जॉफ्रे याचें कुरतडण्याचें काम फेब्रुवारींत सुरूच होते व मेदसजच्या बाजूला फ्रेंचाचें सैन्य आस्ते आस्ते पुढें पाऊल

टाकू लागलें आहे. तथापि एप्रिल—मे महिन्याशिवाय म्हणजे नवी सेना उतरल्याशिवाय, या बाजूला विशेष रग येईलसें दिसत नाहीं. मार्च—एप्रिलांत कॅलेवर पुनः हल्ला करण्याचा जर्मनीचा विचार असून, जर्मन सेनापति फॉन हिंडेनबर्ग हेहि बेल्जममध्ये येऊन दाखल झाल्याचे प्रसिद्ध झाले आहे. यापुढे जर्मनीनें फ्रान्स, बेल्जमच्या बाजूला जर काही नवी व्यवस्था केली तर तिचा हेतु कॅले किंवा पारिस घेण्याचा असणे सभवनीय नाही. कारण, रशियाशीं चाललेले युद्ध साप्रत इतक्या गुतागुतीचें व महत्त्वाचे होऊन बसले आहे की, रशियाचेच बाजूला आपले सर्व बल खर्च करणे जर्मनीला भाग आहे. फ्रान्स—बेल्जममध्ये इंग्रजाना व फ्रेंचाना थोपवून धरण्यापलिकडे इतर उपद्व्याप करीत बसणे लष्करी धोरणाच्या दृष्टीने जर्मनीला श्रेयस्कर नाहीं. जर्मनीनें अद्याप वार्सा घेतला नाही, प्रिजमिसल घेतलेलें नाहीं आणि रशियाची लढाई तर हातघाईवर आलेली आहे. कॅले घेण्याकरिता किंवा पारिसवर चाल करण्याकरिता सेनापति फॉन हिंडेनबर्ग बेल्जमकडे आलेले नसून रशियाच्या बाजूला महायुद्धास तातडीचे स्वरूप येऊ लागले असताना रशियास एक तऱ्हेची मदत मिळावी म्हणून जर्मनीस तबी देण्याच्या हेतूने इंग्लड व फ्रान्स जर्मन चक्रव्यूहावर जे जोराचे हल्ले करतील त्याचा प्रतिकार कसा करावा हे ठरविण्याकरिता सेनापति फॉन हिंडेनबर्ग पश्चिम रणक्षेत्रावर अवतीर्ण झालेले असावेत असा अदाज आहे. कसेहि असो, डिसेंबर—जानेवारीप्रमाणे फेब्रुवारी महिन्यातहि पश्चिम रणक्षेत्र थडच होते व युद्धाच्या देवता पूर्व रणक्षेत्रात म्हणजे रशियाच्या सरहद्दीवर वावरत होत्या. फेब्रुवारीचे प्रारंभी वार्सा घेण्याकरिता एल आठवडाभर निकराचे हल्ले वार्साच्या पश्चिमेस तीस मैलावर जर्मनीनें केले. आठ दिवस हजारो सैन्य एकसारखे बळी देऊन वार्सापासून पधरा मैलावर असलेल्या ब्लोमी गावापर्यंत आपण जाऊन पोचू अशी जर्मनीची उमेद होती. सहाशे जर्मन तोफा भडिमार आठ दिवस करीत होत्या ! तोफाच्या गोळ्याचा पाऊस पडला, सर्व प्रदेश मेलेल्या जर्मन वीरानीं आच्छादला गेला; पण रशियन चक्रव्यूह काही फुटला नाहीं. आठव्या दिवशीं एकाएकीं जर्मनीचे हल्ले बद पडले. जर्मनीची चक्रव्यूहाची कला रशिया पूर्णपणें वार्साजवळ शिकला आहे, असें जर्मनीला जानेवारी महिन्यातच कळून चुकले होतें. जानेवारींत असलेच निकराचे हल्ले ह्याच जागीं करण्यांत आले होते; व त्या हल्ल्यात जर्मनीला पूर्ण अपयश आलें होतें. तसलेंच अपयश पुनः पदरात घेण्याचा

उद्योग फेब्रुवारीच्या प्रारंभी का करण्यात आला? ह्या आठ दहा दिवसात पांचपन्नास हजार सैन्य का नाहक बळी देण्यात आले? बरें, एकदा हल्ला करण्यास सुरुवात करण्याबरोबर सात आठ दिवसातच ते हल्ले का थाबले? लाख दोन लाख सैन्य बळी दिल्याशिवाय वार्सा हाती येणार नाही हे काय जर्मनीस कळत नव्हतें? मग पाचपन्नास हजार मरण्याबरोबर एकदम थडपणा कसा आला? जर्मनीचे हल्ले थड पडण्याबरोबर रशियाने तेथेच उलट हल्ले करण्याचा तडाखा चालविला आणि वार्सासमोर रशिया उलट जर्मनीला मार देतो की काय, अशी चिन्हेहि दिसू लागली, पण इतक्यात लढाईचे स्वरूप यक्षिणीनें काडी फिरविल्याप्रमाणे चटदिशीं पालटले! सर्वांना कळून चुकले, कीं चक्रव्यूह फोडून वार्सा घेण्याचा जर्मनीचा हेतु नाहीं, तर चक्रव्यूह फोडण्याचा जर्मनीचा मूळचाच प्रयत्न अर्धवट! पोलडच्या आसपासचें सर्व रशियन सैन्य वार्सास गोळा व्हावें व सर्व तोफा वार्साच्या बाजूला येऊन पडाव्या म्हणून ही गर्दी वार्साच्या समोर जर्मनीनें चालविली होती. पडद्या-बाहेर वार्सावर हल्ला करण्याचा प्रवेश सुरू होता. पण पडद्याच्या आत वार्सावर हल्ला करण्यापेक्षा वार्साला वळसा देण्याच्या प्रवेशाची तयारी चालू होती. आंतल्या प्रवेशाची तयारी होण्याबरोबर पुढचा प्रवेश सपला व जर्मन सेनापति फॉन हिंडेन-बर्ग चार पाच लाख सैन्यानिशी पूर्व प्रशियाच्या सरहद्दीवर एकदम दृष्टीस पडले! जानेवारी प्रारभाला जर्मन सैन्य क्रॅकोचे ग्रहण सोडावयास रशियास भाग पाडल्या-नतर वार्साच्या पश्चिमेस तीस मैलावर तळ देऊन बसलें. त्यानतर ह्या सैन्यास कमकुवत करण्यासाठी रशियन सेनापति ग्रॅड ड्यूक निकोलस ह्यानीं पूर्वप्रशियावर पूर्वेकडून व दक्षिणेकडून हल्ला करण्यास सुरुवात केली. पूर्व सरहद्दीवर हल्ला तीन बाजूनी करता येतो. एक कोवनोचा पाया धरून नीमेन नदीच्या काठानें तिलस्टिस शहराला पोंचून तेथून पुढे कॉनिग्जबर्गच्या किल्ल्याकडे जाणें तिलस्टिस हें आगगाडीचें मोठे केंद्रस्थान असून लष्करी धोरणाचे दृष्टीने महत्त्वाचें ठिकाण आहे. जानेवारी महिन्यात रशियानें तिलस्टिसचे ठाणें घेतलें. नीमेन नदीचा काठ सोडून कोवनोहून आगगाडी वळवली म्हणजे जर्मन हद्दींतील इस्टर्नबर्गच्या आगगाड्याच्या केंद्रस्थाना-कडे जाण्याचा रस्ता आहे. ह्याहि दिशेनें रशियानें हल्ला करून इस्टर्नबर्गच्या पूर्वेस दहाबारा मैलावर असलेले गुंबीनेनचें ठिकाण कबजात घेऊन पूर्व सरहद्दीला समातर रेषेनें जाणारी जर्मनीची आगगाडी उध्वस्त करण्याचा उद्योग आरभला. कोवनोच्या

खालीं दक्षिणेस ग्रोडनो हें रशियन आगगाड्यांचें एक केंद्रस्थान आहे, व जर्मन सरहद्दीवरील सरहद्दीला समातर असलेल्या जर्मनीच्या आगगाडीला तोडीस तोड म्हणून ग्रोडनो, सुवाल्की व ओरली असा एक लहानसा आगगाडीचा फाटा मूळ फाट्याला मुद्दाम म्हणून चिकटविण्यात आलेला आहे. ह्या फाट्याच्या सहाय्यानें रशियानें जर्मनीच्या लीक प्रांतावर हल्ला केला, व त्या प्रांतांतील जर्मन आगगाड्यांचें केंद्रस्थान जें लीक शहर तेंहि ताब्यात घेतलें. ह्या सर्व प्रांतावर रशियाची ही दुसरी स्वारी होय. महायुद्धाच्या प्रारभाची पहिली स्वारी व जानेवारींतील ही दुसरी स्वारी. पहिल्या स्वारींत कॉनिंग्सबर्गच्या किल्ल्यापर्यंत रशियन सैन्य पोचलें होतें व लीक प्रांतातील निरनिराळी सरोवरें ताब्यात घेऊन ती ओलाडून पुढे जाण्याचाहि रशियानें प्रयत्न केला होता. पण रस्टेनबर्ग येथे म्हणजे दोन सरोवरामधून चाल करून जात असताना दीड लाख रशियन सैन्यास जर्मनीने अवचित गाठून गारद केल्यामुळें पहिल्या स्वारींत रशियास यश आलें नाहीं. ह्या दुसऱ्या स्वारीच्या वेळेला पूर्व सरहद्दीच्या आत जाऊन रशियाने महत्त्वाची नाकी ताब्यात घेतली व पूर्वप्रशियास दक्षिणेकडूनहि त्रास देण्यास सुरुवात केली. व्हिश्चुला नदीच्या उत्तर किनाऱ्यानें रशियन सैन्य चाल करून जाऊन सरहद्दीवरील थॉर्न किल्ल्याजवळ गेलें; व वार्सा म्लावा आगगाडीनें उत्तरेस सरकून म्लावा शहर ताब्यात घेऊन जर्मन सरहद्द रशियानें गाठली. ह्या रीतीनें जानेवारी अखेरीस पूर्वप्रशियाला रशियानें बऱ्याच अशीं गाजून सोडलें! अशारीतीनें पूर्वप्रशिया गाजला गेला असल्यानें जर्मनीनें फेब्रुवारीच्या प्रारभीं वार्सावरच निकराचे हल्ले करण्यास सुरुवात केली होती. वार्सा शहर जर जर्मनीस घेता आलें असते तर पूर्वप्रशियावर दक्षिणेच्या बाजूने जे रशियाचे हल्ले होत होते, ते सर्व आपोआप गळून पडले असते. कारण दक्षिणेकडच्या ह्या हल्ल्याचा उगम वार्सा शहरापासून होता. ह्या हल्ल्याकडे दुलक्ष करून वार्सा घेण्यासाठींच ज्या अर्थी जर्मनीने कबर बाधली आहे त्या अर्थी पूर्वप्रशियात जर्मनी कसेबसे स्वसरक्षण करणार व निकराची स्वारी वार्सावर करणार असा अदाज रशियन सेनापतींनीं बाधला, आणि पूर्वप्रशियांत स्वसरक्षणास जर्मनीला किती सैन्याची जरुरी लागेल असें त्याना वाटलें तितकेंच सैन्य जर्मनी पूर्वप्रशियांत ठेवील व बाकीचें सर्व सैन्य वार्सा शहरावर जर्मनी फेकून देईल, अशा धर्तीचा जर्मन हालचालींचा कार्यक्रम रशियन सेनापतींनीं रेखाटला. पण फेब्रुवारीच्या दुसऱ्या

आठवड्यांत वार्सावरील हल्ल्याचा प्रवेश संपून पडदा वर जाऊन पूर्वप्रशियातील देखाव्यास सुरुवात होऊन रशियन सेनापति पहातात, तो याना असे दिसून आलें की, प्रत्येक ठिकाणी सेनापति फॉन हिंडेनबर्ग ह्यानी आपल्यासमोर अदाजाच्या दुप्पट तिप्पट लोक उभे केले आहेत ! झाले; एकदम धादल उडाली आणि पूर्व-प्रशियावर पूर्वेकडून व दक्षिणेकडून चाल करून जाणाऱ्या रशियन सेनेला एकाकी धादलीने जड सामान टाकून मागे परतावे लागले ! पूर्वप्रशियात पूर्व सरहद्दीवर रशियाचे सुमारे चार आर्मी कोअर म्हणजे दीड पावणे दोन लाख सैन्य होते. ते सर्व सैन्य आपण गारद केले असे जर्मनीचे म्हणणें आहे. पण रशियातर्फे प्रसिद्ध झालेला खरा प्रकार असा आहे की, चार आर्मी कोअरपैकी तीन आर्मी कोअर नीमेन नदीच्या काठाला सुरक्षितपणे येऊन पोचले. जड सामानसुमान व एकसारखे लढत खावी लागलेली माघार ह्यामुळे होणारे नुकसान ह्याशिवाय अधिक कोणचीहि हानि ह्या सव्वा लाख सैन्याची झाली नाही. चौथ्या आर्मी कोअरला ह्मणजे चाळीस पन्नास हजार सैन्याला मात्र जर्मनीने वेढा देऊन अडविले. पण ह्यापैकी काही पलटणी वेढयातून निसटून योग्य स्थळी सुरक्षितपणे पोचल्या व बाकीच्या सैन्याने शेवटचे काडतुस संपेपर्यंत लढून लढणाऱ्या जर्मनाची फार खराबी केली. दीड लाखावर अवचित तीन साडेतीन लाख सैन्य आणल्यामुळे रशियाला ही माघार घ्यावी लागली. पण पूर्वप्रशियाला रशियाच्या पजातून काही काळ सोडविण्यापलिकडे जर्मनीलाहि मोठासा फायदा ह्या धिंगाण्यापासून झालेला दिसत नाही. ग्रोडनोपासून सुवालकीपर्यंत जाणारा धनुष्याकृति आगगाडीचा फाटा ओलांडून नीमेन नदीच्या डाव्या तटापर्यंत जर्मन सैन्य पोंचले आहे. पण रशियाने नवीन सैन्य नीमेन नदीवर पाठवून नीमेन नदीच्या पश्चिमेस जर्मनीला थोपवून धरलें असून सेंट पीटर्सबर्गपासून ग्रोडनोवरून वार्साकडे जाणाऱ्या मुख्य आगगाडीच्या फाटयाला जर्मनीचा स्पर्शहि होऊ दिलेला नाही. ग्रोडनो शहर घेऊन किंवा ग्रोडनोच्या दक्षिणेस किंवा उत्तरेस कोठेंतरी आगगाडी गाठून वार्सा व पिटर्सबर्ग याचा आगगाडीचा संबंध तोडण्याचा जर्मनीचा लष्करी डाव आहे. मार्च महिनाभर हा डाव जर्मनी खेळत राहाणार, हे उघड आहे. जर्मन सेनापति फॉन हिंडेनबर्ग ह्याच्या अवचित हल्ल्याची मुसंडी नीमेन नदीवर थंड झाली आहे; व मार्च महिन्यात आगगाडी गाठण्याकरिता जर्मनी-कडून कितीहि आटोकाट प्रयत्न झाले तरी रशियन चक्रव्यूहापुढे ते विफल होतील

असा रशियास पूर्ण भरंवसा वाटत आहे. ग्रोडनोप्रमाणें ब्लिसलिस्टोक हेंहि ग्रोडनोच्या दक्षिणेकडे महत्त्वाचें आगगाड्याच्या फाट्याचें केंद्रस्थान आहे. पिटर-गडरहून वार्साकडे जाणाऱ्या मुख्य रस्त्याला मास्कोहून वार्साकडे येणारा आगगाडीचा रस्ता येथें मिळतो व तेथूनच जर्मन सरहद्दीकडे लीक गावापर्यंत दुसरा आगगाडीचा फाटा जातो. ब्लिस्टिआकच्या दक्षिणेकडून नॅरो नदी वहात असून लोमशाग, आस्टोलेका ह्या गावावरून ती नदी वहात जाऊन नोव्हो जॉर्जीव्हिस्क येथें व्हिश्चुला नदीला मिळते. लीक आणि टिलस्टिस या सरहद्दीवरून पूर्वेस रशियन लोक चालले ते नीमेन नदी गाठून जर्मनीला थोपवून धरू शकले. त्याप्रमाणें लीक व म्लावा या सरहद्दीवरून रशियन जे मागे हटले ते नॅरो नदीचा आश्रय धरून जर्मनीला थोपवू लागले. नीमेन नदीच्या लढाईत रशियानें साप्रत जर्मनीला थोपवून धरले आहे, पण नॅरो नदीच्या लढाईत डाव्या अगाला जर्मनीचा उलटा पराभव केला आहे. लीक व म्लावा या सरहद्दीचे जर दोन भाग केले तर डाव्या विभागात वार्साच्या थेट उत्तरेस ५० मैलावर असलेलें प्राजनीस शहर डाव्या भागाच्या मध्य बिंदूवर येते. या प्राजनीस शहराभोवतीच मोठी निकराची लढाई झाली. दोनवेळा जर्मनीने हे शहर घेतलें तर रशियानें दोन वेळा ते परत घेतले आणि शेवटीं तर जर्मन सैन्याला सरहद्दीपर्यंत पिटाळून लावून प्राजनीसच्या रस्त्याने उत्तरेकडून वार्सावर उतरण्याचा जर्मनीचा घाट रशियानें निष्फळ केला! प्राजनीसच्या बाजूला जर्मन मागें हटले खरे पण नॅरू नदीच्या तीरावरील रशियाचे तळाचे दोन भाग करणारी ओम्युलू नदी त्यांनीं घट्ट पकडून ठेवली असून लोम्शाच्या दिशेनें खालीं येऊन आगगाडी तोडून वार्साला वळसा देण्याचा उद्योग त्याचा चालू आहे. पहिली मुसडी व्यर्थ गेली असल्यामुळे ह्या उद्योगातहि त्याना रशियन सैन्य जय येऊ देणार नाहीं हें उघड आहे. पूर्वप्रशियाच्या पूर्वेस व दक्षिणेस ज्याप्रमाणे रशियाला माघार खावी लागली त्याप्रमाणें थॉर्नच्या बाजूलाहि रशियन सैन्य मागें परतलें. फ्लॉक शहर जर्मनीनें पुनः परत घेतलें असून नोव्हो–जॉर्नोव्हिस्कच्या उत्तरेस असलेल्या वक्रा नदीच्या तटावर रशियन सैन्याचा तळ पडला आहे. फ्लॉकपासून नोव्हो–जार्नोव्हिस्ककडे जर्मन सेना चाल करून जात आहे. पण नोव्हो–जार्नोव्हिस्कचा किल्ला जर्मनीला अत्यत मजबूत किल्ल्यापैकीं एक असल्यामुळें या बाजूने जगात वार्सा गांठता येईल, अशी फारशी आशा नाहीं. एवंच, पोलंडमधील महायुद्धाचें मुख्य केंद्रस्थान

वार्सा शहर झालें असून पूर्वेकडून, वायव्येकडून, ईशान्येकडून व उत्तरेकडून चार दिशानीं वार्साला वळसा देण्याचा जर्मनीचा उद्योग सांप्रत सुरू आहे. ह्या उद्योगातील पहिले चलाखीचे व जोराचे घाव रशियानें मागे परतविले असून या चारहि दिशाना जर्मनीला थोंपवून धरण्यास रशिया समर्थ आहे, असे फेब्रुवारींत सिद्ध झाले आहे. या चार दिशानीच अधिक घाव घालीत जर्मनी बसणार का नैऋत्य आणि दक्षिण ह्या दोन दिशा वरील चार दिशाना आणखी जोडणार, हे मार्च महिन्यात दिसून येणार आहे. वार्साच्या सर्व बाजू अजून चराच्या चक्रव्यूहानीं सुसरक्षित झालेल्या नाहीत. सैन्याच्या चलाखीच्या हालचालींना व चराबाहेरच्या झटापटीना अद्याप पोलडमध्ये बरीच जागा रिकामी आहे. ही सर्व जागा चराच्या चक्रव्यूहानी व्यापली जाऊन जर्मनी पुरा थोपविला गेल्याशिवाय, किंवा जर्मनीचा एखादा मोठा पराभव झाल्याशिवाय, वार्साच्या बाजूचें पोलडातील आपले बळ कमी करून जर्मनी पश्चिमेस कॅलेकडे वळेल, हे लष्करी धोरणाच्या दृष्टीने सयुक्तिक दिसत नाही.

## कार्पेथियन पर्वत

रशियाच्या व जर्मनीच्या युद्धात वार्सा शहर व व्हिश्चुला नदी हीं जशीं महत्त्वाचीं ठिकाणें होऊन बसली आहेत, त्याप्रमाणे रशियाच्या व ऑस्ट्रियाच्या युद्धात कार्पेथियन पर्वत व कार्पेथियन पर्वतातील घाट महत्त्वाचे होऊन बसले आहेत. जानेवारीत रशियानें डुक्ला घाट, युझाक घाट, जब्लोनिझ घाट, व केरिबाबा घाट हे व्यापून डुक्ला घाटानें रशिया तर हगारींत उतरू लागला होता. फेब्रुवारींत ऑस्ट्रिया हगारीची मदत घेऊन केरिबाबा घाटानें हगारियन सैन्य बुकोव्हिनामध्ये शिरून सर्व बुकोव्हिना प्रातातून रशियन सैन्यास माघार घ्यावी लागली. केरिबाबा घाटाप्रमाणें जब्लोनिस व युझाक ह्या घाटानींहि हगारियन सैन्य रशियावर चालून गेले, आणि फेब्रुवारी अखेरीस बुकोव्हिनातील झर्नोव्हिस शहर आणि झर्व्होनिस व लेंबर्ग याच्यामधील सॅनिशलावर हें शहर ही हगारीच्या हाती पडून पूर्व ग्यालिशियाचा बराच भाग रशियाला सोडून द्यावा लागला. यूझाक व लपको ह्या घाटानीहि ऑस्ट्रियन सैन्य प्रिजमिसलकडे जाऊं लागलें, आणि मार्चच्या प्रारभीं प्रिजमिसलच्या आसपास असलेल्या सॅन नदीवर निकराची लढाई सुरू झाली. बुकोव्हिना व पूर्व ग्यालिशिया या प्रदेशात रशियानें जशी माघार खाल्ली, तशी माघार प्रिजमिसलच्या

टापू त रशिया खात नसून ऑस्ट्रियाच्या मुसडीस तितक्याच नेटानें थोपवून धरीत आहे. प्रिजमिसलचा वेढा आपण लवकर उठवू व लेंबर्गहि घेऊन सर्व ग्यालिशिया-तून रशियाला पिटाळून बाहेर लावू, आता लेबर्गच्या आसपासचा थोडासा भिकारडा प्रदेश काय तो रशियाच्या ताब्यात राहिला आहे, अशी शेखी ऑस्ट्रिया हंगारीतील वर्तमान पत्रे मिरवू लागली आहेत! पण खरा प्रकार रशियाने असा जाहीर केला आहे की, लेबर्ग शहराला बिलकूल धोका नसून बुकोव्हिना व पूर्व ग्यालिशियाचा भाग रशियानें जरी अल्पकाळ सोडलेला असला तरी रशियाच्या ताब्यातील ग्यालिशियाचा भाग क्षुल्लक नसून बेल्जमच्या दुप्पट आहे. प्रिजमिसलच्या आसपासची लष्करी स्थिति जरी बऱ्याच गुंतागुंतीची असली तरी वार्सोचा मध्यबिंदु जसा रशियाने भक्कम पकडला आहे त्याचप्रमाणे प्रिजमिसलचाहि बिंदु तितक्याच चिकाटीने पकडून ठेवल्याशिवाय रशिया राहाणार नाही, असे चिन्ह दिसत आहे. कारण, प्रिजमिसल जर पडले तर लेबर्गला पूर्वेकडून व दक्षिणेकडून दोन्हीकडून धोका आला. आणि प्रिजमिसल–लेबर्ग हा आगगाडीचा फाटा जर ऑस्ट्रियाच्या हातात गेला तर दक्षिण पोलंडातील नीडा नदीच्या काठच्या रशियन सैन्यास अर्धे-मुर्धे पायबंद केल्यासारखे होईल. सर्व्हियावर हल्ला करण्याकरिता तेमेश्वरच्या दक्षिणेस पाच सहा लाख सैन्य ऑस्ट्रियानें व जर्मनीने जुळविले होते, फेब्रुवारी महिन्यात या सैन्यानें सर्व्हियावर बिलकुल हल्ला केला नाही. सर्व्हियावर हल्ला करण्याची केवळ हूल दाखविण्यात आली. खरा रोख बुकोव्हिनावर होता. रुमानियाला दहशतींत ठेवण्याकरिता व रुमानिया यदाकदाचित् रशियाच्या बाजूनें महायुद्धात पडलाच तर त्याजवर अवचित जलदीने स्वारी करून डॅन्यूब नदीच्या तोंडापासून ओडेसा बंदरापर्यंतचा काळ्या समुद्राचा किनारा कब्जात घेता यावा म्हणून तेमेश्वर, ट्रन्स्लिव्हॅनिया व बुकोव्हिना या तिन्ही जागी मोठें लष्कर ऑस्ट्रिया हंगारीनें व जर्मनीने सज्ज करून ठेवलें आहे. मार्च एप्रिलात सर्व बाल्कन राष्ट्रे युद्धात सामील होण्याचा रंग आहे, व ही नवी स्थिति कसकशी परिणत होत जाते हें पूर्णपणें दृग्गोचर होईतों सर्व्हियाच्या स्वारीत मोठेंसें सैन्य गुंतवून ठेवण्याचा जर्मनीचा उद्देश दिसत नाहीं. बाल्कन राष्ट्रे जर सामील झाली, तर मार्च एप्रिलात सर्व्हियाच्या सरहद्दीवर स्वसंरक्षण करण्यापलिकडे काही न करता ट्रन्स्लिव्हॅनियाच्या पूर्व सरहद्दीनें व बुकोव्हिनाच्या दक्षिण सरहद्दीने रुमानियात शिरून जासी, बर्लाड

हा रुमानियाचा प्रांत काबीज करून ओडेसा व डॅन्यूब नदीची तोंडे येथपर्यंत जाऊन भिडण्याचा प्रयत्न हंगारीकडून होईल. असल्या प्रयत्नाकरता जरूर तेवढे सैन्य राखून ठेवून जर्मनीच्या सैन्याची मदत घेऊन ऑस्ट्रिया मार्च महिन्यात प्रिजमिसलचा वेढा उठवून उत्तरेस व्हिश्चुला नदीकडे चाल करून जाईल. तसे केल्याने दक्षिण पोलडातील रशियन सैन्यास अर्धामुर्धा पायबद बसेल, व वार्सा घेण्याच्या जर्मनीच्या खटाटोपास दक्षिणेकडून अर्धवट मदतहि पोचेल. रुमानिया व बाल्कन राष्ट्रे ह्याचे अग्निकुड मार्च एप्रिलमध्ये पेटण्याचा सभव आहे, व त्यावेळी रुमानियाच्या मदतीस आपणास धावून गेले पाहिजे, इतकेच नव्हे तर ओडेसा व डॅन्यूब नदीची तोंडे हा टापू शत्रूच्या हातात जाऊ देता कामा नये, हे धोरण रशिया पूर्णपणे ओळखून असल्यामुळे ग्यालिशियात कार्पेथियन पर्वतावरून खाली उतरणाऱ्या ऑस्ट्रियन सैन्यास थोपवून धरण्यापलिकडे रशिया मार्च महिन्यात काहीहि करणार नाही. पूर्व प्रशियाच्या बाजूला, वार्साच्या उत्तरेस, वायव्येस व पश्चिमेस त्याप्रमाणे दक्षिण पोलडातहि रशिया जर्मनीस मार्च महिन्यात नुसता थोपवून धरणार, उलट हात उगारण्याच्या भरीस पडणार नाही. त्याचप्रमाणे कार्पेथियन पर्वताच्या बाजूलाहि शत्रूला थोपवून धरण्याचें कायते काम रशिया करणार, हात उगारण्याचें काम बुकोव्हिनाच्या बाजूला काय ते रशियाचे होईल, व असेच करणे लष्करी धोरणाच्या दृष्टीने इष्ट आहे. कारण, बाल्कन प्रदेशात नवे मोठें अग्निकुड पेटविण्याची सर्व तयारी झाली असून मार्च-एप्रिलमध्ये केवढा अग्नि प्रज्वलित होईल ह्याचा नियम नाही. हा अग्नि पेटला असता त्याचा पूर्ण फायदा आपल्या पक्षास घेता यावा म्हणून रशियाची व जर्मनी-ऑस्ट्रियाची धडपड एकसारखी सुरू आहे, व त्याच दृष्टीने दोन्ही पक्षाच्या सेनेच्या हालचाली होत आहेत. बाल्कन प्रातातील रणाचा अग्नि कसा व का पेटण्याचा सभव आहे या प्रश्नाकडे आपण आता वळू.

## तुर्कांना तंबी

रुमानिया, बल्गेरिया, ग्रीस वगैरे बाल्कन राष्ट्रे महायुद्धाच्या अग्निकुडात येऊन पडतील अशा एका महत्त्वाच्या गोष्टीस फेब्रुवारीच्या अखेरीस प्रारभ झाला आहे. ती गोष्ट म्हणजे इंग्रजाच्या व फ्रेंचाच्या आरमारानें डार्डानेलिसची सामुद्रधुनी काबीज करण्यास सुरुवात केली ही होय. सुमारें पन्नास साठ लढाऊ जहाजाचा काफिला हें काम करण्यांत गुंतला असून आरभाच्या पद्धतीकडे पाहिलें असता इंग्रजी

आरमारास या बाबतींत यश येण्यास कोणतीच हरकत दिसत नाहीं. ह्या पन्नास साठ जहाजांच्या समूहात महायुद्धास सुरुवात झाल्यानतर तयार झालेले क्वीन एलिझाबेथ नावाचे ड्रेड नॉट जहाजाहूनहि वरच्या दर्जाचें जगातील प्रचड जहाज आहे ! ह्या जहाजावर पधरा इची बारा तोफा असून ह्या तोफा एक टन वजनाचा गोळा बारा बारा मैलावर नेमका मारू शकतात ! डार्डानेलिसच्या सामुद्रधनीच्या तोडाच्या तीन चार मैल प्रदेशातील सुरुगहि झाडून काढले आहेत. डार्डानेलिसची सामुद्रधुनी पन्नास साठ मैल लाबीची असून सरासरीनें दोन अडीच मैल रुदीची आहे. सामुद्रधुनीच्या दोन्ही काठावर एकसारखी किल्ल्याची राग आहे, शिवाय दोन्ही बाजूच्या प्रदेशावर टेकड्याच्या व किल्ल्याच्या साहाय्यानें लाख सव्वा लाख तुर्की सैन्य डार्डानेलिसच्या दरवाजाचे रक्षण करण्याकरिता लहान मोठ्या तोफासह सज्ज होऊन बसले आहे. असली ही डार्डानेलिसची सामुद्रधुनी काबीज करण्याची पद्धत कोणची ? मोठ्या जहाजानी पाच सात मैल लाबीपर्यंतची जमीन तोफाच्या गोळ्यानी जाळून टाकावयाची.; नन्तर जमिनीवर लष्कर उतरवून दोन चार मैल लाबी रुदीचा प्रदेश त्या लष्कराने कब्जात ध्यावयाचा, अशा रीतीनें सामुद्रधुनीच्या ह्या किंवा त्या बाजूला जेवढा भाग सेनेने काबीज केला असेल, त्याच्या अलिकडे दोन चार मैल सामुद्रधुनीतून मोठ्या जहाजानी उभे राहून काबीज केलेल्या चार सहा मैलाचा टापू तोफाच्या गोळ्यानी चोपून काढावयाचा, व त्या दुसऱ्या टापूवरहि शत्रूकडील कोणीहि प्राणी जिवत नाहीं असे झाल्यावर सैन्याने तो टापू व्यापून टाकावयाचा ! सैन्य चारसहा मैल अशा रीतीने पुढे सरकलें, म्हणजे आरमारानें, धाकट्या बोटींनीं पाण्यावरचे सुरुग झाडून टाकून ' क्वीन इलिझाबेथ सारख्या जगी जहाजाला पुढे सरकण्यास सागावयाचें. ह्या पद्धतीला अनुसरूनच डार्डानेलिसच्या तोंडावर साप्रत लढाई सुरू आहे. इग्रजी आरमाराने आपली प्रचड शक्ति तुर्की किल्ल्याच्या प्रत्ययास पूर्ण आणली आहे. किल्ल्यावरील मोठ्या तोफा आरमाराच्यावरील तोफाच्या माऱ्याने मुक्या होतात खऱ्या, पण थोरल्या तोफाच्या पल्ल्यापलीकडे किंवा पल्ल्याच्या आतहि सुरुग झाडून काढण्याकरिता लहान लहान बोटी सामुद्रधुनींत पुढे चालल्या असताना गाड्यावरच्या लहान लहान तोफा घेऊन येऊन तुर्की लष्कराने जर अवचित चाळीस पन्नास तोफाचा त्याच्यावर मारा केला तर तसल्या प्रसगांतून त्याना बचावण्याचें सामर्थ्य बड्या जहाजाचे अगीं नाहीं.

आणि छोटयांनीं पुढला रस्ता झाडल्याशिवाय वडी मडळी आंत शिरूं शकत नाहीं. डार्डानेलिसच्या उत्तरेकडील जमिनीचा भाग एका चिंचोळ्या द्वीपकल्पाचा असून उत्तरेकडील उपसागरात उभे राहून मोठ्या जहाजावरील तोफाना ह्या चिंचोळ्या द्वीवकल्पाचा गळा दाबतां येतो, पण दक्षिण तीराची स्थिति तशी नाहीं. दक्षिण तीरावर मागच्या बाजूला अफाट प्रदेश आहे. व तेथे हजार ठिकाणीं लपून बसून लहान लहान तोफखाने दडवून ठेवून सामुद्रधुनीच्या अरुन्द प्रातात म्हणजे दीड दोन मैल रुन्दीच्या टापूत शिरणाऱ्या जहाजाना ठिकठिकाणच्या वळशाच्या ठिकाणी अचूक गोल्यात आणणे सभवनीय आहे ! एवच आरमाराच्या जोरावर सामुद्रधुनीत आत शिरण्याच्या क्रियेबरोबरच दोन्ही बाजूचे प्रदेश लष्करानें व्यापिल्याशिवाय गत्यन्तर नाही ! बरे, हे प्रदेश तात्पुरते फसगतीनें व्यापून चालेल असे म्हणावे तर तसेहि नाहीं. आपण अशी कल्पना करू, कीं ह्या बाजूला दहावीस हजार व त्या बाजूला दहावीस हजार असे तीस चाळीस हजार सैन्य अकस्मात उतरविण्यात आले, तुर्क गाफील राहून त्याची धादल उडाली, आणि सामुद्रधुनीचा टापू सोडून पळून गेले. सामुद्रधुनी अशा रीतीने मोकळी झाल्यावर एक दोन दिवसात सुरुग झाडून इग्रजी मोठी जहाजे मार्मोराच्या समुद्रात शिरली. इतके झाल्यानन्तर जर तुर्की सैन्य व्यवस्थित होऊन पुनः मागे परतले आणि वीस वीस हजार सैन्याच्या तुकडीचा पराभव करून सामुद्रधुनीचा किनारा जर त्यानी पुनः व्यापला आणि साठ मैल लाबीच्या व दोन अडीच मैल रुन्दीच्या सामुद्रधुनीत सुरुग पेरले तर मार्मोराच्या समुद्रात शिरलेल्या इग्रजी आरमाराची स्थिति व्यवस्थितपणें हत्तीच्या पोटात शिरलेल्या कोल्ह्यासारखीच नाही का होणार ? म्हणजे डार्डानेलिसची सामुद्रधुनी कशीबशी खुली करून भागावयाचें नाहीं. तर ही सामुद्रधुनी कायमची हातात राहील असा बदोबस्त करण्याकरिता, तुर्कांचें ज्याच्या पुढे काहीहि चालणार नाही एवढे मोठे सैन्य डार्डानेलिसच्या दोन्ही तटावर उतरवून मजबूतपणें बसवून ठेवलें पाहिजे. साप्रत तुर्कांचें लाख सव्वा लाख सैन्य डार्डानेलिसच्या काठावर आहे, आणखी लाख सव्वा लाख सैन्य .ते आणू शकतील; किंबहुना तसाच प्रसंग आल्यास सर्व तुर्की मनुष्यबल म्हणजे तीन चार लाख तुर्की सैन्य ह्या बाजूवर आणण्यास ते चुकणार नाहींत. तुर्कांच्या तोफाना नेम बरोबर मारतां येत नाहीं, तुर्की दारूगोळा अर्धवट उडतो, तुर्कांचे सेनानायक

तितके तरबेज नाहींत, ह्या सर्व गोष्टी जरी खऱ्या असल्या तरी जर्मनीची तुर्कांना मिळत असलेली मदत व तुर्की सेनेचें अनादिसिद्ध शौर्य ह्या दोन बाबी ध्यानात घेता डार्डानेलिसची सामुद्रधुनी कबजात घेऊन मार्मोराच्या समुद्रांत शिरून बास्फोरसच्या सामुद्रधुनीवरील तुर्की राजधानीवर इंग्रजी आरमाराच्या तोफा रोखता येण्यास जवळ जवळ तीन लाख सेनेचें पाठबळ इंग्रजाच्या व फ्रेंचाच्या आरमाराना पाहिजे, असे गणित निघतें. हे तीन लाख सैन्य कोठून येणार? फ्रान्स व बेल्जम-मधील चक्रव्यूह अद्याप इंग्रजाच्या व फ्रेंचाच्या फौजेनें फोडलेला नाहीं; इजिप्तच्या बाजूचें लढाईचे घोंगडे तसेंच भिजत पडलें आहे, व इराणात शिरून युफ्रेटीस व तैग्रीस नदीचे काठ काबीज करण्यात गुतलेली सेना रिकामी झालेली नाही. फ्रान्सचें व इंग्लंडचे मिळून फार झालें तर एक लाख सैन्य डार्डानेलिसच्या तोंडावर येऊ शकेल, पण लाख सैन्याने या मोठ्या उद्योगाचा प्रारंभ करता येईल. मागाहून महिना पंधरा दिवसात तीन लाख सैन्याची ह्या लाख सैन्यास जोड आल्याशिवाय हा प्रारंभहि मोठ्या चुकीचा होऊन बसणारा आहे. ही तीन लाख सैन्याची कुमक कोठून येणार? ह्या तीन लाख सैन्याची आतून व्यवस्था लागल्या-शिवाय डार्डानेलिस काबीज करण्याचा उद्योग इंग्रजानी व फ्रेंचानी आरंभलेला नसेल हे उघड आहे. हे सर्व हिशेब ध्यानात घेतले म्हणजे ग्रीस देशानें हे तीन लाख लोक पुरविण्याचें कबूल केलें असल्याशिवाय इंग्रजानी हा उद्योग आर-भला नाहीं असे स्वच्छ म्हणावे लागतें. अर्थात् महायुद्धात ग्रीस देश सामील झालाच पाहिजे. ग्रीसला एशियामायनरमधील म्हणजे डार्डानेलिसच्या दक्षिणे-कडील मुलखाची फार जरुरी वाटत आहे, व एशियामायनरचा काही भाग ग्रीसला देण्याचें आंतून वचनहि झालेलें असेल. डार्डानेलिसची सामुद्रधुनी, मार्मो-राचा समुद्र व तुर्कांचें राजधानीचें इस्तंबूल शहर हें जर इंग्रजी आरमारास घेता आलें तर हा सर्व टापू रशियास द्यावयाचा व रशियाचीं शेंदोनशें वर्षांची सर्व महत्त्वाकांक्षा पूर्ण करावयाची, अशा आशयाचें विधान इंग्लंडचे परराष्ट्रीय प्रधान सर एडवर्ड ग्रे ह्यानीं पार्लमेंट सभेत केलेलें आहे. म्हणजे बास्फोरसची सामुद्रधुनी, कॉन्स्टांटिनोपल शहर, मार्मोराचा समुद्र, डार्डानेलिसची सामुद्रधुनी व काळ्या समुद्राच्या दक्षिण किनाऱ्यावरचा सर्व तुर्की मुलूख हा एवढा भाग रशियाला; एशियामायनरचा बराच भाग ग्रीसला; सीरिया व पॅलेस्टाईन ह्या प्रांतावर

फ्रेंचाचा फार दिवसाचा डोळा आहे, इजिप्त इंग्रजाचें झालेंच आहे, अरबस्तान, इराण आखाताचा प्रांत व बगदादचा मुलूख हे इंग्रजाना, अशी तुर्की साम्राज्याची वाटणी आतून गुप्तपणे ठरलेली दिसते. एवढे मोठे तुर्की साम्राज्य वाटले जात असताना इटली गप्प बसेल हे संभवत नाहीं. तेव्हा एशियामायनरमध्ये कोठेतरी इटालीची सोय लावलेली असावी असावी असा अंदाज आहे. ॲड्रियाटिक समुद्राचा सर्व भाग व एशियामायनरचा बराचसा लचका ही मिळाल्यास डार्डनेलिसच्या आसपास ग्रीसबरोबर इटलीचे सैन्य का उतरू नये? ग्रीस व इटली या दोघांची मदत मिळाल्यावर दोन चार महिन्याच्या अवधीत कॉन्स्टांटीनोपलवरचे तुर्की निशाण खालीं येणार नाहीं असे कोण म्हणूं शकेल? यावेळी तुर्कांना मदत कोणाची व कोठून येणार याचा आता आपण विचार करू. बल्गेरियाला कॉन्स्टांटिनोपल येथे एक मोठे युरोपियन राष्ट्र येऊन बसणे श्रेयस्कर नाहीं. अर्थात् बल्गेरिया अशावेळी दोन चार लाख सेनेनिशी तुर्कांच्या मदतीला धावणार. ही बल्गेरियाची मदत इंग्रज कसे हाणून पाडणार? रुमानिया रशियाच्या तर्फेने बल्गेरियावर स्वारी करणार. रुमानियापाशी बल्गेरिया इतकेंच सैन्य असल्यामुळे दोघांचीहि बेरीज वजाबाकी सारखी होईल, पण रुमानियाच्या मदतीला उत्तरेकडून रशिया आल्यावाचून रहाणार नाही. तुर्कांना जर जर्मनी ऑस्ट्रियाची मदत या प्राणसंकटाच्यावेळी पोंचावयाची असेल तर ऑस्ट्रियाने पहिल्या धडकीसरशी रुमानियाचा उत्तरेकडील चिंचोळा भाग एकदम ताब्यात घेऊन डॅन्यूब नदीच्या तोंडावरचा काळया समुद्राचा पट्टा गिळून बसले पाहिजे. इतके जर ऑस्ट्रियास पहिल्या धडकीला करता आलें, तर बल्गेरियाशी संलग्न होऊन, सर्व्हियाला व इटलीला त्याच्या त्याच्या सरहद्दीवर नुसतें थोंपवून धरून, तुर्कांच्या मदतीस धावून जाता येणें ऑस्ट्रिया-जर्मनीस शक्य आहे, व याच लष्करी धोरणाच्या दृष्टीनें तेमेश्वरच्या दक्षिणेस बल्गेरियन सरहद्दीच्या शक्य तितक्या जवळ आणि ट्रान्सिल्व्हॅनिया व बोकोव्हिना येथें ऑस्ट्रिया जर्मनीचें मोठे सैन्य जमा झालें आहे व जमा होत आहे. डार्डनेलिसच्या सामुद्रधुनीवर तोफांचा भडिमार करून तुर्की साम्राज्य बेचिराख करण्याकरिता एक मोठी होळी बाल्कन प्रदेशात पेटविण्याच्या उद्योगास सुरवात झाली आहे. ह्या होळीमध्यें ग्रीस, इटली, बल्गेरिया, रुमानिया वगैरे राष्ट्रांच्या किती शेणी येऊन पडतात हें मार्च-एप्रिलमध्ये समजून येईल.

२०

---

# महायुद्धाचा मार्च-एप्रिल महिना

## डार्डानेलिसवर हल्ला

मार्च महिन्यात एक नवे महत्वाचें रणक्षेत्र दृग्गोचर झाले असून पुढील काही महिने हे रणक्षेत्र स्वतःच्या महत्त्वाने इतर रणक्षेत्राना मागे ढकलण्याचा सभव आहे. हें रणक्षेत्र म्हणजे डार्डानेलिसची सामुद्रधुनी होय. डार्डानेलिसची सामुद्रधुनी, मार्मोराचा समुद्र, बास्फोरसची सामुद्रधुनी व बास्फोरसच्या सामुद्रधुनीवर असलेलें तुर्कांच्या राजधानीचे कॉन्स्टाटिनोपल शहर इतकी व्याप्ति ह्या रणक्षेत्राची आहे. भूगोलचा हा भाग इतिहास दृष्टया अत्यत महत्त्वाचा आहे. आशिया व युरोप याचा हा साधा असून गेल्या हजार वर्षातील महत्त्वाच्या लढाया या केद्रस्थानाला अनुसरून घडून आलेल्या आहेत. किंबहुना साप्रतचे युरोपातील महायुद्ध हें या केद्रस्थानावर असलेल्या निरनिराळ्या युरोपियन राष्ट्राच्या वेडयावाकडया दृष्टयाचे फळच होय, असे म्हटलें तरी चालण्यासारखे आहे. रशियाला बाल्कन प्रदेशात सर्व्ह लोकाचे महत्त्व वाढवावयाचे आहे, यातील हेतु ज्ञातिविषयक व रक्तविषयक स्नेह हा तर खराच; पण त्याबरोबर कॉन्स्टाटिनोपलवर स्वतःची छाप बसवून स्वतःचे पजात तुर्की साम्राज्याला पकडून भूमध्य समुद्र व आरबी समुद्र ह्यावर स्वतःच्या सत्तेचा पसारा पसरविणे हाहि रूस लोकाचा अतिम उद्देश आहे. स्वतःचें कल्याण व स्वकीयाचे स्वास्थ्य असा मिलाफ रशियाचे धोरणात या युद्धात दिसून येत आहे. जी गोष्ट जर्मनीला जिंकून जर्मनीमार्फत मिळवावयाची, जी गोष्ट ऑस्ट्रियाचा पराभव करून हगारीला पायाखाली चिरडून सर्व्ह लोकाच्या जयदुदुभीनें जाहीर करावयाची, तीच गोष्ट जर्मनीचा हात मानेवर चढत असताना बगलेंत काहीं वेळ तो हात तसाच दाबून धरून, कार्पेथियनच्या पलिकडे हगारीवर पाय टाकण्याची पाळी आली असताना कार्पेथियन पर्वतावर न ठेचाळता पाय उचलला न उचलला अशाच पवित्र्यावर सुखानें उभें राहून, लढाऊ जहाजावरील तोफांच्या सहाय्यानें घडवून आणण्याच्या उद्योगास जर सुरुवात झाली, तर त्यात रशियास विशेष उल्हास कसा वाटणार नाहीं? डार्डानेलिसवरील हल्ल्यासबधानें रशियास जसा उल्हास वाटत आहे, तसाच उल्हास इंग्लडलाहि वाटत आहे. नवें

तीस लाख सैन्य इंग्लड तयार करीत आहे, पार्लमेंटातील सभासदापासून तों गिरण्यातील कामकऱ्यापर्यंत उच्चनीच सर्व स्थितींतील लोक अखेर जय मिळवूच मिळवू अशा निश्चयानें नव्या सैन्यात सामील होत आहेत, बदुका, तोफा, दारू-गोळा वगैरे सर्व लढाऊ सामान सर्वांना पुरविण्याचा बोजा इंग्लडनें स्वतःच्या मस्तकावर घेतला आहे, ह्या सर्व गोष्टी खऱ्या; तथापि एका बाबतींत इंग्लडचें एक मोठे न्यून ह्या युद्धात दृष्टीस पडलें असून ते इंग्लडच्या अतःकरणात डवचत आहे. आपण अशी कल्पना करू, की योग्यवेळी जर्मनीचा पुरा पराभव झाला व इंग्लड फ्रान्स याच्या इच्छेप्रमाणे सर्व गोष्टी घडून येऊन अखेर तह झाला, आणि या तहाचे पुण्य कोणाच्या हातावर सोडावयाचे ह्याची वाटाघाट सुरू झाली, तर अशावेळी रशिया म्हणणार, कोटीने मोजण्याजोगे माझे अवाढव्य सैन्य, पाण्याप्रमाणे रणभूमीवर रक्तहि बेपर्वाईनें खर्च करणारे माझे कोसॅक लढवय्ये, हाडा पिंडानी मजबूत, अल्पसंतोषी व झारच्या हुकमाची अम्मलबजावणी प्राणाहून प्रिय मानणारे रशियन शेतकरी, यानीं जर्मनीला धूळ चारली! रशियाचा जो जयोत्सव तोच फ्रान्सचा जयोत्सव, रशियाचा जो आनद तोच इंग्लडचा आनद, अशी या तीन राष्ट्राची दोस्ती आहे, ही गोष्ट खरी आहे. तरी पण जर्मनीचा कोंड-मारा करून त्याची अन्नान्नगत आम्हीं केली, सर्व जगाला पैसा व दारूगोळा आम्हीं पुरविला आणि प्रत्यक्ष रणभूमीवर तुमच्या क्रोडो लोकात आम्ही आमचे दहा वीस लाख लोक सोडून देण्यास कमी केले नाही, अशा प्रकारची प्रौढी रशिया व फ्रान्स याच्या जयोत्सवापुढे इंग्लडसारख्या विचारी राष्ट्राच्या मनाला फिकी वाटल्यावाचून रहाणारी नाही. वीराचा आनद व सावकाराचा आनद यातील भेद कोणाला समजणार नाही? ह्या महायुद्धात फ्रान्स-रशिया याची पाठराखीण इंग्लड आहे, स्वतः नवोढा नव्हे. हे न्यून गेले सहा महिने इंग्लडच्या हृदयास खात होते, आपण मागासलेले आहो या भावनेनें इंग्लडची उमेद अशतः खालीं जात होती, लॉर्ड किचनेरची नवी सेना पुढे कोणता लौकिक मिळवणार तो मिळवो, पण आज तर स्वतःच्या घरचे पाणी दुसऱ्याच्या ओंजळींत घालून तो पाणी पीत असताना दोस्तांच्या सुखसोहळ्यात आपणास सुख मानण्याची पाळी आली आहे, ह्या विचारानें इंग्लड अस्वस्थ झालेला होता. ही नाउमेद, हें डवचणें, ही अस्वस्थता काढून टाकतां येण्यासारखें महत्कृत्य करून दाखविण्याची स्फूर्ति इंग्लडच्या पुढाऱ्यात उत्पन्न

व्हावी, हे इंग्लंडच्या तेजस्वितेस साजेसेंच होय. इंग्लंडनें पाहिले, लीज, नामूर ॲंटवर्पसारखे बेल्जममधील किल्ले जर्मनीच्या नव्या तोफांनी हा हा म्हणता जमीनदोस्त केले. पायदळाबरोबर असलेला इंग्लंडचा तोफखाना जर्मनीशी तुलना करता पहिल्या सहामाहींत जरी दुय्यम दर्जाचा ठरला, तरी इंग्लंडच्या आरमारी तोफा जर्मनीहून अधिक श्रेष्ठ, असे पहिल्या सहामाहीत ठरले. इंग्लंडच्या ड्रेडनॉटेज जहाजावरील भयंकर तोफांचा प्रभाव कोठे दाखवावयाचा ? जर्मनीची लढाऊ जहाजे तर कील कॅनॉलमध्ये दडून बसलेली, इंग्लंडच्या आरमारी तोफांनी आपलें सामर्थ्य कोठें प्रकट करावें ? प्रत्यक्ष थोबाडीत लगावण्याचे श्रेय नुसत्या दंड थोपटण्याला मिळत नसते. शत्रूला भिवविणारा पुरुष वीर नव्हे असे नाही, पण शत्रूच्या छातीवर बसून शत्रूला नामशेष करणारा अधिक योग्यतेचा कार्यकर्ता होय. आणि दंड थोपटण्यानें आखाडा दणाणून सोडणाऱ्या पण कुस्ती खेळण्याची संधीच न मिळालेल्या पैलवानापेक्षा कुस्तीत प्रतिस्पर्ध्याच्या छातीवर बसणाऱ्या पैलवानाला पुढील पिढ्या अधिक पूजितात, गुरुला किंवा गुरुबंधूला नारळ मिळतात, आणि चारी मुंडे चीत करणाऱ्या पैलवानाला पुढे कित्येक वर्षे चरितार्थ चालेल इतके इनाम मिळतें. लॉर्ड किचनेर याची सेना जसजशी तयार होत चालली, तसतशी इंग्लंडची नाउमेदहि कमी होऊन इंग्लंडच्या नव्या प्रचंड महत्त्वाकांक्षेचा उजेड इंग्लंडच्या डोक्यात पडू लागला; महायुद्धांत इंग्लंडनें महत्कार्य तर केलेंच पाहिजे अशी जाणीव सर्व राष्ट्रभर खेळू लागली ! तुमच्या काय फ्रान्सच्या जिवावरच उड्या ना ? फ्रान्सच्या व रशियाच्या हाताला हात लावून जयाचा वाटा तुम्ही मागणार ना ? अशा तऱ्हेनें जर्मनीनें केलेला इंग्लंडचा उपहास इंग्लंडला साहजिकपणेंच सहन झाला नाही. उपहासानें चिडून जाऊन, आरमारी सामर्थ्यानें उत्तेजित होऊन व लॉर्ड किचनेर ह्याच्या नव्या सैन्यामुळे प्रसंग विशेषी स्वतःच्याच पायावर उभे राहण्याइतका दम उत्पन्न होऊन तुर्कांची राजधानी कॉन्स्टांटिनोपल हस्तगत करण्याचें प्रचंड साहस मार्च महिन्याच्या प्रारंभी इंग्लंडनें आरंभिलें ! भूगोलाच्या दृष्टीनें हें साहस श्रेष्ठ, इतिहासाच्या दृष्टीनें आशिया व युरोप दोन्ही खंडाचे रक्त तापविणारें हें साहस, रशियाच्या उत्साहाचे दृष्टीनें हे साहस सुखकर, आणि इंग्लंडच्या तेजोवर्धनामुळे हे साहस फारच उत्तेजक ! ह्या सर्व गोष्टी खऱ्या, पण अकालीं उत्तेजक पदार्थांचें सेवन तरी काय उपयोगाचें ? अस्थळीं आनंदानें नाचून

तरी कोणचें समाधान ? कालहि अनुकूल नाहीं, स्थळहि अनुकूल नाहीं, मग इतिहास व भूगोल याच्याशीं तरी मेळ कसा बसणार ? इंग्लंडला मागासलेला म्हणतात म्हणून कोठेतरी व केव्हातरी तरतर तरतर धांवून का दाखवावयाचें ! महायुद्धाला ज्या गोष्टी पोषक नाहीत अशा सुखसमाधानाच्या गोष्टीचा रशियावर वर्षाव करून रशियाला कसे आनंदित करावयाचें ? डार्डोनेलिसवरील हल्लयाचें साहस अशा प्रकारच्या अव्यवस्थित प्रकारचें नाही. महायुद्धाच्या मुख्य धोरणाला सोडून वहाणाऱ्या अहेतुक शौर्याचा फाजीलपणा या साहसाला शिवलेला नाही. रशियाचे मुख्य सेनापति ग्रँड ड्यूक निकोलस, फ्रान्सचे फील्ड मार्शल जनरल जोफ्रे, व इंग्लंडचे लॉर्ड किचनेर या त्रिवर्गासंबधानें अशी जगभर ख्याति कीं, जर्मनीचे सेनापति जसे नाचवतील तसे हे नाचणारे नसून स्वतःच्या लष्करी धोरणाच्या तंत्रानें जर्मनीला धावावयाला लावणारे हे धुरीण आहेत. पहिल्या सहामाहींत या धुरीणत्वाचा साक्षात्कार कोठें दृष्टीस पडला नाहीं. लॉर्ड किचनेरनी दहा लाख वीस लाख सैन्य उभें केले तरी ते काय करणार ? जर्मनी बेल्जममध्ये घुसला त्याला बेल्जममधून हाकून देणार इतकेंच ना ? कार्यभाग झाला, यश मिळाले, तरीं जर्मनीच्याच लष्करी धोरणाचे गतानुगतिकत्व लॉर्ड किचनेरच्या पदरात पडणार ना ? जनरल जोफ्रे यांनीं फ्रान्समधून जर्मनीला हाकलून लावलें तरी लष्करी धोरणात कल्पकता कुठे दिसून आली ? जर्मनीनें केलेले उलटे हे सुलटे करून दाखविणार ! उड्या त्याच, पेच तेच, तोंड मात्र निराळ्या दिशेकडे फिरलेले इतकेंच. कल्पकतेच्या दृष्टीनें बेल्जममधील, फ्रान्समधील किंवा पोलंडमधील त्रिवर्ग राष्ट्राचें लष्करी धोरण इतक्या तऱ्हेचें उष्टें होतें. जर्मनीच्या उष्टया पत्रावळी हे जर्मनीच्या तोंडाला पुसणार की काय ? असें वाटून लष्करी धोरणाच्या ध्येयाकडे साश्चर्य पाहू इच्छिणाऱ्याचे मनाचा हिरमोड आस्ते आस्ते होऊ लागला होता. पण डार्डोनेलिसकडील हल्लयाच्या सुरवातीनें नवीन कुतूहल उत्पन्न झालें असून लढवय्याच्या लष्करी साहसाकडे कौतुकानें सर्व दुनिया पाहू लागली आहे ! डार्डोनेलिसवरील हल्ला काळ देश व मनाचा उल्हास या तिन्ही दृष्टीनें यथाकाल, यथास्थल व यथास्तितपणा याच्या स्वरूपाचा आहे इतकेंच नव्हे तर लष्करी धोरणाच्या दृष्टीनें नवीनपणा ह्या हल्लयात असून साहसी व विचारी डोक्याची कल्पकता ह्या हल्लयात दृष्टीस पडत आहे ! बेल्जमकडील लढाईकडे तुम्ही पहा, फ्रान्समधील युद्ध ध्यानांत आणा, पोलंड-

मधील जलदीच्या झटापटी डोळयापुढे ठेवा, किंवा, कार्पेथियन पर्वतावरील लढा-लढी निरखा. या महायुद्धातील डावपेचाचे दुवे एकाला एक जुळवून त्याची जर साखळी बनविली, तर लष्करी धोरणाच्या हारातील मध्यमणीच हस्तगत करण्या-करिता हे साहस आहे हे तेव्हाच लक्षात येईल.

## डार्डानेलिसचें महत्त्व

इतिहास व भूगोल ह्या दोघाचीहि दृष्टि सोडून देऊन साम्प्रतच्या महायुद्धातील लष्करी धोरणाच्या व डावपेचाच्या दृष्टीने डार्डानेलिसचे महत्त्व कोणचे आहे, त्याचा विचार आता आपण करू. विजयाच्या महत्त्वाकाक्षेनें जर्मनीनें महायुद्धास सुरवात केली, स्वतःस जय अखेरीस कसा मिळेल ह्याची माडणी स्वतःच्या मनाशी कशी केली असेल, हे गेल्या सहामाहीच्या जर्मनीच्या लष्करी धोरणावरून दिसून येत आहे. युद्धाचे प्रारभी फ्रान्स, इग्लड व रशिया या तिन्ही राष्ट्राची लढण्याची तयारी असावी तशी नव्हती, किंबहुना, ह्या तीन राष्ट्रावर युद्धप्रसग आकस्मिक येऊन कोसळला असे म्हणण्यास हरकत नाही. रशियापाशी लढाऊ लोक असख्य, शौर्य अमर्यादित, पण, अर्वाचीन शास्त्र व आगगाडया याची मदत मर्यादित. फ्रान्सचे लोक शूर, आगगाडया विपुल आणि नवीन शास्त्राचे तेजहि प्रखर. इग्लड नवीन शास्त्रात मागे नाही, आरमारात अजिंक्य, द्रव्य साहाय्यास मर्यादा नाही, पण सेनेच्या बाबतीत मागासलेले. असल्या तीन राष्ट्रावर मिळून जर्मनीनें जय कसा मिळवावयाचा ? ह्या तीन राष्ट्राची साधनसत्ता अशा प्रकारची आहे, कीं रणभूमीवर तिघाचा जर पूर्ण मिलाफ झाला, तर मनुष्यबलाच्या दृष्टीनें, द्रव्यबलाच्या दृष्टीने व बुद्धिबलाच्या दृष्टीनें, कोणत्याच दृष्टीनें कोणताच दोष रणभूमीवर यत्किंचित्‌हि दृष्टीस पडणें शक्य नाहीं. जर दोष नाहीं तर अपजयहि नाहीं. अर्थात या तिघाचा योग्य मिलाफ झाल्यास, प्रारभीचे बेसावधपणाचे काही दिवस निघून गेल्यावर, अखेरचा जय या तिघासच मिळाला पाहिजे, असाच सिद्धात निघतो. या विचारसरणींत जर्मनीला जयाशेला जागा कोणती ? कोणच्या गोष्टीवर मदार ठेऊन जर्मनीनें स्वतःस अखेर जय मिळेल, अशी स्वतःच्या मनाची समजूत घालावी ? वरील विचारसरणींत एकच दुवा लुला आहे; तो जर्मनीला थोडी तरी आशा दाखवतो. तो दुबळा दुवा म्हणजे या तिघांचा रणभूमीवर पूर्ण मिलाफ झाला पाहिजे, हा होय. मिलाफ न होईल, तर जर्मनीला थोडीशी आशा

आहे. या ठिकाणीं मिलाफ होणें म्हणजे काय याचा अधिक खुलासा करणें जरूर आहे. ह्या तिन्ही राष्ट्रांचे उद्देश एकच आहेत, हीं तिन्ही राष्ट्रें एकमेकाशीं अत्यंत स्नेहभावानें वागत आहेत, माझें मनुष्यबळ मी तुला कसे देऊं अशी कोणी कुरकुर करीत नाहीं; एकाचें शास्त्रज्ञान मित्राच्या उपयोगी पाडण्यासाठीं प्रत्येक जण तयार आहे; आणि इंग्लंडनें आपल्या खजिन्याच्या किल्ल्या फ्रान्स व रशिया यांच्या हवाली केल्या असून रात्रीं अपरात्री ज्याला जे पाहिजे असेल त्यानें तें विनपरवागीनें घ्यावे, पण रणभूमीवर केसभरहि कमतरता दिसूं देऊं नये, असे मुक्तद्वार इंग्रजानी सुरू केलें आहे. इतका स्नेह, इतका स्वार्थत्याग क्वचित्च दृष्टीस पडतो. पण हा अंतःकरणाचा मिलाफ झाला. हे बुद्धीचें ऐक्य झालें. बुद्धीला जसजसे बरें वाटते त्याप्रमाणे अंतःकरणाला सहज प्रेरणा होते, पण त्याप्रमाणें शरीराचा मिलाफ सर्व रणभूमीवर पाहिजे तसा होऊं शकत नाही. हा इच्छेचा दुबळेपणा नव्हे, तर भूगोलाच्या परिस्थितीचा दोष आहे. रशियानें मनांत आणलें, की मजपाशी चाळीस पन्नास लाख लोकांना हत्यारें पात्यारें देऊन मोठें लष्कर सज्ज करून शिवाय चाळीस पन्नास लाख लोक फालतुक राहतात, या चाळीस पन्नास लाख फालतुक राहिलेल्या शिपायांचा मी कसा उपयोग करूं ? इंग्लंड व फ्रान्स यांनीं सांगितलें कीं, तुझ्या चाळीस पन्नास लाख फालतुक लोकांच्या हातांत आम्ही बंदुका देतों, जरूर तेवढा तोफखाना आम्हीं तुझ्याजवळ आणून उभा करतों, एक कोट सेनेचें धूड जर्मनीच्या अंगावर पडूं दे, पण हें घडवून कसे आणावयाचें ? रशियाच्याकडे पाठवावयाच्या तोफा बंदुका जपानच्या दिशेनें एकट्या सैबेरियन रेल्वेनें पोंचवाव्या लागतात. जी गोष्ट साहजिकरीत्या एक आठवड्यांत घडून यावयाची त्या गोष्टीला दोन अडीच महिने खर्च होतात ! फ्रान्सच्या सरहद्दीवरील आपलें मनुष्यबळ, बुद्धीबळ रशियाच्या सरहद्दीवर जर्मनीला दोन दिवसांत नेता येतें; आणि फ्रान्सच्या सरहद्दीवरील फ्रान्सचें मनुष्यबळ व बुद्धिबळ रशियाच्या सरहद्दीवर त्यांच्या गोटांत जर फ्रान्सला नेऊन सोडावयाचे असेल तर दोन महिने लागतात. हें तीस पटीचें अंतर फार हानीकारक असून, वरातीमागून जसें घोडें त्याप्रमाणें काल निघून गेल्यानंतर निष्फळ संयोग घडवून आणतें. सर्व रणक्षेत्राचा योग्य मिलाफ आपणांस करता येण्यासारखा आहे, आणि तसा इंग्लंड, फ्रान्स व रशिया ह्यांना करतां येण्यासारखा नाहीं, या एकाच पायावर जर्मनीच्या लष्करी धोरणाची सर्व इमारत उभारली असून, हा दोष काढून टाक-

ण्याच्या दृष्टीनें लॉर्ड किचनेर, जनरल जॉफ्रे व ग्रँड ड्युक निकोलस ह्याचे अटोकाट उद्योग चालू आहेत. गेल्या सहामाहीत हा दोष बराचसा कमी झाला आहे, व पुढील सहामाहींत हा दोष निर्मूल होऊन सामान्य जनालाहि इंग्लडच्याच बाजूचा जय निःशकपणें दृष्टीस पडू लगेल असे आताच तज्ञाना स्पष्ट दिसू लागले आहे. हे मिलाफाचे काम सुव्यवस्थित कसे करावयाचे? ह्याला दोन उपाय आहेत. लढाईची भरती व ओहटी सेनानायकानीं निरनिराळ्या रणक्षेत्रावर नजर ठेवून एका धोरणाने घडवून आणावयाची. बुद्धि व मन याची एकी असली म्हणजे हे काम सुलभ होतें आणि तसल्या एकीसबधाने यत्किंचित्‌हि सशय नाही. भरती व ओहटी केव्हा कोणी कशी आणावयाची ह्याच्या विचारासबधानें अडचण नाहीं. अडचण आहे ती एका रणक्षेत्रातील पाणी दुसऱ्या रणक्षेत्रात नेऊन खेळविण्यासबधाने. एका रणक्षेत्रातील पाण्याच्या हौदाला नळी लावून ती नळी दुसऱ्या रणक्षेत्रातील पाण्याच्या हौदात नेऊन सोडणें हा एक मार्ग, किंवा अशी जर नळी नेतां येत नसली तर प्रत्येक रणक्षेत्रात पाण्याचा साठाच एवढा अगडबब करून ठेवावयाचा, की भरतीसाठी शेजाऱ्याकडे पाणी मागण्याची जरुरीच राहू नये. गेले सहा महिने प्रत्येक रणक्षेत्रातील साठा भरपूर करण्याकडे इंग्लड, फ्रान्स व रशिया यानी चागलें लक्ष पुरविलें आहे. आणखी दोन तीन सहामाहीत असा चमत्कार दृष्टीस पडेल, की रणभूमीवर भरती ओहटीचे खेळ खेळण्याकरिता कोणाहि सेनानायकाला चातकाप्रमाणे शेजाऱ्याकडे पाहण्याची जरुरीच राहणार नाहीं. हा उद्योग चालू असतानाच दोन हौदाचा सयोग करणाऱ्या नळ्या घालण्याचाहि उद्योग पहिल्या सहा महिन्यात सुरू होताच, आणि तो उद्योग डार्डानेलिसवरील हल्ल्यामुळे शिखरास पोंचलेला आहे. पाण्याचें हें मूळचे दळणवळण कोणीं कसे तोडले, गेल्या सहामाहींत हें दळणवळण सुरू करण्याचें कोणचे उद्योग झाले, आणि इस्तबूल घेतल्यानें इष्टकार्य कसे तडीस जाणार आहे याचा आता आपण विचार करू.

## तुर्कांची ब्याद

रशियातलें पाणी फ्रान्समध्यें आणि फ्रान्सचें पाणी रशियामध्यें नेहमीं खेळत रहाण्यास महायुद्धात तुर्कांच्या ब्यादीची मोठी अडचण झाली आहे; आणि पहिल्या वर्षाच्या आतच महायुद्धाची परिसमाप्ति इंग्लडच्या बाजूची करावयाची असल्यास ही तुर्कांची आडकाठी समूळ काढून टाकणें लष्करी धोरणाच्या दृष्टीनें जरुरीचें

झाले आहे. रूस–फ्रान्स याचा मिलाफ लष्करी धोरणाच्या दृष्टीनें किती जरुरीचा आहे, याचा विचार केला म्हणजे डोळ्यात शिरलेल्या लहानशा खडयाप्रमाणें तरुण तुर्कांचे पुढारी एन्व्हरपाशा किती त्रासदायक झाले आहेत, हें तेव्हाच लक्षात येते. तरुण तुर्कांचा जर्मनीकडे असलेला ओढा रणभूमीवर लष्करी धोरणानें जितका विघातक झाला आहे, तितका विघातक क्रूपच्या कारखान्यातील नव्या प्रचड तोफाचा माराहि झालेला नाहीं. तरुण तुर्कांनीं जर तटस्थवृत्ति स्वीकारली असती तर रशियातले पाणी बास्फोरस व डार्डानेलिस या दोन सामुद्रधुनींच्या मार्गानें भूमध्य समुद्रात मजेनें खेळत राहिले असते. पूर्वीच्या तहनाम्याप्रमाणे डार्डानेलिसच्या सामुद्रधुनीतून रशियाच्या लढाऊ जहाजाना बाहेर पडता आलें नसते इतकेंच, पण भूमध्य समुद्रात रशियाच्या आरमाराची मदत कुणाला पाहिजे होती! पृथ्वीवरील सर्व समुद्रावर सत्ता गाजविण्याचें सामर्थ्य इंग्लडच्या आरमारात भरपूर आहे, ह्याकामी रशियाच्या आरमाराच्या मदतीची यत्किंचित्हि अपेक्षा नाहीं. पण तुर्क जर जर्मनीच्या बाजूचे झाले नसते, तर रशिया, इंग्लड व फ्रान्स याच्या व्यापारी जहाजानी रशियातील फालतूक सैन्य व फालतूक गहू फ्रान्सच्या किनाऱ्यावर आणून सोडला असता; आणि इंग्लड–फ्रान्समधील शास्त्रज्ञ, कारागिर, मोटार गाडया, विमाने, तोफा व दारूगोळा काळ्या समुद्रात पोचवून क्रूपच्या तोफाचा बागुलबोवा रशियास किमपीहि ठेवला नसता. हे दळणवळण तुर्कांनी मध्येंच तोडलें. खेळत्या पाण्याची ही नळी तोडण्याचे सामर्थ्य तुर्कांचे अगात कसे आलें ? इंग्लड, फ्रान्स व रशिया या तीन राष्ट्राच्या माऱ्यापुढे काही दिवस तरी आपण टिकाव धरू असला साहसी विश्वास तुर्कात कोणी उत्पन्न केला ? ज्या साहसामुळे तुर्कांची राजधानी कॉन्स्टाटिनोपल शहर तोफाच्या गोळ्यानी जमीनदोस्त होतें कीं काय अशी भीति आज सर्व मुसलमानाना वाटत आहे, ते आत्मघातकी साहस अगीकारण्यास तुर्कांना कोणी प्रवृत्त केलें ? गोबेन आणि ब्रॅसला या दोन जर्मन जहाजानी, ही दोन क्रुझरें इंग्रजी आरमाराचा डोळा चुकवून ज्या दिवशीं डार्डानेलिस सामुद्रधुनीतून आत शिरून तुर्की राजधानीच्या आश्रयास गेली त्या दिवशीं महायुद्धाच्या लष्करी धोरणाचें स्वरूप एकदम पालटले. एखादी लहान गोष्ट परिणामी किती अपायकारक होते, याचें ढळढळीत उदाहरण गोबेन व ब्रॅसला या जहाजावर नजर ठेवण्यात इंग्रजी आरमाराची झालेली चूक हें होय. ही चूक जर

झाली नसती तर तिसऱ्या सहामाहीत किंवा चौथ्या सहामाहीत जर्मनीस आम्हीं जेरीस आणू असे जे अदाज लष्करी तज्ज्ञाच्या तोडातून निघत आहेत त्याऐवजी तहाचे दिवस सहामाहीनी मोजण्यापेक्षा नुसत्या पधरवड्यानी किंवा महिन्यानी मोजण्याची वेळ आजची ठरली असती ! गोबेन आणि ब्रॅसला ही लढाऊ जहाजे मार्मोराच्या समुद्रात शिरण्याबरोबर तुर्कांनी डार्डानेलिसची सामुद्रधुनी बद केली व लगेच जर्मनीस मिळण्याचा अडदाडपणा त्याच्यात दिसू लागला ! गोबेन आणि ब्रॅसला यानी ही क्राति कशी घडवून आणली ? कॉन्स्टाटिनोपल सभोवारचे आपलें युरोपातील घरटे सुरक्षित रहाण्यास हरकत नाही असे या क्रूझरांमुळे तुर्कांना वाटले. या भ्रमाला आधार कोणचा ? महायुद्धात तुर्कांनी आपले कोणचे धोरण ठेवावे, ह्याचा नकाशा जर्मनीने आखलेला होता, व त्या नकाशातील भूल तुर्कांच्या अगावर चढण्यास गोबेन व ब्रॅसला हीं क्रूझरे कारणीभूत झाली. युद्धात सामील होणारे कोणचेहि राष्ट्र आपले लष्करी धोरण दोन दिशेने ठरवीत असते. पहिली दिशा अशी, की स्वतःचे घर सुरक्षित राहिले पाहिजे. स्वतःच्या घरास आग लागण्याचा सभव आहे, असे जरा जर वाटले तर कोणीहि लढाईच्या भानगडीत आपण होऊन पडत नाही. तुर्क स्वस्थपणानें आपण होऊन लढाईत पडले आहेत, त्याना इग्रजानी, फ्रेंचांनीं किंवा रूसानी यत्किंचित्हि त्रास दिलेला नाही, इतकेच नव्हे तर उलट त्याच्या कितीएक आगळिका सदय दृष्टीनें या तीन राष्ट्रानी पोटात घातल्या होत्या, हे या ठिकाणीं विसरता कामा नये. म्हणजे, तुर्क परेच्छेनें युद्धात पडले नसून स्वेच्छेनें युद्धात पडले आहेत. स्वेच्छेची क्रिया लोभाच्या आशेनें घडून येत असते, व त्याबरोबरच त्याचा बिघाडहि स्वेच्छेला खपत नसतो. तुर्कांना असे वाटले की आपल्या स्वास्थ्याचा बिघाड होणे शक्य नाही, आणि साधल्यास इजिप्तचा लोण्याचा गोळा गिळावयास सापडेल. तुर्कांचे सर्व लष्करी धोरण ह्या दोन गोष्टीभोवती फिरत राहाणार. आपल्या घरट्यास कोणी हात लावू शकणार नाही, आणि नाइल नदीच्या काठचा लुसलुशीत चारा आपणास मौजेने लुटावयास मिळणार. तुर्कांचे हे लष्करी धोरण जर्मनीच्या लष्करी धोरणाशी अगदी मिळते आहे. किंबहुना युरोप खडभर पसरलेल्या महायुद्धातील निरनिराळया रणभूमीत गेल्या महिन्यात जीं लष्करी धोरणें दृग्गोचर झाली त्या सर्वांचा योग्य हार गफता येण्यास तुर्कांचें लष्करी धोरण नेहमी डोळ्या-

पुढें ठेवलें पाहिजे. तुर्कांचें लष्करी धोरण जर्मनीच्या लष्करी धोरणाचा कळस असल्यामुळे, कळसावर अचल दृष्टि ठेवून मग पायाचे व इतर अवयवाचें निरीक्षण करूं लागले ह्मणजे निरनिराळया अवयवाच्या बांधेसूदपणाचे प्रमाण तेव्हांच ध्यानांत येते. चेहऱ्याची आखणी प्रथम नीट ध्यानांत ठेवा, म्हणजे मग पाय एवढाच कां मोठा, हात असाच कां, ह्याची प्रमाणें तेव्हांच सुचूं लागतात. तुर्कांचें घरटें जर सुरक्षित राहिले, त्याला कोणीहि जर शिवू शकला नाही, तर खुशाल अंदाज बांधावा की जर्मनीच्या पक्षाचे हात युरोपांतील महायुद्धांत लुले झाले नाहीत. तुर्कांनी जर इजिप्तवर हल्ला करून नाइल नदीवर सुखसंचार करण्यास आरंभ केला तर खुशाल अंदाज बांधावा, की, जर्मनीच्या पायांनी फ्रान्सच्या व रशियाच्या रणभूमीवर सपाटून धिंगाणा घातलेला आहे. रशियाच्या बाजूला व फ्रान्सच्या बाजूला दोन्ही पक्षांची बरोबरी असेतों तुर्कांचें घरटें सुरक्षित रहाणार ही तुर्कांची समजूत ह्या सर्व लष्करी धोरणाच्या डोलाऱ्याचा पाया होय. तीन बलाढ्य राष्ट्रांशी लढाई सुरू केली असतां आपलें घरटें सुरक्षित राहील असें तुर्कांना कां वाटावें? तुर्कांच्या घरट्याला कोण-कोणत्या मार्गांनी आग लावतां येणें शक्य आहे, ह्याची छाननी करूं लागलें ह्मणजे गोबेन व ब्रॅसला ह्यांच्या कॉन्स्टांटिनोपल येथील साक्षात्काराचें महत्त्व लक्षांत येतें. तुर्कांच्या घरट्याला पांच मार्गांनी आग लावतां येते. या पांच मार्गांत तीन मार्ग खुष्कीचे, व दोन मार्ग पाण्यातले. डार्डानेलिसच्या सामुद्रधुनींतून आंत शिरून इंग्रजी आरमार तुर्की राजधानीला होरपळून काढूं शकेल हा पहिला मार्ग झाला. डार्डानेलिसची आमची सामुद्रधुनी इतकी मजबूत आहे की, त्यावरील किल्ले इतके दुरुस्त केले आहेत की, आणि जर्मनीच्या नव्या तोफा या सामुद्रधुनीच्या सभोंवती इतक्या विपुल आणून ठेवल्या आहेत, कीं डार्डानेलिसची सामुद्रधुनी अभेद्य समजण्यास हरकत नाही, पहिल्या संकटाची विल्हेवाट तुर्कांनी ही अशी लावली. बरें, सामुद्रधुनी अभेद्य खरी पण भूमध्य समुद्र इंग्रजाच्या पूर्ण ताब्यांत आहे ना? मग जहाजांतून लाखो सेना आणून डार्डानेलिसच्या आसपासच्या तुर्की किनाऱ्यावर ती उतरून तुर्कांचा पराभव करून इंग्रजाचें व फ्रेंचाचें सैन्य इस्तंबूलचा किल्ला जमीनदोस्त कां करूं शकणार नाही? तुर्की राजधानीच्या नाशाचा हा दुसरा मार्ग होय. ह्याचा बंदोबस्त तुर्क कसा करणार? इंग्रजाची व फ्रेंचाची सेना तुर्की सेनेहून कितीतरी अधिक श्रेष्ठ दर्जाची. असल्या सैन्याकडून होणाऱ्या

मृत्यूचें निवारण कसे करणार ? या शकेचें निरसन तुर्कांनीं असे केलें कीं, जर्मनीचा पिच्छा जोंपर्यंत फ्रान्सच्या व इंग्लंडच्या मागे आहे तोंपर्यंत या भीतीला भीक घालण्याचे कारण नाही. घरट्यास आग लागण्याची तिसरी दिशा म्हणजे उत्तरेकडून सर्व्हियाचा व रशियाचा लोंढा तुर्कांच्या अंगावर येणे हा होय. पण हा लोंढा अंगावर येण्यास प्रथम हंगेरीला रशियानें चीत केले पाहिजे. हंगेरी चीत होईतो ह्या तिसऱ्या दरवाजाकडे आपणास पहाण्याची जरुरी नाही, असे ठरवून चौथ्या व पांचव्या मृत्युस्थानाचा तुर्कांनी विचार केला. ही दोन मृत्युस्थानें काळया समुद्राला धरून आहेत. काळया समुद्राच्या दक्षिण किनाऱ्याने चाल करून रशिया येऊं शकेल हे चौथे मृत्युस्थान होय. ह्या मार्गाने रशियाला सहज पावले टाकता येऊ नयेत म्हणून तुर्कांनीं प्रथम पासूनच काकेशियस पर्वताच्या बाजूला आपण होऊन रशियाच्या मुलुखात धुमाकूळ घालण्यास आरंभ केला. हेतु हा की, रशियाकडून येणारा ह्या बाजूचा मृत्यु टळावा. रशिया जोंपर्यंत जर्मनीशी निकरानें लढत आहे, तोंपर्यंत तुर्कांवर मोठे सैन्य पाठवू शकणार नाही हें खरे. पण काळ्या समुद्राच्या दक्षिण किनाऱ्यावर रशियानें लहान लहान सेनेच्या तुकड्या जरी उतरविल्या तरी देखील काकेशिअसमधील तुर्कांची बडाळी आपोआप गळून पडल्यावाचून रहाणार नाहीं. लहान लहान तुकड्यानीं अर्झरूमपासून तुर्कांची लष्करी पिछाडी तोडावयाची व चौथा मृत्यु टाळण्याचे तुर्कांचे उद्योग निष्फळ करावयाचे. या पेंचास उपाय काय ? हा चौथा पेच घालीत असताना चारपाच लाख सैन्य जर्मनीच्या रणभूमींतून काढण्याची जर रशियाला सवड मिळाली आणि तो पांच लाखाचा गोळा बास्फो-रसच्या सामुद्रधुनीच्या जवळ म्हणजे तुर्की राजधानीच्या प्रत्यक्ष अंगणातच जर रशियानें आणून उतरविला तर तुर्कांचें घरटे कुठे शिल्लक रहातें ? जर्मनीच्या युद्धात पांच सात लाख सैन्याची ही सवड रशियास मिळू शकणार नाहीं असें म्हणण्याचें धाडस कोणता तुर्की भ्रमिष्टहि करू शकेल ? अंगणातच हें मोठे सैन्य येऊन उतरावयाचें आहे व त्यामुळें आपल्या सर्वस्वाची होळी झाल्यावाचून राहाणार नाहीं हें न समजण्या इतकी बुद्धि अभिनिविष्ट तरुण तुर्कांतहि कोठें सापडेल असें वाटत नाहीं. मग ह्या पांचव्या मृत्युस्थानाचा बंदोबस्त तुर्कांनीं कसा केला ? हा पांचवा मृत्यु तुर्कांच्या अंगणात उतरणार तो काळ्या समुद्रातून चालत येऊन मग उतरणार ! काळ्या समुद्रावरून तरंगत आल्याशिवाय अंगण गाठण्यास त्याला दुसरा मार्ग

नाहीं. काळ्या समुद्राची सत्ता जर रशियाच्या हातांत पूर्णपणें राहाती तर महिन्या दोन महिन्यापूर्वींच तुर्की राजधानींतील हवेल्याच्या भिंतींनीं रूसच्या तोफांपुढे लोटांगणें घातलीं असतीं ! रशियन आरमाराला काळ्या समुद्रावर अव्याहत सत्ता न राहिल्यामुळे ह्या पाचव्या मृत्यूपासून तुर्क जीवत राहिले. ही अव्याहत सत्ता रुसाच्या हातची कशामुळे गेली ? गोबेन य ब्रॅसला हीं तुर्की आरमाराला मिळाल्या-बरोबर तुर्की आरमारहि काळ्या समुद्रावर सचार करू लागलें, आणि परवा परवां म्हणजे गोबेन जहाज नादुरुस्त होईपर्यंत तुर्कांचें–रूसचें दोघांचेंहि आरमार काळ्या समुद्रावर खेळत होते. जर्मनीच्या सर्व लष्करी धोरणाचें ध्येय तुर्कांशी सलग्न होऊन तुर्कांना बगलेत मारून इजिप्त व इराण येथे आपली सेना नेऊन सोडावयाची, हें होय. इंग्लड, फ्रान्स व रशिया याच्या लष्करी धोरणाचें ध्येय म्हणजे जर्मनीचा चोहों-बाजूनीं कोंडमारा प्रथम करून साधल्यास तडाक्यातडाक्यानीं जर्मनीस लोळवावयाचा किंवा निदान वेढ्याचे पाऊल आस्ते आस्ते आत चेपत नेऊन जर्मनीला दमात उखडून तडफडत मरूं द्यावयाचें ! इंग्रजी आरमारानीं समुद्रावरचे मार्ग बद केले व समुद्रावरच्या बाजूचा वेढा पक्का बसविला, इंग्रज व फ्रान्स यांच्या सैन्यानीं बेल्जम व फ्रान्स याच्या सरहद्दीवरील प्रांत भक्कम करून जर्मनीच्या पिच्छेहाटीस सुतोवाच करून दिलें. आता राहिल्या दोन बाजूः—एक रशियाची सरहद्द व दुसरी दक्षिणे-कडची तुर्कांची कटकट. गेले तीन महिने रशियाच्या सरहद्दीवर महत्त्वाच्या लढाया होत असून तुर्कांची कटकट जर महिना दीड महिन्यात अजिबात नाहींशी करतां आली तर जर्मनी सभोवतालचा वेढा पक्का होऊन इंग्रजी धोरण यशाचे मार्गाला बिनचूक लागलें असें म्हणता येईल. दोन धोरणाचीं ही ध्येये ध्यानात ठेविलीं म्हणजे रशियाच्या सरहद्दीवरील लढायाइतकीच किंबहुना काकणभर जास्तच अधिक किंमत डार्डानेलिसवरील हल्ल्याला आहे, हें तेव्हांच लक्षात येईल. डार्डा-नेलिसवरील हल्ल्याची महति वाचकाच्या लक्षात पूर्णपणें यावी म्हणून ही किंचित् लांबट प्रस्तावना करून मार्च महिन्यातील युद्धकथेकडे आता आपण वळू.

## डार्डानेलिसची अरुंद नरडी

मार्च महिन्याच्या प्रारभीं डार्डानेलिसवर इंग्रजी आरमाराचा हल्ला सुरू झाला तो हल्ला एप्रिलच्या प्रारभीं तसाच सुरू होता. फ्रान्स व इंग्लड या दोन देशाचीं मिळून पन्नास पाऊणशें जहाजें ह्या हल्ल्यात गुंतलीं असून एक महिन्याच्या अनुभ-

वाने डार्डानेलिसचा भेद करून मार्मोराच्या समुद्रात शिरण्याचें काम अशक्य नाही, असे ठरविण्यात आले आहे. पहिले पधरा दिवस तोडाचे किल्ले जमीनदोस्त करण्यात गेले; आणि पधरवडयाच्या अखेरीस डार्डानेलिसच्या सर्वात अरुद नरडीजवळ म्हणजे चेनाकच्या किल्ल्याजवळ जेथे डार्डानेलिसची रुदी फक्त एक मैलच आहे त्या जागेजवळ इग्रजी लढाऊ जहाजे जाऊन थडकली ! ह्या जागेपर्यंतच्या सर्व किल्ल्याना इतक्या अवधीत इग्रजी आरमारानें मुके बनविले व अरुद नरडीपर्यंतचे भागातील सुरुगहि काढून टाकण्यात आले. मार्चच्या तिसऱ्या आठवडयात अरुद नरडीच्या किल्ल्यावर ज्यावेळी " क्वीन एलिझाबेथ " जहाजावरील पधरा इची तोफातून एक टन वजनाच्या गोळ्याचा वर्षाव सुरू झाला त्यावेळी तर डार्डानेलिसचा भेद एकदोन आठवडयातच होणार अशी उत्कट जयाशा सर्वांना वाटू लागली. पण इतक्यात दोन नवीन विघ्ने दत्त म्हणून पुढे आली. पहिले विघ्न असे की, सुरुग जरी झाडून टाकण्यात आले तरी हालते सुरुग ह्मणजे पाण्याच्या ओघाप्रमाणे एका जागेवरून दुसऱ्या जागेवर वहात जाणारे सुरुग तुर्कांनी डार्डानिलिसमध्ये सोडून दिले. ह्या वहात्या सुरुगावर आपटून तीन मोठी लढाऊ जहाजे एकदोन प्रहरात सारीसिलरच्या उपसागरात म्हणजे अरुद नदीचे आसपास समुद्रात बुडाली. ह्या अपघातामुळे डार्डानेलिसच्या तोंडात शिरलेल्या आरमाराला पुनः बाहेर यावे लागले. दुसरी अडचण अशी, की सामुद्रधुनीच्या दोन्ही बाजूला समुद्रकाठावर रेल्वे असून आगगाडीच्या डब्यात मजबुतीने काही तोफा जर्मनानी बसवल्या असून हे धावते तोफखाने सामुद्रधुनीच्या दोन्ही किनाऱ्यावर भलत्याच ठिकाणी अवचित प्रकट होऊ लागले आहेत. मोठया ड्रेडनॉट जहाजानी सात मैलाच्या अतरावरून किल्ल्यावरील तोफखाने मुके ठरवावेत, आणि मग धाकटया जहाजानी दोन चार मैल आत शिरून सुरुग झाडण्याच्या कामास सुरुवात करावी तों आगगाडयावरचे हे धावते तोफखाने अवचित धाकटया जहाजावर तोफाचा भडिमार सुरू करतात; आणि मग सुरुग झाडण्याचें काम तसेच टाकून या आरमारी केरसुण्याना मागे परतावे लागतें. धावत्या तोफखान्याच्या जागा विमानानीं नीट टेहळून काढाव्या, त्या जागीं ड्रेडनॉटाचा मारा सुरू व्हावा, आणि पुनः केरसुण्यानीं पुढे सरकावे, इतक्यांत भलत्याच ठिकाणी पुनः नवे तोफखाने तयार होतात ! अशारीतीने सुरुग झाडण्याचें काम प्रारभीचे वेळेपेक्षा ह्या धावत्या तोफखान्यामुळे अधिक कठीण

झालें आहे. त्यांत धुक्याची मदत तुर्कांना होते. धुके पडले म्हणजे विमानांना काही दिसत नाही, आणि विमानाची आधळी कोशिंबीर झाली म्हणजे मोठ्या तोफाचा मारा फुकट जातो. अशा धुक्याच्या वेळी अर्धवट काळोखांत तुर्क पडलेले किल्ले दुरुस्त करतात, आणि धावत्या तोफखान्याच्या जागा बदलून टाकतात. धावते तोफखाने, वाहते सुरुग आणि धुक्यांचें वादळ ह्या तीन अडचणीमुळे एप्रिलच्या पहिल्या आठवड्यात डार्डानेलिसवरील हल्ल्याची स्थिति मार्चच्या पहिल्या आठवड्यातील स्थितीच्या पुढे गेली नाही. मार्चमधलें काम पुनः एप्रिल-मध्ये करावे लागणार आहे, आणि मार्चमधील अनुभवानें इंग्रजी आरमार अधिक हुषार झाले असल्यामुळे एक महिन्यानंतर मे महिन्याच्या पहिल्या आठवड्यांत वेताळ पुनः पूर्व स्थळावर येणार नाहीं, अशी सर्वांना खात्री वाटत आहे. मार्च महिन्यात लहान सहान जहाजाना थोडीशी इजा झाली, व तीन मोठीं जहाजे बुड-विलीं ही गोष्ट खरी, पण कामाच्या महतीच्या मानानें हे नुकसान काहीच नव्हे. दर महिन्यास इतके नुकसान सोसून तीन चार महिन्याच्या अखेरीस जर इंग्रजी आरमार कॉन्स्टांटिनोपल शहराजवळ गेले तर फारच अल्प किंमतीला योग्य सौदा ह्या आरमाराने पटविला असे तज्ज्ञ म्हणतील. इंग्रजी आरमार जसे डार्डानेलिसच्या तोंडावर तोफा रोखून बसले आहे त्याप्रमाणें बास्फोरसच्या तोंडावरहि रशियन आरमारानें तोफा रोखल्या आहेत. इंग्रजी आरमाराच्या तुलनेने रशियन आरमार फारच खालच्या प्रतीचे ठरते. अर्थात् त्या आरमारास बास्फोरसचा भेद करता येणे अधिक कठीण जाईल. बास्फोरसच्या सामुद्रधुनीवर तुर्कांनी चौदा इंची जर्मन तोफा आणून ठेवल्या आहेत. शिवाय ‘ क्वीन इलिझाबेथ ’ जहाजाप्रमाणें पधरा इंची तोफा रूसच्या आरमारावर नसल्यामुळे किल्ल्याच्या व आरमाराच्या लढाईंत इंग्रजी आरमाराइतके यश रशियन आरमाराला येणे शक्य नाहीं. बास्फोरसची सामुद्रधुनी फोडून आत शिरण्याकरिता रशियन आरमार बास्फोरसच्या तोंडाजवळ आले आहे, असें म्हणण्यापेक्षा बास्फोरसचें काळ्या समुद्राकडचे तोंड सुरुगानी म्हणा किंवा इतर साधनानी म्हणा बंद करण्याकरिता आले आहे असे म्हणणें अधिक सयुक्तिक होईल. काळ्या समुद्रावरील एका झटापटीत गोबेन क्रूझर दुखावलें गेले होते व कॉन्स्टांटिनोपलच्या गोदीत दुरुस्तीकरता आले होते. साप्रत हे क्रूझर कसेंबसें दुरुस्त झालें आहे. गोबेन दुरुस्त झाल्यामुळे तुर्की आरमार रशियन आरमाराशीं

हल्लानें लढण्याइतके जरी नाही, तरी रशियन आरमारास काळया समुद्रात हुल-कावण्या दाखवून खेळवीत ठेवण्याइतके समर्थ झालें आहे, आणि एका धावेसरशीं काळ्या समुद्रात पुन्हा शिरण्याचा तुर्की आरमाराचा उद्योग सुरू आहे. तुर्की आरमारास बास्फोरसच्या आत कोडून ठेवणे लष्करी धोरणाच्या दृष्टीने फार इष्ट असल्यानें बास्फोरसचा भेद करण्याकरिता रशियन आरमार बास्फोरसच्या तोंडाशीं उभे आहे असे म्हणण्यापेक्षा तुर्की आरमाराला बास्फोरसच्या समुद्रात कोडून ठेवण्याकरता उभे आहे, असे म्हणणेंच अधिक सयुक्तिक होईल. आपण अशी कल्पना करू कीं, एप्रिल महिन्यात इंग्रजी आरमाराने डार्डानेलिसच्या सामुद्रधुनीची अरुंद नरडी पुन्हा गाठली व मे महिन्याच्या अखेरीस मार्मोराच्या समुद्रात शिरण्याची तयारी इंग्रजी आरमाराची झाली. ही तयारी जरी झाली, तरी डार्डानेलिसची सामुद्रधुनी स्वतःच्या सेनेच्या हातात ठेवल्याशिवाय पुढे मार्मोराच्या समुद्रात सचार करून काय उपयोग ? म्हणजे, डार्डानेलिसच्या सामुद्रधुनीवर दोन चार लाख सैन्य उतरून ती सामुद्रधुनी सैन्यामार्फत कबजात घेण्याचें कामहि आरमाराच्या भडिमाराबरोबरच घडवून आणलें पाहिजे. महिना दीड महिन्यानी दोन तीन लाख सेना डार्डानेलिसच्या सामुद्रधुनीवर उतरू शकेल, पण मार्मोराच्या समुद्राच्या सभोंवतीं तुर्कांचे चारपाच लाख सैन्य आहे. तेव्हा इंग्रजानी पाच लाख सैन्य जरी आणून उतरविले, तरी खात्रीने जय येईल अशातला भाग नाहीं. दहा लाख सैन्य उतरविल्याशिवाय खात्रीचा जय नाही, आणि चार पाच लाख सैन्याहून एखाद्या महिन्यात अधिक मोठया सेनेची फ्रान्सच्या रणभूमींतून डार्डानेलिसच्या रणभूमीत बदली करणें लष्करी धोरणाच्या दृष्टीनें इष्ट नाहीं. डार्डानेलिसवर मार्चच्या प्रारभीं ज्यावेळीं हल्ला करण्यास सुरुवात केली, त्यावेळीं ताबडतोब ग्रीस व नतर एक दोन आठवडयानीं इटली महायुद्धात इंग्रजाच्या वतीनें सामील होतील असा अदाज होता. ग्रीसचे मुख्य प्रधान एम. व्हेनिझिलास हे तर महायुद्धाच्या प्रारभापासून इंग्रजाच्या तर्फेनें आहेत. बाल्कन युद्धाची उभारणी यानींच केली व बाल्कन युद्धात याच्याचमुळे मोठा जय मिळाला ! अशा कर्तबगारीच्या व बोलबाल्याच्या मुख्य प्रधानाने महायुद्धात सामील होण्याचें वचन दिल्यासारखेच होतें. सर्व ग्रीस राष्ट्र तुर्कांचे लचके तोडण्यास उत्सुक झालेलें होतें. इंग्रजी आरमारानें डार्डानेलिसच्या तोफावर भडिमार करा-

बयाचा, आणि ग्रीसनें तुर्की किनाऱ्यावर दोन चार लाख फौज उतरवून इस्तंबूलचा रस्ता धरावयाचा, असे सर्व काही ठाकठीक ठरल्यासरखे झाले होते. इतक्यात ग्रीसच्या राजानें मध्ये खो घातला! ग्रीसच्या राजाला जर्मनीच्या राजाची बहीण दिली असल्यामुळे बायकोच्या नादी लागून ग्रीसच्या महत्त्वाकांक्षेस त्यानें खाजगी नात्याच्या दडपणाखाली दडपले, आणि ग्रीस देशाला लढाइत सामील होऊ दिलें नाही. मुख्य प्रधान एम. व्हेनिजिलास यानीं आपल्या जागेचा राजीनामा दिला, तेव्हा राजानें नवीन प्रधानमंडळ नेमले! राजाचे म्हणणे असे, की आपण जर लढाईत इंग्रजाच्या वतीनें पडलो आणि तुर्कांवर चाल करून गेलों तर बल्गेरिया ग्रीसवर चाल करून येईल, आणि यश मिळायचे एका बाजूला राहून बाल्कन युद्धात मिळालेल्या सालोनिका बंदरावर पाणी सोडावे लागेल! कैसर बादशहाच्या बहिणीच्या नवऱ्याला असले सव्यापसव्य करीत बसण्याइतके नाते ग्रीस देशाचें इंग्लंडशी किंवा फ्रान्सशी नाही असे वाटण्यास त्यावेळी दुसरे एक कारण झालें. जर्मन सेनापति फॉन हिंडेनबर्ग यानी नेरू नदीवर व नीमेन नदीवर फारच मोठे जय मिळविले, अशा लब्याचवड्या खोट्या बातम्या जर्मनीनें मुद्दाम म्हणून त्यावेळी चोहोकडे पसरविल्या. पराचा कावळा करण्याची जर्मनीची युक्ति फ्रान्स, इंग्लंडसारख्या धुरीण देशाना आता कोठे समजूं लागली आहे. महायुद्धात रशिया असून नसल्यासारखाच आहे, रशिया इतका चेपला गेला आहे की जर बाल्कन राष्ट्रे त्याच्या वतीनें टुरटुर करू लागली तर रशियाचा लवकरच पुरा समाचार घेऊन खाली उतरणाऱ्या जर्मन सेनेच्या लोंढ्यापुढे ती हा हा म्हणता वाहून जातील, अशी भीति युरोपातील तटस्थ राष्ट्रात मार्चच्या पहिल्या तीन आठवड्यात जर्मनीनें पसरवून दिली. मार्चच्या चौथ्या आठवड्यात आस्ट्रियाचा प्रिजमिसल किल्ला पडून रशियाची अब्रू साफ धुतली गेली खरी पण, डार्डानेलिसवर हल्ला सुरू होण्याबरोबर लगेच ग्रीसनें व इटलीनें तुर्की राष्ट्रावर हल्ला चढविण्याचा संकेत वाया गेला. या संकेताची घडी मार्चच्या दुसऱ्या आठवड्यात जी बिघडली ती पुनः नीट बसण्यास दोन चार महिने तरी जावे लागतील, हें उघड आहे. एकदा हुकलें तें कायमचेच हुकले गेले नसले तरी दोन चार महिन्यापुरते तरी हुकलें यात संशय नाही. अर्थात्, डार्डानेलिसचा भेद करण्याचे काम फ्रान्स व इंग्लंड या जोडीलाच करावें लागेल, इतरांचें सहाय्य दोनचार महिने मिळणार नाहीं. या

जोडीला तर चारपाच लाखाहून अधिक सैन्य डार्डानेलिसच्या बाजूला झुकविण्याची सोय नाही. मग इस्तंबूल घेण्याचे काम तडीस कसे जाणार ? इंग्रजी आरमार हे काम अर्धेच सोडून देणार काय ? एकदा आरंभ केल्यावर जर इंग्रजांनी हे अर्धेच सोडून दिले, तर हात दाखवून अवलक्षण करून घेतल्यासारखे होऊन सर्व मुसलमानी मुलखांत इंग्रजी निशाणाची बेइज्जत होईल ! धिमा, चिकट इंग्रज बहाद्दर कधीही असली गोष्ट करणार नाहीं, ऑस्ट्रियाचा प्रिजमिसलचा किल्ला पडलेला आहे, आणि नेरू नदीवरील जर्मनीची धडकीहि थडावली आहे. हंगारीला थप्पड लगावण्याइतकें नवे सामर्थ्य रशियाच्या अंगांत उत्पन्न झाले आहे. अशा वेळी हंगारीवर उगारलेला हात थोडकासा आवरून धरून पांच सात लाख सैन्याची बदली कार्पेथियन पर्वताच्या बाजूकडून बास्फोरसच्या सामुद्रधुनीकडे करण्यास रशियास सवड आहे. इंग्लंड, फ्रान्सचे चारपांच लाख सैन्य एका बाजूनें व दुसऱ्या बाजूने रशियाचे पांचसात लाख ! असा हल्ला सुरू झाल्यावर तुर्कांची आतडी केव्हांच बाहेर पडतील. पण हे पांचसात लाख रशियाने बास्फोरसच्या सामुद्रधुनीवर उतरावयाचे कसे ? प्रथम रशियाची काळ्या समुद्रावर पूर्ण सत्ता स्थापिली गेली पाहिजे, दुरुस्त झालेले गोबेन काळ्या समुद्रात ढवळाढवळ करूं शकत नाही हे अगोदर सिद्ध झाले पाहिजे, आणि रशियन आरमार जे बास्फोरसच्या तोंडाजवळ आले आहे, ते गोबेन प्रकरणाचा कायमचा निकाल करून टाकण्याकरताच आले आहे ! तुर्कांची राजधानी कॉन्स्टांटिनोपल शहर घेऊन तुर्कांना जमीनदोस्त करून दक्षिणेकडून ऑस्ट्रिया–हंगारीला तंबी देण्याचा जो साहसी उद्योग इंग्लंड, फ्रान्स व रशियानें आरंभला आहे, तो आस्ते आस्ते फळास यावयाचा असून एप्रिल महिन्यात जर रशियन आरमाराला तुर्की आरमार मार्मोराच्या समुद्रात कोंडतां आले किंवा काळ्या समुद्रांत बुडविता आले, तरच या युद्धास व्यवस्थित स्वरूप येणारे आहे. तेव्हां एप्रिल महिन्यांत तुर्की आरमाराच्या व रूसच्या आरमाराच्या होणाऱ्या झटापटी आणि डार्डानेलिसच्या अरुंद नरडींत शिरण्याची इंग्रजी आरमाराकडून होणारी खटपट ह्याकडे वाचकांनी नीट लक्ष पोंचवून लष्करी धोरणाच्या ज्या हाराचा मध्यमणी डार्डानेलिसची सामुद्रधुनी साम्प्रत होऊन बसली आहे, त्या हाराच्या इतर पुष्पाकडे आतां आपण वळूं.

## प्रिजमिसल पडलें !

डार्डानेलिसच्या सामुद्रधुनीवरील हल्ल्याचा महायुद्धातील सर्व रणक्षेत्राशी निकट

संबंध आहे, हे तर खरेंच; पण, त्यातल्यात्यात कार्पेथियन पर्वताच्या बाजूनें रशिया हंगारीवर करीत असलेल्या स्वारीचा हा एक प्रमुख भागच आहे असे म्हणण्यास हरकत नाही. महायुद्धाच्या अगदीं प्रारंभी रशियानें गॅलिशियावर हल्ला करून कार्पेथियन पर्वत ओलांडून हंगारींत उतरण्याचा प्रयत्न केला, व तोच प्रयत्न पहिल्या सहामाहींत मागेंपुढें हेलकावे खात खात मार्च महिन्यांत सफल होऊं लागण्याच्या मार्गाला लागला. ह्या प्रयत्नाला अडथळे दोन, एक तुर्कांचा अडथळा व एक जर्मनांचा अडथळा. तुर्कांनीं कॉकेशियसच्या जिल्ह्यावर स्वारी केल्यामुळें रशियाला तिकडे थोडेसें लक्ष पुरवावें लागलें. डिसेंबर–जानेवारी महिन्यांत रशियानें साराकामिस येथें तुर्की सेनेचा पुरा पराभव केला, आणि साराकामिसवरून अर्झरूमवर उतरून काळ्या समुद्राच्या दक्षिण किनाऱ्यानें रशिया इस्तंबूलवर चाल करणार अशी चिन्हें त्यावेळीं दिसूं लागलीं. रशियाच्या या स्वारीस मदत व्हावी म्हणून इराणी आखातांतून युफ्रेटीस व तैग्रीस नद्यांच्या मुखांनीं वर चढून बसरा व खुलना हीं ठाणीं घेऊन बगदादपर्यंत मुलुख मारण्याचा उद्योग इंग्रजांनीं त्याच सुमारास आरंभला. पण पोलंडवरील जर्मनांच्या निकराच्या हल्ल्यामुळें काकेशिअस पर्वताच्या बाजूला रशियाला मोठें सैन्य पाठवितां आलें नाहीं; आणि त्यामुळें साराकामिस व अर्झरूम ह्या टापूंतच तुर्क व रूस घुटमळत राहिले आहेत. ह्या ढिलाईचा परिणाम असा झाला आहे कीं, तुर्की सरहद्दीला लागून असलेल्या इराणच्या सरहद्दींतील कुर्द लोकांना फावलें असून त्यांनीं तेथील मिशनरी लोकांची लुटालूट करण्यास आरंभ केला आहे. वायव्य इराणांतील हे बेबंदशाहीचे वारे कुर्ना व बसरा यांच्या दक्षिणेकडील टापूंतहि खालीं उतरलें असून युफ्रेटीस तैग्रीस नद्यांच्या मुखाच्या दक्षिणेकडील कांहीं जातींनीं बंडाळी करून दहा पांच हजारांच्या टोळ्या वैस व आबाज या ठिकाणीं गोळा केल्या. लगेच इंग्रजी फौजेनें तो जमाव मोडण्याचा प्रयत्न केला. पण बंडाळीचें वारें चोहोंकडे फाजील पसरलें असल्यामुळें व्यवस्थित स्वरूपाचीच स्वारी ह्या बंडखोरांवर करण्याची जरुरी मार्चच्या दुसऱ्या आठवड्यांत दिसूं लागली. हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीवर टोंकी दरीच्या आसपास जसा पांच दहा हजार पठाणांनीं पुंडावा करण्याकरितां जमाव परवां केला होता व त्यांना त्यांची सीमा उल्लंघन करूं न देण्याइतकें कह्यांत ठेवण्यापलीकडे जसें अधिक शासन करण्यांत आलें नाहीं तशाच प्रकारची ही इराणी पुंडाव्याची कथा आहे. ह्या क्षुल्लक

रणक्षेत्रात पुडाव्याविंडाव्याचें घोंगडें तसेंच भिजत टाकून 'मूले कुठारः' या न्यायानें तुर्कांच्या राजधानीच्याच मागें इंग्रज व रूस सांप्रत लागले आहेत. रशियाची हंगारीवर जी स्वारी होत आहे त्या स्वारीस कॉन्स्टाटिनोपलचें हें प्रकरण फारच उपयोगी पडणारें आहे. त्या स्वारीस होणारा तुर्कांचा अडथळा इस्तंबूलबरोबरच विलयास जाईल हें उघड आहे. तथापि, जर्मनी–ऑस्ट्रियाचा अडथळा शिल्लक राहिला. कार्पेथियन ओलांडून रशियास हंगेरींत उतरता येऊं नये, म्हणून तर जर्मनीनें पोलंडवर निकराचा हल्ला केला. आणि वार्सॉच्या जवळ तळ दिला.वार्सॉवर निकराचे हल्ले चढूं लागले तरी रशियानें तेथेंच जर्मनीला थोपवून धरून कार्पेथियन-वरील आपली मगरमिठी सोडली नाही ! ही मगरमिठी सुटावी म्हणून फेब्रुवारी महिन्यांत ईस्ट प्रशियाच्या बाजूनें जर्मनीनें नीमेन नदी व नेरू नदी ह्या टाएवर रशियावर आकस्मिक हल्ले केले व मार्च महिन्यांतहि नेरू नदीवरचा आपला हल्ला जोरानें पुढें ढकलण्याचा प्रयत्न केला. जर्मनीला आशा होती, कीं निमेन व नेरू नदीवरील लढायांत ज्या योगानें युद्धाचा निकाल लागेल असला विजय आतां संपादूं ! पण रशियाचा दम व चिकाटी त्याचा साक्षात्कार होण्यापलीकडे निकालाचें यश जर्मनीच्या पदरांत पडलें नाहीं फेब्रुवारी व मार्च महिन्यांत रशियाला निमेन नदीवर मागें हटावें लागलें, लाख सव्वा लाख सेनेची खराबी झाली, शेंदोनशें तोफा जर्मनीच्या हातीं लागल्या, तरी पण, जर्मनीस थोपवून धरतां येणें शक्य झालें नाहीं. मार्चच्या दुसऱ्या पंधरवड्यांत वार्सॉच्या उत्तरेस म्हणजे नेरू नदीवर फारच निकराची लढाई किंबहुना सोक्षमोक्ष करून घेण्याच्या इरेद्याची लढाई जर्मनीनें सुरू केली असून दोन तीन आठवडे झाले तरी अद्याप त्या लढाईचा निकाल लागलेला नाहीं. इतका उशीर लागल्यानंतर वार्सॉच्या उत्तरेकडून रशियाची फळी जर्मनी फोडूं शकेल, असें मानण्यास कांहींच कारण नाहीं उलट ईस्ट प्रशियाच्या पूर्वेस म्हणजे निमेन नदीच्या पश्चिमेस सुवाल्की प्रांतांत मार्च अखेरीस रशियानें जर्मनीवर उलट स्वारी करण्यास आरंभ केला आहे, आणि ह्या स्वारींत जर रशियाला जय मिळाला तर नेरू नदीवरील जर्मनीचा जोर आपोआपच कमकुवत होईल, हें उघड आहे. नीमेनच्या पश्चिमेकडील लढाईंत जर्मनी जोरकस राहूं नये म्हणून ईस्ट प्रशियाचें सर्वांत उत्तरेकडचें ठाणें जें मिमेल शहर त्यावर हल्ला करून रशियानें तें ताब्यांत घेतलें, पण मार्च अखेरीस तें शहर जर्मनीनें पुन्हा हस्तगत केलें असून निमेनच्या

उत्तरेस लीबोच्या दिशेनें रशियावर उलट स्वारी केली आहे. लीबो बंदरहि तोफांच्या गोळयाखाली बडवून काढण्याचा उद्योग जर्मन आरमारानें आरंभला आहे. लष्करी धोरणाच्या दृष्टीने निमेन नदीच्या पश्चिमेस व निमेन नदीच्या उत्तरेस चाललेल्या ह्या झटापटींना विशेष किंमत नाही. ह्या ठिकाणी रशियास पाच पचवीस मैल मार्गे हटावे लागले तरी विशेषशी पर्वा नाही. वार्साच्या उत्तरेस नेरू नदीवर चाललेली लढाई ही मात्र महत्त्वाची आहे. ह्या लढाईत जर्मनीला यश येऊन जर वार्सा शहर जर्मनीच्या हातात गेले तर मात्र कार्पेथियनवरील रशियाची मगरमिठी ढिली पडण्याचा संभव आहे. वार्सा शहर किंवा सर्व पोलंड देश ह्याला जे आज लष्करी दृष्टीनें महत्त्व प्राप्त झाले आहे ते महत्त्व पोलंड देश रशियाच्या हातचा जातो म्हणून नव्हे. कारण पोलंडसारखा आणखी एखादा देश जरी वार्साच्या पूर्वेस जर्मनीनें हिसकावून घेतला, तरी जर्मनीशी कित्येक वर्षे टक्कर देतच राहण्याचे रशियाचे पूर्ण सामर्थ्य बिलकुल कमी होत नाही! वार्साला रशिया जपतो याचे कारण इतकेच की, वार्सा व दक्षिण पोलंड जर जर्मनीच्या ताब्यात जाईल तर कार्पेथियन पर्वतावरील रशियाचा हल्ला मागे परतावा लागून हंगेरीच्या नरडीस नख लावण्याची रशियाची महत्त्वाकांक्षा फोल होईल. कार्पेथियन पर्वतावरील आपला हल्ला रशियाने गेल्या आठ महिन्यात केव्हाच पडू दिला नाही, उलट मार्च अखेरीस या हल्लयात रशियाचे पाऊल पुढे पडू लागले आहे. निमेन नदीवर माघार घ्यावी लागत असताहि नेरू नदीवर दोन तीन आठवडे निकराची लढाई लढत असतानाच, कार्पेथियन वरील हल्लयात रशियाचे पाऊल तसे पुढे पडले. मार्चच्या तिसऱ्या आठड्यात रशियाला कार्पेथियनच्या बाजूला एक मोठा विजय मिळाला. हा विजय म्हणजे प्रिजमिसलचा किल्ला पडला हा होय. या प्रिजमिसलच्या किल्लयाला रशियाने सहा महिने वेढा दिला होता व सुमारे दीड लाख लोक या वेढयात गुन्तले होते. हा किल्ला पडल्याने सव्वा लाख ऑस्ट्रियन सैन्य रशियास कैद करतां आले असून वेढयात गुतलेले दीड लाख सैन्य युझाक व डुक्ला घाटाच्या मार्गाने हंगारीत उतरण्याकरिता पुढे सरसावले आहे! वार्साच्या उत्तरेकडील नेरू नदीवरील रणकंदनाइतकेच महत्त्व डुक्ला व युझाक घाटाच्या रणकंदनास आहे. हीं रणकंदने एकमेकावर पूर्णपणे अवलंबून आहेत. जर्मनीस जर नेरू नदीवर जय मिळाला, तर युझाक घाटावरील रशियाचा तडाखा कमजोर होईल; आणि नेरू

नदीवर जर जर्मनीची पिछेहाट रशियास करता आली तर सोसाटयाच्या वाऱ्याप्रमाणें रशिया हंगारीत धमाकूळ उडवील! हंगारीवरील हे संकट ओळखून जर्मनीनें मार्च अखेरीस व एप्रिलच्या आरंभी नेरू नदीवर आपली पराकाष्ठा करण्याकरिता उद्योग आरंभला आहे, आणि खुद्द हंगारीतहि जर्मन सेनेची कुमक रात्रंदिवस येऊन पोंचत आहे. खुद्द हंगेरियाहि प्रिजमिसल पडल्यामुळे ओढवलेल्या संकटाचें महत्त्व ओळखून स्वतःचा बचाव करण्याच्या मार्गाला आहे. गॅलिशियामध्ये रशियावर हंगेरिया स्वारी करीत होता, पण, प्रिजमिसल पडल्याबरोबर या स्वारीचा नाद सोडून हंगेरियाने माघार घेतली, आणि कार्पेथियन पर्वतात रशियाला अडवून धरण्यापलीकडे दुसरे तिसरे कांही न करण्याचा हंगेरियाचा सांप्रत बेत दिसत आहे. गॅलिशियात रशियाला उलट तंबी देता येणे हंगेरियास जरी सांप्रत शक्य नसले तरी बुकोव्हिनाच्या पूर्वेस बेसारेबिया नावाच्या रशियाच्या मुलुखावर हंगेरियानें स्वारी केली असून कार्पेथियनकडील रशियाचें सैन्य त्या बाजूस आकर्षण करून घेण्याचा हंगेरियाचा मतलब दिसतो. एप्रिलच्या पहिल्या आठवड्यात बेसारेबियावरील हंगेरियाच्या स्वारीस रशियाने मर्यादित केल्याची बातमी आली असून त्या बाजूनें रशियास आता विशेषशी भीति राहिली नाही, अशी चिन्हे दिसत आहेत. तथापि, लष्करी धोरणाच्या दृष्टीने विचार करिता एप्रिल महिन्यात बेसारेबियाचे रणक्षेत्र विशेष जाज्वल्य करण्यास जर्मन चुकणार नाहीत, असा रंग दिसतो. कारण, कार्पेथियनमध्ये रशियाला नुसते अडविण्याचे काम जर हंगारीने व जर्मनीने केले तर आजचें मरण उद्यावर ढकलण्याचे पलिकडे दुसरा तिसरा कांहीच फायदा जर्मनीस मिळणार नाही. एप्रिल प्रारंभाला तीन दिवस जर्मनी, ऑस्ट्रिया व हंगारी येथील आगगाड्या सामान्य जनसमूहाला बंद करण्यात आल्या होत्या आणि जर्मनीतून मोठें लष्कर हंगेरियात आणण्याचे काम रात्रंदिवस चालू होतें. आगगाड्याच्या जोरावर शत्रूच्या बिन तयारीच्या जागी मोठे लष्कर अवचित अदळावयाचें, हीच काय ती जर्मन सेनापति फॉन हिंडेनबर्ग याची युक्ति. या युक्तीकडे लक्ष देता निमेन नदी प्रमाणे बेसारेबियात अवचित लढाई नेऊन घालण्यास ते चुकणार नाहीत, असा सहज अंदाज निघतो. ह्या अंदाजास लष्करी दृष्टीचें आणखीहि पाठबळ आहे. बेसारेबिया जिल्हा जर जर्मनीला व्यापता आला, आणि डन्यूब नदीचे तोंड व थोडेसा बंदर यामधील काळ्या समुद्राच्या किनाऱ्याचा कोणताहि भाग जर स्वतःच्या

कब्जांत घेतां आला, तर वार्सा घेण्याच्या दुप्पट पुण्य जर्मनीच्या पदरांत पडणारें आहे. वार्सा घेतल्याने ज्याप्रमाणें कार्पेथियन पर्वतावरील रशियाचा हल्ला ढिला पडेल त्याप्रमाणे काळा समुद्र गाठल्यानेहि पाणबुडया बोटींच्या जोरावर तुर्कांची राजधानी कॉन्स्टांटिनोपल शहराशी सलग्न होण्याचे श्रेय जर्मनीला मिळणार आहे. म्हणजे सर्व्हिया जिंकून जे फळ मिळणार नाही ते फळ बेसारेबिया जिंकल्याने मिळणारे आहे. वार्सा आणि सर्व्हिया या दोहोंच्या इतकी किंमत एकट्या बेसारेबियाला सांप्रत प्राप्त झाली आहे. वार्सा घेण्याचे जर्मनीचे उद्योग ढिले पडतील, सर्व्हियावर एप्रिलमध्ये ऑस्ट्रिया-हंगारीचा हल्ला होणार नाही, आणि कार्पेथियन पर्वतावर रशियाला अडवण्यापलीकडे इतर उद्योग न करता जर्मन, ऑस्ट्रियन व हंगेरियन सैन्याचा सर्व ओघ बेसारेबियाच्या बाजूला वहात राहील असा रंग दिसत आहे ! कारण, काळा समुद्र जर गाठता आला तरच कार्पेथियन पर्वत व डार्डानेलिसची सामुद्रधुनी ह्या दोन रणभूमीच्या कात्रीतून काही काळ निसटून जाणे हंगारीस शक्य आहे.

## नौकापेलीचा विजय

पोलंड, कार्पेथियन पर्वत व डार्डानेलिसची सामुद्रधुनी या पूर्वेकडील रणक्षेत्रावरून दृष्टि फिरवून पश्चिमेकडे वळविली म्हणजे तेथे सामान्यतः गेल्या तीन महिन्यात विशेष गोष्ट घडून आली नाही, असे दिसून येईल. ता. १८ फेब्रुवारीस फ्रान्स व इंग्लंड सभोंवती पाणबुड्याचा वेढा दिल्याचा जाहीरनामा जर्मनीने जाहीर केला. पण, तेव्हापासून सहा आठवड्याचा हिशोब पहाता असे दिसून येते की, रोज नेहमी इतक्या मालाच्या बोटी इंग्लंडच्या किनाऱ्यावर येतात व किनारा सोडून जातात. जर्मन चाच्यांना एखाद दुसरीच मालाची बोट काय ती बळी पडते. जर्मनीच्या चाचेगिरीपेक्षा इंग्लंडच्या लोकाचे दारूचे व्यसनच या महायुद्धात इंग्लंडला अधिक अपायकारक झालें आहे. नव्या तोफा, नव्या बंदुका, नवा दारूगोळा व शिपायांना आणि खलाशांना बूट पाटलोणीसकट लागणारे सर्व नवे सामान तयार करता करता इंग्लंडचा जीव बेजार झाला आहे. ' खिळ्याकरता नाल जातो, नालाकरिता घोडा जातो, घोड्याकरिता स्वार जातो, आणि स्वाराकरिता लढाई जाते ' या न्यायानें लढाईचे लहान मोठे खिळे वेळेवर तयार न होऊन आपण विजयास पराङ्मुख होतो की काय अशी भीति इंग्लंडच्या मुत्सद्यांना पडली आहे.

युद्ध सामुग्रीचे कारखाने नीट चालावेत म्हणून लागेल तितका पैसा खर्च करण्यास इंग्लंड तयार आहे आणि पाहिजेत ते कारखाने प्रसंग विशेषी स्वतःचे हातांत घेऊन पाहिजे तसे चालविण्याचा अधिकारहि प्रधानमंडळास पार्लमेंटने नुकताच दिला आहे. पण इंग्लंडच्या मुत्सद्यास सांप्रत जी अडचण वाटत आहे, ती भरपूर कच्चा मालाबद्दल नव्हे, भरपूर यंत्रसामुग्रीबद्दल नव्हे, किंवा शास्त्रज्ञ कामगाराबद्दल नव्हे, तर लहानापासून थोराच्या दारूच्या व्यसनाबद्दल ! दारूच्या नादी हे लोक इतके लागले आहेत, की ठरावीक कामाबाहेर अधिक श्रम ह्यांच्या हातून होत नाहीत, आणि कायद्याच्या बळजबरीने यांना काम करावयास बसवावे, तर विनायक बनविता बनविता दारू पिऊन वानर घडवून ठेवतात ! हे दारूचे व्यसन लोकांनी सोडावे म्हणून बादशहा पंचम जॉर्ज यांनी स्वतः दारू सोडली असून सर्व सेनानायकांनी व मुत्सद्दी मंडळाने स्वतःच्या उदाहरणानें लोकांना तसाच कित्ता घालून देण्याचा उपक्रम केला आहे. गेल्या महिन्यात इंग्लंडला असा अनुभव आलेला आहे की, दारूगोळा जर भरपूर जवळ असला तर जर्मनीची फळी फोडण्यास विशेषशी अडचण पडणार नाही. या दारूगोळ्याचा पुरवठा मात्र कल्पनेबाहेर अतिशय मोठा लागतो. आरास आणि लिली यांच्यामधल्या टापूंत लाबासीच्या वायव्येस चारपांच मैलांवर असलेल्या नौचापेली खेड्याजवळ मार्च महिन्यात इंग्रजानीं जर्मन सेनेवर एक मोठा विजय मिळविला. हा विजय फार महत्त्वाचा आहे. जर्मनीला फार मागे रेटून नेले किंवा जर्मनीच्या बऱ्याच तोफा काबीज केल्या, असल्या दृष्टीने ह्या विजयाचे महत्त्व मापावयाचे नसून तोफखान्याच्या जोरावर इंग्रजांना जर्मनीचा चक्रव्यूह एका खेड्यापुरता तरी फोडता आला, ह्या दृष्टीनेंच या विजयाकडे पहावयाचे आहे. नौच्यापेलीच्या खेड्याच्या आसपासच्या जर्मन चरावर इंग्रज तोफांनी असा कांहीं विलक्षण भडिमार केला, की सर्व जागा धरणीकंपाने हादरून जावी त्याप्रमाणें हादरून गेली ! अर्थात् चर सोडून धादली धादलीनें जर्मनांना बाहेर यावे लागले, आणि तशा त्यांच्या भांबावलेल्या स्थितींत इंग्रजी पायदळानें एकदम त्यांच्यावर चाल केली, आणि नौचापेलीचे खेडे व आसपासचे चर हस्तगत केले ! नौचापेलीच्या या विजयानें असे सिद्ध झाले आहे कीं, नव्या इंग्रजी तोफा व नवा इंग्रजी दारूगोळा जर्मन तोफांहून व दारूगोळ्याहून सरस असून युद्धसामुग्रीचा भरपूर पुरवठा मिळाल्यावर बेल्जममधून जर्मनांना

हुसकावून लावण्यास फारशी हरकत येणार नाहीं. आता हरकत उरली आहे काय ती मद्यपि इग्रजाच्या व्यसनाची! गोळीबाराची दारू पाहिजे असेल तर प्यावयाची सोडली पाहिजे, आणि प्यायची दारू पाहिजे असेल तर गोळीबाराच्या दारूला मुकून त्याबरोबरच साम्राज्यसत्तेलाही मुकलें पाहिजे! जर्मनाचा चक्रव्यूह अभेद्य नाहीं, असा अनुभव नौचापेलीच्या लढाईत ज्याप्रमाणें इग्रजाना आला त्याप्रमाणें मार्च महिन्यात फ्रेच सेनेलाहि मुलहुसेनच्या बाजूला तसाच अनुभव आला. त्या बाजूच्या टेकडया फ्रेंचानी आता काबीज केल्या असून मैदानावर चाल करून जाण्याची फ्रेचाची तयारी झाली आहे. पचवीस लाख फ्रेच लोक साप्रत रणभूमीवर असून पधरा लाख रिझर्व्हमध्ये आहेत. फ्रेंच सरकारनें नुकतेंच असें जाहीर केले आहे, की इग्लड, फ्रान्स व रशिया याची युद्धसामुग्री दिवसानुदिवस वाढत असून जर्मनीच्या युद्धसामुग्रीचा पहिला लोंढा आता वाहून गेला आहे, व युद्धसामुग्रीस ओहोटी लागली आहे. फ्रेच सरकारचें आणखी असे म्हणणें आहे, की युद्धसामुग्रीप्रमाणेच इग्लड, फ्रान्स व रशिया याचे मनुष्यबळ दिवसानुदिवस वाढत असून युद्धात होणारी मनुष्याची हानि जर्मनीला आणखी सात आठ महिने फार झालें तर सोसवेल! असा उत्साहवर्धक खलिता फ्रेच सरकाराकडून आजपर्यंत प्रसिद्ध झाला नव्हता, आणि जनरल जोफ्रे याचा धिम्मा पण करारी स्वभाव ज्याना माहित आहे, त्याना या खलित्याबद्दल आनद वाटत असून जनरल जोफ्रे याचे म्हणणें अक्षरशः खरे असले पाहिजे अशी खात्री वाटत आहे. अर्थात्, एप्रिल मे महिन्यात फ्रान्स व बेल्जम या रणभूमीत महत्त्वाचे युद्ध सुरू करण्यास इग्रजाची व फ्रेचाची बरीच चागली तयारी झाली आहे, असे म्हणण्यास हरकत नाही. मात्र, एप्रिल मे महिन्यांतच हे युद्ध सुरू होईल असे कोणी समजू नये. कारण, त्याचवेळीं डार्डानेलिसच्या सामुद्रधुनीची रणभूमि विशेष जोरानें प्रज्वलित झाली तर फ्रान्स, बेल्जममधील अग्नीस वारा घालीत बसणे इग्रजानाँ व फ्रेचाना सोईचे होणार नाहीं! एप्रिल महिन्यात डार्डानेलिस प्रज्वलित न झाल्यास फ्रान्सची रणभूमि प्रज्वलित होईल, हें सागावयास नकोच.

# महायुद्धाचा एप्रिल—मे महिना

## युद्धाचीं चक्रे जोरानें फिरूं लागलीं

एप्रिल महिन्यात युरोप खंडात वसंत काळास सुरवात होऊन मे अखेर उन्हाळ्यास प्रारंभ होतो आणि एप्रिल, मे, जून जुलई, आगस्ट हे महिने सामान्यतः कोरडे महिने म्हणण्यास हरकत नाही. हे कोरडे दिवसच हवापाण्याच्या दृष्टीनें खऱ्या लढाईस अनुकूल होत. इतक्या दिवस धुक्यामुळे खरी झुंज बंद पडावी तर केव्हा पावसाने हातघाईवर आलेली कुस्ती बंद पडावी, छातीवर छाती आपटण्याकरिता पुढे सरसावलेल्या सैन्यास गुढघ्याइतक्या किंवा माड्याइतक्या बर्फाने अडकवून पाडावे तर केव्हा नद्यानाल्याच्या चिखलामुळे जवळ जवळ आलेली सैन्ये एकमेकास न भिडता एकमेकापासून दूर अंतरावर उभी रहावीत, अशी स्थिति पावसाळ्यात व हिवाळ्यात युरोपातील रणभूमीची होऊन गेली होती. थोडे दिवसच खऱ्या लढाईस अनुकूल असतात. पंचमहाभूताची ही अनकूल स्थिति आता प्राप्त झाली आहे, आणि मे, जून व जुलई या तीन महिन्यात युरोपातील वीराचा व महावीराचा संहार करण्याकरिता रणभूमीवर संचार करणाऱ्या महाकालाच्या घड्याळाची चक्रे फार जोरान चालू रहातील अशी चिन्हे दिसत आहेत. गेल्या आठ महिन्यात दोन्ही बाजूची लष्करी सामुग्री व डावपेच यांचीं स्वरूपे पूर्णपणे प्रकट झाली आहेत, पण संहाराचे प्रत्यक्ष कार्य मात्र पूर्ण निर्दयतेने प्रकट झालेले नाही. सेनापतींनीं केव्हाहि ह्या निर्दयतेच्या संहारावर महायुद्धातील यशापयश अवलंबून ठेविले नव्हते. गेल्या आठ महिन्यात संहाराचे काम दुय्यम दर्जाचे होते. युद्ध सामुग्रीची जुळवाजुळव, सैन्याच्या चलाखीच्या हालचाली व नवीन तऱ्हेच्या शस्त्रास्त्राचा उपयोग याच्यावरच भिस्त ठेवून सेनापति लढत असतात. संहार व डावपेच ही दोन्ही युद्धाचीं अंगे आहेत. युक्ति व मनगट, शरीर व बुद्धि असे हे दोन विभाग आहेत. बुद्धीचा पूर्ण पाठिंबा मिळून शरीर ज्यावेळीं लढते त्यावेळी जय मिळतो. जेथे जेथे बुद्धि तेथे तेथे जय हे खरे आहे, पण अखेरीस एका शरिराने दुसऱ्या शरिरास मागवे लागते व या प्रत्यक्ष संहाराच्यावेळी बुद्धीस प्राधान्य केव्हाहि नसते. मनगटाच्या टोल्यानेच शेवटचा निकाल लावावयाचा असतो. युद्ध

सामुग्री गोळा करणें हें काम बुद्धीचें, चक्रव्यूह रचणें हें काम बुद्धीचें, दूरवरचें सैन्य चलाखीनें एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी नेणे हे काम बुद्धीचें, आपणाला अनुकूल अशा रणभूमीवर उभे राहून शत्रूला मनगटाशीं मनगट भिडवावयाला भाग पाडणें हे काम बुद्धीचें, प्रतिकूल रणभूमीतून हळूच माघार घेऊन अनुकूल कालाकरिता व अनुकूल रणभूमीकरता सैन्य राखून ठेवणे हें काम बुद्धीचे ! या सर्व प्रसंगी बुद्धीस जरी प्राधान्य देण्यात आले, तरी अखेरीस मनगटावर मनगट आपटून एकाने दुसऱ्याचा चक्काचूर केल्याशिवाय पक्का निकाल लागत नाहीं. गेले आठ महिने महायुद्धात सोनाराची कामे झाली, पुढील तीन महिने आता लोहाराचे आहेत. आठ महिन्याच्या अखेरीस तहाची वाटाघाट सुरू झाली होती, पण सोनाराच्या कलाकौशल्याकडे पाहून आम्ही हा तटा मिटविणार नसून लोहाराच्या घावांनीच ह्याचा सोक्षमोक्ष झाला पाहिजे, असे म्हणून दोन्ही पक्ष हट्टास पेटलेले दिसतात, आणि या हट्टाचा परिणाम भयंकर संहाराच्या रूपाने पुढील तीन महिने युरोपात दिसल्यावाचून रहाणार नाही. आठ महिन्याचा जर आढावा काढला तर रणभूमीवर प्रत्यक्ष दोन्ही पक्ष समबल दिसत आहेत. प्रत्यक्ष वजनात दोन्ही सारखे आहेत; प्रत्यक्ष नेट दोघाचाहि सारखा आहे. पण अप्रत्यक्ष वजनात व अव्यक्त सामर्थ्यात इंग्रजाची सरशी आहे. जर्मनीचे सामर्थ्य व मनुष्यबल परिमित झाले आहे. जर्मनीच्या बलाची वाढ खुंटली, सैन्याची संख्या यापुढे अधिक वाढणे शक्य नाही. जर्मनीची चपलता मात्र कायम आहे. पण हा चपलचटु धावेल धावेल म्हणजे किती धावेल, नाचेल नाचेल म्हणजे किती चटचट नाचेल, फिरेल फिरेल म्हणजे किती गिरक्या घेऊ शकेल, ह्याची पराकाष्ठा इंग्रजाच्या अनुभवाला येऊन चुकली आहे. नवीन धाव, नवा नाच, नवीन गिरकी जर्मनीपाशी आता उरली नाही. म्हणजे जर्मनीच्या मनुष्यबलाप्रमाणे जर्मनीचे बुद्धिबलहि आता परिमित झाले आहे. पहिल्या आठ महिन्यात बेल्जम, फ्रान्स व पोलंड, यातील काही भाग जर्मनीस व्यापता आला तो बुद्धिबलाच्या जोरावर. हे बुद्धिबलाचे डावपेच आता संपले आहेत. यापुढे जय मिळवावयाचा म्हणजे प्रत्यक्ष माराकुटीच्या सहाय्यानें मिळविला पाहिजे. माराकुटीच्या किंवा संहाराच्या कृत्यात जय कुणाला मिळेल ? ज्याच्या मनगटाचा जोर जास्ती तो यशस्वी. चराच्या चक्रव्यूहाची कला जर्मनीप्रमाणें इंग्रजानाहि आता अवगत झाली आहे; तोफखान्यातील कमकुवतपणा इंग्रजानीं

पार नाहींसा केला असून, रशियाचा काय, फ्रान्सचा काय किंवा इंग्लंडचा काय, दोस्त राष्ट्राचा तोफखाना आज जर्मनीहून कांकणभर वरचढच आहे. आतां राहिली आगगाडीची चपळाई. रशियाच्या बाजूला या चपळाईच्या जोरावर अकल्पित नाच जर्मनीला नाचता येईल, पण कल्पित आणि अकल्पित सर्वच रणभूमि मुग्या-प्रमाणे वीरानीं गजबजून सोडण्याचें सामर्थ्य रशियाच्या अगांत असल्यामुळे चपल हालचाली यशःप्रद कशाच्या होणार ? उन्हाळ्यात रशिया लाखो सैन्य रणभूमीवर आणू शकेल, इतकेच नव्हे तर इंग्लडचेहि लाखों सैन्य उन्हाळ्यात रणभूमीवर उतरण्यास सज्ज होत आहे. वसतकालच्या प्रारभीच इग्रजाचे सातआठ लाख सैन्य शत्रूशी झुजत होते, महायुद्धास सुरुवात झाली त्यावेळीं इग्रजाचें काय ते लाख सव्वा लाख सैन्य फ्रान्समध्ये उतरलें. आठ महिन्याच्या अखेरीस भयकर प्राणहानि झाली असताहि इग्रजी लष्कर सात आठ पट फुगलें ! महायुद्धाच्या वर्ष समाप्तीच्या वेळी बारा महिन्यात हे लष्कर बारा पट फुगल्यावाचून रहाणार नाही. फ्रान्सचें सैन्यहि दिवसानुदिवस अधिकाधिकच वाढत आहे. जी काही थोडीशी अडचण इग्रजाना वाटत आहे ती दारूगोळा पुरविण्यासबधाने. इग्रजाच्यापाशीं कारखाने नाहीत, कारागीर नाहीत किंवा इतर सामुग्री नाहीं, अशातला भाग नाही, पण इग्रजी देश पडला मद्यप्याचा. इग्रजाचें दारूचे व्यसन दुधात मिठाचा खडा या न्यायानें अखेरच्या विजयाची घडी बिघडविते की काय, अशी भीति मुत्सद्याना वाटू लागली आहे. दीड लाख लोक रणागणावरून काढून घेतले असता जेवढे नुकसान होईल तेवढे नुकसान मद्यपानाच्या सवयीमुळे होत आहे, असे इग्रजी फडणविसाचे म्हणणे आहे. हें सकट निवारण्याकरिता खुद्द बादशहाने दारू सोडली, सेनापतीनीं दारू सोडली, पण कामकरी काही दारू सोडीत नाहीत. तेव्हा पार्लमेंटनें मेच्या प्रारभीं दारूवरचा कर दुप्पट केला असून प्रधानमडळानें कानडा, अमेरिका वगैरे देशातून कामकरी इग्लडात आणण्याची व्यवस्था केली आहे. या दूरदर्शी-पणामुळे उन्हाळ्यातील सहाराच्या लढायात दारूगोळ्याचा तुटवडा इग्रजाच्या बाजूला राहील अशी धास्ती बिलकूल उरली नाहीं. मनुष्यबलानें जर्मनी–ऑस्ट्रिया-हून इग्लड–फ्रान्स–रशिया कितीतरी अधिक, दारूगोळ्याचा पुरवठा मुबलक; मग प्रत्यक्ष माराकुटीत जर्मनी का चोपला जाऊ नये ? जर्मनीला अद्याप घमेंड वाटत आहे कीं, इग्लड–फ्रान्सला प्रत्यक्ष माराकुटींत आपण हार जाणार नाही, आणि

चपळाईच्या हेलपाट्यांत रशियन सैन्याचा खिळखिळाट करून पहिल्या आठ महिन्यात बळकावून बसलेला प्रदेश आपण पचनीं पाडू. तूप देखलें पण बडगा देखला नाहीं. सोटयाचें प्रत्यक्ष दर्शन जर्मनीस व्हावें म्हणून एप्रिल महिन्यापासून माराकुटीच्या युद्धास सर्व युरोपभर सुरुवात झाली आहे व ही माराकुटी उन्हाळ्यात तीन महिने खूप जोरानें चालेल असा अदाज आहे.

## डार्डानेलिस

लढाईत प्रत्यक्ष पिटल्याशिवाय जर्मनीची रग जिरावयाची नाहीं, अशा स्थितीला महायुद्ध येऊन पोंचले आहे. सर्व रणभूमि प्रज्वलित झाल्या आहेत, बेल्जममधील लढाई हातघाईला आली आहे, फ्रान्समध्ये मारपीट सुरू आहे, पूर्व प्रशियात उत्तरेला, पूर्वेला, दक्षिणेला हत्यारें सारखीं चालू राहिलीं आहेत, कार्पेथियनवर हल्ल्यावर हल्ले चढत आहेत, बुकोव्हिनाच्या बाजूला लढालढी माजून राहिली आहे, आणि डार्डानेलिसच्या किनाऱ्यावर इंग्रजी फौज उतरली असून तुर्कांची व त्याची प्राणांतिक झोंबाझोंबी सुरू झाली आहे. ही सर्व रणक्षेत्रे एकमेकाला सहाय्यक असून त्या रणक्षेत्राच्या चक्राचे दात एकमेकात अडकले आहेत. एक चक्र सुरू झाले म्हणजे सर्व चक्रे फिरू लागतात. तथापि प्रत्येक क्षेत्रात चक्राला गति देण्याचें सामर्थ्य एका पक्षाकडेच असते, आणि इतर सर्व चक्राची गति पाहून तो स्वतःच्या चक्राला गति देत असतो. या सर्व चक्राच्या गतीचा विचार करिताना आज इंग्रजाच्या बाजूला मनुष्यबल अधिक असल्यामुळे इंग्रज कोठे गति देणार याचा विचार प्रथम केला पाहिजे. आठ महिन्याच्या अखेरीस इतकें ठरले की प्रत्यक्ष नरडीला नख लावल्याशिवाय जर्मनी इंग्रजाच्या इच्छेप्रमाणें तह करीत नाही. नरडीला नख तर लावले पाहिजेच, पण ते कोणत्या नरडीला लावावयाचें, बेल्जममध्ये घुसलेल्या जर्मनाना पायाखालीं तुडवावयाचे कां फ्रान्समध्ये डेरा देऊन बसलेल्या जर्मनांचीं हाडे मोडावयाचीं ? या दोनहि गोष्टी इंग्रजाना कर्तव्य आहेतच आणि ते योग्य कालीं करतीलहि. तथापि बेल्जममध्ये किंवा फ्रान्समध्ये मुख्य मारपीट करण्याचा समय अद्याप आलेला नाही. ज्या ठिकाणीं शत्रूचें पारडें जड नाहीं, त्याच ठिकाणी शत्रूला खरपूस ठोक दिला पाहिजे. या दृष्टीनें विचार केला असता जर्मनीपेक्षा तुर्कांना पुरतेपणीं पराभूत करणे इंग्रजाना सांप्रत अधिक सोईचें व अधिक किंमतीचें आहे. बेल्जममधून जर्मनांना हाकून देण्यापेक्षा डार्डा-

नेलिस येथे सैन्य उतरून महिना दोन महिन्याच्या अवधींत इस्तंबूल शहरावर चाल करून जाणे हे अधिक सोपे आहे. इंग्लड व फ्रान्स याच्यापाशीं जर्मनीपेक्षा पश्चिम रणक्षेत्रात १०–१२ लाख सैन्य अधिक आहे. अधिक असलेले सैन्य जर्मनीच्या चक्रव्यूहावर सोडावयाचे का त्यापैकीं ५–६ लाख सैन्य डार्डानेलिसवर उतरून कॉन्स्टाटिनोपल काबीज करावयाचें ? जर्मनीच्या २० लाख सैन्यावर इंग्रज व फ्रेंच यांच्या ३० लाख सैन्यानें चाल करून जाण्यापेक्षा २० लाख सैन्याच्या उरावर २५ लाख सैन्यच ठेवून ५–७ लाख सैन्याचा गोळा इस्तंबूलवर फेकणे अधिक श्रेयस्कर होय. डार्डानेलिसच्या व इस्तंबूलच्या सरक्षणाकरिता तुर्कांचे चार सव्वा चार लाख सैन्य आहे. या सव्वा चार लाखामध्ये दीड दोन लाखच चागल्या तयारीचे, बाकी बाजारबुणगे. दीड दोन लाखावर पाच सहा लाख सैन्य सोडणे हे केव्हाहि हितावहच होणार. ही गोष्ट खरी की तुर्क आपल्या घरात आहेत व इंग्रजाना बाहेरून त्याच्या घरावर हल्ला करावयाचा आहे तुर्कांच्यापेक्षा इंग्रजाची युद्धसामुग्री अधिक किंमतीची, शिस्त व लष्करी ज्ञान विशेष तेजस्वितेचे, शिवाय जगातील अत्यत बलाढ्य मानलेल्या आरमाराचा इंग्रजाना पूर्ण पाठिंबा. इतकी अनुकूल रणभूमि मारापिटीची लढाई करण्यास दुसरीकडे कुठे मिळणार ? खऱ्या लढवय्याचे प्रमाण एक तुर्क तर दोन किंवा तीन इंग्रज असे असण्याचा सभव. तुर्कांच्या ज्ञानाहून इंग्रजाचे ज्ञान दसपट अधिक, आणि आरमाराच्या बाबतींत तर तुर्क पासगासहि पुरणार नाहीत. असल्या अनुकूल रणभमीत अखेरची मारापिटी करून त्या रणभूमीपुरता व पर्यायाने इतर रणभूमीपुरताहि सोक्षमोक्ष कोण करून घेणार नाही ? मार्चच्या प्रारभीं डार्डानेलिसवर इंग्रजानी जेव्हा आरमाराचा हल्ला केला, तेव्हा ग्रीसचे व इटलीचे सैन्य मदतीला येईल अशी आशा होती. पण इटलीच्या किंवा बाल्कन प्रातातील तटस्थ देशाच्या नादी लागण्यात हाशील नाहीं असे आता निदर्शनास आलें आहे. तेव्हा फ्रान्स बेल्जममधील काम थोडे ढिलें ठेऊन डार्डानेलिसचे काम, सैन्यामार्फत किंवा आरमारामार्फत, पुरे करण्याची व्यवस्था इंग्रजानीं एप्रिल अखेर अमलात आणली आहे. भूमध्य समुद्रात मोठी सेना गोळा झाली असून कसलेले सेनानायक सर हॅमिल्टन हे त्या सेनेचे मुख्य आहेत. एप्रिल अखेर हें सैन्य डार्डानेलिसच्या तोंडावर उतरले असून डार्डानेलिसच्या उत्तरेकडील जिभेचे टोंक या सैन्याने व्यापिले आहे. डार्डानेलिसच्या अरुंद

नरडीच्या ठिकाणी ग्यालीपोली गांवाजवळ उत्तरेच्या बाजूनें म्हणजे सॅरोसच्या आखातच्या बाजूनें उतरण्याचा उद्योग इंग्रज सेना करीत आहे. ग्यालिपोली गावाच्या पूर्वेस ग्यालिपोली द्विपकल्पाची सर्वांत अरुद जागा आहे. या अरुद जागेत सॅरोसच्या आखातातून उतरून दक्षिणेस डार्डानेलिसचें पाणी इंग्रजाना गाठता आलें तर सर्व ग्यालिपोली द्विपकल्पाचा व तुर्कांचा संबंध मध्येच तोडल्यासारखा होईल. असा संबंध तोडता येणे विशेष अवघड नाहीं, कारण सॅरोसच्या आखातांत ग्यालिपोलीच्या मानेजवळ जर इंग्रजाचे क्वीन एलिझाबेथ नावाचें अत्यंत बलाढ्य जहाज उभे राहिले तर सॅरोसच्या आखातातून डार्डानेलिसच्या समुद्रात या जहाजास आरमारी गोळे टाकिता येतात. अर्थात् जमिनीचा तीन चार मैल रुदीचा तो चिंचोळा भाग तोफाच्या गोळयाखालीं बडवून काढून तुर्की सेनेला तेथून हांकवून लावून इंग्रजी सेनेला तो भाग स्वतःच्या कब्जात घेणे विशेषसे अशक्य नाहीं. डार्डानेलिसच्या संरक्षणाची ही नाजुक मान्याची जागा तुर्कांच्या व जर्मनाच्या लक्षात नसणे शक्य नाहीं अर्थात् ह्या ठिकाणीं त्यानीं आपली सर्वशक्ति एकवटली असली पाहिजे. अद्याप ग्यालिपोलीची ही मान इंग्रजी सेनेच्या हाती गेली नाही, हे खरें, तथापि एकदोन आठवडयाच्या अवधीत ती नाजुक जागा इंग्रज सर करितील अशी चिन्हे दिसत आहेत. ग्यालिपोलीची मान ताब्यात आल्यापासून दोन आठवडयाच्या आत सर्व ग्यालिपोली द्विपकल्प इंग्रजाच्या हातीं जाईल. आजच्या अंदाजाप्रमाणें मे अखेर अगर जूनच्या प्रारंभी डार्डानेलिसच्या सामुद्रधुनीच्या उत्तर किनाऱ्यावर इंग्रजी लष्कराचे ठाणें पडेल असे म्हणण्यास हरकत नाहीं. ग्यालिपोलीचे द्विपकल्प काबीज करताना आरमाराच्या मदतीचा अत्यंत उपयोग होणार असल्यामुळे ह्या कामात लष्कराची विशेष खराबी होणार नाही डार्डानेलिसच्या सामुद्रधुनीची दक्षिण बाजू काबीज करिताना आरमाराचें पाठबळ मिळणें शक्य नाही. सैन्याने स्वतःच्या हिंमतीनें हा किनारा काबीज केला पाहिजे. तथापि दक्षिण किनाऱ्याचा बंदोबस्त उत्तर किनाऱ्याइतका नसल्यामुळे ते कामहि आगलट येण्याचा संभव नाही. दक्षिण किनारा काबीज करण्याचें काम फ्रेंच सैन्यानें आरंभलें असून डार्डानेलिसच्या दक्षिण मुखाजवळ फ्रेंच सैन्य उतरलें आहे. या सैन्यास तुर्कांकडून विशेष अडथळा होऊ नये म्हणून एशियामायनरमधील तुर्कांची राजधानी जे स्मरना बंदर त्यावरहि फ्रेंच आरमारानें तोफांचा भडिमार सुरु केला

असून, स्मर्नाच्या आसपासहि फ्रेंच सैन्य उतरू लागलें आहे. मतलब हा कीं, डार्डानेलिस व स्मर्ना यामध्ये तुर्की बलाची वाटणी व्हावी. मे महिन्यात डार्डानेसलचा दक्षिण किनारा फ्रेंचाना काबीज करिता आला तर बरेंच, पण तसे जरी काही करिता आले नाही, तरी मे महिन्यात उत्तर किनाऱ्यावर इंग्रजाचे एक ठाणे बसले म्हणजे तेथे रोवण्यात येणाऱ्या इंग्रजी तोफखान्याच्या मदतीने जून महिन्यात फ्रेंच लोक दक्षिण किनारा सहज काबीज करतील. एवच मे-जून महिना डार्डानेलिसची सामुद्रधुनी घेण्यात जाईल आणि जून-जुलई महिना मार्मोराचा समुद्र ओलाडून कॉन्स्टाटिनोपलला पोचण्यात खर्च करण्यात येईल. ज्या लष्करी धोरणाच्या दृष्टीने एप्रिल अखेर डार्डानेलिसवर इंग्रजी व फ्रेंच सैन्य उतरविण्यात आले आहे, ते लष्करी धोरण फळास येण्यास तीन चार महिन्याची तरी अवधी जरूर आहे. पण तुर्कांची राजधानी घेऊन काळ्या समुद्रापर्यंत रशियाशीं सलग्न होणे हे काम इतक्या महत्त्वाचे आहे की, त्यासाठी उन्हाळ्याचे चार महिने रात्रदिवस लढून पाच सात लाख सैन्य झुजवीत ठेऊन मार्च महिन्यात ज्या प्रमाणे तीन लढाऊ जहाजे बुडाली त्याप्रमाणे आणखीहि काहीं लढाऊ जहाजे बळी देणे म्हणजे कामाच्या दृष्टीने काहीच नाही. बेल्जम व फ्रान्स या दोन रणभूमीमध्ये आहे ती स्थिति जरी कायम राहिली, किंबहुना जर्मनी टीचभर किंवा वीतभर पुढे सरकला तरी एक वेळ चालेल. कार्पेथियनची मगरमिठी न सोडता रशियास जर्मनीपुढे आणखी एक दोन ठिकाणी माघार घ्यावी लागली तरी चालेल, पण उन्हाळ्याच्या या चार महिन्यात जर इंग्रजानी व फ्रेंचानीं तुर्कांना पुरा चोप दिला आणि त्याचे कॉन्स्टाटिनोपल राजधानीचें शहर घेऊन तुर्की सत्तेचा नायनाट करून काळ्या समुद्राच्या मार्फत जर रशियाला ते जाऊन मिळाले, तर महायुद्धातील निम्मा बोजा त्यानी खाली केला असें म्हणावें लागेल. एकदा हे काम चार महिन्यात आटपलें म्हणजे शत्रू डोक्यावरच्या खाद्यावर आला, व शेवटच्या जयाबद्दल शकाच राहाणार नाहीं. डार्डानेलिसवरील हल्ल्याचें महत्त्व इतके विशेष असल्यामुळे इंग्रजाची शत्रूला मारपीट करण्याची रणभूमि-मे जून महिन्यात डार्डानेलिस व मार्मोराचा समुद्र ही होऊन बसतील, बेल्जम होऊन बसणार नाहीं. मे-जून महिन्यात किंवा उन्हाळयात इंग्रज तुर्कांना चोपणार; फ्रान्समध्ये फ्रेंच जर्मनीला चोपूं पहाणार आणि जर्मनी इंग्रजाना बेल्जममध्ये साधल्यास खो देणार. फ्रेंचानीं जर्मनीला खो घालावयाचा, जर्मनीनें बेल्जममध्ये इंग्रजाना

खो घालावयाचा, व इंग्रजांनीं डार्डानेलिसमध्ये तुर्कांना खो घालावयाचा, असा हा उन्हाळ्यातील मारपिटीचा कार्यक्रम दिसतो ! या कार्यक्रमात तुर्कांनीं कोणाला खो घालावयाचा नसून स्वतःचे घर जरी त्यानीं सांभाळले तरी महायुद्धात त्यानीं चांगली तलवार गाजविली असे होईल, इतकेच नव्हे तर जर्मनीची एक तऱ्हेची अब्रु तशाच बिकट प्रसंगी त्यानी सांभाळली असेच युद्धाच्या अखेर म्हणावे लागेल. मार्च–महिन्यात नवीन दारूगोळा जर्मनींतून तुर्कांना पोचला असून आपल्या घराचे संरक्षण करण्याच्या कामी त्यानी गेले दोन महिने मेहनतीची शिकस्त केली आहे. त्याच्या स्वतःच्याच घराला पूर्ण आग लागण्याची ही वेळ असल्यामुळे चवताळून व प्राणावर उदार होऊन ते लढतील यांत संशय नाही. डार्डानेलिसमधून मार्मोराच्या समुद्रात आम्ही इंग्रजांना शिरू देणार नाही, आणि यदाकदाचित् शिरलेच तरी कॉन्स्टांटिनोपल शहर इंग्रजाच्या हातात जाणे शक्य नाही, अशी घमेंड तुर्कांना वाटत आहे. इंग्रजाच्या व तुर्कांच्या झटापटीचे केंद्रस्थान मे महिन्यात डार्डानेलिसची सामुद्रधुनी होणार असल्यामुळे लढाईच्या बातम्या वाचणारांनी डार्डानेलिसकडे मे महिन्यात दुर्लक्ष करू नये अशी सूचना करून रशियाकडे आपण आता वळू.

## रशिया काय करणार ?

डार्डानेलिसवर इंग्लंड व फ्रान्स यांचे सैन्य उतरावयाचे वेळेला, तुर्कांकडून जमिनीवर भयंकर अडथळा झाला, व हे सैन्य जसजसे पुढे जाईल तसतसे अधिक निकराने इंग्रजांना तुर्कांशी लढावें लागेल हे उघड आहे. तुर्की सैन्यानेच नुसता अडथळा केला असे नाही तर डार्डानेलिसच्या तोंडापाशी तुर्की आरमारानेहि अडथळा करण्याचा प्रयत्न केला होता. पण क्वीन एलिझाबेथच्या माऱ्यापुढे तुर्कांच्या क्षुल्लक आरमाराचे कांही न चालता मुकाट्याने त्यास मागे परतावें लागले. हे तुर्की आरमार स्वतःकडे ओढून घेऊन त्याचा नायनाट करण्याचे काम रशियाचे आहे. मार्च महिन्यातील डार्डानेलिसच्या आरमारी हल्ल्याच्या वेळी रशियाने बास्फोरसच्या सामुद्रधुनीवर आरमारी हल्ला केला होता व सर्व तुर्की आरमार त्या बाजूला गुंतलेले होते. त्यावेळी रशियाच्या आरमाराला चकवून तुर्की आरमाराचा काही भाग काळ्या समुद्रात घुसला व त्यामुळे रशियन आरमाराला पुनः ओडेसाकडे जावें लागले. रशियन आरमाराच्या व तुर्की आरमाराच्या किरकोळ झटापटी झाल्या, पण कोणचीच गोष्ट निकालास लागली

नाही. काळ्या समुद्रात तुर्की आरमाराचा नायनाट केल्याशिवाय रशियाचे कारस्थान सिद्धीस जाणे शक्य नाही. तेव्हा तुर्की आरमाराशी पुन्हा दोन हात करून, काळा समुद्र निष्कटक करण्याच्या हेतूने रशियाचे आरमार एप्रिल अखेर बास्फोरसवर भडिमार करू लागले आहे. ह्या आरमारी युद्धात रशियास जर चांगला जय आला, निदान बास्फोरसच्या सामुद्रधुनीच्या आतच तुर्की आरमारास कोंडून ठेवण्याची शक्ति जर रशियाच्या आरमाराच्या अंगी दृष्टीस पडली तर ओडेसा बंदरातून मोठे सैन्य आणून बास्फोरसच्या उत्तरेस कोठे तरी उतरविण्याचा प्रयत्न रशियाकडून अलबत करण्यात येईल. ओडेसा बंदराच्या बाजूला रशियाच्या लष्कराचा ओघ साप्रत वाहू लागला आहे, व खुद्द झार साहेबानीहि नुकतेच ओडेसा बंदर स्वतःच्या वास्तव्याने उत्साहित केलेले आहे. रशियाचे बादशहा झारसाहेब यानी एप्रिल महिन्यात प्रिजमिलस, लॅबर्ग व ओडेसा या तीन ठाण्याना आपले दर्शन दिले रशियाच्या बादशहाचे या ठिकाणी आगमन झाले यावरून असे अनुमान करण्यास हरकत नाही की, प्रिजमिसल, लॅबर्ग व ओडेसा या तीन प्रातात रशियाचे मुख्य लष्कर गोळा झाले असून मे–जून महिन्यात येथूनच ऑस्ट्रियावर व कॉन्स्टाटिनोपलवर रशियाची मोठी स्वारी होईल. याच महिन्यात प्रिजमिसल पडल्याबरोबर रशियाचे मोठे लष्कर डुक्ला व युझाक या दोन घाटावर चाल करून गेले, व डुक्ला घाट ओलांडून कार्पेथियन पर्वताच्या दक्षिणेस हंगेरियाच्या मैदानावर उतरण्यास रशियाने सुरुवात केली. मार्च अखेरपासून एप्रिल अखेरपर्यंत ह्या बाजूला एक महिनाभर तुबळ युद्ध झाले कार्पेथियन पर्वतावर हल्ल्यावर हल्ले रशिया एकसारखे चढवीत होता. हेतु हा की युझाक घाट आपल्या ताब्यात घ्यावा. युझाक घाट व डुक्ला घाट यामध्ये ७०–८० मैलाचें अंतर आहे. डुक्ला घाट क्रॅकोच्या बाजूला असून युझाक घाट प्रिजमिसलच्या दक्षिणेस आहे. युझाक घाटात आगगाडीचा फाटा आहे, आणि डुक्ला घाटात आगगाडी नाही. डुक्ला घाट जरी रशियाच्या पूर्णपणे ताब्यात आहे तरी त्या घाटानें हंगेरियात मोठे लष्कर उतरविणे लष्करी दृष्टीने चुकीचे आहे. कारण, क्रॅकोच्या बाजूने त्या लष्कराची पिछाडी उघडी रहाते. आणि आस्ट्रिया–जर्मनीने पिछाडीवर जर अवचित हल्ला केला व कर्मधर्मसंयोगानें त्यात त्याना यश आले तर डुक्ला घाटानें हंगेरियात उतरलेले मोठें लष्कर आपण होऊन शत्रूला बळी दिल्यासारखें होते. डुक्ला घाटाची पिछाडी व डुक्ला घाटातून हंगेरियात उतरणारे

सैन्य या सर्वांचा उपयोग हंगेरियावर करावयाच्या मुख्य स्वारीकरिता होणारा नसून युझाक घाटानेच मुख्य लष्कर मैदानावर उतरलें पाहिजे. युझाक घाटाने उतरणाऱ्या मुख्य लष्कराची उजवी बगल सुरक्षित करण्याकरिता व त्याच्या हालचाली शत्रूच्या दृष्टिआड करण्याकरिता डुकळा घाटाचा उपयोग होणार आहे. युझाक घाट हे मुख्य अंग असून डुकळा घाट हे उपांग आहे. मुख्य अंग जे युझाक घाट तो काबीज करण्याकरिता अत्यंत नुकसान सोसून व साहसाची पराकाष्ठा करून रशियाने एक महिनाभर लढाई केली या लढाईत रशियाच्या हातात युझाक घाट पडण्याचा समय आला होता, पण इतक्यात जर्मनीची मदत ऑस्ट्रियास येऊन मिळाल्यामुळे आस्ट्रिया अधिक जोराने रशियन हल्ल्याशी टक्कर देऊ लागला, आणि एप्रिल अखेर हल्ले करकरून रशिया दमला आहे असे पाहून ऑस्ट्रिया-जर्मनीने उलट रशियावर हल्ले करण्यास सुरवात केली. या सर्व हल्ल्यात आस्ट्रिया जर्मनीचे फार नुकसान होत असून रशिया मोठ्या शिताफीने हे हल्ले मागे परतवीत आहे. शिवाय एप्रिल अखेर रशियास प्रतिकूल अशी रणभूमीची स्थिति कार्पेथियन पर्वताच्या बाजूला उत्पन्न झाली आहे. युझाक घाटात कार्पेथियन पर्वताच्या डोक्यावर ऑस्ट्रिया व जर्मनी बसले असून उत्तरेच्या उतरणीच्या खाली रशियाचा तळ आहे. या तळास प्रिजमिसल येथून सैन्याची व सामुग्रीची मदत मिळत असते. एप्रिल महिन्याच्या अखेरीस वसंत काळचा अमल कार्पेथियन पर्वतावर बसला असून, कार्पेथियन पर्वतातील बर्फ वितळू लागले आहे, व त्यामुळे उत्तरेकडील सर्व नद्या-नाल्याना वसंत काळचा पूर आला असून प्रिजमिलपासून युझाक घाटापर्यंतचा प्रदेश चिखलाचा व दलदल बनला आहे. हिममय प्रदेश सैन्याच्या हालचालींना विशेष अडथळा करीत नाही, पण चिखलाची दलदल सैनिकाचे प्रत्येक पाऊल फासात अडकल्याप्रमाणे जमिनीत रुतवून ठेवते. ही अडचण पधरा वीस मेपर्यंत टिकणारी असून तेवढ्या अवधीत ऑस्ट्रिया जर्मनीचे थोडेसे फावेल इतकेच, पण पधरा मेनतर सर्व जमीन कोरडी झाल्यावर युझाक घाटाच्या रोखाने हंगारीवर रशियाची फार मोठी स्वारी होईल. हंगारीच्या मैदानावर उतरणे हे रशियाचे महा-युद्धातील ध्येय आहे. प्रिजमिसल पडल्यामुळे युझाक घाटावर चाल करून जाण्याचा मार्ग खुला झाला आहे. एप्रिल महिन्यात रशियाचे उद्योग सफल झाले नाहीत खरे, तरी उन्हाळ्यातील तीन महिन्याचा उपयोग हंगारीत घुसण्याकडे रशिया केल्यावाचून

रहाणार नाही. मे–जून महिन्यात युझाक घाट हा मध्यबिंदु कल्पून दोन्ही बाजूला ७०–८० मैलावर म्हणजे एकदर शभर दीडशे मैलाच्या टापूवर कार्पेथियन पर्वतात ' न भूतो न भविष्यति ' असले भयकर युद्ध लढण्याची रशियाची तयारी चालली आहे.

## जर्मनीची धडपड

महायुद्धाच्या पहिल्या महिन्यातच रशियानें कार्पेथियन पर्वताला मगरमिठी मारिली ती अद्याप कायम आहे इतकेच नव्हे, तर उन्हाळ्यामध्ये रशियाची अमर्याद सेना तो पर्वत ओलाडून हगेरियामध्ये घुसणार व उन्हाळ्यात हगेरियास कोणीहि त्राता उरणार नाही, अशी स्पष्ट चिन्हे दिसत आहेत. एप्रिल महिन्यात आस्ट्रियन सैन्य फार दमाने रशियाशी लढले, पण रशियाप्रमाणें आस्ट्रियाचे देखील या महिनाभराच्या लढाईत अत्यत नुकसान झालेले आहे. कार्पेश्यिन पर्वताच्या महत्त्वाच्या काही टेकड्या रशियाच्या ताब्यात गेल्या असून, नवे सैन्य रशियन लष्करात एकसारखे सामील होत आहे, आणि उन्हाळ्यात तर या सैन्याची गणतीच करता यावयाची नाही. कार्पेथियन पर्वताला रशियानें मारलेली ही मगरमिठी सोडविण्याकरिता गेले ७ महिने जर्मनीने एकसारखी धडपड चालविली आहे, आणि मे–जून महिन्यातहि जर्मनीकडून ही धडपड अविश्रात करण्यात येईल, असे स्पष्ट दिसत आहे. वार्सावर हल्ला चढवून सेनापति फॉन हिंडेनबर्ग यांनी क्रॅकोचें व डुक्ला घाटाचे ग्रहण डिसेबर–जानेवारी महिन्यात सोडविले, पण वार्सा शहर काही हाती लागले नाहीं. वार्सा घेण्याकरिता पूर्व प्रशियातून रशियन सैन्यावर हल्ला करून निमेन नॅरो नदी याच्या काठचे प्रदेश जर्मन सैन्यानें पाहिले, पण निमेन नदी व नॅरो नदी याच्या प्रदेशात जर्मनीला आळा घालून प्रिजमिसलच्या किल्ल्यासभोवती रशियाने अधिक नेटाचा वेढा दिला, आणि डुक्ला घाटावर उलट हल्ला केला. कार्पेथियनची मगरमिठी सुटून प्रिजमिसलचा वेढा उठावा म्हणून सेनापति फॉन हिंडेनबर्ग यानी जर्मन सैन्य भिंगरीसारखे फिरविले. जर्मनीनें हेलपाटे द्यावे आणि रशियाने हेलपाटे खावे आणि स्वतःचे नुकसान करून घ्यावे, पण कार्पेथियन पर्वतावरील नेट काही कमी करू नये अशा प्रकारची धावपळ सुरू झाली. अखेरीस प्रिजमिसल पडलें व रशियाच्या धिमेपणाच्या नेटास यश आलें. या यशामुळे जर्मनीची धावपळ व धडपड कमी झाली नाहीं, प्रिजमिसल पडण्या बरोबर कार्पेथियनवरचें सकट दुणावलें हें जर्मनीच्या तेव्हाच लक्षात आलें, व

लगेच जर्मनीनें ऑस्ट्रियाच्या मदतीकरितां युझाक घाटाकडे नवें सैन्य पाठविलें. ही कुमक पाठवूनच जर्मनी थांबला नाही तर एक नवी धडपडच अकल्पित रीतीनें जर्मनीनें एप्रिल महिन्यात सुरू केली. हंगेरियन पर्वताच्या पूर्वेस असलेल्या आस्ट्रियाच्या बुकोव्हिना प्रातात जर्मनीचे नवे लष्कर एकदम गोळा झालें; व हे लष्कर उत्तरेस लेंबर्गकडे चाल करून जाऊ लागले. बुकोव्हिनातून उत्तरेस शिरून स्टॅनिशलाहो हे आगगाडीच्या केंद्राचें स्थान ह्या लष्करानें घेऊन लगेच स्टॅनिशलाहोपासून स्ट्राय ठिकाणहि ह्या सैन्यानें घेतले. लेंबर्गकडून युझाक घाटाकडे जो आगगाडीचा फाटा जातो, त्या फाट्याच्या मध्यावर स्ट्राय हे केंद्रस्थान आहे. स्ट्राय येथून लेंबर्गवर चाल करून जाता येते, स्ट्राय येथून युझाक घाटावर हल्ला करणाऱ्या रशियन सैन्याची डावी बगल मारता येते, लष्करी धोरणाच्या दृष्टीने वरील दोन कारणामुळें स्ट्राय हे महत्त्वाचे ठिकाण आहे. स्ट्राय येथून उत्तरेकडे चाल करून लेंबर्ग–प्रिजमिसल ही आगगाडी जर ऑस्ट्रियन जर्मन सैन्याला मोडता आली तर कार्पेथियनची मगरमिठी आपोआप नष्ट होईल. स्ट्रायचे हे महत्व जाणून एप्रिल महिन्यात रशियाने स्ट्रायचे आसपास निकराची लढाई आस्ट्रियाशी सुरू केली. ती लढाई सारखी तीन आठवडे चालू असून मे महिन्याच्या प्रारंभीहि ती कमजोर झाली नाही. किंबहुना सोक्षमोक्ष करून घेण्याकरिताच ह्या ठिकाणी दोन्ही पक्ष निश्चयाने व हट्टाने लढत आहेत असे म्हणण्यास हरकत नाही. उत्तरेस लेंबर्गच्या बाजूला जोराने हल्ले करून बुकोव्हिनातील ऑस्ट्रियन सैन्य थांबले नाही तर बुकोव्हिनाची पूर्व सरहद्द ओलांडून बेसारेबियातहि जर्मन सैन्य घुसले. डेनीजेस्टर नदी गाठून प्रुथ व डेनीजेस्टर या दोन नद्यामधील बेसारेबियाचा भाग ताब्यात घेऊन ओडेसापर्यंतचा रशियन मुलुख उध्वस्त करण्याचा ह्या सैन्याचा हेतु होता, पण रशियानें रुमानियाच्या उत्तर सरहद्दीच्याच ठिकाणीं या स्वारीस आळा घातला. बेसारेबियात रशियाच्या डावे बगलेला वळसा घालून ओडेसापर्यंतचा मुलुख उध्वस्त करण्याचा आस्ट्रिया जर्मनीचा हा डाव सांप्रत फुकट गेला आहे, इतकेच नव्हे तर ओडेसापर्यंतचा मुलुख उध्वस्त झाल्यास टर्कीचे आपले कारस्थान फुकट जाऊन जर्मनीचे कारस्थान आयतें साधेल, हें जाणून बुकोव्हिनाच्या पूर्व सरहद्दीच्या बाजूनें ऑस्ट्रियास उलट तंबी देण्यास रशियाने एप्रिलअखेर सुरुवात केली आहे. रुमानियासबंधाचे व टर्कीसबंधाचे रशियाचे डाव

साधण्यास रशियानें ऑस्ट्रियाचा बुकोव्हिनामध्यें पराजय करणें भाग आहे. या कारणाकरिता एप्रिलअखेर बुकोव्हिनात सुरू झालेले युद्ध मे–जून मध्येहि तसेच जारीनें सुरू राहील हे उघड आहे. मे महिन्यात बुकोव्हिनामध्ये भयंकर रणसंग्राम होणार, मे महिन्यात लेंबर्गच्या दक्षिणेस स्ट्रायच्या बाजूला तुंबळ युद्ध माजणार, मे महिन्यात युझाक घाटाच्या बाजूला रशियन व ऑस्ट्रियन वीराच्या रक्ताचे पाट वहाणार, मे महिन्यात कार्पेथियन पर्वत मानवी रक्ताने माखला जाणार ! कार्पेथियन पर्वताची उत्तर व पूर्व बाजू मानवी रक्ताने एप्रिल महिन्यातच पूर्णपणे भिजलेली आहे, आणि मानवी रक्ताची चटक लागलेला हा पर्वत उन्हाळयात बर्फ वाहून गेल्यामुळे तृषार्त झाला असताना मागच्या व पुढच्या किती पिढ्याचें रक्त पिऊन टाकील याचा अंदाज आज करिता येणे शक्य नाही. रक्त पिण्याची कार्पेथियन पर्वताची हौस पुरी झाल्यावर तेथील देवता महायुद्धाचा निकाल प्रसिद्ध करणार आहे. या देवताच्या समोरच रशियाला झुंजावे लागेल, या देवताच्या समोरच ऑस्ट्रियाला लढावे लागेल, या देवताच्या समोरच हंगेरियाला आपली पराकाष्ठा करावी लागेल, आणि या देवताच्या समोरच जर्मनीला आपले युद्ध–कौशल्य दाखवावे लागेल. कार्पेथियन पर्वताच्या देवतात या सांप्रतच्या महायुद्धाच्या देवता आहेत, आणि मनुष्याची हाडे एकमेकावर आदळल्यानंतर त्याच्या इच्छेनुरूप या महायुद्धाचा निकाल लागणार आहे. युझाक घाट, स्ट्रायचे केंद्रस्थान व बुकोव्हिनाची बगल या तिन्ही ठिकाणी जर्मनी ऑस्ट्रिया–हंगारीस मदत करीत आहे. एवढ्या कुमकेनें भागावयाचे नाही. उन्हाळयात रशियाचे सैन्य मुंग्याप्रमाणे कार्पेथियन पर्वत चढू लागणार. या सैन्याचा प्रचंड ओघ दुसरीकडे वळविणे जर्मनीस भाग आहे, व एप्रिल महिन्यात याच हेतूने जर्मनीने एकसारखी धडपड सुरू केली आहे. क्रॅकोच्या पूर्वेस टर्नौ व नीडा नदी या दोन्ही ठिकाणीं रशियन सैन्यावर आसपास आपण मोठा विजय मिळविला असेहि जर्मनीने उगीच जाहीर केले आहे. हेतु हा की टर्नौच्या दक्षिणेस असलेल्या डुक्ला घाटाचे ग्रहण सोडणे रशियास भाग पडावे. नीडा नदीवरच हल्ला करून जर्मनी गप्प बसला नाही तर वार्साच्या पश्चिमेस व्हिश्चुला नदीच्या डाव्या काठावरहि पुन्हा लढाईस सुरुवात झाली आहे. रशियाने आपलें सर्व बल जर कार्पेथियन पर्वताकडे झुकविले तर वार्साच्या बाजूची रशियाची फळी कमकुवत होईल अशी जर्मनीची अटकळ आहे, म्हणून एप्रिल

अखेर वार्साच्या पश्चिमेला व उत्तरेला जोराची लढाई जर्मनीनें सुरू केली आहे. व्हिश्चुला नदीच्या डाव्या किनाऱ्यावर, नॅरो नदीवर, वार्सा–म्लावा आगगाडीच्या मध्यावर, म्लावाचे पूर्वेस प्रासनिस शहराजवळ, प्रासनिसच्या पूर्वेस ओमिल्यू नदीवर, लीक–बायलीस्टॉक या आगगाडीच्या मध्यावर, आसोविस किल्ल्यावर आणि पूर्व प्रशियाच्या पूर्वेस सुवालकी प्रातात निमेन नदीच्या प्रदेशात चोहोकडे एप्रिल अखेर जर्मनीने एकदम लढण्यास सुरवात केली आहे. कार्पेथियन पर्वतावर जर रशियाने मुख्य जोर केला आणि वार्साची बाजू ढिली ठेविली तर नॅरो नदी किंवा व्हिश्चुला नदी येथे कोठेतरी रशियाची फळी फुटून वार्सा हस्तगत करण्यास जर्मनीला ठीक पडेल बरें, वार्साचे चक्र जर रशियानें बळकट करून ठेविले तर निमेन नदीच्या काठची फळी फुटून वार्सा–पेट्रोग्राड आगगाडी मोडावयास सापडेल. या सर्व रणभूम्या एकदम जाग्या करून जर्मनी थाबलेला नाही, तर पूर्व प्रशियातील उत्तरेकडच्या तिलसिट प्रातातून उत्तरेच्या लिबोच्या रशियन द्विपकल्पावर जर्मनीने अवचित हल्ला चढविला. वार्सा–पेट्रोगाड रेल्वेच्या विलना जक्शनमधून आगगाडीचा फाटा निघून शावली जिल्ह्यातून बाल्टिक समुद्रावरच्या लिबो बदराकडे जातो. हा शावली प्रात जर्मन सैन्याने आक्रमिला असून लिबो बदराजवळहि जर्मन सैन्याची आघाडी पोचली आहे. शिवाय लिबो द्विपकल्पाच्या रिगाचे आखातातहि जर्मनीच्या लढाऊ जहाजानी टेहळणी करण्यास सुरवात केली आहे. बाल्टिक समुद्राच्या काठच्या या प्राताकडे जर्मनी व रशिया या दोघानीहि गेले आठ महिने जवळ जवळ दुर्लक्ष केले होते, व लष्करी डावपेचाच्या खेळात लोणच्या पलीकडे या प्राताचा उपयोग नाही अशी सर्वांची समजूत झालेली होती. पण जर्मनी साप्रत या भागास महत्त्व देत आहे असे दिसते. रशियाकडून हेळसाड या भागाची झाली असल्यामुळे जर्मनीला कोपरानें खणण्यास मऊ जागा मापडली आहे, आणि शावली प्रात सर्व गाठून लिबो व रिगा ही दोन्ही बदरे जर्मनीनें लवकर आक्रमिल्यास त्यामुळे कोणास फारसे नवल वाटणार नाही. पण लिबो बदर, रिगा बदर व रिगाचा उपसागर व लिबोचे सर्व द्विपकल्पहि कबजात घेऊन करावयाचे काय ? वार्साच्या लष्करी धोरणावर त्याचा कोणता परिणाम होणार आहे ? कार्पेथियन पर्वताच्या लष्करी धोरणावर त्याचा कोणता परिणाम होणार आहे ? रशियाची उजवी बगल मागे परतवून तिला वळसा देऊन निःशकपणें पाहिजे तिकडे धुमाकूळ घालीत

सैरावैरा चाल करून जाण्यास व शत्रूचा मुलुख उध्वस्त करण्यास जर संधि मिळाली नाहीं तर लढाईची रांग उत्तरेस थोडीशी लांबविली या पलीकडे शावली प्रांतातील या स्वारीचा काही उपयोग नाही. जर्मनीने जर मोठे लष्कर लिबोच्या द्वीपकल्पात नेले असेल तर रशियाची उत्तर म्हणजे उजवी बगल त्याला मारता येईल, व रिगाचे आखात गाठून पेट्रोग्राडच्या दक्षिणेकडील श्रीमंत प्रदेशांत उध्वस्त करणारी लढाई नेऊन सोडण्याचे श्रेय जर्मनीला मिळेल. पेट्रोग्राडच्या जवळील दक्षिणेचा श्रीमंत प्रदेश जर जर्मनीस गाठता आला तर रशियन सेनापतीला दक्षिणेकडचे सैन्य उत्तरेकडे नेणे भाग पडेल. कसेहि असो, जर्मनीने रिगाच्या आखातापासून निमेन नदी, नॅरो नदी, व्हिश्चुला नदी, पिलिका नदी, नीडा नदी, क्रॅकोचा पूर्वभाग, डुक्ला घाट, युझाक घाट, स्ट्रायचें केंद्रस्थान, आणि बेसारेबिया आणि ओडेसा यांना शह देणारी बुकोव्हिनाची पूर्व सरहद्द या सर्व ठिकाणी म्हणजे बाल्टिक समुद्रांत रिगापासून काळया समुद्रांत ओडेसापर्यंत सर्व ठिकाणी एप्रिल अखेर एकदम हर हर महादेव म्हणण्यास प्रारंभ केला आहे. इतक्या सर्व ठिकाणी लढण्यास जर्मनीनें सैन्य कोठून आणले ? भगवान जाणे. या सर्व ठिकाणी लढण्याइतके रशियापाशी सैन्य आहे, व उन्हाळयात रशियापाशी अधिक सैन्य गोळा झालेले दिसेल हे पूर्वीच्या अंदाजाला धरून आहे. पण जर्मनीची सांप्रतची विलक्षण हालचाल पूर्वीच्या अंदाजाला सुटून आहे. जर्मनीच्या सेनेच्या संबंधाचे पूर्वीचे अंदाज तरी चुकलेले असले पाहिजेत किंवा जर्मनी तरी शेवटच्या त्राग्याने लढत असला पाहिजे. पणतीत तेल अंदाजापेक्षा तरी अधिक असले पाहिजे किंवा दिवा शेवटी मोठा झाला असला पाहिजे, यांपैकी खरे कोणचें हे मे–जूनमधील लढाया जाहीर करतील.

## पुन्हां यिप्रेस

घनघोर लढाई रशियाच्याच बाजूला तेवढी एप्रिलमध्ये चालू होती असे नाही तर फ्रान्स व बेल्जममध्येहि लढाईस पुन्हा ऊत आला होता. एप्रिल महिन्यात मेट्झच्या बाजूला फ्रेंचाचें पाऊल बरेच पुढे पडून, मेट्झच्या तटबंदीच्या बाहेरच्या भागावर तोफांचे गोळे टाकण्याइतके फ्रेंच लोक पुढे सरकले आहेत. फ्रेंचाचे पाऊल आस्ते आस्ते पुढे पडत आहे, आणि जर्मनी सामान्यतः फ्रेंचाच्या बाजूला स्वसंरक्षणाचेंच तेवढें काम करीत आहे. उन्हाळयाच्या दोन तीन महिन्यात फ्रेंच सैन्य या बाजूला जर्मनीस मेटाकुटीस आणील असा अंदाज आहे. डार्डानेलिसच्या

हल्ल्याचे कामात इंग्रजांनी जितका पुढाकार घेतला आहे तितका पुढाकार फ्रेंचांनी घेतलेला नाही, अर्थात् इंग्रजी सैन्य व इंग्रजी दारूगोळा डार्डनेलिसकडे अधिक खर्च होणार हे उघड आहे. शिवाय आरास व लाबासि ह्या टापूत नौचापेलीचा जो मोठा विजय इंग्रजांनी मिळविला त्या एका विजयाचेपायी सबंध बोअर युद्धाला जितका दारूगोळा खर्च झाला तितका दारूगोळा दोन दिवसात खर्च करण्यात आला. मद्यपानाच्या व्यसनामुळे दारूगोळ्याची सामग्री निर्माण करण्यात होणारी दिरंगाई, चढाई करून जाताना खर्च कराव्या लागणाऱ्या दारूगोळ्याचा नौचापेली येथे मिळालेला अनुभव, आणि डार्डनेलिस सर करण्याचा सुरू केलेला प्रचंड उद्योग, या कारणामुळे बेल्जम आणि आरास या टापूत इंग्रजांनी फारसे पाऊल पुढे टाकिले नाही. एप्रिलच्या प्रारंभी यिप्रेसच्या आग्नेयेस असलेली ६० नं ची उंच जागा दोन दिवस निकराने लढून इंग्रजांनी सर केली. ६० नं. ची जागा ही एक टेकडी नसून २५० यार्ड लांब व २०० यार्ड रुंदीचा एक उंचवटा आहे. यिप्रेस व त्याच्या आसपासच्या भागावर ज्या एका दुसऱ्या टेकडीवरून जर्मनींच्या तोफा मारा करीत असतात ती टेकडी ६० नं. च्या उंचवट्याच्या माऱ्यात असल्यामुळे हा ६० नं उंचवटा काबीज करण्याकरिता नौचापेलीच्या निम्मे किंमत इंग्रजांनी या उंचवट्यास दिली. डार्डनेलिसच्या कामगिरीकडे इंग्रजांना पूर्ण लक्ष पोचविता येऊ नये म्हणून बेल्जममध्ये इंग्रजांना तवी देण्याच्या इराद्याने जर्मनीने पुनः हालचाल सुरू केली. ६० नं. चा उंचवटा ताब्यात घेण्याकरिता दोन दिवस जर्मनांनी शिकस्त केली, पण इंग्रजी तोफापुढे त्यांचे काही चालले नाही इंग्रजांच्या व फ्रेंचांच्या तोफाहि आपल्या तोफाहून अधिक भयंकर आहेत असे पाहून, जर्मनांनी एका रानटी क्रूरपणाच्या उद्योगास यिप्रेसच्या उत्तरेस प्रारंभ केला. या रानटी क्रूरपणाच्या कृत्यामुळे जर्मनीची क्षात्रवृत्ति पूर्ण बिघडली आहे हे तर सिद्ध होतेच, पण युरोप खंडातील नेहमीच्या क्षात्रधर्माला धरून आपणास जय मिळविता येणे शक्य नाही असें खुद्द जर्मनीसच वाटत असले पाहिजे हे एक अनुमान सहज निघू शकते. यिप्रेसच्या उत्तरेस डिक्समूरच्या बाजूला जर्मनतळाकडून फ्रेंच तळाकडे वारा वहात आहे, अशी संधि पाहून चोहोकडे आगाऊ बसवून ठेविलेल्या व्यवस्थेशीर यंत्रातून विषारी धुराचे लोट जर्मनीनें बाहेर सोडले, वाऱ्याने हे लोट फ्रेंचांच्या अंगावर आणले, हा धूर नाकात शिरण्याबरोबर फ्रेंच सैन्याला काही काळ मूर्छा

आली. स्वतःच्या नाकात हा धूर शिरू नये म्हणून कार्बनच्या रासायनिक द्रव्यांत भिजविलेली फडकी पडद्यासारखी जर्मनानी आपल्या नाकातोंडावर बांधली होती. फ्रेंच सैन्य गोंधळले आहे व मूर्छेत पडले आहे असे पाहून जर्मनानी यिप्रेस कॅनॉलपर्यंत फ्रेंचाचा तळ व्यापून टाकिला. फ्रेंचाची फळी फुटली खरी, तरी यिप्रेस कॅनॉलच्या पलीकडे फेकून द्यावयाला लागेल तेवढे सैन्य जर्मनीपाशी नसल्यामुळे बोसिंगे गावच्या पलीकडे जर्मनीला जाता आले नाही, आणि यिप्रेस कॅनॉलवर असलेल्या दोन पुलाच्या पलीकडले तळ तेवढे हातात ठेवून यिप्रेस कॅनॉलच्या अलिकडे जर्मनाना यावे लागले. फ्रेंच सैन्य यिप्रेस कॅनॉलच्या मागे हटल्याबरोबर यिप्रेस शहराच्या खुद्द उत्तरेस असलेल्या कानडाच्या फौजेची डावी बाजू उघडी पडली, आणि कॅनेडीयन फौजेलाहि मागे हटावे लागले. ही माघार घेताना कॅनेडियन फौजेच्या चार तोफा जर्मनाच्या हाती लागल्या. आपल्या शौर्यास हा कलंक लागतो हे पाहून, मध्यरात्री अडीच हजार कॅनेडियन फौजेने हे तोफाचे ठिकाण पुनः गाठले, आणि जर्मन सेनेची कत्तल चालविली. पण दुसरे दिवशी ते अडीच हजार लोक वेढले गेले. अशी स्थिति प्राप्त झाली तरी कॅनेडियन लोक पुनः एक दिवस व एक रात्र जर्मनाशी निकरानें लढले, आणि जर्मनीच्या प्रत्येक लढवय्याला भित्र्या भागूबाईप्रमाणे त्यानीं पळावयास भाग पाडिले. दुसऱ्या दिवशीं इंग्रजाची व फ्रेंचाची कुमक त्याना येऊन पोचली, आणि अवशिष्ट राहिलेले कॅनेडियन व्यवस्थित रीतीनें यिप्रेसच्या बाजूला परत येऊन पोचले. कानडाचे कल्पनेच्या बाहेर या युद्धात नुकसान झाले. सदरील अडीच हजार वीरापैकीं मृत्यूशी झुंजण्यास कोणी कसूर केली नाहीं. मृत्युसंख्येच्या दृष्टीनें फारच नुकसान झाले, तरी पण चार तोफा मागे ओढून आणण्याच्या साहसी पराक्रमानें सर्व इंग्रजी साम्राज्याला व विशेषतः कानडाला त्यानी आनंदित व उल्हसित करून सोडले. या चार तोफा परत आणल्यानंतर यिप्रेसच्या कॅनालच्या मागे फ्रेंच सैन्य ज्याप्रमाणाने मागे हटले त्याचप्रमाणाने कानडालाहि आपलें ठाणे मागे हटवून घ्यावे लागले, म्हणजे यिप्रेसच्या उत्तरेस तीन मैलावर असलेले सेटज्युलियन गाव जर्मनाच्या हाती जाऊन यिप्रेसच्या उत्तरेचा मैल दोन मैलाचा परिघ संरक्षण करण्याचे काम कानडाकडे आले. कॅनेडियन लोक अशारीतीने मागे हटल्यामुळे यिप्रेसच्या ईशान्येस व पूर्वेस असलेल्या इंग्रजानाहि कॅनेडियन तळाला मिळता येईल असा आपलाहि तळ मागे हटवून घ्यावा लागला. यिप्रेस गावापासून दोन चार मैलावर जर्मन आता आले असून यिप्रेस कॅनॉलहि

बिक्सच्युट व डिक्सम्यूर या गावांच्या बाजूला त्यांनीं ओलाडलें आहे. गेल्या आठ महिन्यात येवढा मोठा भडिमार कधीहि पूर्वी झाला नाही. असला भडिमार मे प्रारभाला यिप्रेस गावावर जर्मनीनें सुरू केला असून मे महिन्यात यिप्रेस गाव व इतर कॅनालच्या बेल्जमचा अवशिष्ट भाग काबीज करण्याचा जर्मनीचा रोख दिसतो. विषारी धुराच्या मूर्छनेचा अधर्म जर्मनी सर्व रणभूमीमध्ये लवकरच सुरू करील, आणि दुर्बल झालेले लोक निष्करुण व पापी होतात ह्या न्यायानें सैन्याचा तुटवडा अधर्मानें भरून काढील, अशी भीति सर्व सज्जनाना साप्रत वाटत आहे. समुद्रात पाणबुडया बोटीच्या अधर्माला विषारी धुराच्या अधर्माची जोड मिळाली आहे, आणि या अधर्माच्या जोरावर डकर्कपर्यंत सर्व बेल्जम घशात घालण्यास जर्मनी प्रवृत्त झाला आहे. डकर्कपासून एकवीस मैलाच्या अतरावर डिक्सम्यूरच्या बाजूला जर्मन तळ आहे, या ठाण्यात जर्मनानी एक मोठी तोफ बसविली असून त्या तोफेने २१ मैलाच्या अतरावर डकर्क बदरावर दोनदा मडिमार केला. या असल्या प्रचड तोफा लढाईच्या कामाला फारशा उपयोगी जरी नसल्या तरी सामान्य लोकास उगीच लाबून भिवविण्यास बऱ्याच उपयोगी पडतात. या तोफेच्या दहशतीच्या जोरावर विषारी धुराचा अधर्म जरी डकर्ककडे वाट चालू लागला तरी समुद्रातून पाणबुडया बोटीच्या चाचेगिरीप्रमाणे त्या अधर्मासहि विशेषसें यश येणारे नाहीं अशी इग्लडला खात्री वाटत आहे. पाणबुडया बोटीच्या चाचेगिरीस एप्रिल महिन्यात तरी कोठे यश आले ? सर्व महिन्यात मिळून २०–२५ च जहाजे काय ती त्यानी बुडविली. नाही म्हणायला भूमध्य समुद्रात इटालीच्या दक्षिण टोकाजवळ ॲड्रियाटिक समुद्राच्या बाजूला, ऑस्ट्रियाच्या पाणबुडया बोटीने एक फ्रेंचाचे लढाऊ क्रूझर बुडविले ! जर्मन पाणबुडया बोटीप्रमाणें जर ऑस्ट्रियन पाणबुडया बोटी आपल्या घरट्यापासून महिना महिना बाहेर राहून समुद्रात फार दूरवर सचार करू लागल्या तर ग्रीस, माल्टा व इटली याच्या बाजूच्या भूमध्य समुद्रातील व्यापारी जहाजाचे रस्ते सुरक्षित रहाणे शक्य नाहीं; किंबहुना डार्डानेलीसपर्यंत म्हणजे ग्रीसच्या पूर्वेस एजियन समुद्रातहि या पाडबुडया बोटींचा सुळसुळाट मे–जूनमध्ये ऐकू येण्याचा सभव आहे. पाणबुडया बोटींनी असल्या काही किरकोळ अधर्मात जय मिळविला आणि विषारी धुराच्या अधर्मानें जरी जर्मनीला थोडेसे पुढे सरकता आले तरी अखेर अधर्म तो अधर्मच.

---

# महायुद्धाचा मे-जून महिना

महायुद्धाचा मे महिना पूर्वीच्या महिन्याहून विशेष महत्वाचा गेला. महायुद्धाच्या इतिहासात विशेष महत्त्वाच्या समजल्या जाणाऱ्या अशा दोन गोष्टी या महिन्यात घडून आल्या. या दोन गोष्टींपैकी एक गोष्ट कडू आहे व दुसरी गोष्ट गोड आहे. कडू गोष्ट म्हणजे कार्पेथियन पर्वतावरील लढाई होय. सबंध मे महिना ही लढाई चालून जूनच्या प्रारंभीहि या लढाईचा जोर कमी झालेला नाही. ह्या लढाईत रशियाची पिछेहाट झाली असल्याने, ही लढाई म्हणजे इंग्रजी साम्राज्य व इतर दोस्त सरकार याना गिळावा लागलेला कडू घास होय. पण हा कडू घास गिळत असताना इटलीची साखर त्यावर पडल्यामुळे त्याचा कडूपणा नाहीसा झाला आहे. इटली महायुद्धात इंग्रजी साम्राज्याच्या वतीने सामील झाल्यामुळे महायुद्धाचे स्वरूप काही अशी पालटले असून इंग्रजी साम्राज्यात व दोस्त मंडळात नवीन विश्वास व नवीन उत्साह उत्पन्न झाला आहे. इटलीने हा गोड घास महायुद्धास चारला आहे. गोड घास शेवटी घ्यावा या न्यायाने, कार्पेथियन पर्वतातील लढाईचे प्रथम अवलोकन करून, नंतर इटालीच्या युद्धाकडे वळणे हे शिष्टसंमत होय. एप्रिल अखेर कार्पेथियन पर्वतातल्या बातम्या गोड होत्या. पण मे प्रारंभापासून त्या बातम्यातील गोडवेपणा नाहीसा होऊ लागला, आणि मे अखेर तर या बातम्या एकदम कडू झाल्या. हा कडूपणा कितपत तीक्ष्ण होणार, व महायुद्धाच्या इतर रणभूमींना कितपत व्यापून टाकणार, हे जून महिन्यात दृष्टोत्पत्तीस येईल. कार्पेथियनमधील लढाईची भट्टी मे महिन्यात बिघडली. कार्पेथियनची लढाई मे महिन्यात नासली, एकच पदार्थ बिघडून रहातो, का सर्वच जेवण बेचव व कडू होते, हे जून महिन्यात ठरावयाचें आहे. एक पदार्थ बिघडला यात संशय राहिला नाहीं. तथापि इंग्रजी साम्राज्यास पूर्ण विश्वास असा आहे की, पुन्हा टवटवीत होण्याचे रशियाचें विलक्षण सामर्थ्य रशियास या प्रसंगातून पार पाडून नेऊन, बेल्जम, फ्रान्स, डार्डानेलिस वगैरे ठिकाणी फ्रेंच व इंग्रज आचारी बनवीत असलेली पक्वान्ने जर्मनीस कडू घास म्हणून खावयास लावून इटलीची साखर सर्वांस अखेरचा गोड घास चारील. उलटपक्षीं जर्मनीचा असा

कटाक्ष दिसतो की, कार्पेथियनमध्ये जे आपण वीप तयार केले आहे, त्या विषाच्या गोळ्या प्रथम रशियास, नतर सर्व्हियास व त्यामागून इटली, फ्रान्स व इग्लड यास यथावकाश व यथास्थल खावयास लावण्यास जिवापाड शिकस्त करावयाची. जर्मनीची ही घमेंड निराधार असून अतिशयोक्तीची आहे हे रशियाचा गेल्या शभर वर्षांतील इतिहास कठरवाने सागत असल्यामुळे कार्पेथियन पवतातील ऑस्ट्रियाच्या व जर्मनीच्या यमस्वरूपास कोणीहि भीक घालणार नाही. एप्रिल महिन्याच्या अखेरीस कार्पेथियन पर्वतातले उत्साहजनक स्वरूप दिसत असता मे महिन्याच्या अखेरीस तेच स्वरूप अत्यत खेदजनक कसे झाले ? विजयाचा पराजय कसा झाला ? हगेरियाला मे–जून महिन्यात आपण तुडवू या ईर्षेने कार्पेथियन पर्वताच्या डोक्यावर नाचणाऱ्या रशियन वीराना शेपन्नास मैल मागे एकदम कसे परतावे लागले ? या बोटावरची थुकी त्या बोटावर एक महिन्याच्या अवधीत हा हा म्हणता कोणत्या जादूने नेली ? रगमहालात नेऊन सोडणाऱ्या पुष्पवाटिकेचा देखावा रगभूमीवर दिसता दिसता एकदम भयानक यमपुरी कार्पेथियन पर्वतात कोणत्या सूत्र चालनानें दृष्टीस पडली ! लेखणीच्या फटकाऱ्याने एका मागून एक विस्मयजनक प्रवेश जसे ग्रथकारास लिहिता यावे किंवा पडद्याच्या दोऱ्या एक टाकून एक ओढल्याने रगभूमीवर देखाव्यात चटदिशी फेरबदल जसा करून दाखविता यावा, त्याप्रमाणें कार्पेथियन पर्वतात सुलटयाचे उलट कसे झाले ! रशियाच्या विजयाचे ऐवजीं रशियाची पिछेहाट आकस्मिक कशी झाली हें समजावून घेण्याकरितां एप्रिल अखेर कार्पेथियन पर्वताची स्थिति कशी होती हे आपण पाहू. मे प्रारभाला डक्ला घाटाच्या पश्चिमेस असलेला तिलिझ घाट रशियानें घेतला होता आणि तिलिझ व डुक्ला या दोन घाटानी खाली उतरून हगेरीच्या मैदानावरचे वार्टफीड गावहि रशियानें घेतले होते. डुक्ला घाटाच्या पूर्वेकडचे लपकौ व रास्टोकी हे घाटहि रशियानें घेतले होते, आणि रास्टोकीच्या पूर्वेकडील युझाक घाटावर रशियाचा शह बसलेला होता. युझाक घ्यावयाला उत्तरेकडून, पश्चिमेकडून व अशतः दक्षिणेकडून तब्री देण्याचा रशियाचा उद्योग जारीने सुरू होता. डुक्ला घाट जरी रशियाच्या पूर्ण ताब्यात होता, तरी त्या घाटाच्या पश्चिमेकडील व वायव्येकडील शेपन्नास मैलाचा मुलूख रशियाच्या ताब्यात नसल्यामुळे व त्या घाटात आगगाडी नसल्यामुळे डुक्ला घाटांतून मोठे सैन्य हगारीत उतरविणें लष्करी धोरणाच्या दृष्टीनें चुकीचें झाले असतें. यासाठी डुक्ला

घाट व त्याच्या आसपासचा प्रदेश चांगला कह्यांत ठेऊन युझाक घांटानेंच रशियाची मुख्य सेना हंगारीवर उतरणार होती. युझाक घाट हा लेंबर्ग व प्रिजमिसल ह्या दोन्ही ठाण्यांना जवळ असल्यामुळे आणि या घाटातून प्रिजमिसलकडे व लेंबर्गकडे जाणारे आगगाडीचे फाटे असल्यामुळे लष्करी धोरणाच्या दृष्टीने हा घाटच हंगारीवरील स्वारीचें केंद्रस्थान होऊन बसला होता. मार्च महिन्यात प्रिजमिसल पडल्यानंतर रशियाने युझाक घाटावर जोराचे हल्ले सुरू केले. या हल्ल्यात रशियास जय येऊ नये म्हणून, ऑस्ट्रियाने स्टॅनला प्रांतातून स्वारी करून स्ट्रीज गांव आपल्या ताब्यात घेतला. युझाक घाट व स्ट्रीज यामधील व्हीजको प्रांत व आगगाडी रशियाच्या ताब्यात एप्रिलमध्ये होती. व स्ट्रीज येथील ऑस्ट्रियन सैन्याचा पाया, युझाक घाटाच्या बाजूने नसून स्टॅनला व बुकोव्हिना याच्या बाजूला होता. हंगेरियावर स्वारी करून यश मिळविण्याकरिता रशियाला युझाक घाट पूर्णपणे कबजात घ्यावयास पाहिजे होता, व हा घाट निर्विघ्नपणे आपल्या कह्यात ठेवता यावा म्हणून स्ट्रीज व स्टॅनला या टापूतून ऑस्ट्रियास हाकून देणें रशियाला भाग होते. शिवाय डार्डोनेलिस येथील तुर्की युद्धावरहि अंशतः कांहीं परिणाम व्हावा म्हणून व रुमानियावर वजन पडावें म्हणून बुकोव्हिना प्रांत सर करणे रशियास भाग होतें. या गोष्टी घडवून आणण्याकरिता रशियानें बुकोव्हिनावरची दुसरी स्वारी एप्रिल अखेर सुरू केली. स्ट्रीज, स्टॅनला व बुकोव्हिना या टापूत रशियाचें मोठें सैन्य गोळा करण्यात आलें, आणि युझाक घाटावर हातवड्याचे एकसारखे घाव मारण्यास सुरवात झाली. एप्रिल अखेर रशियाच्या असे निदर्शनास आले आहे कीं, युझाक घाटात ऑस्ट्रियाची बळकटी विशेष होऊ लागली आहे, व जर्मन सैन्याची कुमक ऑस्ट्रियास येऊन मिळाली आहे. स्ट्रीज, स्टॅनला व बुकोव्हिना येथेहि जर्मनीची कुमक ऑस्ट्रियास मिळाल्यामुळें, ऑस्ट्रियाची प्रतिकारशक्ति वाढलेली रशियाच्या दृष्टीस पडली. अर्थात युझाक घाट व स्ट्रीज–स्टॅनलाचा टापू येथे जर्मनी रशियास तोंड देणार, व हंगारीवर मोठें सैन्य उतरविण्यापूर्वीच्या प्रास्तविक लढाया याच टापूत होणार असा रशियन सेनापतीनीं अंदाज बांधला. ह्या लढ्यात एकदा आपण जय मिळविला म्हणजे सबंध कार्पेथियन पर्वत पर्वत निर्विघ्नपणें आपल्या हातात पडला, मग युझाक घाटानें खालीं उतरून हंगेरियाच्या मैदानात महायुद्ध ढकललें असताना हतवीर्य झालेल्या शत्रूची त्याच्याच

घरांत ताराबळ उडवून त्याला त्राही त्राही म्हणावयास लावण्यास कितीसा उशीर लागणार ? युझाक घाट, स्ट्रीज व स्टॅनला, येथील टापू त वरील लष्करी धोरणाला धरून मोठी लढाई लढण्याची तयारी रशियाने आरभिली. स्ट्रीज व युझाक याच्या दरम्यान रशिया कमर बाधीत होता. ऑस्ट्रियाकरितां जर्मन कमरेचे शेले याच टापूकडे येताना त्याला दिसत होते. जर्मनीचा शेला कमरेभोंवतीं गुडाळण्यात ऑस्ट्रिया प्रारभ करतो न करतो त्यापूर्वीच आपली कमर बाधली जाऊन आपण दड थोपटू अशी रशियास खात्री वाटत होती. अशी खात्री वाटण्यास दुसरींहि कारणे उपस्थित झाली. जर्मनीने रशियाच्या बाल्टिक समुद्रावरच्या लुबा प्रातावर याच सुमारास हल्ला केला, आणि नॅरो नदीवरील रशियाची तटबदी फोडून दक्षिणेस वार्साकडे उतरण्याचा अविर्भाव आणला. क्रॅकोच्या बाजूला व दक्षिण पोलंडात नीडा नदीवरहि जमनीची हालचाल सुरू झाली. या सर्व हालचालीवरून रशियाने असा तर्क बाधला कीं, या हालचाली मोठया हल्ल्याच्या स्वरूपाच्या नसून रशियास भय दाखवून, रशियास नुसते गुतवून ठेवून, युझाक-स्ट्रीज टापू त रशियास आपली कमर नीट खेचता येऊ नये म्हणून योजलेल्या या सामान्य युक्त्या होत. रशियानें या युक्त्याकडे दुर्लक्ष केले व स्ट्रीज युझाक टापू त अधिक जोराने कमर खेचण्यास सुरुवात झाली. हगारीमधील महायुद्धाच्या प्रास्ताविक लढाया युझाक घाटाच्या आसपासच लढल्या गेल्या पाहिजेत असे रशियानें मुक्रर ठरविले, व युझाक घाट हीच रणभूमि लढाईस योग्य असा स्वतःच्या मनाशी ठराव केला. इतर रणभूमीमध्ये जरी जर्मनीने हालचाल केली तरी ती हालचाल स्थानिक स्वरूपाचीच होऊन मोठया जोराची होणार नाहीं, व अखेर जर्मनीसहि आपण आगाऊ ठरविलेल्या रणभूमीवरच उभें राहून दोन हात करावे लागतील, असा सिद्धात ठरविण्यास रशियास दुसरे एक कारण याचवेळी घडून आले. यिप्रेस व इसर कॅनॉल या बेल्जममधील टापू त, विषारी धुराच्या साहाय्याने जर्मनीनें बराच धुमाकूळ सुरू करून कॅलेवर हल्ला करून आपण जाणार अशी वर्तमानपत्रातून आरडाओरड सुरू केली. रशियाच्या बाजूचें पूर्वेकडचें बरेच सैन्य जर्मनीने पश्चिमेकडे बेल्जममध्ये नेले असावें असे अदाज बाहेर पडू लागले. डार्डनेलिस येथें इग्रजानी जोर बाधल्यामुळे इग्रजाना उलट तबी देण्याकरिता या लष्करी धोरणाचा अगिकार जर्मनी करील असा अदाज जर एप्रिलमध्ये कोणी बाधला

असता तर तो अयथार्थ होता असे त्यावेळीं म्हणता येणें शक्य नव्हतें. सर्व निरनिराळ्या रणभूमीच्या या बाह्य देखाव्यामुळे एप्रिल अखेर व मे च्या प्रारंभीं रशियास असा भास झाला की, कॅलेवर चाल करून जाण्यास जर्मनीनें कमर बांधली आहे. लुब्रा प्रांत, नॅरो नदी व दक्षिण पोलंड आणि क्रॅकोचा टापू येथे जर्मनी नुसत्या हुलकावण्या दाखवीत असून युझाक घाट आणि स्ट्रीज–स्टॅनला टापू येथे जिवापाड लढून नुसते अडविण्याच्या उद्देशानें ऑस्ट्रिया उभा राहिला असून याच टापूत ऑस्ट्रियाची कमर खेचण्याकरिता जर्मनीचा शेला येऊन पोचत आहे. वरील सर्व कारणाकरिता रशियन सेनापतींनी युझाक घाट व स्ट्रीज–स्टॅनला टापू ही रणभूमि म्हणजे कार्पेथियन पर्वतांतील मुख्य रणभूमि होय असे आपले मत निश्चत केले आणि सैन्याच्या हालचाली या मताला धरून चालविल्या, पण जर्मनीने दुसरीच रणभूमि मनात निश्चित करून ठेविली होती ! रशियाच्या डोळ्यात उडण्याकरिता बेल्जममध्ये, लुब्रा प्रांतात, दक्षिण पोलंडात व उत्तर पोलंडात धूळ उडवीत असताना त्या धुळीच्या पडद्याआड नव्याच देखाव्याची तयारी क्रॅकोच्या टापूत जर्मनीने गुप्तपणे चालविली होती.

## ‘ इतिहासांतील सर्वांत मोठी लढाई ’

कार्पेथियन पर्वताच्या जंगी लढाईस युझाक–स्ट्रीज–स्टॅनला या टापूत तोंड लागेल अशी जरी रशियाची अटकळ होती, तर क्रॅकोच्या टापूत मोठा सेनासमूह गोळा करून तारीख ३–४ मेच्या सुमारास क्रॅको येथील जर्मन सैन्य क्रॅकोच्या पूर्वेस असलेल्या डयूनाजी नदीवर चाल करून गेलें. क्रॅकोच्या दक्षिण–पूर्वेस डयूनाजी नदीवर असलेलें नाऊसॅडेक हे गाव यावेळी ऑस्ट्रिया–जर्मनीच्याच ताब्यात होतें. नाऊसॅडकच्या दक्षिणेस कार्पेथियन पर्वतातील टार्नो घाट असून या टार्नो घाटाच्या उत्तरेस रेजेटौ गाव आहे. हें गाव रशियाच्या ताब्यात मे महिन्याच्या प्रारंभी होते. व तेथून नाऊसॅडेक वगळून डयुनाजी नदीच्या काठाने व्हिश्चुला नदीपर्यंत पश्चिम ग्यालिशियात व व्हिश्चुलाच्या उत्तरेस दक्षिण पोलंडात नीडा नदीच्या काठानें रशियाचा तळ पडलेला होता. नीडा नदी व डयुनाजी नदी ही या तळाची पूर्वेकडील भिंत होय. टार्नो घाटातून डयुनाजी नदीचा उगम आहे. तेथपासून म्हणजे टार्नो घाटापासून ते युझाक घाटापर्यंत पश्चिम ग्यालिशियातील सर्व कार्पेथियन पर्वत रशियाच्या ताब्यांत असल्यासारखा होता. युझाक घाटाच्या

पूर्वेस स्ट्रीज–स्टॅनला टापू व बेसकीड, व्हिजको वगैरे कार्पेथियनचे घाट पूर्व ग्यालिशियाला धरून असल्यामुळें रशियाने आंखडून ठेविलेल्या रणभूमीसंबधाचे ते भाग होत.पूर्व ग्यालिशियात लढाई न टाकता पश्चिम ग्यालिशियात डयुनाजी नदीच्या काठावर जर्मनीने एकदम लढण्यास सुरुवात केली. नाऊसॅडेक व टार्नो किल्ला यामधील टापूतील डयुनाजी नदीवर एकदम हल्ला केला व टार्नो घाटातून वर चढून रेजेटौ हे गाव कब्जात घेऊन गार्लिसच्या रोखाने जर्मन सैन्य उत्तरेकडे चालू लागले. मे महिन्यातील पहिल्या आठवडयाच्या लढाईत जर्मन सैन्याने डयुनाजी नदी ओलाडून टार्नोचा किल्ला कब्जात घेतला व नाऊसॅडेकच्या पूर्वेस असलेलें गार्लिस गावहि ताब्यात घेतले. व तेव्हापासून दक्षिणेस गार्लिस व उत्तरेस टार्नो या पचवीस तीस मैल रुदीच्या पटयावर सर्व सैन्य गोळा करून मुख्य माऱ्याचा भाग ही २५ मैल रुदीची फळी जमनीने नेमस्त केली. पश्चिमेकडून पूर्वेकडे प्रिजमिसलच्या दिशेने ही पचवीस मैल रुदीची फळी एकसारखी पुढे चालू लागली ! दुसऱ्या आठवडयात टार्नोजवळील सैन्य पूर्वेस रेसझौ या किल्ल्यापर्यंत गेले, व दक्षिणेकडील गार्लिस हें टोंक जसलो ओलांडून क्रॅसनोपर्यंत येऊन पोचले. चौदा–पधरा मेच्या सुमारास गार्लिस टार्नोच्या ऐवजी क्रॅसनो–रेसझौ येथपर्यंत ही पचवीस मैल रुदीची पाचर रशियाच्या तळात शिरली. १८–१९ मे च्या सुमारास या लढाईचे खरे स्वरूप रशियाच्या ध्यानात आले, आणि तेव्हापासून अत्यत भयकर रणकदनास सुरुवात झाली. मे महिन्याच्या पहिल्या आठवडयात ज्यावेळी डयुनाजी नदीवर २०–२५ मैल रुदीच्या पटयात जर्मनीने रशियाची फळी फोडली, त्यावेळी २–४ मैल पलीकडे कोठेतरी जर्मनीस आपण थोपवून धरू असे रशियास वाटले, आणि आपल्या फळीचा पुढचा भाग तेवढा फुटलेला आहे, पण पाठीमागील पूर्वीच आखून ठेवलेल्या भागावर सैन्य बदोबस्तानें उभे आहे, इतकेच नव्हे तर कार्पेथियन पर्वतावरील आपला शह यत्किंचित्‌हि ढिला झालेला नाहीं असे रशियाने जाहीर केलें होते, जर्मनी थोडासा पुढे आला म्हणून काय झाले, तो फार पुढे कसचा येतो, असे रशियास वाटलें. म्हणून रशियानें डयुनाजी बाजूच्या फळीचा विशेष बदोबस्त न करिता स्ट्रीज–स्टॅनला व बुकोव्हिना येथें गोळा झालेल्या आपल्या सैन्यास ऑस्ट्रियावर तुटन पडण्यास हुकूम दिला. स्ट्रीज-स्टॅनला बाजूचें ऑस्ट्रियन सैन्य माघार खाऊ लागलें आणि बुकोव्हिनातील ऑस्ट्रियन सैन्याचा तर रशियाने धुव्वाच

उडवून दिला! बुकोव्हिनाच्या बाजूला मोठी लढाई लढावयाची नाही, असा ऑस्ट्रियाचा संकल्प यावेळी असल्यामुळे बुकोव्हिनातून कार्पेथियन पर्वतात येणारे ऑस्ट्रियन सैन्य बुकोव्हिनात विशेष न लढता नद्यांच्या व घाटाच्या आश्रयानें मजबूत जागा पकडून बसू लागलें. पण स्ट्रीज स्टॅनला येथे मात्र आस्ट्रिया नेटानें लढू लागला. मे महिन्याच्या १०–१२ तारखेपर्यंत ड्युनाजी नदीवर जर जर्मनानीं आपणास मागें ढकललें तर बुकोव्हिनाच्या लढाईंत आपण ऑस्ट्रियास लाब पिटाळून लावलें, तेव्हा फिटाफिट होऊन बुकोव्हिनातील ऑस्ट्रियाची ताराबळ संभाळण्याकरिता ड्युनाजीच्या बाजूची कामगिरी अर्धवट टाकून बुकोव्हिनाकडे जर्मनी धावत येईल, अशी रशियानें अटकळ बांधली. ड्युनाजी नदी व बुकोव्हिना येथील लढाई याची म्हणजे पश्चिम ग्यालिशिया व पूर्व ग्यालिशिया येथील लढायाची फिटाफिट होत नाही, बुकोव्हिनाच्या बाजूला मागें सरकणे हा जर्मनीच्या खेळातील एक डाव असून ड्युनाजी नदीवर गार्लिस पासून टार्नोपर्यंत २५ मैल रुंदीची आस्ते आस्ते पुढें ढकलण्यात येत असलेली पाचर प्रिजमिसलपर्यंत नेऊन तेथून लेंबर्गपर्यंत पोचविण्याचा जर्मनीचा इरादा असून त्या तयारीनेच जर्मनी लढत आहे, हे अर्धा मे महिना गेल्यानंतर रशियाच्या ध्यानात आलें. पूर्व ग्यालिशियाचा जर नकाशा पाहिला तर असे दिसून येईल की मे महिन्याच्या प्रारंभीं रशियाच्या ताब्यात असलेल्या पूर्व ग्यालिशियाच्या पूर्वेस ड्युनाजी नदी, उत्तरेस व्हिश्चुला नदी आणि व्हिश्चुला व उत्तर सॅन नद्यामधील त्रिकोण, आणि दक्षिणेस डुक्ला घाटापासून युझाक घाटापर्यंतचा कार्पेथियन पर्वत यानी हा भाग वेष्टिलेला आहे. उत्तरेकडील व्हिश्चुला नदी व उत्तर सॅन नदी यामधील टापूस जर्मन शिवला नाही, व दक्षिणेकडील कार्पेथियन पर्वताच्या ८०–९० मैल लांबीच्या भागासहि जर्मन सैन्य शिवलें नाहीं. ड्युनाजी नदीचा मध्य भाग २०–२५ मैल शोधून काढून तेवढ्याच टापूत पाचर ठोकण्यास जर्मनीनें सुरुवात केली. या २०–२५ मैल रुंदीच्या पट्ट्यावर जर्मनीने जवळ जवळ १५०० तोफा गोळा केल्या. काही प्रसंगी तर या १५०० तोफांनीं ४ तासात ४॥ लाख या प्रमाणानें कित्येक मण वजनाच्या गोळ्यांचा रणभूमीवर वर्षाव केला! तोफखान्यावर तोफखाना असे दुमजली, तिमजली तोफांचे मोर्चे काहीं ठिकाणीं बनविण्यात आले होते! १५ तारखेनंतर रशिया सावध झाला.

ही रोजची सामान्य झुंज नसून हें उग्र स्वरूप जिवापाड लढून पूर्व ग्यालिशिया व साधल्यास लेंबर्गहि घेण्याच्या इराद्याने जर्मनीनें प्रकट केले आहे असे रशियाच्या ध्यानात आले. लगेच बुकोव्हिनातील सैन्य रशियाने आखडून धरले आणि सर्व सैन्याचा मारा व सर्व सैन्य प्रिजमिसलच्या पूर्वेस २५–३० मैलावर रवाना करण्यात आले. १८–१९ मेच्या सुमारास प्रिजमिसलच्या पूर्वेस २०–२५ मैलावर जर्मनीची पाचर येऊन पोचली, व दक्षिण सॅन नदी ओलांडण्यास जर्मनीने सुरुवात केली. १८–१९ मेच्या सुमारास तीन दिवसापर्यंत रशियाने जर्मनीच्या मध्यावरच्या पाचरेस अत्यंत निकराने लढून थोपवून धरले व ही लढाई इतिहासातील सर्वांत मोठी लढाई होय असे प्रसिद्ध करण्यात आले. यावेळी जर्मनी जिवापाड लढून १५०० तोफांच्या जोरावर आपली २० मैल लांबीची पाचर आत घुसविण्याचा प्रयत्न करीत होती, व रशिया भयंकर गोळ्याच्या वर्षावाखाली हजारो सैन्य बळी देऊन कार्पेथियन पर्वत व व्हिश्चुला नदी याच्यावर पसरलेले आपले हात व्यवस्थितपणे मागे घेण्याच्या उद्योगात गुन्तला होता. जर्मन सैन्याचा मध्य अशा रीतीने आत घुसल्या-नंतर उत्तरेकडील व दक्षिणेकडील पुढें गेलेले आपले हात मागे परतवून घेणे हे काम बिकट होते. पण रशियाने ३ दिवसपर्यंत घनघोर युद्ध करून मध्ये घुसलेल्या पाचरेस पुढे सरकू दिले नाही आणि व्हिश्चुला नदीकाठचा आपला हात व कार्पेथियन पर्वतावर ८०–९० मैलाच्या टापूवर रशियाने टाकलेला आपला पजा ३ दिवसात फार शिताफीने व व्यवस्थितपणानें प्रिजमिसलपर्यंत मागे ओढून घेतला! महायुद्धाचे प्रारंभी बेल्जम सरहद्दीवर मॉन्स येथे पराभव पावल्यावर ज्या शिताफीने, युक्तीने व नेटाने लढत लढत इंग्रजी सैन्य बेल्जम सरहद्दीपासून पारिसपर्यंत ३–४दिवसाच्या अवधीत मागे परतले, त्याच शिताफीनें व युक्तीने पाठलाग करून येणाऱ्या जर्मन सैन्याशी लढत लढत कार्पेथियन पर्वतावरील सर्व रशियन सैन्य प्रिजमिसलच्या आसपास ३–४ दिवसात सुरक्षित जाऊन पोंचले! व्हिश्चुला काठच्या सैन्यानेहि अशीच करामत करून दाखविली. व्हिश्चुला नदी सर्व सोडून या सैन्यानें सॅन आणि व्हिश्चुला याच्या संगमाचा त्रिकोण मोठ्या शिताफीनें गाठला आणि दक्षिण पोल-डातील नीडानदीच्या काठचा रशियाचा तळ उठवून व्हिश्चुला उत्तर वाहिनी होते त्या टापूत व्यवस्थितपणें माघार खात येऊन पोचले. म्हणजे मध्यावरची पाचर जरी आत शिरली तरी पूर्व ग्यालिशियाच्या उत्तरेकडचा म्हणजे व्हिश्चुला नदीच्या

दोनहि काठचा रशियाचा हात लुला होऊन न पडतां पुढें केला होता तो मागें सरकावून घेऊन सुरक्षितपणें पाठीआड करता आला. त्याचप्रमाणें दक्षिणेकडचा कार्पेथियन पर्वतावर टाकलेला पजाहि शत्रूच्या हातीं एक बोटहि किंवा नखहि न लागता कासव ज्याप्रमाणे हात पोटात ओढून घेते, त्याप्रमाणें रशियानें कार्पेथियन पर्वतावरील पसाऱ्यासकट प्रिजमिसलच्या पोटात ओढून घेतला. जर्मनीनें मध्यावर तेवढे लक्ष दिलें पण दोन्ही बगलावर लक्ष पुरविले नाही. त्यामुळे रशियास मध्यावर पराजय चालला असताहि बगलाच्या बाजूने हात आंत ओढून घेऊन माघारीच्या काळातले विलक्षण कर्तृत्व जगास दाखविता आले ! मॉन्सनतर पारिसपर्यंत माघार खाताना इंग्रजी सेनापति फील्ड मार्शल फ्रेंच यानी जी हिम्मत व युक्ति दाखविली तशाच प्रकारचें चातुर्य व तशाच प्रकारचा नेट यावेळीहि रशियाने दाखविला. झाले, दोन्ही बाजूचे हात आखडून घेण्याबरोबर रशियानें मध्यावरच्या पाचरेस २०–२२ मेनतर पुढे येऊ दिले. मे महिन्याच्या तिसऱ्या आठवड्यात जर्मन सैन्य प्रिजमिसलच्या पूर्वेस थडकलें. प्रिजमिसलच्या उत्तरेस जारास्लौव्ह व सिनिव्ह हे सॅन नदीकाठचे प्रात जर्मन सैन्यानें व्यापले. व जारास्लौव्ह येथून लेंबर्गकडे जाणाऱ्या आगगाडीच्या रोखाने जर्मनी लुबॅकझौ गावापर्यंत आत घुसला. प्रिजमिसल व जारास्लौव्ह या दोन ठाण्यामधील सॅननदी रशियानें जर्मनीस ओलाडू दिली नाही, व प्रिजमिसलच्या दक्षिण–पूर्वेस प्रिजमिमल व सॅमभोर या दोन ठाण्यामधील नीस्तर नदीच्या उगमाजवळील दलदलीच्या टापूत रशिया बंदोबस्तानें फळी धरून बसला. मे महिन्याच्या तिसऱ्या आठवड्यात लढाईचे तोंड स्ट्रीज–सॅमभोर, प्रिजमिसल, जारास्लौव्ह, सिनेव्हा व सॅननदी व व्हिश्चुला नदी याच्या सगमाचा त्रिकोण या टापूवर पसरलेलें होतें. प्रिजमिसलच्या पश्चिमेच्या किल्ल्यावर तिसऱ्या आठवड्यात जर्मनी हल्ला करीत होता, आणि प्रिजमिसलपासून सॅमभोरपर्यंत किंवा उत्तरेस प्रिजमिसलपासून जारास्लौव्हपर्यंत कोठेंतरी रशियाची फळी पुन्हा फोडण्याचा जर्मनीचा नेटाचा उद्योग सुरू होता. हा उद्योग चालू असताना उत्तरेकडील सिनेव्हाचे टापूतील जर्मन सैन्य मागे परतू लागले. व व्हिश्चुला व सॅन नदी याचेमधील त्रिकोणात रशिया पुढें सरकू लागला. त्याचप्रमाणें स्ट्रीजच्या पूर्वेस रशिया पुढे सरकून स्ट्रीज व स्टॅनला याच्यामधील टापूंत घुसून, स्ट्रीजच्या दक्षिणेस आस्ट्रियन सैन्यास वळसा देण्याचा उद्योग रशियानें आरंभला.

मे महिन्याच्या तिसऱ्या आठवड्यात स्ट्रीजचा युझाक घाटातील ऑस्ट्रियन सैन्याशीं संबंध पुरा जोडला जाऊन त्या बाजूचें ऑस्ट्रियन सैन्य स्ट्रीज सॅमभोरच्या पट्ट्यानें पुढे सरकू पहात होतें, हें ह्या ठिकाणीं विसरता कामा नये. स्ट्रीज सॅमभोरच्या पट्ट्यावर पसरलेल्या ऑस्ट्रियन सैन्यास स्ट्रीजच्या पूर्वेकडून वळसा देण्यास रशियानें आरंभ केला, व मे महिन्याचे अखेरीस, व जूनचे प्रारंभी स्ट्रीजच्या पूर्वेकडचा रशियाचा हात बराचसा पुढे सरकला. स्ट्रीज–सॅमभोर या पट्ट्याला पूर्वेकडून वळसा देण्यास जरी रशियाने हात बराच पुढे ढकलला तरी सॅमभोर व प्रिजमिसल या मध्यावरच्या टापूंत ऑस्ट्रो–जर्मन सैन्यानें रशियाची फळी फोडली; व जूनच्या प्रारंभी ऑस्ट्रो–जर्मन सैन्य प्रिजमिसलपासून लेंबर्गकडे जाणाऱ्या आगगाडीला भिडलें. उत्तरेस सिनेव्हा टापू रशियानें पुन्हा ताब्यात घेतला, व तेथून सॅन नदी ओलांडून व्हिश्चुलेच्या दक्षिण किनाऱ्याने रशियाचा हात पुढे सरसावू लागला. मध्यावर घुसलेल्या जर्मन सेनेला उत्तरेकडून वळसा देण्याकरिता व्हिश्चुलेच्या किनाऱ्यानें रशियाचा ह्रा हात पुढे सरकत असता सिनेव्हाचा प्रांत सोडून मागे परतलेलें जर्मन सैन्य एकदम जारास्लौव्हच्या दक्षिणेस येऊन जर्मनीने जारास्लौव्ह व प्रिजमिसल याच्यामधील सॅन नदीवर मे महिन्याच्या चौथ्या आठवड्यात भयंकर हल्ला केला, आणि तोफांच्या गोळ्यांनीं रशियाची फळी फोडून जर्मन सैन्य जारास्लौव्ह व प्रिजमिसल याच्यामध्ये घुसून जूनच्या प्रारंभीं प्रिजमिसलपासून लेंबर्गकडे जाणाऱ्या आगगाडीकडे येऊन थडकलें. म्हणजे जून प्रारंभाला प्रिजमिसलला चारी बाजूंनी वेढा पडला; आणि प्रिजमिसल येथें मोठें सैन्य, अवजड तोफा व कार्पेथियनच्या युद्धाकरिता जमविलेले सर्व सामान अडकून पडलें असल्यामुळें प्रिजमिसल व लेंबर्ग यामधील आगगाडीवर रशिया जर्मनीशी निकरानें लढला. पण प्रिजमिसलचे किल्ले पूर्वींच ऑस्ट्रियानें मोडून टाकलेले असल्यामुळे लष्करी धोरणाच्या दृष्टीनें प्रिजमिसल येथे अडकून पडणे नुकसानीचें होते; म्हणून सर्व सामानसुमान व तोफा बरोबर घेऊन रशियानें तारीख २ जून रोजीं प्रिजमिसल सोडलें ! जून महिन्यामध्ये जर लेंबर्ग जर्मनीला गिळंकृत करता आलें आणि तेथील अवाढव्य साठा जर जर्मनीच्या हाती पडून लेंबर्गच्या पलीकडे रशियास माघार खावी लागली तर मे–जून दोन महिने चाललेली ‘न भूतो न भविष्यति।’ असल्या स्वरूपाची ही लढाई जर्मनीच्या तर्फेने निकाल देऊन रशियास या महायुद्धांत पुढे ७–८ महिने तरी

निकामी करून टाकील. जून महिन्यात जर प्रिजमिसल–लेंबर्ग यामधील आगगाडीवर रशियास जर्मनीचा पराभव करता आला आणि प्रिजमिसल शहर पुन्हा हस्तगत करून कार्पेथियन पर्वताकडे आपला मोर्चा फिरविता आला तर हंगारीचें मे महिन्यातले मरण जर्मनीने एवढा उपद्व्याप करून २–४ महिने पुढे ढकलले एवढीच काय ती फलप्राप्ति या विलक्षण उद्योगाने जर्मनीला प्राप्त होईल. मे महिन्याप्रमाणे जून महिन्यातहि कार्पेथियनच्या बाजूची ही अद्वितीय लढाई जर्मनी मे महिन्यातीलच पुढे नेटानें चालवील. कारण जून अखेरीस मे महिन्याप्रमाणेच त्याना यश मिळाले तर रशियापुरती तरी महायुद्धाची परिसमाप्ति या ठिकाणी करून घेण्याची संधि जूनच्या प्रारंभाला ऑस्ट्रिया–जर्मनीला मिळाली आहे. या बिकट प्रसंगी मे महिन्याप्रमाणें रशियास जून महिन्यातहि माघार खावी लागेल असे मानण्यास मात्र काही आधार नाही. कारण जर्मनी आगगाडीचे जाळे सोडून फार पुढे आला आहे आणि रशियास आगगाडीचा चांगला पाठिंबा असून स्ट्रीज–स्टॅनला–चुकोव्हिनाच्या बाजूला रशियाची ताकदहि जर्मनी–ऑस्ट्रियापेक्षा निःसंशय अधिक आहे. या दृष्टीने विचार करिता जून महिन्यात या बाजूच्या लढाईचे पारडे फिरेल व रशियाचा हात पुन्हा वर चढेल असेंच अनुमान काढावे लागते. मे महिन्यात जशी रशियाला माघार खावी लागली तशीच माघार जरी जूनमध्ये खावी लागली, आणि त्यामुळे रशिया जरी महायद्धातील पुढील सहामाहीत लुला होऊन पडला, तरी इटली महायुद्धात सामील झाल्यामुळे रशियाच्या लुलेपणानेहि महायुद्धाचे एकंदर स्वरूप पालटणार नाही. कार्पेथियन पर्वतातील लढायाइतकीच किंबहुना काकणभर किंमत अधिक इटलीच्या प्रवेशास दिली पाहिजे, आणि इटलीचें कर्तृत्व दिवसानुदिवस अधिक प्रकट होणारें असल्यामुळे रशिया लुला झाला असताहि इटालीच्या सामर्थ्यामुळें महायुद्धाचा अखेर शेवट रशिया लुला न होता जसा लागावयाचा तसाच लागणार याविषयीं कोणासहि शंका नाहीं. इटलीच्या प्रवेशाचे महत्त्व इतके जबरदस्त असल्यामुळें, कार्पेथियन पर्वतातील लढाईनें कडू झालेले तोंड इटालीच्या घासानें आता आपण गोड करू.

## इटालीचें शुभ कृत्य

नाहीं होय म्हणता म्हणता इटलीला अखेरीस इंग्रजाच्या वतीनें महायुद्धात सामील होणें इष्ट वाटलें, आणि तारीख २२ मेपासून इटलीचें युद्ध जर्मनी,

ऑस्ट्रिया व टर्की या त्रिकुटाशी सुरू झाले. इटलीच्या या शुभ कृत्याबद्दल इंग्रजी साम्राज्यानें व दोस्त सरकारांनीं इटलीचें अभिनंदन करावें तितके थोडेंच आहे. योग्य वेळी दहा पंधरा लाख जय्यत सैन्याची व एका सबल आरमाराची मदत मिळाली व त्यामुळे महायुद्धाचा अखेर शेवट कसा होणार याविषयी कोणाचे मनांत शंकाहि राहिली नाही. याबद्दल हे अभिनंदन तर खरेंच, पण त्याहीपेक्षा दुसऱ्या एका कारणाबद्दल इटली विशेष स्तुतीस पात्र आहे. जर्मनी व ऑस्ट्रिया या दोन राष्ट्रांच्या तहनाम्याने पक्का केलेला तीस वर्षांचा दोस्त म्हणजे इटली होय. असल्या दोस्ताला जर्मनीच्या त्रिकूटीतून का बाहेर पडावेसे वाटले बरे? युद्धारंभी तहनाम्याच्या विरुद्ध इटलीने तटस्थ वृत्ति स्वीकारली होती, तशीच तटस्थ वृत्ति तरी इटलीची का राहिली नाही? जर्मनीच्यातर्फेनें या प्रश्नास असे उत्तर देण्यात येते की, इटलीचे राष्ट्र हे निमकहरामाचे राष्ट्र होय. स्वार्थापुढे याना मैत्रीची किंमत नाही, स्वार्थापुढे तहनामे म्हणजे पाहिजे तेव्हा फाडावयाचे व पाहिजे तेव्हा केराच्या पेटीत फेकून द्यावयाचे कागदाचे चिटोरे याना वाटतात, स्वार्थामुळे हे कोणाचा केव्हा विश्वासघात करतील याचा नियम नाही. बेल्जम संबंधाचा तहनामा कागदाचा चिटोरा म्हणून त्यावर धिक्कारानें थुंकणाऱ्या जर्मनीनें कोणच्या नीतिशास्त्राच्या जोरावर इटलीवर असले आरोप करावे हे समजणे कठीण आहे. तथापि कायदे हे मोडण्यासाठींच असतात व तहनामे हे पुढील लढायाचे उपोद्घातच होत, या दृष्टीने विचार करून जर्मनीला किंवा इटलीला कोणालाच असल्या बाबतीत दोष लावणें ठीक नाही, असे प्रतिपादन करणारा विचारी पुरुषाचा एक संघ असतो; व तो संघ आणा-शपथा, तहनामे, करारनामे याची बाह्य स्वरूपे एका बाजूस ठेवून सगळेच तहनामे करतात व सगळेच तहनामे मोडतात असे गृहीत धरून, जर इटलीच्या या कृत्याचा विचार करू लागला तर त्यास काय वाटेल? जर्मनीने इटलीला इंग्रजाच्या पक्षाचे कसे होऊं दिलें? इटलीची स्वार्थबुद्धि जर्मनीला यापूर्वी ठाऊक झाली नव्हती काय? इटालियन लोकाचा ओढा फ्रान्सकडे आहे. ही इटालियनाच्या अंतःकरणांतील गुपित गोष्ट जर्मनीला माहित नव्हती काय? आस्ट्रिया व हंगारीपासून इटली देश स्वतंत्र झाला; ते स्वातंत्र्य फ्रान्सच्या प्रत्यक्ष मदतीनें व इंग्लंडच्या पूर्ण सहानुभूतीने इटलीस मिळालें. वडील बंधूच्या ठिकाणी व गुरूच्या ठिकाणी फ्रान्स व इंग्लंड याची स्थापना इटालीयन अंतःकरणानें केली असताना इटली देश, जर्मनी व

ऑस्ट्रिया याच्या संघात तीस वर्षे तरी नांदला कसा ? बिस्मार्कच्या कारस्थानामुळें इटलीला जर्मनीस आपल्या संघात गोंवून घेता आले, त्यावेळी इटली फ्रान्सशी निमकहराम झाला नाही काय ? परवा इटलीनें तुर्कस्थानच्या त्रिपोली प्रांतावर दरोडेखोराप्रमाणे हल्ला केला आणि तुर्कस्थानचा त्रिपोली प्रांत आपल्या घशात टाकला, त्यावेळी इटलीचा हा नैतिक अधःपात जर्मनीच्या लक्षात कसा आला नाही ? राष्ट्राराष्ट्रामधील मोठमोठया प्रसंगी सरकारमार्फत होणाऱ्या वर्तनाला सामान्य नीतितत्त्वाचे नियम लागू करणेच अयोग्य होय. हे सामान्य नियम एका बाजूस ठेवून त्या त्या राष्ट्राच्या वाढीच्या व अभ्युदयाच्या दृष्टीनेच त्याच्या वर्तनाचा विचार केला पाहिजे. इटली ऑस्ट्रियन संघात फ्रान्सच्या विरुद्ध तीस वर्षांपूर्वी कसा घुसला ? बिस्मार्कने कोणच्या जादूने भारल्यामुळे फ्रान्सशी असली निमकहरामी करणें इटलीला इष्ट वाटले ? इटली फ्रान्सच्या मदतीने स्वतंत्र झाला खरा, पण युरोपियन राष्ट्राशी तुलना करताना तो वैभवशून्यच त्यावेळी होता. युरोपातील स्वतंत्र राष्ट्राला मग ते कितीहि लहान असो, युरोपखंडाच्या वैभावात आपल्यात कर्तृत्वाला योग्य अशी वाटणी मिळावीशी वाटणे हे सहाजिक नाही काय ? युरोपखंडाचे ५० वर्षांपूर्वी म्हणा किंवा आजचे म्हणा वैभव म्हणजे तरी काय ? युरोपखंड आशिया, आफ्रिका व अमेरिका या खंडावर किंबहुना सर्व पृथ्वीवर सत्ता चालविते, ही सत्ता म्हणजे युरोपखंडाचें वैभव होय. या वैभवात आपल्या सामर्थ्यानुरूप योग्य वाटणी मिळणे हा युरोपखंडातील लहान सहान प्रत्येक राष्ट्राचा नैसर्गिक हक्क होय! युरोपखंडातील मोठी राष्ट्रे व लहान राष्ट्रे याच्यामध्ये जेव्हा जेव्हा लढा उत्पन्न होतो तेव्हा तेव्हा लढयाचें कारण असें दिसतें कीं, मोठी राष्ट्रे लहान राष्ट्राना सांगतात, बाबानो, तुम्हाला आम्ही जिवंत ठेविलें आहे हे तुमचें भाग्य समजा, आमच्याप्रमाणे बाहेरचे दिग्विजय करण्याची हाव तुम्ही धरू नका, या दिग्विजयातल्या वैभवातल्या प्राप्तीचा वाटा तुम्ही मागू नका. लहान राष्ट्राचें स्वातंत्र्य राखणें याबरोबरच त्याच्या अभ्युदयालाहि सवड ठेवणें जरूर आहे असें मोठया राष्ट्राना स्वतःच्या शक्तीच्या घमेंडीमुळें कांहीं कांहीं प्रसंगीं वाटत नाहीं. अशा राष्ट्रानीं लहान राष्ट्राना दिलेलें स्वातंत्र्य म्हणजे भिकेची हडी होय. ती हडी शिंक्यावर कधींहि चढावयाची नाहीं. स्वातंत्र्य म्हणजे जर स्वपराक्रमानें मिळविलेलें अन्न असेल तर, तें पराक्रमाच्या वाढीबरोबर शिंक्यावरहि चढलें पाहिजे. इटली देश ऑस्ट्रिया–

हंगारीशीं युद्ध करून स्वतंत्र झाला व पुढे काही वर्षांनी आपली हडी शिंक्यावर चढावीशी त्याला निसर्गतः इच्छा झाली. पण इटली चोहोंकडे दृष्टि फेकून पहातों तों आफ्रिकेतील सर्व मुसलमानी राष्ट्रावर इंग्लंड–फ्रान्सनी आगाऊच डोळा ठेविला असून आफ्रिकेत कोठेहि आपले शिंके टांगण्यास जबरदस्तीने खुंटी ठोकता यावयाची नाहीं. त्यावेळी फ्रान्स व इंग्लंड यांच्या सत्तेने खुंटी ठोकण्याच्या सर्व जागा व्यापून टाकल्यामुळे ज्यांच्या सहाय्याने आपणाला कोठेतरी आपले घोडे पुढे ढकलण्यास सवड मिळेल अशा जर्मनी–ऑस्ट्रियाच्या गट्टीत इटलीनें आपला प्रवेश करून घेतला. परवा परवापर्यंत इटलीला तशी संधि मिळाली नाही. तरुण तुर्कांनीं तुर्की साम्राज्यात उलथापालथ करून नवीन सत्ता स्थापिल्यामुळे जी चोहोकडे धांदल उडाली त्या धांदलीचा फायदा घेऊन इटलीने त्रिपोली प्रांतात आपले शिंके लटकाविले. यावेळी ऑस्ट्रिया–जर्मनीनें गट्टीच्या नियमानुसार इटलीला पूर्ण पाठबळ द्यावयाला पाहिजे होते, पण जर्मनीचे व तरुण तुर्कांचे अंतस्थ लग्न पूर्वीच लागले असल्यानें ऑस्ट्रियाने इटलीला असे बजावले कीं, आफ्रिकेतील त्रिपोली प्रांत तुम्ही घेतला खरा, पण इतर ठिकाणच्या तुर्की साम्राज्याला जर तुम्ही स्पर्श करू लागला तर ऑस्ट्रियन सैन्य इटलीवर एमदम चाल करून येईल. ऑस्ट्रियाच्या या धमकावणीमुळे इटलीला तुर्कस्थानशीं बाल्कन युद्धाचे वेळी घाईघाईने तह करावा लागला. त्यानंतर इटलीपुढे साहजिकपणे दोन प्रश्न उभे राहिले. इटालियन राष्ट्राला युरोपखंडाच्या वैभवात आपल्या सामर्थ्यानुरूप यापुढे वाटणी मिळणार की नाहीं? अशी वाटणी मिळण्याची हाव धरणें आपणास योग्य आहे किंवा नाही? ही हाव जर धरावयाची तर स्वतःच्या घराचे संरक्षण शेजाऱ्यापासून आपणास करता येईल किंवा नाहीं ? त्रिपोलीच्या लढाईत जे शहाणपण इटालीला प्राप्त झाले, त्या शहाणपणाचा उपयोग वरील प्रश्न सोडविण्यात इटाली करीत असताना सांप्रतच्या महायुद्धास सुरुवात झाली. तुर्की साम्राज्यावर पर्यायाने सत्ता कोणी चालवावयाची हा प्रश्न त्रिपोलीच्या लढाईच्या, बाल्कन युद्धाच्या व सांप्रतच्या महायुद्धाच्या बुडाशीं आहे, हे वाचकानी यावेळी विसरता कामा नये. तरुण तुर्कांचे व जर्मनीचे संगनमत झालेले आणि बाल्कन प्रदेशात व तुर्की साम्राज्यात अग्रपूजेचा मान कोणाला याबद्दल तर महायुद्ध सुरू झाले. अशा प्रसंगी इटलीनें कोणाचा पक्ष स्वीकारावयाचा ? प्रत्येक

राष्ट्रानें आपल्या स्वतःच्या अभ्युदयाच्या दृष्टीनें असल्या बिकट प्रसगीं वागावयाचें असते. कोणचा पक्ष इटलीच्या अभ्युदयास सुसगत व कोणचा पक्ष इटलीच्या जीवनास विसगत ? इटली मुसलमानी देशातच खुटया मारून आपली शिदोरी शिंक्यावर चढविणार. मुसलमानाशी सगनमत झालेल्या व तुर्की साम्राज्याचा कैवार घेणाऱ्या जर्मनीच्या पक्षात उभे राहणे हे इटालीच्या जीवनास सुसगत कसचें होणार ? अर्थात इटलीनें युद्धारभीं एकदम तटस्थवृत्ति स्वीकारली. हे महायुद्ध आकस्मिक रीतीने सुरू झाल्यामुळे जर्मनीच्या विरुद्ध एकदम उभे रहाण्यास इटलीला धीर झाला नाही. गेले ८–१० महिने युद्धासबधाने इटालीने सैन्याची व आरमाराची पूर्ण तयारी केली आणि नतर ऑस्ट्रिया–जर्मनीला सवाल विचारला की दोस्तानो, तुम्ही तुर्की साम्राज्याला आपल्या सावलीत ठेवून युरोपखडात अग्रपूजेचा मान मिळवू इच्छिता आहा, तुह्मी कराल तसे भराल, तुमच्या आड आह्मी येऊ इच्छित नाही, पण आमच्या जीवनाचे, आमच्या शिदोरीचे व आमच्या शिंक्याचे या महायुद्धानतरहि योग्य रीतीनें सरक्षण होईल असा बदोबस्त आजच करून घेणे आह्मास भाग आहे. इटालीची सेना व इटालीचे आरमार याचा महायुद्धानतर कोणाहि एका राष्ट्रास अवचित हल्ला करून धुळीस मिळविता येणार नाही असा बदोबस्त आम्हास करू द्या. इटलीची ८–१० लाखाची सेना सुसरक्षित रीतीने व निर्धास्त रहाण्यास इटलीची सरहद्द बळकट असावयास पाहिजे. फ्रान्सच्या बाजूची इटलीची सरहद्द भूगोलाच्या दृष्टीनें शक्य तितकी बळकट आहे, पण ऑस्ट्रियाच्या बाजूची मात्र तशी स्थिति नाही. ऑस्ट्रियाच्या सरहद्दीवरचे आल्प्स पर्वताचे फाटे ऑस्ट्रियाच्या ताब्यात असून इटालीयन वस्तीचेहि काही परगणे ऑस्ट्रियाच्या ताब्यात आहेत. हे आल्प्स पर्वताचे फाटे व इटलीयन वस्तीचे परगणे इटलीच्या ताब्यात येणें हें भूगोलाच्या दृष्टीने इटलीच्या जीवनास अवश्य आहे. इटलीचे म्हणणें असे की, आमच्या सेनेच्या जिवपणास कायमपणाचा विश्वास पटावा म्हणून आल्प्स पर्वताचे फाटे व इटालियन परगणे आमचे स्वाधीन करा. हें इटलीचें मागणें त्याच्या स्वातत्र्याच्या हक्कास धरूनच होतें. इटालीचें दुसरें मागणें असे पडलें कीं, त्रिपोली प्रात आम्ही जिंकून घेतला आहे, हें आमचें कृत्य युरोपखडाच्या वैभवात वाटणीचा आमचा हक्क शाबीत करण्याकरितां आहे. या आमच्या हक्काच्या आड निष्कारण शेजाऱ्यानें येऊ नये म्हणून सेनेच्या स्वास्थ्याप्रमाणें आरमाराचेहि स्वास्थ्य आज आम्हीं सपादन

केलें पाहिजे; आमचें रोजच्यारोज वाढत जाणारे बलवान आरमार अवचित हल्ल्यापासून सुसरक्षित राहील, किंबहुना आपत्काली स्वस्थ लपून राहून योग्य समयीं बाहेर पडण्यास त्यास हरकत येणार नाही असे स्थल आम्हास पाहिजे. परमेश्वरानें ॲड्रिॲटिक समुद्र असा निर्माण केला आहे की, त्या समुद्राचे तोंड जर मजबूत किल्ल्यानी, सुरुगानीं बंदोबस्ताचे केले तर इटालीच्या आरमाराला विसाव्याची, सुरक्षितपणाची व आरमारी कारखान्याच्या सहाय्याने योग्य वाढ करणारी मजबुतीची जागा सबंध ॲड्रियाटिक समुद्र इटलीस होणार आहे. तेव्हा हा समुद्र आरमारी सत्तेच्या दृष्टीने पूर्णपणे आमच्या आखत्यारात राहील असा बंदोबस्त आज आम्हास करून द्या. जर्मनी–ऑस्ट्रियास इटलीच्या स्वातंत्र्याचे आड यावयाचे नव्हते, म्हणून त्यानीं इटलीची पहिली मागणी अंतशः कबूल केली. पण इटलीची दुसरी मागणी म्हणजे जर्मनी ऑस्ट्रियाच्या अग्रपूजेतीलच काही फुले मागण्याच्या स्वरूपाची असल्यामुळे, व ती मागणी कबूल केल्याने जर्मनी–ऑस्ट्रियाचे भूमध्य समुद्रावरचे दारच बंद होत असल्यामुळे, ऑस्ट्रियाने इटालीची ही दुसरी मागणी अमान्य केली. युरोपखंडाच्या वैभवात इतालीस स्वसामर्थ्यानुरूप भाग मिळू नये व जर एखादादुसरा घास इटालीच्या वाटणीस आला तर तो ऑस्ट्रिया–जर्मनीच्या उष्टयापैकीच असावा अशी फाजील महत्वाकांक्षा ऑस्ट्रियाची असल्यामुळे ऑस्ट्रियानें इटालीस धिक्कारिले. लहान राष्ट्रांना वैभवात भागिदार म्हणून घेण्यास जर्मनी–ऑस्ट्रिया तयार नाही असे पाहून इंग्लंड, फ्रान्स व रशिया याच्याकडे इटली वळला. या राष्ट्रांचें ध्येय जर्मनी–ऑस्ट्रिया या राष्ट्रांच्या ध्येयाहून भिन्न आहे. लहान राष्ट्रांना जिवत ठेवावे एवढेच याचे म्हणणें आहे असे नाही, तर या जिवन्त ठेवलेल्या लहान राष्ट्रांना त्यांच्या सामर्थ्यानुरूप युरोपखंडाच्या वैभवाचे भागिदारहि होता यावें व भागीचा हक्क प्रस्थापित करता येण्याइतके त्याचें जीवन सुदृढ असावे, असे मि. अस्क्विथसारखे इंग्लंड–फ्रान्स व रशिया येथील महात्मे प्रतिपादन करीत आहेत. सेव्य–सेवकाच्या दृष्टीने जर्मनी मानवी प्राण्याकडे पहातो. मैत्रीच्या व भागीदारीच्या नात्यानें इंग्लंड सर्व लहान राष्ट्रांचे हक्क तोलतो. महायुद्धातील दोन पक्षात असा हा फरक असल्यामुळे स्वतःच्या जीवनास इंग्लंडचा पक्ष सुसंगत आहे इतकेच इटालीस वाटले असें नव्हे, तर लहान राष्ट्रांच्या भागीदारीच्या हक्कासहि इंग्लंडचा पक्ष श्रेयस्कर आहे असे इटलीच्या निदर्शनास आलें. इटाली इंग्ल

मिळाल्यानें त्याचें स्वतःचें स्वातंत्र्य कायम राहून त्याची भागी उत्तरोत्तर वाढीस लागणारी आहे. या महायुद्धात इंग्लंडला अखेरचा जय इटाली मिळाल्याने आतां खात्रीने मिळणार हे जसे सिद्ध झाले आहे, त्याप्रमाणे इंग्लंड देश म्हणजे लहान राष्ट्रांच्या भागीचाहि वाली असे इटालीने लढाईत पडण्याच्या आपल्या कृत्याने इंग्लंडास एकप्रकारे सर्टिफिकीटच दिले आहे. इटाली लढाईत सामील झाल्याने इंग्लंड, फ्रान्स, रशिया व इटली या सर्वांचेच कल्याण होणार आहे, याबद्दल इटलीचें अभिनंदन तर केले पाहिजेच, पण इटलीच्या कृत्यानें मि. आस्क्विथ याच्या नीतितत्त्वास जें सर्टिफिकीट मिळाले आहे त्याबद्दल इटलीचे विशेष अभिनंदन करणें जरूर आहे.

## इटली काय करणार ?

महायुद्धात सामील झाल्याबद्दल इटलीचे अभिनंदन केल्यावर इटलीनें कसे इंग्लंडचे पारडे जड केले आहे तें आता आपण पाहू. इटलीपाशी दहा लाख सैन्य असून प्रसंगविशेषी आणखी ८—१० लाख सैन्य तयार करण्याचे सामर्थ्य इट-लीच्या अंगीं आहे. इंग्लंडने लढाई सुरू केल्यानंतर जवळ जवळ २० लाख सैन्य उभारले. तरी अद्याप ३ लाख आणखी सैन्य पाहिजे म्हणून लॉर्ड किचनेर यानीं नुकतीच मागणी केली. लॉर्ड किचनेर यानी ३ लाख मागितले, आणि इटलीला पाठवून देवाने दहा पधरा लाख दिलें, अशीच ही स्थिति झाली. म्हणजे लॉर्ड किचनेरनी मागितलें त्यापेक्षा जवळ जवळ १० लाख अधिक मिळाले. कार्पेथियन पर्वतातील रशियाच्या माघारीमुळे ५ लाख सैन्य व १००—२०० तोफा एवढया पुरता रशिया काही काळ कमकुवत झाला अशी पराकाष्ठेची नुकसानी गृहीत धरून चालले तरी हे ५ लाखाचे नुकसान भरून काढून शिवाय ५ लाखाची अधिक भर इंग्रजाच्या पारडयात इटली टाकीत आहे. म्हणजे लॉर्ड किचनेर याची ३ लाखाची मागणी व रशियाची ५ लाखाची नुकसानी हे सर्व खड्डे भरून आले. शिवाय ५ लाख अधिक उरतातच. तेव्हा संख्येच्या दृष्टीने विचार केला असता अखेरचा जय इंग्रजांच्यातर्फेचा होणार या सिद्धांतास आकडेशास्त्र बिलकूल आड येऊ शकत नाहीं. आता इटली आपलें दहा पधरा लाख सैन्य कसे उपयोगात आणणार ते पाहू. इटलीच्या बरोबर मध्यावर डोक्यावर ऑस्ट्रिया—जर्मनीचा टिरोल प्रांत येतो. या टिरोल प्रांतापैकीं ट्रेंटिनो हा दक्षिण भाग असून त्रिकोणाकृति आहे; व त्याची पाचर इटलीच्या डोक्यात खुपसल्यासारखी दिसून येते. या ट्रेंटिनो प्रांताची इटली

कडची सरहद्द डोंगराळ असून किल्ल्यानीं व इतर साधनानीं ऑस्ट्रियानें ती सरहद्द फार बळकट केली आहे. या ट्रेंटिनो प्रातात इटालियन लोकाची वस्ती असल्यामुळे व डोक्यातच कुऱ्हाडीचा घाव बसल्यासारखी याची भूगोलस्थिति असल्यामुळे हा प्रात झटक्यासरशी काबीज करून घेणें इटलीला भाग आहे. या महायुद्धात जर ऑस्ट्रियानें इटलीवर कधीं काळी उलट स्वारी केली तर ती या ट्रेंटिनोच्या पाचरे-मधूनच ऑस्ट्रिया करणार हे उघड आहे. ट्रेंटिनोच्या पाचरेमधून खाली उतरून जर व्हेनिसचा उपसागर ऑस्ट्रियास गाठता आला तर व्हेनिशियाचा सर्व प्रात ऑस्ट्रियाच्या हाती सहज जाण्यासारखा आहे. डोक्यावरचा ट्रेंटिनोचा हा बागुलबुवा दूर करणें इटलीस भाग असून युद्ध सुरू होण्याबरोबर पहिल्या आठवड्यातच इटलीने ट्रेंटिनो प्रातावर हल्ला चढविण्याचा उपक्रम केला आहे. पण ट्रटिनो प्राताचा आपणास फार उपयोग आहे हे ऑस्ट्रिया समजून असल्यामुळे ट्रेंटिनो प्रातात ऑस्ट्रियाचीहि प्रथमपासूनच विशेष तयारी आहे. अशी स्थिति असल्या-मुळे ट्रेंटिनो प्रातातून ऑस्ट्रिया खाली उतरणार नाही एवढाच प्रथम बदोबस्त इटली करील, व प्रारभीच्या लढाया ट्रेंटिनो प्रातात न करता ट्रिस्टी प्रात काबीज करण्याकरिता होतील असा अदाज आहे. जिनेव्हा प्राताच्या उत्तरेस कर्नाक—आल्प्स पर्वताची ओळ असून हा पर्वत ओलाडून ऑस्ट्रियात मोठे सैन्य नेणे जसे इटलीस दुरापास्त आहे त्याप्रमाणे ऑस्ट्रियाचेहि मोठे सैन्य हा पर्वत ओलाडून इटलीत येणें फारसे सभवनीय नाही. तेव्हा जिनेव्हा प्रात व व्हेनिसचे आखात याच्या पूर्वेस असलेला ट्रिस्टी प्रातच इटली व ऑस्ट्रिया याची पहिली रणभूमि होईल असा रग दिसतो. व्हेनिशियन प्रात व ट्रिस्टी प्रात याच्या सरहद्दीवर किरकोळ डोगर असून पहिल्या धडकीसरशी हे डोगर इटलीने आपल्या ताब्यात घेतले आहेत. ही सरहद्द ओलाडली म्हणजे ट्रिस्टी प्रातातील इसोनझो नदी लागते. या नदीच्या डाव्या किनाऱ्यावर ऑस्ट्रियन सैन्य बदोबस्ताने साप्रत बसले असून जूनच्या पहिल्या पधरवड्यात इटलीची व ऑस्ट्रियाची पहिली मोठी लढाई या नदीच्या काठी होईल असे लक्षण साप्रत दिसत आहे. पण मे महिन्याच्या अखेरीस व जूनच्या प्रारभी या बाजूला वादळ होऊन पाऊस पडत असल्यामुळे इटालियन सैन्यास पुढे पाऊल टाकण्यास थोडा त्रास होत आहे. यामुळे इसोनझो नदी ओलाडल्यास सबध जून महिनाहि खर्ची पडण्याचा सभव आहे. ट्रिस्टी प्रातात

विशेष नेटानें इटलीशीं लढण्याचा ऑस्ट्रियाचा संकल्प दिसत आहे. नद्यांचे पूल पाडून टाकणें, आगगाडीचे रस्ते उध्वस्त करणें व ट्रिस्टी प्रातातील इटलियन लोकाची मालमत्ता लुटून ट्रिस्टी प्रांत उजाड करून सोडणें, असला उपद्व्याप हल्लीं ऑस्ट्रियानें या प्रातात चालविला आहे. ट्रिस्टी प्रातात इटालियन सैन्यास नुसता अडथळा करीत बसावयाचे, पण हाताने काही इटलीशी लढावयाचें नाही, असले धोरण ऑस्ट्रियाने स्वीकारले असले पाहिजे,एरव्ही ट्रिस्टी प्रात आपण होऊन उजाड पाडण्याची संगति लागत नाहीं. लष्करी धोरणाच्या दृष्टीने विचार करता ऑस्ट्रियाचें हे कृत्य व्यवस्थीतपणाचें दिसून येते. ऑस्ट्रिया व जर्मनी हे दोघेहि कार्पेथियन पर्वताच्या बाजूला रशियाशी जिवापाड लढत आहेत आणि संधि साधल्यास एकदोन सहामाहीपुरते रशियास लुले करून सोडण्याचा निश्चय त्यानी केलेला दिसतो. हा प्रयत्न सफल होण्यास किंवा विफल ठरण्यास जून महिना निघून जावा लागेल. आपण अशी कल्पना करू कीं ग्यालिशियन आस्ट्रो-जर्मनाचा हा विलक्षण प्रयत्न जून अखेर सफल झाला. सफल झाला तरी काय होणार ? हंगारीवर स्वारी करण्याच्या दृष्टीने रशिया पुढील आठ दहा महिने लुला ठरणार. लुला कसा ठरणार ? रशियास ग्यालिशियाची सरहद्द सोडून आपल्या स्वतःच्या राज्याच्या हद्दींत परत जावें लागणार. अशारीतीने रशिया स्वतःच्या हद्दत परत गेला तरी महायुद्धात लोणचे होऊन बसतो, असा भाग मुळीच नाही. दोन-चार महिन्यात रशिया पुन्हा दहा पधरा लाख सैन्य गोळा करू शकेल व ते सैन्य पुन्हा कार्पेथियन पर्वतावर चाल करून येईल. पण अशा रीतीनें पुरे पारडे फिरण्यास आठदहा महिन्याचा अवधि लागेल. या आठदहा महिन्यात ग्यालिशियाच्या सरहद्दीवर काही लढायाच होणार नाहीत कीं काय ? लढाया होतील पण त्या किरकोळ स्वरूपाच्या होतील. रशियाची पुन्हा तयारी होईतों म्हणजे ५-७ महिने रशियाच्या या दक्षिण तोंडावर ५-७ लाख सैन्याहून अधिक सैन्य ऑस्ट्रिया जर्मनीस ठेवण्याचे कारण रहाणार नाहीं. मे महिन्यात झालेल्या व जून महिन्यात सुरू राहिलेल्या कार्पेथियन लढाया करता नीडा नदीपासून बुकोव्हिनापर्यंत २५० मैलाच्या पट्ट्यावर ऑस्ट्रिया जर्मनीनें २५ लाख सैन्य गोळा केलेलें आहे. या सैन्यास यश मिळून ग्यालिशियातून रशियास जरी मागे परत जावे लागलें तरी ५-७ लाख सैन्याचा फन्ना दीडदोन महिन्यात उडाल्यावाचून राहाणार नाहीं. ७ लाख लढाईत मेले;

५--७ लाख स्वदेशात परत गेलेल्या रशियाच्या तोंडावर ठेवावे लागतील. बाकीचे १०–१२ लाख जून अखेर पक्का विजय मिळाल्यास इतर ठिकाणी वापरण्याकरिता मोकळे होतील. जून अखेर जरी हे १० लाख मोकळे झाले, तरी इटलियन सरहद्द किंवा सर्व्हियाची सरहद्द गाठण्यास त्याना जुलईचा शेवटचा आठवडा पहावा लागेल, हे उघड आहे. अर्थात् जुलई निम्मा अधिक निघून जाईपर्यंत इटलीशीं लढण्याकरिता ऑस्ट्रियापाशीं सैन्यच शिल्लक रहात नाहीं. तेव्हा काही ना काही तरी युक्ति करून जून जुलई हे महिने इटलीस ट्रिस्टी प्रातातच अडकवन ठेवणें ऑस्ट्रियास भाग आहे. ही युक्ति साधण्याकरिता ट्रिस्टी प्रात उजाड करून थोडक्या सैन्याकड्न शक्य तेवढा अडथळा इटलीला ऑस्ट्रिया करणार. पण इटली होईल* तितकी पराकाष्ठा करून जून महिन्याच्या आतच ट्रिस्टी प्रात काबीज करील व लगेच ताबडतोब ऑस्ट्रिया हगारी बोस्नियाचा हा प्रात घेऊन सर्व्हियाशी सलग्न होईल. तसे होण्याच्या पूर्वी ऑस्ट्रियाला रशियाकडचा बाजार आटपून सर्व्हियावर स्वारी करून टर्कीशी सलग्न होणे भाग आहे. इटली जर सर्व्हियाशीं अगोदर सलग्न झाला तर ऑस्ट्रिया जर्मनी कधीं काळी पुढे या महायुद्धात टर्कीशीं सलग्न होतील अशी टर्कीने आशाहि करणे नलगे. रशिया जर जून अखेर लुला झाला व त्याच सुमारास जर इटली सर्व्हियाशी सलग्न झाला तर रशिया लुला होण्यापासून मिळणारा फायदा ऑस्ट्रियाच्या पदरात फारसा पडणार नाहीं. उत्तरेकडून ट्रिस्टी प्रातावर व ट्रेंटिनोमधून खालीं उतरून व्हेनिसच्या प्रातावर हल्ले करून इटलीचा प्रथम पराभव ऑस्ट्रियास करावा लागेल व नतर सर्व्हियाकडे बघावे लागेल. ही अशी स्थिति होऊ नये म्हणून ट्रिस्टी प्रात अर्धा मुर्धा घेतल्यावरच रशियाकडचा बाजार जर्मनीवर सपवून ऑस्ट्रिया इटलीकडे वळेल असा रग दिसतो. ट्रिस्टी प्रातात शिरून ऑस्ट्रिया स्वतःकडे खेचून घेणे येवढे कृत्य जरी इटलीने जून महिन्यात केले तरी रशियास लुले होण्याच्या सकटातून इटलीने सोडविलें असे होईल, आणि रशिया जर यावेळी लुला झाला नाही, तर एकदीड महिन्याच्या अवधींत तो पुनः जर्मनीच्या उरावर बसल्याशिवाय राहणार नाही हे उघड आहे. ऑस्ट्रियाला ओढून घेण्याचें महत्कृत्य जर इटलीनें यावेळीं केलें व १–२ लाख सैन्य डार्डानेलिसकडे इग्रजाच्या मदतीला पाठविलें तर २–४ महिन्यात युद्धाचें स्वरूप एकदम पालटून जाईल. इटालीनें ऑस्ट्रियाला खेचून

धरले असतां काय परिणाम होईल ते पहा. ( १ ) रशिया एकट्या जर्मनीस पोलंड-मध्ये चागली तवी देईल. ( २ ) पोलडमध्ये जर्मनी डबघाईस आला असता बेल्जम-मधून व फ्रान्समधून त्याला हाकून लावण्यास चारपाच महिन्याहून अधिक वेळ लागणार नाही. ( ३ ) डार्डानेलिसच्या बाजूला ३ लाख इटालियन सैन्याची कुमक मिळाल्यास ३–४ महिन्यात कॉन्स्टाटिनोपल शहर जमीनदोस्त होईल आणि काळ्या समुद्राच्यामार्फत रशियाशी इग्लड सलग्न होऊन खुद्द जर्मनीवर हल्ला करण्याकरिता लागणाऱ्या तोफा व दारूगोळा रशियास भरपूर मिळे. कार्पेथियनमध्ये चालू असलेल्या लढायात रशिया लुला होण्यापूर्वी इटालीने ऑस्ट्रिया स्वतःकडे खेचून घेण्यावर यशाची ही मालिका अवलबून आहे. प्रिजमिसल घेतल्याने रशिया लुला होतो अशातला भाग मुळीच नाही, पण प्रिजमिसल बरोबरच अर्धेमुर्धे यश जर्मनीनें सपादिले आहे. पुढचे अर्धे यश जर्मनी सपादितो किंवा कसे व या कामी ऑस्ट्रियाच्या यशावर इटली कितपत बिब्बा घाडतो ही गोष्ट महायुद्धाच्या इतिहासात फार महत्त्वाची असल्यामुळे तिकडे वाचकानी जून महिन्यात विशेष लक्ष पुरवावे अशी सूचना देऊन मे महिन्यातील किरकोळ लढायाकडे आपण आता वळू.

## किरकोळ

मे महिन्यात बेल्जममध्ये बरीच धामधूम उडाली आणि फ्रान्समध्ये फ्रेंचानीं आस्ते आस्ते नेटाने आपले पाऊल पुढे टाकले. विषारी धुराच्या सहाय्याने प्रथम प्रथम जर्मनीला काही इग्रजी जागा घेता आल्या, पण विषारी धुराच्या वेळीं कोणत्या तऱ्हेने वागावे हें इग्रजी सेनेस आता चागले कळले असल्यामुळे विषारी धुराचा विशेषसा फायदा जर्मनीला यापुढे मिळणार नाही. जर्मनीने मे महिन्यात डिक्समूरच्या बाजूनें २३–२४ मैलावरून डकर्कचे बदरावर तोफाचे गोळे टाकले. तात्कालिक लढाईच्या दृष्टीनें या गोळ्याचा विशेषसा परिणाम झाला नाही ही गोष्ट खरी, पण २३–२४ मैलावरून मोठमोठे गोळे नेमके मारण्याएवढ्या तोफा जर्मनीने तयार केल्या आहेत असें यावरून सिद्ध होते. जर्मनीच्या धडपडीला दुर्दैवाने यश मिळून जर यिप्रेस जवळचें जर्मन सैन्य कॅलेपर्यंत गेलें तर कॅलेवरून इग्लडच्या भूमीवर या तोफाच्या सहाय्याने जर्मनीस भडिमार करतां येण्यासारखा आहे. अर्थात् कॅले जर्मनीच्या हातात गेल्यास डोव्हरच्या सामुद्रधुनीतून चिट-पाखरूहि वरून खाली किंवा खालून वर जर्मनी जाऊ देणार नाहीं हे उघड आहे. कॅले घेण्याकरितां मे महिन्यात यिप्रेसच्या आजूबाजूस जर्मनीनें जोराचे हल्ले केले,

पण इंग्रजाच्या फळीपुढे काही न चालल्यामुळे जर्मनीला मेअखेर तो नाद सोडून द्यावा लागला. यिप्रेसच्या आजूबाजूस व इसर नद्यावर मे महिन्यात झालेल्या लढाया किरकोळ स्वरूपाच्या नव्हत्या, पण कार्पेथियन पर्वतातील लढायाशी तुलना केली असता किरकोळ सदरातच त्या ढकलणे भाग आहे. आरगमच्या बाजूला व पूर्व सरहद्दीवर फ्रेंचानी नेटाने पाऊल पुढे टाकले. फ्रेंचाचे हे विजय एकदर लष्करी धोरणाच्या दृष्टीने महत्त्वाचे आहेत. पण कार्पेथियन पर्वतातील नगाऱ्यापुढे फ्रेंचाची मे महिन्यातील कृति टिमकीच होय तुर्की युद्धाकडे पहाता तेथेहि मे महिना तुलनेच्या दृष्टीने किरकोळ स्वरूपाचा गेला एप्रिल महिन्यातच डार्डानेलिसच्या सामुद्रधुनीवर इंग्रजाचे व फ्रेंचाचे सैन्य उतरले होते, मे महिन्यात या सैन्याच्या व तुर्की सैन्याच्या रोज झटापटी झाल्या आणि तुर्कांना इंग्रज व फ्रेंच सेनेपुढे फार नुकसान सोसून मागे हटावे लागले. इंग्रजी सेनेचीहि या झटापटीत फार खराबी झाली तथापि मे महिन्यात डार्डानेलिसच्या युद्धास इतर ठिकाणच्या रणभूमीस मागे टाकण्याइतका रग चढला नाही, व इटालीचे २–३ लाख सैन्य तुर्की किनाऱ्यावर उतरेतो विशेषसा रग चढेल अशी स्थितीहि दिसत नाही. जर्मनीच्या पाणबुड्या बोटी मात्र डार्डानेलिसच्या बाजूला जाऊन पोचल्या आहेत त्या बोटींनी दोन इंग्रजी लढाऊ जहाजे डार्डानेलिसजवळ बुडविली व तुर्की सरकारने तदनतर असे जाहीर केले आहे की, सुएझ कालव्याच्या तोंडाजवळहि पाणबुड्या बोटीच्या कारवाईस सुरुवात करण्याचा सुलतानी हुकूम सोडण्यात आला आहे. इंग्रजाच्या पाणबुड्या बोटी डार्डानेलिसच्या बाजूला गप्प बसलेल्या नाहीत. एक पाणबुडी बोट मार्मोराच्या समुद्रात शिरून तिने तुर्की व्यापारी जहाजे बुडविण्याचा सपाटा चालविला आहे, आणि खुद्द राजधानीच्या बदरात टार्पेडो सोडून कॉन्स्टाटिनोपल येथील लोकाना तिनें भयभीत करून सोडले आहे. पूर्वभूमध्य समुद्रात डार्डानेलिसच्या बाजूला जर्मन पाणबुड्या बोटींनी थोडीशी तरी हालचाल दाखविली. पण इंग्लडच्या सभोवार घिरट्या घालून व्यापारी जहाजाना बुडविण्याचा या पाणबुड्याचा उद्योग मे महिन्यात अगदी शिथिल पडला. सबंध महिन्यात सात आठ जहाजेच काय तीं या पाणबुड्यानीं बुडविली. जर्मन पाणबुड्याची कारवाई इंग्रजी व्यापारी जहाजाच्या ध्यानात आल्यामुळे या जहाजाचे बळी त्याना घेता येणे शक्य राहिलें नाही असे म्हणा, किंवा भूमध्य समुद्राकडे या पाणबुड्याची रवानगी

२८

होऊ लागल्यामुळें पूर्वीइतक्या पाणबुडया बोटीच इंग्लडच्या सभोवती आता घिरटया घालीत नाहीत असे म्हणा, कसेहि म्हणा, इंग्रजी व्यापार हाणून पाडण्याचे जर्मनीचे उद्योग हास्यास्पद होण्याच्या पथाला मे महिन्यात लागले हे स्पष्ट आहे. नाही म्हणायला अमेरिकेतून इंग्लडला येत असलेली ल्यूसीनिया नावाची १७००–१८०० उतारूनी भरलेली जगातील एक अत्यन्त प्रचड व सुन्दर राजवाडया-प्रमाणे सर्व श्रीमत प्रवाशाना प्रिय झालेली आगबोट जर्मन पाणबुडयानी बुडविली! हे निर्दयपणाचे अमानुष कृत्य जर्मनीच्या हातून झाल्यामुळे इंग्लडचे लोक सतापून चिडून गेले, इतकेच नव्हे तर अमेरिकेच्या आणि जर्मनीच्या मैत्रीवर खो येण्याचीहि पाळी या दुष्ट कृत्यामुळे आली आहे. इंग्लडचे राजविलासी प्रवासी ज्या आगबोटीत बसून प्रवास करतात, तीन हजार प्रवाशाना प्रवासात राजविलास उपलब्ध करून देण्याची ज्या आगबोटीची शक्ति, क्रोडो रुपये ज्या आगबोटीवर इंग्रजानी खर्च केले आहेत, व सर्व जगातील सर्व आगबोटीमध्ये नटविलेली सजविलेली ही सुन्दर राणी म्हणून जी आगबोट इंग्रजी दर्यावर्दी वैभवाच्या मदानें महासमुद्रावर नाचत चालत असते तीच आगबोट सागून सवरून टिचून आम्ही इंग्लडच्या किनाऱ्याजवळ बुडवू शकतो, यावरून आमच्या शास्त्रीय ज्ञानापुढे इंग्लडच्या आरमाराचें अमर्यादित म्हणून समजले गेलेले सामर्थ्य कःपदार्थ होय, अशा प्रकारच्या वल्गना जर्मन लोक ल्युसिनियाच्या खुनासबधानें करू लागले आहेत. एखादे राष्ट्र एकदा नीतिभ्रष्ट झालें म्हणजे त्याचें निर्दयतेचें वर्तन निस्सीम होते, याचे उदाहरण ल्युसिनियाच्या या खुनानें सर्व जगाच्या पुढे माडलें आहे. जर्मनीचीं नीतिबधने आता तुटलीं, गरीब व निरुपद्रवी प्रवाशाचा अशा प्रकारे खून करणें हे आपल्या बुद्धिवैभवाचें द्योतक होय असे जर्मनीला वाटू लागावे याहून नीतिदृष्टया जर्मनीचा आणखी अधःपात तो कोणचा ? पाणबुडया बोटीच्या दुष्कृत्याला झेपेलिनच्या स्वाऱ्याचीहि जोड मे महिन्यात मिळाली. जर्मनीच्या झेपेलिनानें मे महिन्यात इंग्लडवर स्वाऱ्या करून खुद्द लडन शहरातील काही घरे जाळली. इंग्रजी व फ्रेंच विमानानीं याचें उट्टे काढलें, पण लष्करी ठिकाणाशिवाय इतर ठिकाणाना उपद्रव दिला नाहीं. या सर्व किरकोळ दुष्कृत्याना महायुद्धाचे प्रारभी नसतें महत्व देण्यात येत असे. पण खून व जाळपोळ असले अनन्वित प्रकार रोजचे खेळ होऊन बसल्यामुळें सामान्य जनतेनें त्याजकडे दुर्लक्ष करण्यास सुरुवात केली आहे. इंग्लडमधील जनसमूह आता असल्या सकटाबद्दल

जरी बेफिकीर असला, तरी लढाई एकदरीनें जशी चालावी तशी चाललेली नाहीं. अशा प्रकारचा ग्रह मे महिन्यात इंग्लडातील लोकाचा होऊ लागला, वर्तमान पत्रातून प्रधानमण्डळाच्या लायकीबद्दल अविश्वासाचे उद्‌गार बाहेर पडू लागले, वक्तृत्वाच्या व नीतिमत्तेच्या दृष्टीने मुख्य प्रधान ॲस्क्विथसाहेब सर्वांत थोर ही गोष्ट खरी, पण महायुद्धास वेसण घालण्याची शक्ति त्याच्या बुद्धींत नाहीं, परराष्ट्रीय प्रधान सर एडवर्ड ग्रे हे मोठे धोरणी म्हणून नावाजलेले असले तरी ग्रीसला त्यानी फ्रान्स-इंग्लडच्या प्रभावळीतून निसटून जाऊ दिलें, नामदार चर्चिल साहेब यानीं मेहनतीने आपले आरमार जरी लढाईच्या वेळीं सिद्ध ठेविले तरी त्याच्या अगचा उत्साहातिशयच डार्डानेलिसच्या सामुद्रधुनीवर विनतयारीनें इंग्रजी आरमार प्रथम नेऊन टाकण्यास व मार्च महिन्यातील नाश करून घेण्यास कारणीभूत झाला, नामदार लॉईड जॉर्ज याची तडफ पूर्ण कळकळीची असली तरी दारू पिण्याच्या दुर्व्यसनावर आपली छाप त्याना बसविता आली नाही, अशा एक ना दोन, नाना प्रकारच्या टीका एप्रिल अखेर व मे प्रारभीं प्रधानमण्डळा वर इंग्लडमध्ये होऊ लागल्या. असले द्वैतमत लढाईच्या तयारीस विघातक असते. ही उत्साहविनाशक स्थिति ओळखून मि. अस्क्विथ यानी विरुद्ध पक्षाच्या पुढाऱ्याना प्रधानमंडळात घेण्याचा एकदम निश्चय केला. स्वतःच्या सोबत्याच्या लायकीविषयीं मि. ॲस्क्विथ याच्या मनात लवलेशहि सशय नाही. पण चर्चेच्या वेळचा असला द्विधा भावहि महायुद्धाच्या प्रारभीं राष्ट्रास विघातक असतो हे तात्काळ ओळखून युद्धाचा शेवट अखेरीस इंग्लण्डच्या बाजूचा व्हावा या एकाच इच्छेने प्रेरित होऊन मि. अस्क्विथ यानी आपल्या सोबत्याना दोन पावले मागे बसावयास सांगितलें व आपल्या विरुद्ध पक्षातील पुढाऱ्याना-ना. कार्सन सारख्या एक तऱ्हेच्या हाडवैऱ्यालाहि-त्यानीं प्रधानमण्डळात घेऊन आपल्या जवळ जिवलग मित्राप्रमाणें बसवून घेतलें ! मि. बाल्फोअर, लॉर्ड लान्सडाऊन, मि. बोनार्ड लॉ, लॉर्ड कर्झन, मि. कार्सन वगैरे विरुद्ध पक्षाची मण्डळी प्रधानमण्डळात घेण्यात आली असून नवें प्रधानमंडळ सर्व पक्षाचें मिळून झालेलें असल्यामुळे त्यास राष्ट्रीय प्रधानमण्डळ असे नाव देण्यात आले आहे. या राष्ट्रीय प्रधानमण्डळाच्या धुरीणत्वाखाली लढाईची तयारी अधिक जोरानें व अधिक नेटानें करण्यात येईल व बेल्जममधून जर्मनीला लवकरच हाकून देण्यात येईल, असा नवा विश्वास इंग्लण्डात उत्पन्न झाला आहे. स्वतःचा अभिमान राष्ट्रकार्याकरिता एका बाजूस ठेवणारे मि. ॲस्क्विथ सारखे महात्मे ज्या देशाच्या पुढारी-मण्डळात आहेत तो देश धन्य का समजू नये !

---

# महायुद्धाचा जून-जुलई महिना

मे महिन्याप्रमाणे जून महिनाहि महायुद्धाच्या इतिहासात महत्त्वाचा गेला असून युद्धाच्या वातम्याचे केंद्रस्थान ग्यालिशिया प्रांत होता. जूनच्या प्रारंभी प्रिजमिसल शहर रशियाने सोडून दिले व त्यामुळे ग्यालिशियाचा सर्व पश्चिम भाग ऑस्ट्रिया-जर्मनीच्या ताब्यात गेला. जूनच्या तिसऱ्या आठवड्यात लेंबर्ग शहर सोडून देऊन रशिया लेंबर्गच्या पूर्वेकडील वेझानी प्रांतात मागे हटत गेला असून जुलई महिन्यात सर्व पूर्व ग्यालिशियाहि ऑस्ट्रिया-जर्मनीच्या ताब्यात जाईल. जून महिन्यात ग्यालिशियातील लढाईची एकतऱ्हेची परिसमाप्ति झाली आहे, आणि इंग्लंड, फ्रान्स व इटली हे तीन देश जर रशियाच्या बाजूने लढणारे खंबीर नसते तर रशियाची झाली इतकी पिच्छेहाट तह करावयास रशियास राजीखुषी पुरेशी करण्यास झाली असती. महायुद्धाच्या या अकरा महिन्यात रशियाची चार पाच वेळा चांगली पिच्छेहाट झाली आहे. अगदी प्रारंभीं रशियाने पूर्व प्रशियावर हल्ला केला असताना मेसूरियन सरोवराच्या दलदलीच्या प्रदेशात रशियाच्या सैन्यास पहिली मोठी टोकर बसली, पुढे क्रॅको व सॅलिशिया या टापूवर हल्ला करण्याचा घाट रशियाने घातला असता जर्मन सेनापति हिंडेनबुर्ग याच्या हिकमतीमुळे वार्सापर्यंत रशियास पिच्छेहाट करून घ्यावी लागली; व या पिछेहाटीत लोड्ज येथे रशियाची फार नुकसानी झाली, वार्सा शहराचा कसाबसा बंदोबस्त रशियाने त्यावेळी केला, पण पूर्व प्रशियांत सेनापति हिंडेनबुर्ग यानीं अवचित मोठी सेना गोळा केल्यामुळे नीमेन नदीपर्यंत रशियास मागे हटावे लागले. उत्तरेस कोरलंडच्या द्विपकल्पातहि अशीच रशियाची पिछेहाट होऊन लीबा बंदर व अर्धेमुर्धे कोरलंड जर्मनीच्या ताब्यात गेलें. पोलंडमध्ये पूर्व प्रशियाच्या बाजूला व उत्तरेस कोरलंडमध्ये रशियाची अशी पिछेहाट झाली तरी ग्यालिशिया प्रांतात रशियाचे रोज पाऊल पुढे पडतच होते. महायुद्धाच्या पहिल्या महिन्यातच रशियानें लेंबर्ग शहर घेतले, व तिसऱ्या चौथ्या महिन्यात प्रिजमिसलला वेढा दिला. पांच महिन्यानंतर मार्चच्या २२ तारखेच्या सुमारास प्रिजमिसलचा किल्ला रशियाच्या हाती जाऊन एप्रिल महिन्यात रशियानें कार्पेथियन पर्वतावर जोराचा हल्ला केला. या हल्ल्यात रशियास बरेच यश मिळून कार्पेथियन पर्वत ओलांडून रशिया हंगेरीत

खात्रीनें घुसतो आणि हंगेरीचा विध्वस करून आस्ट्रिया–जर्मनीस तह करण्यास भाग पाडतो, असे सर्वांस वाटले होतें. पण मे जून महिन्यांत ही सर्व स्थिति पालटून रशिया तहाची याचना करतो की काय अशी भीति काही कुनर्की भीरूना उत्पन्न झाली आहे. मे–जून महिन्यात रशियाचे पूर्वीच्या दहा महिन्याचे श्रम वाया गेले. पोलंडमध्ये जर्मनीस रशियानें एक तऱ्हेनें कोपरानें खणू दिलें. हेतु हा की, जाऊद्या, वार्सापर्यंत जर्मनी आला तरी चालेल, आपण कार्पेथियन पर्वत ओलांडून हंगेरींत शिरलो म्हणजे दूध दिसले पण बडगा दिसला नाही, असे जर्मन माजरास करून सोडू, हा पूर्ण भरवसा रशियास वाटत होता. प्रिजमिसल पडून कार्पेथियन पर्वताच्या डोक्यावर ज्यावेळी रशियन सैन्य नाचू लागले त्यावेळी तर इतर ठिकाणच्या सर्व पिछेहाटीची व पराभवाची सव्याज भरपाई झाली असे रशियास वाटले. पण मे जून महिन्यात ही भरपाई ऑस्ट्रो–जर्मन सैन्यानें रशियापासून जबरदस्तीनें हिसकावून घेतली. इतकेच नव्हे तर रशियास पुढील काही महिने चढाईचे उद्योगात निरुपयोगी ठरवून टाकले ! पुढील काही महिने जेथे जेथे म्हणून ऑस्ट्रिया–जर्मनीचे मोठे सैन्य त्याच्या अंगावर चालून जाईल तेथे तेथे रशिया धिमेपणानें, चतुराईनें व सैन्याची खराबी न होऊ देता मागे हटत राहील. शत्रूच्या अंगावर चाल करून जाण्याची धमक काही महिने निदान रशियाच्या ठिकाणीं दिसणार नाहीं. व्यवस्थितपणें मागे हटणें व मागे हटत असताना शत्रूच्या सैन्याची शक्य तेवढी खराबी करून शत्रूच्या मोठया सैन्यास आपल्या बाजूला गुंतवून ठेवणें एवढेंच कार्य रशियास कांही महिने करता येण्यासारखे आहे. ही लढाई जर जर्मनी व रशिया या दोघामध्यें असती तर असल्या व्यवस्थित पिछेहाटीची शक्ति आपल्या जवळ शिल्लक आहे एवढया भिस्तीवरच तहाचें बोलणें लावण्याचें रशियानें टाळलें नसतें. वरील स्थितीमुळें काहींना सांप्रत अशी भीति वाटत आहे कीं, रशिया स्वतन्त्रपणे तह करण्यास उद्युक्त होतो कीं काय ! पण थोडासा विचार केला असता असें स्पष्ट दिसून येईल कीं, या भीतीस मुळींच आधार नाही. काहीं महिने जरी रशियास थोड-थोडी पिच्छेहाट करीत काळ कठावा लागला तरी पांच सात महिन्यात १९१६ सालच्या आरंभीं–निदान पुढील एप्रिल–मे महिन्यात–रशियास चांगले दिवस दिसून रशियन सैन्य कार्पेथियन पर्वत ओलांडून हंगारियाच्या उरावर बसल्यावाचून राहाणार नाही. सांप्रत रशियास अशुभ प्राप्त झालें आहे व ‘ अशुभस्य काल हरणम् ’ या

न्यायानें आणखी काहीं महिने पिछेहाटींत घालविल्यावर त्या अशुभाचें शुभ झाल्या-वाचून रहाणार नाही. साप्रतच्या अमगलाचे पाच सात महिन्यानीं मगल तरी कसे होणार ? आजचा अपशकून उद्या शुभफल कसा देणार ? आजचे नुकसान १९१६ साली कोण भरून काढणार ? रशिया स्वतः भरून काढणार. फ्रान्सचा विलक्षण जोम, इग्लडची इतिहासप्रसिद्ध चिकाटी, व इटलीची ताजी तरतरी, या सर्वांची रशियाच्या असख्य सेनासमूहाना मदत असल्यामुळे रशियाच्या प्रतापाचा सूर्य अल्पकाळच लोपला जाणार आहे, हे कोणीहि विसरता कामा नये.

## प्रिजमिसलची लढाई

रशिया जरी मागे हटत चालला आहे तरी रोज पाच दहा हजाराचा जर्मन नैवेद्य खाल्ल्याशिवाय ही स्वारी मागे पाऊल टाकीत नाही ! मे आणि जून दोन महिन्याचा आढावा घेतला तर सैन्याच्या हानीसबधानें रशियापेक्षा जर्मनीचीच नुक-सानी अधिक झाली आहे असे दिसून येईल. प्रिजमिसल शहर घेताना व प्रिज-मिसलच्या उत्तरेस व दक्षिणेस रशियाची फळी फोडताना जर्मनीचे फार नुकसान झालें. प्रिजमिसलच्या दक्षिण–पूर्वेस निस्टर नदीच्या उगमाजवळ दलदलीचा मोठा प्रदेश आहे, तो प्रदेश खदक वगैरे खणून मोठया बदोबस्ताची रशियाने जागा बनवून ठेविली होती, या ठिकाणी फार निकराने लढून ऑस्ट्रियन सैन्याला रशियाची फळी फोडावी लागली. ही फळी फोडताना ऑस्ट्रियाचें विशेष नुकसान झाले. प्रिजमिसलच्या उत्तरेस सॅन नदीला धरून रशियानें आपल्या सैन्याची चागली तयारी ठेविली होती. प्रिजमिसलच्या उत्तरेस जारास्लाव्ह येथे जरी जर्मनानीं सॅन नदी ओलाडली तरी जारास्लाव्हाच्या उत्तरेस सॅन व्हिश्चुला नदी याच्यामधील त्रिकोणात रशियानें मोठे सैन्य जमा केल्यामुळें जारास्लाव्ह येथून पूर्वेस जर्मन सैन्य चाल करून जाणार नाहीं असें प्रथम वाटलें होतें. जारास्लाव्हाच्या उत्तरेकडून जर्मन सैन्याला वळसा घालण्याचा डाव रशिया खेळत होता; आणि जारास्लाव्ह येथन दक्षिण–पूर्वेस चाल करून जाऊन प्रिजमिसलच्या पिछाडीस पोंचण्याच्या हेतूनें जर्मन सैन्य पुढें चाल करून जात होते. एकाचा एक पेच तर दुसऱ्याचा दुसरा पेंच ! जारास्लाव्हच्या उत्तरेस जर्मनीच्या मानेवर बगलेंतून रशिया हात चढवूं पहात होता, आणि जर्मनी पिछाडीस जाऊन प्रिजमिसलची तगडी ओढूं लागण्याचा उद्योग करीत होता. दोघांचे डावपेंच लष्करी धोरणाच्या दृष्टीनें बरोबर होते. ज्याचें बल अधिक त्यास

यश अशी स्थिति झाली. बगलेंतून मानगुटीवर चढलेला रशियाचा हात जर्मनीनें बगलेंत तसाच दाबून धरला, आणि जारास्लाव्हच्या दक्षिण–पूर्वेस रशियाची फळी फोडून प्रिजमिसलपासून पूर्वेस लेंबर्गकडे जाणाऱ्या आगगाडीवर आपल्या तोफा रोखल्या ! दक्षिणेकडून निस्टर नदीची दलदली ओलांडून ऑस्ट्रियन सैन्यहि या आगगाडीवर तोफा रोखू लागले. प्रिजमिसलची पिछाडी अशा रीतीनें तोफाच्या भडिमारानें उध्वस्त केली जात असताना दोन दिवस निकरानें लढून जर्मनीला किंवा ऑस्ट्रियाला आगगाडीच्या रस्त्यावर रशियानें उभे राहू दिलें नाहीं. हे दोन दिवस मोठ्या शिताफीची पिछेहाट करण्यास रशियाने घालविले. प्रिजमिसलचे किल्ले मोठ्या निकरानें शत्रूशी लढत होते, आणि इकडे जर्मन तोफाच्या तावडींत सापडलेल्या मार्गानेच प्रिजमिसल येथील सामानसुमान व सैन्य लेंबर्गकडे रवाना करण्यात येत होते ! महत्त्वाचें सर्व सामानसुमान रवाना झाल्यावर प्रिजमिसल येथील इतर सामानसुमानाचा नाश करून रशियन सैन्यानें प्रिजमिसल शहर सोडलें, आणि प्रिजमिसलच्या पूर्वेस पधरा वीस मैलावर एका ओढयाच्या काठीं मजबुतीच्या ठिकाणी जर्मन सैन्यास थोपवून धरण्यास रशियानें प्रारभ केला. याठिकाणीं प्रिजमिसलच्या लढाया सपल्या. ग्यालिशियातील लढाईचे सामान्यतः पाच भाग करतां येतात. पहिला भाग डुनाजी नदीची लढाई, दुसरा भाग जास्लो–टार्नोच्या लढाया, तिसरा भाग प्रिजमिसलच्या लढाया, चवथा भाग लेंबर्गच्या लढाया व पाचवा भाग निस्टर नदीच्या लढाया. डुनाजीच्या लढाईत रशियाची खरी फळी फुटली, व रशियास इतक्या जलदीने पिछेहाट करावी लागली की, जास्लो–टार्नोच्या पट्ट्यावर रशियास फार वेळ उभे रहाता आलें नाहीं. कार्पेथियन पर्वतावर पसरलेलें आपलें सैन्य कसेंबसें प्रिजमिसलकडे ओढून घेण्याला अवकाश मिळावा म्हणून टार्नो-जास्लोच्या पट्ट्यावर रशियाचें सैन्य थोडावेळ उभें राहिलें. रशियास असें थोडावेळ उभें रहाता आलें, आणि कार्पेथियन पर्वतावरील आपला पसारा नुकसानी होऊ न देतां आवरता आला, हें कृत्य लष्करी डावपेचाच्या दृष्टीनें फार शिताफीचें झालें, अशी रशियाची वाखाणणी तज्ज्ञ करीत आहेत. कारण डुनाजी नदीवरील रशियाचा पराभव एवढा मोठा होता कीं, प्रिजमिसलपर्यंत रशियास कोठें आसराच मिळणार नाहीं, आणि कार्पेथियन पर्वतावरील रशियाच्या पसाऱ्याचा बाजार आपणांस फुरसतीप्रमाणें यथेच्छ लुटावयास मिळेल, अशी घमेंड जर्मनीस वाटत होती. तिमजली तोफांचे

मोर्चे रचून दोन चार तासात लाखों गोळ्याचा वर्षाव करून रशियाच्या मजबूत फळीचे शतशः जर्मनीनें तुकडे केले ते डुनाजी नदीवर. ग्यालिशियातील सर्व लढायाचा पाया या डुनाजी नदीवर जर्मनीने रचला. रशियाची फळी फुटली खरी, पण एवढी मोठी लढाई जिंकल्यामुळे मिळणारे लुटीचें फळ जर्मनीच्या पदरात रशियाने पडू दिले नाहीं. हें फळ पडू न देण्याकरिता जारलोच्या उत्तरेस थोपवून धरण्याची दुसरी लढाई रशिया लढला. ही लढाई अर्थात पिछेहाटीच्या स्वरूपाची होती. सर्व पसारा प्रिजमिसलला येऊन पोचण्याबरोबर रशियाचे मुख्य सैन्यहि प्रिजमिसलकडे मागे हटले. व ग्यालिशियन युद्धातील तिसऱ्या भागास म्हणजे प्रिजमिसलच्या लढायास प्रारंभ झाला. खुद्द प्रिजमिसलचे किल्ले, दक्षिणेकडे निस्टरच्या दलदली, आणि उत्तरेकडील सॅननदी हा टापू रशियाने नेटाने लढविला. येथेहि डुनाजी नदीसारख्या निकराच्या लढाया झाल्या, पण अखेरीस जर्मन तोफखान्याच्या सर्वनाशी माऱ्यामुळे रशियाची फळी फुटली. जगी तोफखाना आणि अमर्यादित गोळ्याचा पुरवठा ही रशियाच्या पराभवाची मुख्य कारणे होत. रशियन लोक शौर्यात जर्मनीपेक्षा कमी नाहीत, हालअपेष्टा सोसण्यात कमी नाहींत, रशियन सेनापतीची बुद्धिमत्ता कमी नाही. रशियन शिपाई जिवावर उदार होऊन लढतो, हाडापिंडानें तो मजबूत आहे, थडीवाऱ्याने तो आजारी पडत नाहीं, उपासमारीनें तो थकत नाहीं, पिछेहाटीने त्याचे धैर्य गळत नाही, रशियन सेनापतीहि आपल्या कामात हुषार आहेत. सामान्य सैनिकाच्या हालअपेष्टाचे ते भागिदार असतात. शूर शिपायाबरोबरच जिवावर उदार होऊन ते शत्रूवर तुटून पडतात. रणांगणावरील डावपेचात किंवा युद्धाचे धोरण आखण्यात ते फार कुशल आहेत, आणि पिछे-हाटीची वेळ आली असताना भावी धोरणाला धरून आपली नुकसानी न होऊ देता शत्रूच्या सैन्याची रोज पांच दहा हजाराची खराबी करण्यात त्याचा हातखंडा आहे. असल्या सेनानायकाचा पराभव डुनाजीच्या व प्रिजमिसलच्या लढायात कोणी केला? जर्मन सैनिकांच्या मजबूत हाडानी हा पराभव केला नाहीं. ऑस्ट्रियाच्या सशक्त मनगटानीं हा पराभव केला नाहीं, किंवा सेनापति हिंडेनबुर्ग याच्या चपल बुद्धीनें हा पराभव केला नाहीं. ऑस्ट्रिया जर्मनीच्या अक्राळविक्राळ तोफानीं हा पराभव केला; रणभूमीवरील प्रत्येक फुटावर पडणाऱ्या तेजस्वी गोळ्यानीं हा पराभव केला; मजबूत किल्ल्याचे पाय उलथून गगनात फेकून देणाऱ्या तोफाच्या गोळ्यांतील

रासायनिक द्रव्यांनीं हा पराभव केला. तोफाची जुळवाजुळव व गोळ्याचा भरपूर साठा या अगाचें महत्त्व डुनाजीच्या व प्रिजमिसलच्या लढायामध्ये रशियाच्या जितके ध्यानात आलें तितकें यापूर्वी आले नव्हतें. मग मोठया तोफा येईपर्यंतच लढावयाचें आणि तोफा येताच मागे पाय घ्यावयाचा अशी पद्धत रशियानें सुरू केली तर नवल काय ? इग्लंड, फ्रान्स, इटली, या सर्वांच्याहि लक्षात तोफाचें व दारूगोळ्याचें अपरिमित साठयाचें महत्त्व डुनाजीच्या व प्रिजमिसलच्या लढायानीं आणून दिले. चराच्या चक्रव्यूहाचें महत्त्व ऐन नदीवरील जर्मनीच्या चरानीं चागले सिद्ध केले. चराचे चक्रव्यूह रचण्याची कला इतक्या परिणतस्थितीस जर्मनीने नेऊन पोंचविली असेल व त्यामुळे शेकडो मैल रुदीचे तोड किल्लयासारखें मजबूत करता येते ही बाब इग्लड, फ्रान्स व रशिया याच्या पूर्णपणे प्रत्ययास येण्यास महायुद्धाचे पहिले तीनचार महिने निघून गेले. दुसरे चारपाच महिने कसे गेले ? आगगाडीच्या जाळ्यामुळे आणि अत्यत व्यवस्थित हालचालीमुळे एका ठिकाणचे मोठे सैन्य तीस चाळीस तासात दुसऱ्या ठिकाणीं अवचित नेऊन चपळतेनें कसा जय मिळविता येतो, ही हिंडेनबुर्गी हातचलाखी शिकण्यात दुसरे ४–५ महिने गेले. जर्मनीने ज्या चराच्या चक्रव्यूहाची विलक्षण रचना जगास शिकविली ते चराचे चक्रव्यूह कसे फोडावे ही विद्याहि डुनाजी व प्रिजमिसल येथील लढायात जर्मनीनें शिकविली. असख्यात तोफा व अमर्यादित गोळ्याचा साठा हें चरांच्या चक्रव्यूहावर मुख्य औषध होय.

## लेंबर्गची चढाई

प्रिजमिसलचा किल्ला रशियानें सोडून दिल्यानतर ग्यालिशियातील युद्धाच्या चवथ्या व पांचव्या भागास सुरवात झाली. चवथा भाग म्हणजे लेंबर्गच्या लढाया आणि पांचवा भाग म्हणजे निस्टरच्या लढाया हें वर सागितलेंच आहे लेंबर्गच्या लढायाचे पुनः तीन भाग होतात. एक लेंबर्ग शहराच्या उत्तरेकडील, दुसरा प्रिजमिसलपासून लेंबर्गच्या आगगाडीवरील व तिसरा लेंबर्गच्या दक्षिणेस असलेल्या लेंबर्ग नदीच्या काठावरील. प्रिजमिसल येथे रशियन सैन्य चारी बाजूनी कोंडण्याचा जर्मनीनें आटोकाट प्रयत्न केला; पण तो फसला. तसाच प्रयत्न लेंबर्ग येथे करण्याचा जर्मनीनीने घाट घातला. पण रशियन सेनापति ग्रॅंड ड्यूक निकोलस याच्या दूरदर्शीपणामुळे तोहि फसला ही सतोषाची गोष्ट होय. लेंबर्ग प्रात चारी बाजूनीं

वेढण्याचा जर्मनीने कसा उद्योग चालविला ते आतां आपण पाहू. प्रिजमिसलला चारी बाजूनी वेढता यावें म्हणून जारास्लाव्हच्या उत्तरेस जर्मन सैन्य चाल करून गेलें होतें. या सैन्याच्या मानगुटीवर उत्तरेकडून बसावे म्हणून सॅन व व्हिश्चुला या दोन नद्यामधील त्रिकोणात रशियाने मोठे सैन्य जमविले होते. प्रिजमिसल पडल्याबरोबर प्रिजमिसलकडून लेंबर्गकडे जाणाऱ्या रशियन सैन्यावर जोराचे हल्ले न करता सॅन आणि व्हिश्चुला या नद्यामधील त्रिकोणातील रशियन सैन्यास पूर्व पोलडमध्ये प्रथम हाकून दिले आणि आपली उत्तरेकडची बगल सुसरक्षित करून घेतली, व नतर जर्मन सैन्य जारास्लाव्ह येथून पूर्वेकडे चालू लागले. ही उत्तरेची बगल जसजशी पूर्वेकडे जाऊ लागली, तसतसे प्रिजमिसल–लेंबर्ग या आगगाडीवरील रशियन सैन्यहि मागे हटत चालले. लेंबर्गच्या उत्तरेकडील प्रात व्यापला जाऊन उत्तरेकडून पूर्वेस जर्मन सैन्य उतरू लागण्याच्या अगोदर लेंबर्ग शहर सोडून जाण्याचा रशियाचा इरादा त्यावेळी स्पष्ट दिसला. रशियाला असे निसटून जाता येऊ नये म्हणून ऑस्ट्रियन सेनापतीनी एक नवा डाव खेळण्यास यावेळी प्रारभ केला. जारास्लाव्ह येथून प्रथम निघून लेंबर्गची उत्तर गाठावयाची व नतर पूर्वेस वळावयाचे हा लाबचा पल्ला होय. हा लाबचा मार्ग आक्रमीत असताना रशियास फुरसद मिळणार व लेंबर्ग येथील सर्व सामुग्रीसकट मजेने मागे हटण्यास हरकत येणार नाही. ही हरकत तर आली पाहिजे, तेव्हा आस्ट्रियानें असा बेत केला कीं, उत्तरेकडच्या लाबच्या पल्ल्यापेक्षा दक्षिणेकडूनच वळसा घालून लेंबर्गची पूर्व तातडीने का गाठू नये ? निस्टर नदी लेंबर्गच्या दक्षिणेकडून दक्षिण–पूर्वेस वहात जाते. लेंबर्गच्या थेट दक्षिणेचा तेवढा भाग जर सोडून दिला, आणि दक्षिण–पूर्वेच्या भागावरील काहीं नाक्याचीं ठिकाणें गाठून तेथे जर निस्टर नदी ओलाडली तर बराच कार्यभाग होईल, असे ऑस्ट्रियास वाटलें. म्हणून खुद्द लेंबर्ग सबधाच्या लढाया चालू असताच ऑस्ट्रियाने लेंबर्गच्या दक्षिण–पूर्वेकडील निस्टरच्या टापूत तीन ठिकाणी निस्टर नदी ओलाडण्याचा प्रयत्न केला. स्ट्रीजच्या पूर्वेस जर्नाव्हो येथे, स्टॅनिस्लाच्या पूर्वेस हेलिवस येथे व कोमिलियाच्या उत्तर–पूर्वेस निस्टर नदीच्या नागमोडीच्या दोन तीन वळशाच्या ठिकाणीं ऑस्ट्रियानें निस्टर नदी ओलाडून निस्टरच्या उत्तर किनाऱ्यावरील प्रातात घुसण्याचा प्रयत्न केला. लेंबर्गच्या लढ्या-बरोबरच निस्टर नदीवरील लढ्यासहि अशारीतीनें प्रारभ करण्याचें कारण रशियन

सैन्याची पिछाडी मारता यावी हे होय. पण रशियन सेनापति या युक्तीसबधाने पूर्ण सावध होते. आपल्या दक्षिण बगलेवर लाबवर पूर्वेपर्यंत ऑस्ट्रिया पसरला आहे, व त्यामुळे उत्तरेपेक्षा दक्षिणेकडून अवचित धोका मिळण्याचा सभव आहे, ही जाणीव त्याना पूर्णपणें होती, आणि लेंबर्गची पिछेहाट व्यवस्थितपणे पार पडेपर्यंत निस्टर नदीवर कोठेहि फळी फोडू द्यावयाची नाही अशा निश्चयाने त्यानी निस्टर नदी सभाळली होती. लेंबर्ग येथे रशियाने साठविलेली युद्धसामग्री मिळकत करता यावी म्हणून ऑस्ट्रियानें निस्टरची फळी तीन ठिकाणी फोडण्याचा प्रयत्न केला,पण निस्टर नदीवरील या तीन लढायात ऑट्रियास पराजय येऊन रशियाने ऑस्ट्र्याचे प्रत्येक जागीं पाच सात हजार लोक कैद केले व काहीं तोफा घेतल्या. बगलेला दक्षिणेकडून वळसा देण्याचा हा प्रयत्न फसला जात असताना ऑस्ट्रिया–जर्मनी लेंबर्गच्या लढाया लढत होते. जारास्लाव्ह येथून निघालेले जर्मन सैन्य अर्ध्या वाटेत रशियन सैन्याचा पराभव करून लेंबर्गच्या उत्तरेकडील आगगाडीच्या टापूत म्हणजे रावरुसका प्रातात शिरले. रशियाचा मध्यहि उत्तरेकडील या हालचालीला धरून मागे हटला व लेंबर्गच्या दक्षिणेकडे जाणारे ऑस्ट्रियन सैन्य सॅमभोर येथून ग्रोडेक गावाजवळ पोचलें. ग्रोडेक येथे लहान मोठे बरेच तलाव असून या तलावाची फळी रशियाने मजबूत करून ठेविली होती, शिवाय लेंबर्गच्या पश्चिमेकडील भागहि चराच्या चक्रव्यूहानीं सुरक्षित केलेला होता, आणि उत्तरेकडील आगगाडीच्या टापूतहि रशियाचें मोठे सैन्य जमा झाले होते. पण या आगगाडीच्या टापूत व ग्रोडेकच्या तटबदीजवळ ऑट्रिया–जर्मनीच्या मोठ्या तोफा येऊन पोचल्यामुळे एक दिवसाच्या लढाईतच ग्रोडेकची तटबदी व ग्रोडेकचे तलाव ऑस्ट्रियाने सर केले, व उत्तरेकडील आगगाडी जर्मनीने दोन तीन ठिकाणी मोडली. लगेच लेंबर्ग शहर सोडून रशियन सैन्य पूर्वेकडे हटलें. लेंबर्ग शहर सोडण्यापूर्वी सर्व युद्धसामग्री पूर्वेस लाबवर सुरक्षित ठिकाणी नेऊन ठेविली होती. लेंबर्ग शहर जून महिन्याच्या तिसऱ्या आठवड्यात सोडण्यात आले व चवथ्या आठवड्यापासून ग्यालिशियन युद्धातील पाचव्या भागास म्हणजे निस्टर नदीवरील पिच्छेहाटीस सुरुवात झाली. जुलईच्या प्रारभी हॅलिक्स गावापर्यंत निस्टर नदी रशियानें सोडली होती. जुलई महिन्यात उत्तरेकडून निस्टरला मिळणाऱ्या पूर्व ग्यालिशियातील सर्व निलापिला नद्या ऑस्ट्रिया–जर्मनीच्या ताब्यात जातील व टार्नोपोलचाहि प्रांत ताब्यांत घेऊन निस्टर नदीच्या उत्तर किनाऱ्यावरील ऑस्ट्रियाची

रशियावरील स्वारी ओडेसा घेण्याच्या इराद्यानें सुरू होईल, असा अदाज आहे, स्वतःच्या सरहद्दीकडे जाईपर्यंत रशिया बेताबेताने मागें हटत जाईल हे खरे; पण स्वतःच्या सरहद्दीत गेल्यावर रशियाच्या अगावर चाल करून जाण्याची शक्ति ऑस्ट्रियात रहाणार नाही, किंबहुना योग्य सधि मिळताच रशिया उलट ग्यालिशियात घुसण्यास कमी करणार नाही, असा भरवसा रशियन सैन्यास वाटत आहे.

## जर्मनी पुढे काय करणार ?

पश्चिम ग्यालिशिया व पूर्व ग्यालिशिया येथून रशियास स्वतःच्या मुलखात घाल्वून दिल्यानें रशिया थोडाच तह करण्यास तयार होणार? या पिछेहाटींत रशियाच्या दक्षिणेकडील सैन्याचा चक्काचूर न होता सैन्य व्यवस्थितपणे मागे हटलें आहे. आता तोफखान्याची व दारूगोळ्याची जुळवाजुळ होताच रशिया पुन्हा जर्मनीच्या अगावर उलटेल यात सशय नाही हा उलट फिरण्याचा काळ दोन महिन्यानतरचा असो, चार महिन्यानतरचा असो, किंवा सहा महिन्यानतरचा असो ! पाठ भूमीला लागल्यानतर दुप्पट जोराने उठण्याच्या रशियाच्या ताकतीविषयी इतिहास पूर्ण साक्ष देत आहे. अर्थात ग्यालिशियातून पिछेहाट झाली म्हणून इग्लड व फ्रान्स याचा स्नेह सोडून रशिया एकटाच जर्मनीशी तह करील हे सभवत नाही. रशियन राष्ट्राचा इतिहास तसा नाहीं, रशियन सैन्याची देशभक्ति तशातली नाहीं, रशियाचे बादशहा झारसाहेब याची नियत तसली हिणकस नाहीं. बरे रशियापाशी साप्रत दारूगोळा नाहीं म्हणून रशियाच्या मागे लागून कोठपर्यंत पूर्वेस जावयाचें ! नेपोलियन मॉस्कोपर्यंत गेला होता, पण शेवटीं रशियानें दाद दिली नाही ती नाहीच; इतकेच नव्हे तर आपलें सर्व सैन्य बळी देऊन नेपोलियनला मागे फिरावे लागलें, अर्थात स्वतःचे अवसान न जोखता रशियाचा पाठलाग करणे म्हणजे मृत्युमुखीं पडण्यासारखेंच होय. अशा स्थितींत जर्मनी पुढें काय करणार ? रशिया पूर्व ग्यालिशियात पुनः पूर्वेकडून शिरू न शकेल असा बदोबस्त ऑस्ट्रियास करणें भाग आहे, म्हणून रशियन प्रातातील निस्टर नदीच्या काठचा मुलुख साधल्यास ऑस्ट्रिया व्यापून बसेल, पण निस्टर सोडून फार दूरवर रशियात ऑस्ट्रिया घुसणार नाहीं. ऑस्ट्रियाचा रोख हा असा दिसतो. लेंबर्गच्या लढाया सपण्याबरोबर जर्मनीनेंहि आपल्या रोखाचें दिग्दर्शन केलें आहे. बग नदी लेंबर्गच्या उत्तर–पूर्व कोंपऱ्यात उगम पावून पूर्व पोलडची पूर्वेची सरहद्द होऊन वार्साच्या उत्तरेस

व्हिश्चुला नदीला मिळते. लेंबर्ग शहर पडण्याबरोबर बग नदी व व्हिश्चुला नदी या दोन नद्यामधील ग्यालिशियाची उत्तर सरहद्द ओलांडून जर्मन सैन्य उत्तरेकडे पूर्व पोलडात जोराने आत घुसले, व झटक्यासरसे ' ल्यूब्लीन खोल्म ' हा आगगाडीचा फाटा गाठण्याचा जर्मनीनें प्रयत्न केला. पहिल्या हुलेसरशी हा फाटा गाठता आला नाही, पण जुलई प्रारभाला त्या फाटयाजवळ जर्मन जाऊन पोंचला असून खोल्म, ल्यूब्लीन, इव्हनगोराड, हा आगगाडीचा फाटा जर्मनीच्या ताब्यात जाईल असा अदाज आहे. पूर्व पोलडातील जर्मनीच्या या लढाईचा अर्थ काय ? वार्साकडे इव्हनगोराड येथून व्हिश्चुला नदीच्या डाव्या किनाऱ्याने एक फाटा जातो, एक फाटा बिलासस्टॉक व खोल्म या फाटयाच्या मध्यभागातून वार्साकडे जातो, व उत्तरेकडून फिट्रगड व मॉस्को येथून येणाऱ्या आगगाडया बिलासस्टॉक येथे मिळून वार्साकडे दक्षिणेस उतरतात. म्हणजे वार्सा शहराला जर सर्व रशियन साम्राज्यापासून अलग करावयाचे असेल तर बिलासस्टॉक व खोल्म अर्थात् बग नदीच्या पश्चिमेकडील सर्व प्रात हस्तगत केला पाहिजे. खोल्मच्या जक्शनजवळ जर्मन जाऊन पोंचताच उत्तरेस बिलासस्टॉकच्या जक्शनजवळ पोंचण्यचा प्रयत्न तावडतोब करण्यात येईल. पूर्व प्रशियात सेनापति हिंडेनबर्ग हे जून महिन्यात जाऊन बसले असून तेथें जर्मनीची मोठी सेना जमा होत असल्याची बातमी प्रसिद्ध झाली आहे. उत्तरेकडील कोन्हो व कोरलड या प्रातातील स्वारीकरिता म्हणजे रिगाच्या आखातातील रिगा बदर घेण्याकरिता किंवा पूर्व प्रशियाच्या दक्षिण–पूर्वेस असलेला नेरू नदीचा आगस्टोव्हो प्रात व्यापून बिलासस्टॉक जक्शन घेण्याकरिता हें सैन्य गोळा होत आहे हे निश्चयानें सागणें कठीण आहे; तथापि ग्यालिशियातील सैन्य ज्या अर्थी पूर्व पोलडातून उत्तरेस वर चढूं लागलें आहे, त्याअर्थी सेनापति हिंडेनबर्गहि उत्तरेकडून बिलासस्टॉक जक्शनवर उतरून वार्साला सर्व रशियन साम्राज्यापासून अलग करण्याचा प्रयत्न केल्यावाचून राहाणार नाहीं असे उघड होतें. महायुद्धाच्या प्रारभीं ऑस्ट्रियाने लेंबर्ग येथून उत्तरेस जाऊन बग नदीच्या किनाऱ्याने वर चढावे व पूर्व प्रशियातून जर्मनीनें खालीं उतरून नेरू नदी ओलांडून बिलासस्टॉक मार्गाने बग नदीवर यावें, आणि बग नदीवर व नेरू नदीवर चराच्या चक्रव्यूहाची तटबदी करून रशियास थोपवून धरून रशियासबधानें दोघानीं स्वस्थ राहून इतर उद्योगास लागावें. असें ऑस्ट्रिया–जर्मनीचें लष्करी धोरण ठरलें होतें: पण प्रारंभीं

रशियन सेनापति ग्रँड ड्यूक निकोलस यांनीं ऑस्ट्रियन सैन्याचा धुव्वा उडवून दिल्यामुळें प्रारभीचे बेत कागदात गुण्डाळून ठेवून हगेरीचें सरक्षण करता करतां ऑस्ट्रिया-जर्मनीस पुरेवाट झाली, पण मे-जून महिन्यात ग्यालिशियामध्यें एका मागून एक विलक्षण जय ऑस्ट्रिया-जर्मनीस मिळाल्यामुळे अगदी प्रारभीचे बेत अमलात आणण्यास त्याना सवड मिळाली आहे. जुलई महिन्यात खोल्म, ल्यूब्लीन व इव्हनगोराड या टापूंत निकराच्या लढाया होतील असा रग दिसत नाही, पण हा टापू ओलाडून वार्साच्या रोखानें ज्यावेळीं जर्मन सैन्य उत्तरेस जाऊ लागेल त्यावेळी रशिया निकराने लढल्यावाचून राहाणार नाही. त्याचप्रमाणे पिटरगडकडून वार्साकडे येणारी आगगाडी जर्मनीच्या ताब्यात जाऊ नये म्हणून रशियाचे उत्तरेकडील सैन्य जिवापाड लढण्यास कमी करणार नाहीं. वार्सासबधाच्या या युद्धास कसा काय रग चढतो हे जुलई महिन्यात व्यक्त होऊ लागेल.

## इंग्लंडची तयारी

ग्यालिशियाच्या युद्धात रशिया पेचात आलेला पाहून जर्मनीनें आपले मूळचे बेत अमलात आणण्याचा उद्योग सुरू करावा ही ओघाओघानेच होणारी गोष्ट होय. जर्मनीस काहीं वेळ तसे करण्यास जरी फुरसत मिळाली तरी अखेरीस जर्मनीचा कोंडमारा करून तहाची याचना करावयास जर्मनीस भाग पाडणें इग्लडास शक्य आहे, व त्या दृष्टीनें इग्लडचे उद्योग जारीने सुरू आहेत. इग्लड, फ्रान्स, इटली व रशिया या चार देशातील युद्धास लायक अशा पुरुषाची सख्या काढली, मग ते पुरुष १६ वर्षांचे असोत, १७ वर्षांचे असोत, किंवा ५० वर्षांचे असोत, तर ती सख्या ऑस्ट्रिया-जर्मनी व टर्की याच्या तसल्या सख्येहून दुप्पट भरते. ऑस्ट्रिया व जर्मनी याना कितीएक वर्षांच्या शिस्तीचा व व्यवस्थेचा फायदा ह्या कामीं मिळणारा आहे ही गोष्ट खरी; पण या महायुद्धात एक जगावें तरी किंवा मरावयाला तयार व्हावे, असा आणीबाणीचा प्रसग आपल्या देशावर आलेला आहे; ही गोष्ट इग्लड, फ्रान्स, इटली व रशिया या चारहि राष्ट्रातील लोकाच्या हृदयात ग्यालिशियातील रशियन पिछेहाटीनें पूर्णपणें बिबवली आहे. तेव्हा कितीएक वर्षांच्या शिस्तीची उणीव देशाभिमानाच्या स्फूर्तीनें भरून निघणारी आहे. आज जरी जर्मनी व ऑस्ट्रिया याचें सैन्य सख्येनें अधिक दिसलें तरी १९१६ सालच्या प्रारभाला जर्मनी संख्येनें अधिक राहाणार नाहीं, व १९१७ सालच्या प्रारभीं तर इग्लडची

संख्या जर्मनीच्या मानगुटीवर बसल्यावाचून राहाणार नाहीं ! आपली सर्व संख्या उपयोगात आणता यावी म्हणून इंग्लंडच्या सर्व प्रजाजनाची नोंद करण्याचें बिल पार्लमेंटपुढें आलें आहे, व जुलई महिन्यात तें पास झाल्यावर संख्येच्या बाबींतील कमीपणा भरून काढण्यास जारीचे उद्योग सुरू होतील. प्रजाजन आयते आहेत; त्याची नोंद केली म्हणजे कामास सुरुवात झाली, नवीन काहीं उत्पन्न करावयास नको. पण दारूगोळ्याची गोष्ट तशी कोठें आहे ? सैन्याला लागणारा पोषाख, सैन्याला लागणाऱ्या मोटारगाड्या, सैन्याला लागणाऱ्या बंदुका, तोफा व दारूगोळा हीं सर्व उत्पन्न करावीं लागतात. दारूगोळा जेव्हा पाण्यासारखा खर्च करावा तेव्हा चराच्या चक्रव्यूहाची फळी फोडता येते. हें तत्त्व ग्यालिशियाच्या युद्धात जर्मनीनें पूर्णपणें स्थापित केलें आहे. ग्यालिशियात हा अनुभव येत असताना किंबहुना तत्पूर्वींहि फ्रान्समध्ये व बेल्जममध्ये तोच बोध इंग्लंडच्या व फ्रान्सच्या सैन्याने घेऊन टाकला होता. नौचापेलीच्या लढाईंत दोनतीन दिवसात सबंध बोअर युद्धात जितका दारूगोळा खर्च झाला तितका खर्च होऊन गेला; आणि दारूगोळ्याच्या साठ्याचें महत्त्व इंग्लंड व फ्रान्स याच्या हृदयात बिंबलें. नौचापेली येथे जय मिळाला खरा, पण दारूगोळा सपल्यामुळे पुढे पाऊल टाकता आलें नाही. ही दारूगोळ्याची कमतरता मे–जून महिन्यात इंग्लंड व फ्रान्स याना पावलोंपावलीं नडली आहे. डुनाजीच्या लढाईंत जर्मनीने रशियाची फळी फोडली असें ऐकल्यानतर इंग्लंड व फ्रान्स याच्या सैन्यानीं जर्मनीच्या चक्रव्यूहावर तुटून पडावयास नको होतें काय ? रशियाची एकसारखी पिछेहाट होत आहे व जर्मनी त्याचा पाठलाग करीत आहे अशा रोज बातम्या येत असताना इंग्रज व फ्रेंच स्वस्त कसे बसतील ? इंग्रज व फ्रेंच स्वस्थ बसले नाहींत. मे व जून दोनहि महिने सैन्य लढत राहिलें, सेनापति लढत राहिले, बंदुका लढत राहिल्या, तोफा लढत राहिल्या; इतकेंच नव्हे, तर मुत्सद्दी व प्रधानमंडळ, व्यापारी लोक, ब्यांका, लहानापासून मोठाल्या सर्व कारखान्यात असलेले बायकामुलासकट सर्व कामकरी लोक ही सर्व युद्धकलेचीं अदृश्य यंत्रे जोरजोरानें भ्रमण पावू लागलीं. हा चमत्कार नुसत्या इंग्लंडात व फ्रान्सांत घडून आला असें नव्हे, तर जपान व अमेरिका येथीलहि हरएक कारखाना दारूगोळा निर्माण करण्याकरिता व तो रणभूमीकडे पोंचविण्याकरितां गरगर फिरू लागला. दारूगोळ्याचा सांठा तयार करण्याच्या

कामास मे–जूनमध्यें इंग्लंडनें प्रारंभ केला, व १९१६ सालच्या प्रारंभाला कोण-त्याहि रणभूमीवर दारूगोळ्याचा यत्किंचित्‌हि तुटवडा पडणार नाहीं; इतकेंच नव्हे तर, अविचाराची नासधूस सहज खपून जाण्याइतका तो साठा मोठा होईल, असा भरवसा इंग्लंडास वाटत आहे. असें कां वाटू नये ? तर्कदृष्ट्या या भरवशांत कोणचा लेचापेचा दुवा आहे ? कोणचाच नाहीं. खुद्द दारूगोळ्याची नसली तरी इंग्लंड व फ्रान्स यामध्यें इतर जिन्नस तयार करणाऱ्या कारखान्यांतील यंत्रसामग्री येवढी मोठी आहे कीं, या सर्व यंत्रांनीं जर एकसारखा दारूगोळा तयार केला तर रणभूमीच्या पट्टयावर नव्हे, तर सर्व जर्मन साम्राज्यावर दारूगोळ्याचा पाऊस पाडणाऱ्या तोफांचे मेघ इंग्लंडातून युरोपकडे वाहू लागतील ! इंग्लंडची स्वतःची यंत्रसामग्री एवढी मोठी आहे. शिवाय इंग्लंड व फ्रान्स याच्यापाशीं कधींहि न सपणारा द्रव्यनिधि आहे. इंग्लंड व फ्रान्स यांच्या संपत्तीशीं जर जर्मनी–ऑस्ट्रि-याच्या संपत्तीची तुलना केली, तर जर्मनी–ऑस्ट्रिया याकामीं मर्यादित दिसतील व इंग्लंड, फ्रान्स अमर्यादित दिसतील. रणभूमीवर या अमर्यादित द्रव्याचा काय उपयोग ? सोन्यारुप्याचा दारूगोळा, बंदुकींतून व तोफांतून उडवून लोखंडी शत्रू कसा मागें हटणार ? रणांगणावर जरी त्या सोनेरी व रुपेरी गोळ्यांचा उपयोग नसला, तरी दारूगोळा निर्माण करण्याचे कामीं सोन्यारुप्याची शक्ति अद्भुत आहे. इंग्लंड, फ्रान्स, रशिया व इटली येथील हरएक यंत्रावर हरएक इंजिनीअरवर व हरएक कामकऱ्यावर पूर्ण सत्ता प्रधानमंडळाच्या हातीं आली आहे. पण जपान व अमेरिका येथील यंत्रें, इंजिनीअर्स व कामकरी यांच्यावर प्रधानमंडळाची सत्ता कशी चालणार ? कायद्यानें जरी नाहीं तरी सोन्यारुप्याच्या मध्यस्थीनें जपान व अमेरिका येथील सर्व यंत्रांवर इंग्लंडची सत्ता मे–जून महिन्यापासून सुरू झाली आहे, आणि समुद्रावर इंग्लंडचें वर्चस्व अबाधित राहिलेलें असल्यामुळें आगबोटीं-तून एका किनाऱ्याचा दारूगोळा इंग्लंडास दुसऱ्या किनारीं सहज लीलेनें नेतां येतो. इंग्लंडचा पैसा अमर्यादित, समुद्रावरील वर्चस्व अबाधित, व इंग्लंडच्या बाजूची लायक व लढवय्या उमेदवारांची संख्या दुप्पट. न्यून येवढेंच कीं, चराच्या चक्रव्यूहाचें स्वरूप, आगगाडीच्या व्यवस्थित धावण्याची चलाखी, व तोफखान्याच्या बेसुमार माऱ्यानें चराचे चक्रव्यूह फोडण्याची युद्धकला, ह्या बाबींचें नुसतें बौद्धिक ज्ञान नव्हे, लढाईच्या खात्यांत प्रत्येक रंध्ररोमांत खेळून राहिलेलें

ज्ञान महायुद्धास सुरुवात होण्यापूर्वी काहीं वर्षे इंग्लंडास व्हावयास पाहिजे होतें. त्या अज्ञानाचें प्रायश्चित्त ग्यालिशियाच्या पराभवानें इंग्लंडच्या चौकडीनें घेतलें आहे. आता ज्ञानविज्ञान चांगलें झालें आहे. पूर्वीच्या चुका भरून काढून जर्मनीवर चढ करण्याच्या मार्गाला इंग्लंड आता लागलेला आहे. मे–जून महिन्यात रशियाची पिच्छेहाट ग्यालिशियात होत असताना इसर नदीवर यिप्रेसच्या बाजूवर आरास व लेन्स या टापूंत किंवा आरगॉन प्रांतात इंग्रज व फ्रेंच जर्मनीशी बऱ्याच निकराने लढत होते, पण दारूगोळ्याचा मोठा साठा जवळ नसल्यामुळे तशी निकराची चढाई करण्यास फ्रेंच सेनापति जनरल जॉफ्रे यानीं सम्मति दिली नाहीं. शिवाय ग्यालिशियातून रशियाची पूर्ण पिछेहाट झाल्यानंतर वार्साच्या नादाला न लागता पश्चिमेस कॅलेकडे जर्मनीचा मोर्चा पुन्हा वळण्याचा संभव आहे. कारण, आज वार्सा घेतला तर पुढे काय ? व्हिश्चुला नदीच्या काठी बसावयाचें तें बग नदीच्या काठी तळ देऊन बसावयाचे, एवढेंच ना ? पण १९१६ सालापासून इंग्लंडच्या पक्षाची वरचढ होऊं लागेल त्याची वाट काय ? ही वरचढ होऊं लागण्यापूर्वी जर्मनीने अशा जागा व्यापिल्या पाहिजेत कीं त्या वरचढीचें फळ इंग्लंडच्या पदरात पडणार नाही, किंवा फ्रान्स व रशिया यापैकी कोणीतरी दमून जाऊन तह करण्यास राजी होईल. रशियाला दमवावे तर ते धूड फार मोठें. पारिस घेतल्यानें फ्रान्स दमला जाण्याचा संभव. पारिस घेता आले तर फ्रान्स दमतो, आणि कॅले व कॅलेचा दक्षिण किनारा ही जर घेता आली तर इंग्लंडचे प्रयत्न विफल होतात, इंग्लंडचे प्रयत्न विफल करण्याचा दुसरा एक मार्ग म्हणजे निस्टरच्या काठानें काळा समुद्र गाठून ओडेसा बंदर घेऊन पाणबुड्या बोटीच्या व तुर्की आरमाराच्या जोरावर तुर्की साम्राज्याशी काळ्या समुद्राच्यामार्फत संलग्न होणें हा होय. अशा रीतीने संलग्न झाल्यानें ग्रीस, रुमानिया, बल्गेरिया आदि करून सर्व बाल्कन देशांना मत्सर न वाटून इटलीप्रमाणे बाल्कन प्रदेश युद्धाच्या ज्वालेनें न पेटवितां तुर्की साम्राज्याच्या मार्फत सर्व मुसलमानी जगांत युद्धाच्या आगीच्या दिवट्या फिरविता येण्यासारख्या आहेत. एक कॅले तरी घ्यावे किंवा काळ्या समुद्रापर्यंत तुर्की साम्राज्याशीं संलग्न होऊन सर्व मुसलमानी जगाला आपल्या करंगळीभोंवतीं गरगर फिरावयास लावावें, एवढ्ही १९१५ साली पसरलेल्या व १९१६–१७ सालीं आवळल्या जाणाऱ्या इंग्लंडच्या जाळ्यातून जर्मन मासोळीची सुटका होणें

शक्य नाहीं. ग्यालिशियांतील पिछेहाटीमुळे काळया समुद्राकडे धाव घेणें कॅलेवरील हल्लयापेक्षा कमी नुकसानीचे आहे. तथापि, ' मूले कुठारः ' या न्यायानें कॅलेकडे जर जर्मनीची चढाई झाली तर प्रतिकाराला लागणारा दारूगोळा कमी पडू नये म्हणून जून महिन्यात जर्मनीच्या चक्रव्यूहावर जनरल जोफ्रे यानीं तितके निकराचे हल्ले केले नाहींत. फ्रान्समधील लढाईप्रमाणेंच इटली व ऑस्ट्रिया यांच्यामधील चढाई चक्रव्यूही स्वरूपाची झाली असून जून महिन्यात इझानो नदीवर ट्रिस्टीच्या बाजूला थोडेसे पुढे सरकण्यापलीकडे इटलीची विशेष प्रगति झाली नाहीं. वार्सा किंवा ओडेसा यापैकीं कोणच्या ना कोणच्या तरी धोरणाची वासलात लागून जाई-पर्यंत स्वसरक्षणास लागण्यापलीकडे अधिक सैन्य इटलीच्या अगावर ऑस्ट्रिया पाठवणार नाहीं. जून महिन्यात तुर्की युद्धालाहि विशेष तेज आलें नाहीं. इराणी आखातातून युफ्रैटीस व तैग्रीस या नद्यांच्या मार्गानें बसरा कुर्ना सोडून उत्तरेस जाण्यास इग्रजी सेनेनें जून महिन्यात आरभ केला इतकेच. डार्डानेलिसची लढाई एक प्रकारच्या सुस्तीनेच चालली आहे. जर्मनी जर कॅलेकडे वळला तर फ्रान्स बेल्जमकडे इग्लडचें सर्व लक्ष वेधले जाऊन डार्डानेलिसच्या कामगिरीस सुस्तीचेच नव्हे, तर हेळसाडीचेंहि स्वरूप प्राप्त होईल. पण पारीस कॅले याच्या ऐवजीं वार्सा घेऊन ओडेसाकडे जर जर्मनीचा मोर्चा फिरला तर डार्डानेलिसमधील सुस्ती पार नाहींशी होऊन सर्व बल खर्च करून ओडेसाला जर्मनी पोचण्यापूर्वी कॉन्स्टाटिनोपल शहरात इग्रज सैन्य शिरल्यावाचन राहणार नाहीं.

---

# महायुद्धाचा जुलई-आगस्ट महिना

जून महिन्याप्रमाणें जुलै महिन्यातहि युद्धाचा खरा भर पश्चिमेपेक्षा पूर्वेकडेच होता. मे महिन्याच्या प्रारंभापासून रशियाचा पिच्छा पुरविण्यास जर्मनीनें जो प्रारंभ केला आहे त्याचा शेवट जुलै अखेरहि झालेला नाहीं. ग्यालिशियन युद्धास सुरुवात होऊन तीन महिने होऊन गेले तरी अद्याप त्या बाजूच्या युद्धाचा काहींच निकाल लागलेला नाहीं. आणखी तीन महिने म्हणजे नोव्हेंबर-डिसेंबरात थंडी पडून बर्फाचा करडा अम्मल युरोपात सुरू होईपर्यंत रशियाच्या बाजूचें युद्ध असेंच निकरानें चालेल, असा अंदाज आहे. रशियाच्याच बाजूला एवढी भर का ? रशियावर निकराचे हल्ले करण्यात ऑस्ट्रिया जर्मनीस फायदा कोणता ? सर्व्हियासारखा चिमुकला देश एकदा कायमचा चिरडून टाकण्याचा सोडून देऊन रशियाच्या मागें हात धुवून लागण्यात कोणता मतलब ? कॅले किंवा पारिस घेतल्याने पश्चिम बाजूच्या रणभूमीची एक तऱ्हेची परिसमाप्ति होण्याचा संभव असताना व दोन्ही ठाणीं जर्मनीच्या छावण्यापासून पन्नास-पाऊणशें मैलाच्या अंतरावर असताना अजस्त्र शत्रूचा पाठलाग करून मृगजलाच्या मागें धावल्याप्रमाणे स्वतःच्या सेनेची फसवणूक जर्मनी का करून घेत आहे ? पंचवीस-तीस लाख सैन्य रशियाच्या अंगावर पाठवून वार्सोच्या सभोंवती जमिनींत धान्य पेरल्याप्रमाणे मशिनगन्स व मोठ्या तोफा पेरीत बसण्याचा उद्योग जर्मनीस कशाला पाहिजे ? हे एवढे लष्करी सामर्थ्य आल्प्स पर्वतावरून जर खालीं इटलीच्या अंगावर कोसळून पडले असते तर रोमपर्यंत किंवा जिनेव्हापर्यंत नुसत्या वजनाखाली इटलीची पोळी लाटली जाऊन इटलीने स्वतंत्र तह नसता का केला ? या प्रश्नास उत्तर असे आहे की, इटलीचा पुरा मोड केल्यानें महायुद्ध थांबत नाहीं. इटली महायुद्धास सामील होण्यापूर्वी महायुद्ध जोरानें चालले होते, आणि उद्या इटली जरी कर्मधर्मसंयोगानें पुन्हा गप्प बसला तरी महायुद्ध तसेंच पुढे जोराने चालेल. महायुद्धाचा प्रारंभ, मध्य व अंत इटलीवर बिलकूल अवलंबून नाही. इटलीने जय मिळवून ट्रिस्टी प्रांत हस्तगत करून घेतला तर त्यात इटलीचें कल्याण आहे, आणि महायुद्धाचें आयुष्य कमी करण्याचें श्रेय इटलीस मिळणार आहे; पण इटली महायुद्धाच्या मुख्य स्तंभापैकीं एक स्तंभ पूर्वी नव्हता, आज नाहीं व पुढेहि होणार नाहीं. अशा स्थितींत इटलीच्या

बाजूला स्वसरक्षण करण्यापलीकडे ऑस्ट्रियाने विशेष लक्ष देऊ नये हे साहजिक आहे. इटलीने इसोना नदी ओलाडली असून गारीज व ग्रॅडिक्स या ठाण्यावर हल्ला चढविला आहे. व थोडयाच अवकाशात इटली ट्रिस्टी बदर गाठील असा अदाज आहे, ट्रिस्टी बदरातील दारूगोळा तयार करणारीं यत्रे ऑस्ट्रिया दुसरीकडे नेऊ लागला आहे, यावरून प्रसग पडल्यास ट्रिस्टी बदर सोडण्याचा ऑस्ट्रियाचा सकल्प झालेला दिसतो असे अनुमान निघतें. गेले अडीच महिने इटलीचे पाऊल ज्या हिशोबाने पुढे पडत आहे त्या हिशोबाचा धिमेपणा पाहिला असता हिंवाळ्याच्या सुरुवातीपर्यंत ट्रिस्टी प्रात व्यापण्याहून अधिक मोठी कामगिरी इटलीच्या हातून होणार नाही. अशा स्थितींत हिंवाळ्यापर्यंतचे पुढील तीनचार महिने ऑस्ट्रिया—जर्मनीने रशियावरच आपले सैन्य पाठवीत रहावे व कडक हिंवाळ्याच्या दिवसात दक्षिणेस भूमध्य समुद्राच्या काठची जरा उबदार हवा खाण्याकरिता आपल्या लष्करास खालीं पाठवावे, हें जर्मनीच्या दृष्टीने अव्यवस्थितपणाचे लक्षण नव्हे. इटलीची गोष्ट एका बाजूला राहू दे, पण सर्व्हियाला अद्याप जिवत का ठेवले ? सर्व्हिया जिवत राहिला आहे याचे कारण ऑस्ट्रिया—जर्मनीची इच्छा नव्हे तर सर्व्हियाचा पराक्रम होय. सर्व्हियाला नामशेष करण्याचा ऑस्ट्रियानें दोनवेळ प्रयत्न केला, पण तो प्रयत्न दोन्ही वेळा फसला. सर्व्हियाचे चिमुकले राष्ट्र जिवावर उदार होऊन लढलें आणि दुसऱ्या खेपेस सर्व्हियाचा अर्धा अधिक भाग ऑस्ट्रियाच्या ताब्यात गेला असताना सर्व्हियानें स्वदेशातून शत्रूस बाहेर पिटाळून लावलें, या दुसऱ्या स्वारीनतर गेल्या चार पाच महिन्यात सर्व्हियावर ऑस्ट्रियाची तिसरी स्वारी कां झाली नाहीं ? या अवधींत भयकर ज्वराच्या साथीनें सर्व सर्व्हिया देश होरपळून गेला होता; अशा वेळीं ऑस्ट्रियानें आपलें यमकृत्य सहजासहजीं का उरकून घेतलें नाही ? साप्रत सर्व्हिया रोगग्रस्त नसून पुन्हा ताजातवाना झाला आहे, आणि त्याला इग्रजाची व फ्रेंचाची मदत मिळाली असून इग्रजी तोफा व इग्रजी छोटया लढाऊ बोटी सर्व्हियाच्या डान्यूब नदीच्या सरहद्दीचें सरक्षण करीत आहेत. इतकी सर्व्हियाची पुन्हा बळकटी झाल्यावर ऑगस्टमध्ये सर्व्हियावर ऑट्रियाची तिसरी स्वारी होणार, अशी बोलवा ऐकू येऊ लागली आहे. इतके दिवस ऑस्ट्रिया स्वस्थ कसा बसला ? स्वस्थ बसला याचें कारण चार महिन्यापूर्वी प्रिजमिसलचा किल्ला घेऊन कार्पेथियन पर्वताच्या डोक्यावर ज्यावेळीं रशिया चढला, त्यावेळीं

हंगेरीचा बचाव करण्याकरिता इतर सर्व बाबी बाजूला सारून एकट्या रशियाकड सर्व लक्ष लावून ठेवणें ऑस्ट्रिया–जर्मनीस भाग पडले. मार्च महिन्याच्या २२ तार खेस प्रिजमिसलचा किल्ला रशियाने घेतला, आणि तेव्हांपासून ऑस्ट्रिया–जर्मनीस दुसरे तिसरे काहीं सुचेनासे झालें. गेले तीन महिने रशियाची पिच्छेहाट होत आहे खरी, पण रशियाशिवाय अन्य विषयाकडे लक्ष पुरविण्यास फुरसदच रशिया देत नाही. प्रिजमिसल ऑस्ट्रियानें पुन्हा परत घेतलें, लेंबर्ग पडलें, ग्यालिशियाचा किरकोळ कोपरा मात्र रशियाच्या ताब्यात राहिला, या गोष्टी मे–जून महिन्यातच घडून आल्या. जुलै अखेरीस वार्सा सोडून देऊन व्हिश्चुला नदीपासून बग नदी पर्यंत मागे हटण्याचा रशियानें उपक्रमहि केला, पण रशिया मागे हटतो आहे तो कसा हटतो आहे? मनुष्यानें कान पकडले असता लाडगा जसा मागे हटतो त्याप्रमाणें, एक कान जर्मनीच्या हातात देऊन व एक कान ऑस्ट्रियाच्या हातात देऊन त्या दोघानाहि आपल्याबरोबर मागे ओढीत नेऊन मागील दोन पायावर उभा राहून हा रशियन लाडगा मागे सरकत चालला आहे. ऑस्ट्रियाचें व जर्मनीचें लष्कर हा आपल्याबरोबर पूर्वेकडे खेचून नेतो आहे, इतकेच नव्हे तर जर्मनीने किंवा ऑस्ट्रियानें फाजील लगट केल्यास त्याचे नाक डोळे फाडून काढण्यास या लाडग्याचे पुढच्या दोन पायाचे पजे सज्ज आहेत. बरें, कान सोडून देऊन एखाद्या नदीनाल्याच्या काठीं स्थिर आसन माडून स्वस्थ बसावें तर चारी पायावर उठाव घेऊन मस्तकावर झडप घालण्यास हा लाडगा तयार! याच्या चारी पायापैकीं एक पाय अजिबात मोडल्याशिवाय रशियाची पिछेहाट जर्मनी–ऑस्ट्रियाला यशदायक न होता उलटी त्रासदायक होणारी आहे. एखाद दुसरा पाय मोडण्याकडे जर्मनी–ऑस्ट्रियाचें सर्व लक्ष वेधून गहिलें आहे; आणि कोणत्याच पायास इजा होऊ न देता जर्मनी–ऑस्ट्रियास आपल्या भीतीच्या सावलींत नेहमी गुरफटून ठेऊन त्यांच्या घरादारापासून, त्याच्या आगगाडीच्या जाळ्यापासून आणि पश्चिमेकडील किंवा दक्षिणेकडील रणक्षेत्रापासून पूर्वेस फार दूरवर दलदलीच्या दऱ्याखोऱ्यात मोठ्या विजयाच्या नादानें विलोभून नेण्याचा डाव पराभूत झालेला रशिया खेळत आहे! रशियन आस्वलाची एखादी तगडी तरी मोडली पाहिजे, किंवा धूर्तानें फसविलें म्हणून स्वतःचा अपजय तरी कबूल केला पाहिजे. या दोन गोष्टीपैकीं एखादी गोष्ट घडून येऊन रशियन प्रकरण निकालास लागल्याशिवाय

सर्व्हियावर ऑस्ट्रियाची तिसरी स्वारी होण्याचा संभव नाहीं. रशियन सैन्याची व जर्मन सैन्याची गुंतागुंत साप्रत इतकी बिकट झाली आहे कीं, निकालाच्या वेळे-शिवाय ती गुंतागुंत सोडविणें फार मुष्कीलीचें होणार आहे. ही गुंतागुंत जुलै महिन्यात अधिक पेचाची कशी झाली हे पहाण्यापूर्वी पश्चिम रणभूमीचे प्रथम निरीक्षण करणें जरूर आहे.

जून महिन्याप्रमाणें जुलै महिन्यातहि बेल्जम व फ्रान्समध्ये लढाया सुरू होत्या. इसर नदी, यिप्रेस, लाबासी व आरास या टापूमध्ये जर्मनी कुरतडत होता, आणि आरगोन प्रातात फ्रान्स जर्मनीला कुरतडत होता. जर्मनानी इंग्रजाचा चर घ्यावा तर इंग्रजानी दुप्पट जोरानें उलट हल्ला करून तो चर परत घ्यावा, अशा स्वरूपाची लढाई सर्व महिनाभर चालली होती. कुरतडत कुरतडत जर्मनीच्या चरातील अशक्त व लुला चर शोधून काढून त्या जागी जोराचा हल्ला करून तेथे फळी फोडून जर्म-नीला फ्रान्समधून व बेल्जममधून हाकून देणें हे इंग्लडचे व फ्रान्सचें कर्तव्य आहे, पण जर्मनी कशाला कुरतडत होता ? रशियाच्या बाजूला जर मुख्य लढाई लढवाव-वयाची होती तर कॅले किंवा पारिस याच्या दिशेने हे किरकोळ हल्ले का ? असल्या निष्फळ हल्लयात मनुष्यबळ व यंत्रबळ खर्च करणें म्हणजे एक प्रकारची नाहक उधळपट्टी नव्हे काय ? जर्मनीला अशी उधळपट्टी करता येणे शक्य आहे काय ? सर्व बाजूनीं जर्मनी कोंडला गेला आहे आणि आज नाहीं उद्या या कोंडमाऱ्याचे पाश आवळले जाऊन जागच्या जागी जर्मनीच्या नाडया थड पडू लागावयाच्या आहेत. या अतस्थ मृत्यूपासून सुटका करू पहाणाराला अहेतुक वर्तन शोभतें काय ? फ्रान्सचे कुरतडणें अहेतुक नाही तसेच जर्मनीचें कुरतडणे अहेतुक नाही. जर्मनीच्या फळीतील दुर्बल जागा शोधून काढून त्यावर जोराचा हल्ला चढविणें हा फ्रान्सचा हेतु आहे. दुर्बल जाग्यावर हल्ला चढविण्याचा फ्रान्सचा हेतु विफल करण्याकरिता आणि सबळ जाग्यासमोरच फ्रेंच सेना डाबून ठेवण्याकरिता जर्मनी उलट हल्ले करीत असतो. असले हल्ले करून फ्रान्सचे किंवा इंग्लडचे काहीं चर घेतले म्हणजे दुसऱ्या ठिकाणीं केलेली जुळवाजुळव मोडून टाकून जर्मनीच्या हल्लयाच्या ठिकाणी फ्रान्सला धावत जावे लागतें. शिवाय असल्या हल्लयामुळे जर्मनीच्या नव्या यंत्रबला-चीहि आपोआप परीक्षा होते. फ्रान्स व बेल्जमच्या टापूत जर्मनीनें ९५ हजार मशिनगन्स आणल्या आहेत. हा टापू एकदर पाचशें मैल लाबीचा आहे. या ५००

मैलांपैकीं ४०० मैल जागत किंवा लढते आहेत असें धरून चाललें तर तीन खणाला एक मशिनगन पडते, आणि पचवीस हजार मशिनगन्स फ्रान्सच्या बाजूला यावयाच्या आहेत. एक मशिनगनला दोन इसम पुरतात. २-३ खणातील दोन मशिनगनच्या खाबामध्ये दोन बदुकवाले उभे असले म्हणजे काम भागते. एक लाख मशिनगन्स म्हणजे दोन लाख मशिनगन्सचीं माणसें, त्याच्या आजूबाजूस उभ्या रहाणाऱ्या दोन लाख बंदुका, व ह्या चार लाखाच्या पुढील ओळीच्या तोडामागे चार लाखाची पुन्हा कुमक, शिवाय मोठया तोफा आणि प्रसंगी इकडून तिकडे नाचवावयाचे हालते लाख दीड लाख सैन्य म्हणजे एकदर दहा लाख सैन्यावर फ्रान्स व बल्जम या सर्व पट्टीचें संरक्षण भागविता येतें. फ्रान्स-बेल्जमच्या बाजूला पंधरा लाखापर्यंत जर्मनीचें सैन्य साप्रत असावे असा अंदाज आहे, आणि रोज या पंधरा लाखापकी काहीं लोक रशियाकडे रवाना होत आहेत. पधरा सतरा वर्षांचीं मुलें व पन्नाशीवरचे म्हातारे याचें मिळून नवीन दहा लाख निर्वाणीचें सैन्य जर्मनींत साप्रत तयार होत आहे. हे आबालवृद्ध लष्कर जसजसें तयार होते तसतशा त्याच्या तुकडया फ्रान्सच्या बाजूला रवाना होतात. मशिनगन्स चालविण्यात ही नवी मडळी पटाईत झाली म्हणजे जुने कसलेले वीर मोकळे होतात आणि ते समोरील फ्रेंचाच्या किंवा इंग्रजाच्या चराना डवचून मागें परततात. डिवचल्यामुळे संतप्त झालेला शत्रू अंगावर चाल करून येत असताना, या धरून आणलेल्या बालवृद्धाना जर चराच्या कोटाचे किल्ले साभाळता आले तर ते परीक्षेत उतरले असे समजून मोकळें झालेलें सैन्य रशियाकडे रवाना करण्यात येतें. फ्रान्स-बेल्जमचा सर्व पट्टा दुय्यम तिय्यम प्रतीच्या दहा लाख सैन्याला साभाळता यावा या उद्देशानें कुरतडण्याचें, नवीन मशिनगन्स बसविण्याचें, आणि नव्या जुन्याची बदली करण्याचें जर्मनीचें काम चालू आहे. फ्रान्सच्या बाजूचे चराचे चक्रव्यूह म्हणजे जर्मनीनें आपली युद्धशाळा बनविली आहे. तेथे युद्धकलेचें सप्रयोग प्रत्यक्ष शिक्षण देण्यात येतें, आणि पास झालेले विद्यार्थी रशियाच्या बाजूला खऱ्या युद्धात काम करण्याकरिता पाठविण्यात येतात. जर्मनीचे हे चराचे किल्ले फ्रान्स व इंग्लंड लवकर कां हस्तगत करीत नाहींत ? फ्रान्सपाशीं मनुष्यबल कमी आहे किंवा यंत्रबल कमी आहे असें म्हणता येत नाहीं. मग या ढिलाईचें कारण काय ? दारूगोळ्यांचा तुटवडा हे या ढिलाईचें मुख्य कारण आहे. नौचापेली येथें इंग्रजांनीं मोठा जय मिळविला

त्याप्रमाणें आरगोन प्रातातहि फ्रान्सनें मोठमोठे जय मिळविले. पण जर्मनीची फळी फोडता आली नाहीं. याचें कारण २–३ दिवस लढत राहिल्यानंतर पुढे आणखी २ दिवस एकसारखा वर्षाव करण्याइतका तोफाच्या गोळयाचा साठाच तोफखान्यापाशी नव्हता. एप्रिल–मे महिन्यात इंग्लंड व फ्रान्स यानी जर्मनीवर निकराचे हल्ले केले, व नाव घेण्यासारखे शौर्य दाखवून सर्वांकडून वहावा ह्मणवून घेतली, पण त्याच हल्लयामुळे दारूगोळयाच्या तुटवडयाची बाब चव्हाटयावर आली आणि तेव्हापासून आणखी काहीं महिने आपली फ्रान्स–बेल्जममधील फळी फोडली जात नाहीं अशी पक्की गाठ मनाशी बाधून पश्चिम रणक्षेत्र रणशाळा बनवून जर्मनीनें एकटया रशियाकडे आपले तोड फिरविले. हे असलें तोड फिरविणे जर्मनीस सुखावह होऊ नये म्हणून इंग्लंड व फ्रान्स यानी जर्मनीस कुरतडण्याचा उद्योग जुलै महिन्यात अधिक नेटाने चालविला असून नवीन दारूगोळा उत्पन्न करण्याचे काम इंग्लड, फ्रान्स, इटली व रशिया या चारहि देशात अत्यत झपाटयानें व नेटानें जुलैपासून सुरू झालें आहे; आणि असे म्हणतात की, थडीच्या प्रारभापासून कोणच्याहि बदुकीस व कोणच्याहि तोफेस दारूगोळा पोटभर मिळाला नाहीं अशी कुरकुरच करता यावयाची नाही.

## पोलंडच्या लढाया

जूनच्या तिसऱ्या आठवडयात रशियन सैन्यानें लेंबर्ग सोडून पूर्वेकडून स्वतःची पिच्छेहाट करून घेतल्यानंतर जर्मनीचा मोर्चा पूर्वेकडचे तोंड फिरवून उत्तरेकडे वळला. प्रिजमिसलच्या लढायाचे वेळीं किंवा लेंबर्गच्या लढायाचे वेळीं जर्मन सेनेच्या हालचालीत एक गोष्ट विशेषेकरून दृष्टीस पडली. ती ही कीं, जर्मन सैन्याचें मुख्य वजन प्रिजमिसल व लेंबर्ग या टापूच्या दक्षिणेस असलेल्या सैन्यामध्ये नव्हतें, तर उत्तरेकडून वळसा घालणाऱ्या सैन्यामध्ये होतें. प्रिजमिसल व लेंबर्ग यांच्या उत्तरेस ग्यालिशियाची जी उत्तर सरहद्द आहे ती पश्चिम पोलंड व पूर्व पोलण्ड याची दक्षिण सरहद्द होय. प्रिजमिसल जर्मनानीं घेतलें त्यावेळीं पश्चिम पोलण्डची दक्षिण सरहद्द मोकळी झाली, आणि लेंबर्ग घेऊन पूर्वेस फार दूरवर जर्मन सैन्यानें रशियन सैन्याचा पाठलाग केला नाहीं. लेंबर्गच्या पूर्वेस टार्नेपोल प्रातांतून ३–४ नद्या निघून खालीं दक्षिणेस निस्टर नदीला मिळतात. या चार नद्यांपैकी तीन नद्याच्या पलीकडे रशियन सैन्य गेल्यावर दुसऱ्या व तिसऱ्या नदीच्या मध्यें सुरक्षित

जागा पाहून ऑस्ट्रो–जर्मन सैन्य तळ देऊन बसलें आहे. दक्षिणेस निस्टर नदी बऱ्याच ठिकाणीं ओलाडून निस्टर नदीवरचे पूल आपल्या कब्जात घेऊन निस्टर नदीच्या बांधाआड ऑस्ट्रियन सैन्यानें तळ दिला आहे. निस्टर नदीवर व ल्यूकोविना प्रांताच्या पूर्वेस बेसारेब्रिया प्रांताच्या सरहद्दीवर रशियन सैन्याच्या व ऑस्ट्रियन सैन्याच्या किरकोळ चकमकी जुलै महिन्यात झाल्या, पण लष्करी धोरणाच्या दृष्टीनें त्यास जुलै महिन्याच्या हकीकती नमूद करण्यापलीकडे अधिक महत्त्व नाहीं. निस्टर नदीच्या उत्तर किनाऱ्यावर अशारीतीनें रशियन सैन्यास अडकवून ठेवल्यानंतर जर्मन सेनापति जनरल मॅकेनसेन याने रावारूस्का व सोकाल या टापूतून एकदम उत्तरेस पूर्व पोलडात घुसण्यास सुरवात केली. पहिल्या धडकीसरशी त्यानीं ग्रामोसचें ठाणे घेऊन इप्रेस व बग या दोन नद्यामधील आपली फळी झपाट्यानें उत्तरेस रेटली आणि क्रन्सटॉवची दक्षिण गाठून खोल्म जक्शनच्या दिशेने अवचित हल्ला चढविला. या अवचित हल्ल्यात त्यास यश आले नाही. खोल्मच्या दक्षिणेच्या बाजू तून रशियन सैन्याने त्यास मागे लोटलें, आणि क्रॅन्सटॉवच्या टेंकड्यावर जर्मन सैन्य आदळून त्याची गति कुंठित झाली. अशा रीतीनें जर्मनीची पहिली उडी फसल्यानतर खोल्म व ल्यूबलीन या प्रातात रशियाने उलट जर्मन सेनेवर हल्ले करण्यास सुरवात केली आणि जनरल मॅकेनसेन याना खोल्मच्या पूर्वेस बग नदीपर्यंत पसरलेले आपले हातपाय मागे आवरून घ्यावे लागले. ग्यालिशियाची सरहद्द सोडून पूर्व पोलडात एकदम तीस चाळीस मैल आत घुसलेल्या जनरल मॅकेसेनच्या सेनेस आगगाडी सोडून फार दूरवर गेल्यासारखे झाले. शिवाय रशियन सेनेनें पिछेहाट करताना पोलडचा हा भाग उध्वस्त करून टाकलेला होता, त्यामुळें वाटेंत सर केलेल्या मुलुखातून दाणापाणी मिळण्याची काही सोय नव्हती. ल्युबलीन आणि खोल्म याच्या दक्षिणेस ज्यावेळीं रशियानें जनरल मॅकेन्सेन याचे हल्ले मागे परतविले आणि काहीं ठिकाणीं जर्मन सैन्याला मागें हटविलेंहि त्यावेळी असे वाटलें कीं, ग्यालिशियात दोन महिने लढून जर्मनी आता दमला आहे आणि नवीन ठाण्यावर निकराचे हल्ले करण्याची ताकद जर्मनींत उरली नसून पश्चिमेकडील रणभूमीप्रमाणें पूर्वेकडील रणभूमींतहि जर्मनी लवकरच चराच्या भुयारी किल्ल्यांत आपलें सैन्य स्वतःच गाडून घेईल. आगस्ट महिन्याचा दुसरा आठवडा या अशाप्रकारच्या अटकळींत गेला, पण तिसऱ्या आठवड्याच्या आरंभीं जर्मनीच्या प्रचंड

लष्करी डावपेचाचें खरें स्वरूप एकदम प्रकट झालें. मे आणि जून महिन्यांतील ग्यालिशियन युद्ध जनरल मॅकेन्सेन यानीं चालविलें, जनरल हिंडेनबुर्ग याचें नांव या युद्धात ऐकू आले नाहीं. एवढे मोठे ग्यालिशियन युद्ध झालें पण त्यांत सेनापति हिंडेनबुर्ग याचा चेहरा कोठेच दृष्टीस पडला नाहीं याचें सर्वांस आश्चर्य वाटलें. कांहींनीं असा तर्क काढला कीं, पूर्वीच्या हिंडेनबुर्गी हालचालीनीं जर्मन सैन्याची फार खराबी झाल्यामुळे त्या बुढ्ढ्या पण चेंडूप्रमाणें प्रत्येक उशीसरशी नवानवा नाच करणाऱ्या सेनापतीस सूत्रचालकाच्या जाग्यावरून दूर करण्यात आलें. आगस्टच्या तिसऱ्या आठवड्यात हे सर्व तर्ककुतर्क गप्पागोष्टीच्या सदरात ढकलण्यात आले. कारण, त्यावेळीं या बुढ्ढ्यानें आपले तोंड पुन्हा जगास दाखविले आणि हिंडन-बुर्गच्या हातात पाच सहा नव्या जर्मन सेनाचीं सूत्रे घेऊन पडलीं असून दक्षिणेस ग्यालिशियन युद्धाचा जो पाया जनरल मॅकेन्सेन यानीं रचला त्या पायावर पाच मजली इमारत रचण्यात गुंग झालेले सेनापति हिंडेनबुर्ग एकदम दृष्टीस पडले ! ल्यूब्लीन व खोल्म या टापूवर चाल करून जाणारी जनरल मॅकेन्सन याची सेना भव्य इमारतीस आधारभूत असलेल्या पायाच्या ठिकाणीं होती. आगस्टच्या दुसऱ्या आठवड्यात या पायास कुमक पोंचून पाया भक्कम केल्यानतर सेनापति हिंडेनबुर्ग यानें पडदा वर ओढला व सर्वांस थक्क करून सोडणाऱ्या पाच मजली इमारतीची योजना एकदम दाखविली ! पश्चिम पोलड व पूर्व पोलड यामधील इव्हनगोरोड किल्ल्यापर्यंतची व्हिश्चुला नदी हस्तगत करण्याकरिता रॅडमच्या दक्षिणेकडील टापूत जर्मनसेना एकदम रॅडमवर चाल करून गेली. व तिनें रॅडम शहर हस्तगत करून घेऊन रॅडमच्या पूर्वेकडील झापलेन ठाणें घेऊन व्हिश्चुला नदीच्या काठचे नोवा अलेक्झाड्रा हेंहि ठाणें आगस्टच्या तिसऱ्या आठवड्यात घेतलें, आणि इव्हनगोरोड पर्यंत व्हिश्चुलेच्या डाव्या तटावरील मुलूख काबीज केला. हा पहिला मजला झाला. दुसरा मजला म्हणजे इव्हनगोरोड पासून वार्सापर्यंतचा व्हिश्चुलेचा पश्चिमेचा भाग होय. येथेंहि जर्मनीची दुसरी मोठी सेना रशियाच्या मागे लागली. आगस्टच्या तिसऱ्या आठवड्यात या दुसऱ्या मजल्यातील खुद्द वार्सा शहरामोंवतालचा पधरा वीस मैलांचा भाग सोडून व्हिश्चुला नदीपर्यंतचा बाकी सर्व भाग जर्मन सेनेच्या हवालीं करण्यात आला. पहिल्या व दुसऱ्या मजल्यात विशेष मारामारी झाली नाहीं, किरकोळ चकमकी झाल्या; पण सोडण्याच्या व व्यापण्याच्या क्रिया गुपचुप व

बिनबोभाट घडून आल्या. जुलै महिन्यातील खऱ्या लढाया पायांत म्हणजे ल्यूबलीन व खोल्म या टापूंत आणि तिसऱ्या मजल्यात म्हणजे नॅरू नदीच्या रणभूमींत झाल्या.

## नॅरू नदीची लढाई

वार्सोच्या सभोंवरच्या लढायात नॅरू नदीच्या काठच्या लढाया म्हणजे अत्यंत महत्त्वाच्या आहेत. ह्या रणभूमींत जुलै महिन्यात महत्त्वाचें रणकंदन झालें आणि आगस्ट महिन्यांत जुलै महिन्याहून अधिक महत्त्वाचा रक्तपात या टापूंत होईल. सेनापतीनी युद्धभूमीवरील सेनेची मांडणी केल्यानंतर त्या मांडणीमध्यें मान्याच्या किंवा प्रत्यक्ष लढण्याच्या जागा ठरलेल्या असतात. त्या जागा म्हणजे त्या सर्व मांडणीची मर्मस्थानें होत. या मर्मस्थानाच्या ठिकाणीं आपापला कार्यभाग होईतों जिवाप्पाड सैनिकांना लढावें लागते. मर्मस्थानी प्रत्यक्ष लढाई सुरू झाली म्हणजे मुख्य सेनापतीच्या हातातील फासा सैनिकाच्या हातात जातो आणि मग त्या फाशाला जे दान पडेल त्यावर त्या मर्मस्थानाचेंच नव्हे तर सर्व मांडणावळीचे यश अवलंबून असते. सेनापति हिंडेनबुर्ग यानी पोलंडच्या सभोंवार जी पांच मजली इमारत उठवली आहे तिची मर्मस्थानें दोन आहेत. एक नॅरू नदी व दुसरा दक्षिणेकडील खोल्म प्रांत. खोल्म प्रांतात जुलै महिन्याच्या पहिल्या आठवड्यात जनरल मॅकेनसेन याच्या सैन्याला निकराने लढावें लागले. दुसऱ्या आठवड्यात खोल्मच्या दक्षिणेस रशियन सन्यानें त्याना थोपवून धरले, किंबहुना मागे हटविले, पण तिसऱ्या आठवड्यापासून हिंडेनबुर्गी डावपेचाचे पंचाननी विराट स्वरूप अक्राळविक्राळ दिसू लागल्यानंतर खोल्माच्या बाजूला पुन्हा निकराच्या लढाया झाल्या. या लढायात रशियाला पिच्छेहाट करावी लागली आणि ल्यूबलीन व खोल्म ही दोन्ही ठाणीं सोडून जुलै अखेरीस रशियन सैन्य वीस पंचवीस मैल मागे हटले. खोल्मच्या बाजूने जशा निकराच्या लढाया जुलैच्या दुसऱ्या पंधरवड्यात झाल्या त्याप्रमाणें नॅरू नदीवरहि निकराच्या लढाया दुसऱ्या पंधरवड्यात झाल्या. या पंधरवड्याच्या प्रारंभी नॅरू नदीला मिळणाऱ्या पिसा व ओम्युल्यू या दोन नद्यामधील जर्मन सैन्य नॅरू नदीकडे चाल करू लागलें. व लगेच प्राझमिझ प्रांतातहि जर्मन सैन्यानें दक्षिणेस उतरण्यास प्रारंभ केला. ही उत्तरेकडची फळी नॅरू नदीच्या जवळ येईपर्यंत रशियानें जर्मन सैन्यास फारसा अडथळा केला नाही, आणि चवथ्या आठवड्यात जर्मन सेना नॅरू नदीच्या उजव्या म्हणजे उत्तरेकडील किनाऱ्याजवळ

येऊन पोंचली. ही नॅरू नदी ओलांडावयाची म्हणजे फार मुष्किलीचें काम आहे; आणि रशियन सेनाहि या ठिकाणीं मोठ्या शिताफीनें लढत आहे. या टापूंत नॅरू नदीला धरून नोव्होजॉर्जव्हिस्क, झिग्री, सेरॉक, पुलटास्क, रोशन, आस्ट्रोलेंका, व लोंझा असे सहा सात महत्त्वाचे किल्ले आहेत, या किल्ल्यांतूनच नॅरू नदीला ओलाडण्याचे महत्त्वाचे राजमार्ग आहेत. इतर ठिकाणी चांगले रस्ते नाहींत. अवजड सामान व तोफा वाहून नेण्यास नवे रस्ते व नवे पूल करावे तेव्हा पुढे काम चालतें. जर्मन सैन्यानें प्रथम आस्ट्रोलेंका व रोशन या किल्ल्यावर हल्ला करून पाहिला पण तेथें डाळ शिजली नाहीं. नतर पुलटास्क व रोशन या दोन किल्ल्याच्यामध्ये नॅरू नदी ओलाडली, पण तोफा नदीपार जाण्यापूर्वी रशियन सेनेला कुमक येऊन पोंचली, आणि त्यामुळे जर्मनाना नदीच्या अलीकडे पुन्हा यावे लागले. पुलटास्कच्या बाजूला ही लढाई चालली असता आस्ट्रोलेंका आणि रोशन याच्यामध्ये नॅरू नदी ओलाडून नॅरू नदीच्या डाव्या किनाऱ्यावर किंवा दक्षिण तटावर जर्मन सेना टिकाव धरून बसली. टिकाव धरून बसलेल्या या जर्मनाना मागे पतवून लावण्याच्या कामात मदत येऊन पोचू नये म्हणून आस्ट्रोलेंकाच्या उत्तरेस, रोशनच्या दक्षिणेस, पुलटास्कच्या आजूबाजूस आणि खुद्द सिरॉकच्या पुलावर जर्मन सैन्यानें निकराचे हल्ले केले, आणि त्याचवेळीं नोव्होजॉर्जव्हिस्क किल्ल्याची लढाई सुरू करून वार्साच्या पश्चिमेकडील बिनीच्या लष्करालाहि पश्चिम उत्तरेकडून वळसा देण्याचा उद्योग आरभिला. नॅरू नदीचें रणमैदान अशारीतीनें सर्व ठिकाणी पेटू लागल्या-मुळें रोशन ऑस्ट्रोलेका याच्यामधून नदीवर गेलेल्या जर्मन सैन्यास अवजड तोफा जाऊन मिळाल्या, आणि नॅरू नदीवर आयत्यावेळीं तयार केलेला नवा राजमार्ग सुरू झाला. याचा परिणाम असा झाला कीं, रोशनच्या पूर्वेस असलेले गोवोराव प्रथम जर्मनाच्या हातीं पडून नतर आस्ट्रो स्टेशनहि जर्मनाच्या हातीं गेले. वार्सापासून पिटरगडपर्यंत जो रेलवेचा मुख्य मार्ग जातो त्या मार्गातून तीन फाटे आस्ट्रोलेंकाकडे जातात. गोवोराव व आस्ट्रो हीं दोन ठाणी जर्मनानीं घेतल्यामुळे बग नदीपासून आस्ट्रोलेकाकडे जाणारे दोन्ही आगगाडीचे फाटे मोडले गेले, इतकेंच नव्हे तर ज्या ठिकाणी पेट्रोग्राडची मोठी आगगाडी बग नदी ओलाडते तेहि ठिकाण जर्मन सेनेपासून अवघे दहा पधरा मैलावर उरलें. बग नदीवरील या मोठ्या आगगाडीचा पूल मोडण्याचा जर्मनीचा इरादा दिसतो. या पुलाच्या

आसपास दहावीस मैलांवर जर्मन सेना येऊन पोंचली असता आस्ट्रोलैंका व लापी या टापू तून त्याना त्रास होऊ नये म्हणून लोंझाच्या पूर्वेसहि नॅरू नदी जर्मनांनीं ओलाडली व तेथून ते आस्ट्रोलैंका व लापी ह्या फाटयावर येऊन पोंचू लागले. मालकीन येथे बग नदीला मुख्य रेल्वेचा पूल आहे, त्याप्रमाणें लापी येथे नॅरू नदीला मुख्य आगगाडीचा पूल आहे. मालकीन व लापी या दोन स्टेशनामधील आगगाडीचा फाटा आपल्या ताब्यात घेण्याचा जनरल हिंडेनबुर्ग याचा मुख्य डाव दिसतो. मालकीन–लापी हा टापू जर जर्मनाच्या ताब्यात गेला, तर बग नदीला पूर्वेकडून वळसा देऊन बग नदीवरील रशियाचें मुख्य ठिकाण जे ब्रेसलिटोव्हिस्क शहर ते आपल्या हातात घेण्यास जर्मनाना सोईचें पडेल. लोझा व रोशन या टापूतच जर्मनानीं नॅरू नदी ओलाडली, ती मालकीन–लापी हा टापू घेण्याकरिता आणि मालकीन–लापी हा टापू ब्रेसलिटोव्हिस्क किल्लयावर चाल करून जाण्यास उत्तरेकडेस नवा पाया मिळावा म्हणून दक्षिणेकडून खोल्म येथून जनरल मॅकेनसेन जे उत्तरेस चालले आहेत ते ब्रेसलिटोव्हिस्कच्या रोखानेच वर चालले आहेत. जुलै अखेरीस मालकीन–लापी या रेल्वेच्या जवळ जर्मन सेना आली असून तेथून दक्षिणपूर्वेस ३५ मैलावर सिल्डिस–क्लिडझोव्हिली हा आगगाडीचा फाटा आहे, व तेथून पुढें पुन्हा ३५ मैलावर ब्रेसलिटोव्हिस्कचा किल्ला आहे; ब्रेसलिटोव्हिस्क किल्लयाच्या दक्षिणेस सुमारें ४५ मैलावर जनरल मॅकेनसेन याचें सैन्य येऊन पोंचले आहे. आता जुलै अखेरीस व आगस्टच्या प्रारभी कशी नाजुक स्थिति येऊन पोचली ती पहा; मालकीन–लापी या टापूत एक मोठी जर निकराची लढाई झाली आणि त्यात जर्मनाना रशियाची फळी जर फोडता आली तर बग नदी व क्लेझोडोली याच्यामधील आगगाडीचा फाटा जर्मन सेना अकस्मात मोडू शकेल आणि त्यामुळें ब्रेसलिटोव्हिस्क ह्या किल्लयाची उत्तर उघडी पडून जनरल मॅकेनसेन याचें सैन्य एका दुसऱ्या उसळीसरसे ब्रेसलिटोव्हिस्कच्या पश्चिमेस असलेले आगगाडीचे फाटेहि मोडून टाकील. म्हणजे रूसचें सैन्य व्हिश्चुला नदी पकडूनच जर्मनाशीं लढत राहिलें तर सर्व बग नदी आकस्मात जर्मनाच्या ताब्यात जाऊन एका मोठया जाळ्यात दहा पधरा लाख रशियन्स अडकून पडतील. जनरल हिंडेन-बुर्ग याचा हा कावा रशियन सेनापति ग्रॅन्ड डयूक निकोलस यानी ताबडतोब ओळखला व लगेच वार्सा व व्हिश्चुला नदी सोडून सिल्डेक व बग नदीच्या

रोखाने रशियन सैन्यास मागें हटण्यास त्यानीं हुकूम सोडला. आगस्टच्या प्रारभा-पासून वार्सा खालीं करण्याचें काम सुरू झालें असून प्रथम सिल्डेकचा टापू गाठून नतर बग नदी व्यवस्थितपणें गाठण्यास सबध आगस्ट महिना लागेल, असा अदाज आहे. वार्साच्या टापू तील मोठे सैन्य सिल्डेक–क्लिडझोजेली या आगगाडीच्या दिशेनेंच मागे हटत गेलें पाहिजे आणि या आगगाडीच्या फाट्यातील बग नदीचा भाग रशियन सेना गाठीतो बग नदीच्या उजव्या बाजूचा आगगाडीचा फाटा जर जर्मन सैन्यास गाठतां आला, तर अखेरीस सेनापति हिंडेनबुर्ग याच्या हिकमतीस यश मिळाल्यासारखें होईल. सेनापति हिंडेनबुर्ग याची हिकमत फोल करण्याकरिता ग्रॅड ड्यूक निकोलस यानीहि रशियन सैन्याची माडणावळ फार कुश-लतेची केली असून वार्सा सोडण्याच्या मनोधैर्याबद्दल आणि बिकट प्रसगीहि सावधान चित्ताने सैन्याची सूत्रे व्यवस्थितपणे हालविण्याच्या त्याच्या हातोटीबद्दल सर्व लोक त्याची तारीफ करीत आहेत ! मालकीन–लापी हा टापू यानी फार बदोबस्ताचा केला आहे, आणि वार्साच्या उत्तरेकडील नॅरू नदीहि त्यानी ढिली ठेविली नसून वार्साच्या टापू तील रशियाची शेवटची बदुक व शेवटचे काडतुस सुरक्षित स्थळीं जाऊन पोंचेपर्यंत जर्मनीला उत्तरेकडून वार्सा शहराला वळसा घालता घेऊ नये असा त्यानीं पक्का बदोबस्त केला आहे. जर्मन सेनाहि वार्साच्या टापू त तितके निकराचे हल्ले करीत नसून मालकीन–लापी या टापू त आगस्ट महिन्यात मोठे रणकन्दन माजविण्याचा जर्मनाचा हेतु दिसतो व या हेतूस अनुसरून रोशन, आस्ट्रोलेका व लोंझा या टापू त नॅरू नदी ओलाडून मोठया तोफासह जर्मन सेना आस्ट्रोलेका व लोंझा याच्या दक्षिणेस गोळा होत आहे. या सेनेस रशियाच्या उत्तरेकडील बाजूच्या सेनेकडून त्रास पोचू नये म्हणून सेनापति हिंडेनबुर्ग यानी जुलै महिन्यातच आपल्या भव्य कारस्थानाचा चवथा व पाचवा मजला उभारण्यास आरभ केला आहे. जुलै महिन्यात जर्मनाचें चवथें सैन्य पूर्व प्रशियातून निघालें, आणि नीमेन नदी ओलाडण्याचें व नीमेन नदीच्या पूर्वेकडील आगगाडी म्हणजे वार्सा–पिटर्सबर्ग आगगाडी तोडण्याचें धोरण या सैन्यानें प्रकट केलें. नीमेन नदीच्या पश्चिमेस या सैन्याची व रशियन सैन्याची गाठ पडून कोव्हनोच्या दक्षिणेस हें सैन्य जुलै अखेरीस पोंचलें आहे. उत्तरेस शावली, लिबो व रिगा प्रातात सेनापति हिंडेनबुर्ग यांचा पाचवा मजला असून त्या पांचव्या लष्कराचें काम रिगा बदर घेणें

व कोव्हनेला उत्तरेकडून वळसा देऊन नीमेन नदीची रशियाची फळी फोडण्यास चवथ्या मजल्यास किंवा चवथ्या लष्करास मदत करणें हें आहे. जुलै महिन्यांत या लष्करानें विंडा बदर घेऊन रिगा बदरच्या दक्षिणेस पधरा मैलावर असलेलें मीटॉव्ह ठाणेंहि घेतलें आहे. शिवाय शावलीच्या पूर्वेस जाऊन कोव्हनोस उत्तरेकडून वळसा देण्यासहि प्रारभ केला आहे. अर्थात् आगस्टच्या पहिल्या दुसऱ्या आठवडयात नीमेननदी सोडून रशियास मार्गे हटावें लागेल आणि नीमेनच्या पूर्वेस कोठे तरी वार्सा पेट्रोग्राड रेल्वे मोडली जाईल. या कामगिरींत चवथ्या पाचव्या लष्करास जर यश मिळालें तर नॅरू नदी व बग नदी याच्यामध्ये मालकीन लापी टापूत गोळा होणाऱ्या जर्मन सेनेस रशियाच्या उत्तरेकडील सैन्याची बाधा येणार नाहीं. जर्मनाचें उत्तरेकडील चवथे पाचवें लष्कर हें पिटर्सवर्गवरील भावी हल्ल्याच्या पूर्व तयारीकरिता नसून पूर्व पोलडात कोंडावयाच्या रशियन सैन्यास मदत करण्याकरिता उत्तरेकडील रशियन सैन्यानें धावत येऊ नये ह्मणून ही आगाऊ तरतूद आहे. वार्साच्या टापू तील रशियन सेना बग नदीच्या आत कोंडली जाते किंवा कसे हें निश्चितपणें सिद्ध होण्यास सबध आगस्ट महिना जावा लागेल. रशियन सेना कोंडली गेली तर सप्टेंबर आक्टोबरातील जर्मन डावपेचास जे वळण लागेल तेंच वळण सैन्याची खराबी न होता व्यवस्थित पिछेहाट झाल्यास लागणे शक्य नाहीं. अशा स्थितींत पोलडच्या या युद्धानतर पुढे कोणाचें कसे धोरण राहील याचे विवेचन करणें म्हणजे नुसत्या कल्पना—तरगाबरोबर वस्तुस्थिति सोडून भलत्याच दिशेला वहात जाणें होय. आगस्ट महिन्यात सेनापति हिंडेनबुर्ग आपल्या जाळ्याचे दोरे कसे आखडतात व ग्रॅड ड्यूक निकोलस कोणच्या करामतीनें या जाळयातून निसटून जातात, या मुद्यावर युद्धाच्या वार्ता वाचताना वाचकानीं लक्ष पुरविले म्हणजे बस्स आहे.

---

# महायुद्धाचें पहिलें वर्ष

आगस्टच्या प्रारंभाला महायुद्धाचे बारा महिने संपून गेले आणि आगस्टपासून महायुद्धाच्या दुसऱ्या वर्षाचे पहिल्या महिन्यास सुरवात झाली. या दुसऱ्या वर्षाची अखेर हे युद्ध पाहील किंवा कसे याविषयी आजच अंदाज बांधता येत नसला तरी हिंवाळ्यात विश्रांति घेऊन पुढील वसंतकाळी जर्मनीस हात दाखविल्याशिवाय रहावयाचें नाहीं असा दृढ निश्चय इंग्लंड, फ्रान्स, रशिया, इटली या चौकडीनें केला आहे. अर्थात् १९१६ सालच्या एप्रिल--मे महिन्यात प्रचंड लढाया होऊन जर्मनीचा पराभव होईतो आणि जर्मनी इंग्रजांना अनुकूल असा तह करण्यास राजी होईतों महायुद्धाची परिसमाप्ति होणे शक्य नाही. आगस्ट महिन्यात व्हिश्चुला व बग या दोन्ही नद्या जर्मनीच्या ताब्यात गेल्या. पश्चिम व पूर्व दोन्ही पोलंड जर्मनीच्या कब्जात गेले असून वार्सा, नोव्हाजर्नविस, कोव्हनो आणि ब्रेस्टलिटॉस्क हे चारहि पहिल्या प्रतीचे रशियाचे किल्ले जर्मनीच्या ताब्यात गेले. आगस्ट महिन्यात रशियावर जर्मनीला मिळालेल्या विजयामुळे महायुद्धाचा शेवट आपल्यातर्फेंचाच होणार व आपण सांगू त्या अटींवर तह करणें इंग्रजांना भाग पाडणार अशी घमेंड जर्मनीला वाटू लागली आहे. रशियाला किंवा इंग्रजांना जर्मनीवर, ऑस्ट्रियावर किंवा तुर्कस्थानावर चाल करून जाण्याचें मनात आणताना या पुढील युद्धात दहशत वाटावी व सामान्यतः या त्रिकूटीच्या वाटेस रशियानें किंवा इंग्लंडने केव्हाहि जाऊ नये असा बंदोबस्त आज आम्ही करून घेऊ, शिवाय लढाईचा खर्चहि त्या त्रिकुटीपासून चोपून घेऊ, असे उद्गार जर्मनीच्या मुख्य प्रधानाचे तोंडातून नुकतेच निघाले आहेत. इंग्लंडच्या अजिंक्य आरमाराला असल्या तहाच्या अटी कसच्या मान्य होणार ? मानी व तेजस्वी फ्रान्स असल्या पराजयाच्या ओझ्याखालीं आपली मान देण्यास कसा कबूल होणार ? पुढील वसंतकाळात नवीन ६० लाख सैन्य पुन्हां उभारू पहाणाऱ्या रशियाच्या प्रचंड शक्ति, चार किल्ले व सर्व पोलंड देश गेल्यानें कशी बदलली जाणार ? जर्मनीच्यातर्फें प्रसिद्ध झालेल्या अरेरावीपणाच्या तहाच्या अटी रशिया, इंग्लंड व फ्रान्स यानीं झुगारून दिल्या आहेत; रशियास मागें हटावें लागलें आहे, आणि कल्पनेबाहेर मागें हटावें लागणारहि, पण रशियाच्या

लष्कराचा विध्वंस झालेला नाहीं. आपल्या सैन्याचें शरीर मजबूत व निकोप ठेवून जर्मनीचे सैन्य जखमामुळे दुबळें करीत रशिया मार्गे हटत आहे. रशिया जरी मागें हटत असला तरी हिंवाळ्याच्या आत रशियाचें कोणतेंच मर्मस्थान जर्मनीच्या ताब्यात जाणें शक्य नाही. रशियाचीं मर्मस्थानें जर हिंवाळ्यात मजबूत व जिवत राहिलीं तर पुढील वसतकाळी वृक्षवेलींना नवीन पल्लव फुटण्याबरोबरच रशियाच्या लष्करी शरिरातून ६० लाख नवीन सैन्य बाहेर फुटल्यावाचून रहाणार नाही ! मग रशियानें अपमानास्पद तह का कबूल करावा ? इग्लडचे आरमार अजिंक्य, इग्लडच्या द्रव्य-निधीला गणति नाही, चीन, दक्षिण आफ्रिका, पश्चिम आफ्रिका वगैरे ठिकाणच्या जर्मनीच्या वसाहती इग्लड आज खाऊन बसलेले, जर्मनीचा व्यापार इग्लडने आज बडविलेला; अशा स्थितीत मिळविलेल्या वसाइती पुन्हा ओका, आपल्या हाताने आपल्या घराचे दरवाजे उघडून धुमाकूळ घालण्याकरिता जर्मन व्यापाऱ्याना स्वतःच्या माजघरात घ्या, आणि जर्मनीच्या लढाईचा खर्च भागावा म्हणून १-२ पिढ्या आपल्या मुलामाणसाना राबावयाला सागा, असला तह इग्लड स्वप्नींहि कबूल करणार नाही. जर्मनीच्या मुख्य प्रधानाला सणसणीत उत्तर देऊन इग्लडचे परराष्ट्रीय प्रधान सर एडवर्ड ग्रे यानी नुकतेच जाहीर केले आहे की, जर्मनीला जसा स्वतःचा देश सुरक्षित रहावा असे वाटत आहे तसा इग्लड देशहि सुरक्षित राहिला पाहिजे, आणि पुनः युद्ध करण्याची खुमखुमी इग्लडच्या शत्रूच्या अगात उत्पन्न होता कामा नये अशी इग्रजाची इच्छा आहे. जर्मनीप्रमाणे इग्रजाचे स्वास्थ्य सभाळून जर तह झाला तर तो तह इग्रजाना पाहिजे आहे, मात्र खडणीसबधाची गोष्ट जर्मनीनें काढता उपयोगी नाहीं. याच वेळी फ्रान्सच्या मुख्य प्रधानजीनींहि जाहीर केले कीं, बेल्जमच्या राजाला बेल्जम परत मिळेतों आणि आल्साक व लॉरेन्स हे प्रात फ्रान्सला परत मिळेतों फ्रेंच लोक आपली तरवार म्यानात परत घालणार नाहीत. इटली सागून सवरून नुकताच लढाईत पडलेला, युद्धाकरिता त्याचे बाहू स्फुरण पावत आहेत; आणि इग्लड व फ्रान्स याच्या खाद्याला खादा लावून तुर्कांवर तुटून पडण्यास इटली उतावीळ झाला आहे ! तहाच्या वेळच्या जर्मनीच्या मागण्या अवाच्यासवा, आणि इग्रजी चौकडीतील लढण्याचा आवेश जसाच्या तसा. मग इतक्यात तह कसा होणार ? हिंवाळ्यात किंवा हिंवाळ्यापर्यंत कांहीं आकस्मिक गोष्टी घडून आल्यास दोन चार महिन्यांत तह होईल, पण तसें

काहीं न घडल्यास आणखी बारा महिने युद्धाच्या वार्ता लिहिण्याचें व वाचण्याचें सव्यापसव्य टळत नाहीं. दुसऱ्या वर्षांतहि युद्ध चालणार अशी भावना मनांत ठेवून दुसऱ्या वर्षाच्या आगस्ट महिन्याच्या हकीकतीस सुरुवास केली पाहिजे. तसे करण्या-पूर्वी गेल्या बारा महिन्याचे सिंहावलोकन करणें इष्ट असल्यामुळे गत गोष्टीविषयीची स्मृति जागृत करण्यास वाचकास विनति करून गेल्या सालच्या त्रोटक हकीकतीस सुरुवात करतों.

## अजिंक्य इंग्रजी आरमार

महायुद्धाच्या पहिल्या वर्षांत मेरू पर्वताप्रमाणे अढळपद जर कोणाचे स्थापित झालें असेल तर ते अजिंक्य इंग्रजी आरमाराचे होय. बारा महिन्यःपूर्वी इंग्रजी आरमाराची जी शक्ति होती ती शक्ति आजहि कायम असून सर्व समुद्रावर या आरमाराचा पूर्वींचा वचक आजहि कायम आहे. तीन ऑगस्टला महायुद्धास सुरुवात झाली. महायुद्धात इंग्रज सामील झाले आणि त्याच दिवशी सर्व आरमार युद्ध करण्यास सज्ज झाले. इतकेंच नव्हे तर ज्या ज्या नाकेबंदीच्या ठिकाणीं जितकी जितकी लढाऊ जहाजे उभीं असावयास पाहिजे होती तितकी तितकीं उभी राहिली असे जगाच्या दृष्टीस पहिल्या दिवशी दिसलें. असा कडेकोट बंदोबस्त, रोमरोमाला जाऊन भिनणारी इतकी व्यापक योजना आणि दगडी कोळशाच्या ल्हानशा खडयापासून तो ॲडमिरलपर्यंत एकच स्फूर्तीने प्रकट होणारी तयारी महायुद्धात दुसऱ्या कोणाच्याहि बाबीत गेल्या बाराहि महिन्यात दिसली नाहीं ! जर्मनीच्या लष्कराची तयारी इंग्रजी आरमाराच्या तोडीची दृष्टीस पडली हें खरें. पण इंग्रजी आरमारानें आपलें इष्ट कार्य गेल्या बारा महिन्यात, जितके साधिलें तितके जर्मनीच्या लष्करास साधता आलें नाही. जर्मनीच्या सैन्यानीं रशियावर मोठमोठे जय मिळविले हे खरें, पण बारा महिन्याचा इतिहास पाहिला तर मार्न नदीच्या काठीं फ्रेंच सैन्यानें जर्मनीचा पराभव केला, आणि चार महिने एकसारखी पिछेहाट करीत असतानाहि रशियाचा सेनाशकट जर्मनीस बिलकूल मोडता आला नाहीं, या दोन बाबी जर्मनीच्या विजयास फार कमीपणा आणणाऱ्या आहेत. अशा तऱ्हेचा डाग इंग्रजी आरमाराच्या वर्चस्वास बिलकूल लागलेला नाहीं. तीन आगस्टला लढाई सुरू झाली आणि अठ्ठावीस आगस्टला झालेल्या हेलिगो-लँडच्या आरमारी लढाईत सर्व उत्तर समुद्र इंग्रजी आरमाराच्या पूर्ण कह्यात गेला,

आणि बिळांत ज्याप्रमाणें उंदीर लपून बसावें त्याप्रमाणें कील कॅनॉलमध्यें जर्मन बेडर जहाजांना स्वतःस कोंडून घ्यावें लागलें. यानतर एक दोन वेळा जर्मनीची पळपुटी जहाजे आपल्याला माजधरातून बाहेर पडून उत्तर समुद्राचा हमरस्ता ओलाडून इग्रजी किनाऱ्याला शिवून गेलीं हे खरें, पण २४ जानेवारी रोजीं डॉजर बॅकजवळ उत्तर समुद्रात झालेल्या चकमकींत या पळपुटयाना इग्रजीं आरमाराचें वर्चस्व चागलें अनुभवास आले. डॉजर बॅकची लढाई निर्णयात्मक स्वरूपाची नव्हती हे खरे, पण इग्रजी आरमारी तोफाचे महत्त्व जर्मनाना या लढाईनें कबूल करावें लागले. कारण त्यानतर इग्रजी आरमारासमोर उभे रहाण्यास जर्मन आरमार केव्हाहि धजले नाहीं. जर्मन आरमारापैकीं दहा बारा पळपुटी जहाजे भूमध्य समुद्र, अटलाटिक महासागर, पासिफिक महासागर, हिंदी महासागर, आरबी समुद्र व बगालचा उपसागर येथें एमडेनप्रमाणें एक दोन महिने चाचेगिरी करीत फिरत होतीं. पण बलाढय इग्रजी आरमारानें थोडयाच अवकाशात चिलटा-प्रमाणें याना चिरडून टाकले. गोबेन–ब्रॅसला हीं क्रूझरे मात्र डार्डानेलिसकडे पळून गेलीं, आणि त्यामुळे त्याचे प्राण बचावले. एमडेनला बगालचे उपसागरात जलसमाधि मिळाली, एमडेनच्या दुसऱ्या एका भावडास आफ्रिकेच्या किनाऱ्यावर गाडून घ्यावे लागले, आणि पाच साताची गट्टी करून फिरणाऱ्या अटलाटिक महासागरातील चाच्याना फाकलड बेटाजवळील लढाईत तारीख २८ डिसेंबर रोजीं समुद्राचा तळ पहावा लागला. जर्मनीने चीनच्या किनाऱ्यावर किआचु बदरात जीं मजबूत जहाजे गोळा करून ठेविली होतीं तीं लढाई सुरू होण्याबरोबर किआचु येथून बाहेर पडून पाच साताच्या गट्टीने राहून पासिफिक महासागरात व अटला-टिक महासागरात इग्रजी व्यापाराला उपद्रव देऊ लागली. एका चकमकींत यानीं एकदोन इग्रजी लढाऊ जहाजेहि बुडविलीं, पण लवकरच ह्याच्या पापाचे घडे भरून पापक्षालनास समुद्राच्या पोटात स्वतःस पचवून घेण्याचा मार्ग फाकलड बेटाजवळ त्याना धरावा लागला. फाकलड बेटाची लढाई व डॉजर बॅकची लढाई या दोनच आरमारी लढाया गेल्या बारा महिन्यात झाल्या. इग्रजाचें लढाऊ जहाज आणि त्याच दर्जाचें जर्मनीचें लढाऊ जहाज यापैकीं कोणाची लढण्याची शक्ति अधिक हें अजमावून पहाण्याचे वरील दोनच प्रसग होत. या दोन्हीं प्रसगानीं असें सिद्ध केलें आहे कीं, लाब पल्ल्याची इग्रजी आरमारी तोफ इग्रजी गोलदाजी;

व इंग्रजांची दर्यावर्दी तडफ, या तिन्ही बाबींत इंग्रजी आरमार जर्मन आरमाराच्या गुरुस्थानापासून बिलकूल चळलेले नाहीं. अजिंक्य इंग्रजी आरमारानें गेल्या बारा महिन्यात जर्मन व्यापार नामशेष केला आहे. इतकेच नव्हे, तर इतर जगाशीं असलेले जर्मनीचे सबध पार तोडून टाकून जर्मनीला स्वतःचे देशात कैदखान्या-प्रमाणें अटकवून टाकलें आहे. हा तुरुगवास जर्मनीला शेवटी दमात उखडवून टाकणारा आहे. दोन वर्षांनी, तीन वर्षांनी, पाच वर्षांनी जर्मनी आपोआप थकेल, आणि नतर फ्रान्सचे व रशियाचें सैन्य जर्मन लष्कराच्या उरावर बसेल अशी जी आशा रशियाच्या इतक्या पिछेहाटीनतरहि फ्रेंच व रशियन मुत्सद्याना वाटत आहे त्या आशेचें मूळ इंग्रजी आरमाराच्या बुडात असून त्या आशेचा फैलाव तुरुगाच्या भिंतीवरील पहारेकऱ्याप्रमाणे डोळ्यात तेल घालून सचार करणाऱ्या इंग्रजी आर-मारावरील तोफाच्या विशाल जबड्यात आहे. बारा महिन्यापूर्वी हे आरमार "जसे अजिंक्य समजले जात होते तसे आजहि समजले जाते. इतकेच नव्हे, तर तेजस्वी फ्रेंच सेना ह्या आरमाराकडे पाहून आपला थकवा दूर करू लागली आहे; आणि पराभूत झालेलें रशियन सैन्य ह्या आरमाराच्या प्रभावामुळे पुढील वसतकाळात पुन्हा साठ लाखाचे साठ लाख जिवत होऊ पहात आहे. इंग्रजी साम्राज्यसत्ता, इंग्रजी अगणित सपत्ति, आणि एकसारखे रोज नवे वेत विणारी इंग्रजी सेना याची जननी इंग्रजी आरमारी तोफ होय, बारा महिन्याच्या लढाईमुळे मनाला आलेली उदासीनता पार धुवून टाकून फ्रेंचाचें मन रजवून नवीन साहसास प्रोत्साहन देणारी फ्रेंचाची जननी, इंग्रजी आरमारी तोफ होय, आणि जर्मनानीं मागे ढक-लल्यामुळे हतवीर्य झालेल्या रशियन राष्ट्राची सजीवनी, इंग्रजी आरमारी तोफ होय। इंग्रजी आरमारामुळें इंग्रजी व्यापार अबाधित चालला आहे, न्यूझीलड, कॅनडा, आस्ट्रेलिया, हिंदुस्थान, इजिप्त वगैरे देशातील लाखों सैन्य शाततेच्या वेळेप्रमाणें सहज लीलेने एका ठिकाणचे दुसऱ्या ठिकाणी जात आहे. आफ्रिकेतल्या जर्मन वसाहती इंग्रजाना खाता आल्या हा या आरमाराचा प्रसाद होय, इराणी आखातात युफ्रेटिस आणि तैग्रीस या दोन नद्याजवळच्या बसरा प्रातात इंग्रजी अम्मलहि सुरू झाला, हा या आरमाराचाच प्रसाद होय, हिंदुस्थान किंवा इजिप्त कोठेंहि इंग्रजी अम्मलाखालील परकीय लोक इंग्रजांच्या अखेरच्या विजयाबद्दल साशक होत नाहींत हा या आरमाराचा प्रसाद होय, दार्दानेलिसवर चाल करून

इंग्रजी सेना आज तुर्कांना तबी देत आहे आणि रशियाला सजीवन पोचविण्याचा मार्ग खुला करू पहात आहे, हा या आरमाचा प्रसाद होय! इंग्रजी आरमारानें सर्व जगभर पकडून ठेविलेल्या नाक्याच्या ठाण्याकडे पाहिलें असतां इंग्रजी आरमाराचें सर्वव्यापी विराट स्वरूप वाचकाचे ध्यानात येईल. लांब पल्ल्याच्या तोफा वाहणारी बेडर जहाजे याचें महत्त्व महायुद्धाच्या पहिल्या वर्षांत जसे स्थापित झालें त्याप्रमाणें पाणबुडया छोटया बोटीचेंहि महत्त्व गेल्या बारा महिन्यात चांगलेंच स्थापित झालें आहे. आपला व्यापार इंग्रजी आरमारानें नष्ट केलेला पाहून सूड उगविण्याच्या बुद्धीनें पाणबुडया बोटींचा पूर्ण विकास करण्याकडे जर्मनीनें आपलें बुद्धिकौशल्य खर्च केलें आणि ज्या पाणबुडया बोटी आपल्या आश्रयाच्या ठिकाणापासून शे दीडशे मैल दूर जाऊ शकत नव्हत्या त्या पाणबुडया बोटी आश्रयाची जागा सोडून हजार दीड हजार मैल बाहेर जाऊ लागल्या. त्याना महिना पधरा दिवस दाणापाण्याकरिता परत घरटयाकडे यावेंहि लागत नाहीं. या पाणबुडया बोटींनीं जर्मन चपल क्रूझरचें चाचेगिरीचें काम गेले सात आठ महिने चालविले आहे आणि रोजचें एखादे लहान मोठे व्यापारी जहाज फोडण्याचा त्याचा क्रम चालू आहे. या पाणबुड्याच्या भीतीनें इंग्रजी व्यापारी जहाजाचें सरक्षण करण्याचे कामात इंग्रजी आरमाराचा काही भाग गुन्तवून ठेविला आहे. त्यामुळे कील कॅनालवर हल्ला करून तेथील बिळातील उंदीर बाहेर खेचून काढण्याचा उद्योग इंग्रजी आरमाराला करता आला नाही इतकेच नव्हे, तर बेल्जमचा किनारा जर्मन तोफा व्यापीत असताना या पाणबुड्या बोटींनीं इंग्रजी आरमाराला स्वस्थपणानें भडिमार करू दिला नाहीं. गेल्या मार्च महिन्यात डार्डानेलीसच्या सामुद्रधुनीवर ज्यावेळीं इंग्रजाचें व फ्रेंचाचें आरमार चाल करून गेलें आणि डार्डानेलीसच्या तोंडात शिरून अरुद नदी गाठण्याचा ह्या आरमारानें अट्टाहास केला, त्यावेळीं वहात्या सुरुंगामुळे व एका पाणबुड्या बोटीमुळे तुर्कांना चारपाच लढाऊ जहाजे बुडवता आलीं. जर्मन पाणबुडया बोटींनी उत्तर समुद्रात इंग्लिश चॅनलमध्ये दोन तीन लढाऊ जहाजें बुडविलीं, काळ्या समुद्रात रशियाचें लढाऊ जहाज तुर्की पाणबुडया बोटीनें बुडविलें. आड्रियाटिक समुद्रात एक फ्रेंचांचें व एक इटलीचें अशीं दोन लढाऊ जहाजे आस्ट्रियन पाणबुड्या बोटींनीं बुडविलीं; आणि एजन समुद्रात डार्डानेलीसच्या आसपास लष्करानें भरलेलें एक मोठें व्यापारी जहाज हजार बाराशें जवानासह रसातळास तुर्की पाणबोटीनें

पाठविलें. उलट पक्षीं बाल्टिक समुद्रात जर्मनीची दोन लढाऊ जहाजे इंग्रजी पाण-बुडयानीं बुडविलीं. आड्रियाटिक समुद्रात आस्ट्रियाचें एक जहाज इटालियन पाण-बुडया बोटीनें बुडविलें. डार्डानेलीसच्या सामुद्रधनींत घुसून मार्मोराच्या समुद्रात एकदोन इंग्रजी पाणबुडया बोटी प्रकट झाल्या आणि त्यांनीं एक तुर्की लढाऊ जहाज बुडवून बऱ्याचशा तुर्की व्यापारी जहाजाचे बळी घेतले. इतकेंच नव्हे, तर इस्तंबूल किल्ल्यावरहि आपल्या मगदुराप्रमाणें लहानशा तोफेतला गोळा टाकून तुर्की राजधानीला भयभीत करून सोडले. पंधरा सतरा इंची तोफा वहाणाऱ्या क्वीन एलिझाबेथ नावाच्या बेडर जहाजाला ज्या गोष्टी डार्डानेलीससमोर करून दाख-विता आल्या नाहींत त्या गोष्टी चिमुकल्या पाणबुडीनें पानाला चुना लावता लावतां करून दाखविल्या. काळ्या समुद्रातहि रशियाच्या एका पाणबुडीने एक तुर्की लढाऊ जहाज बुडविलें असून तुर्की व्यापारास बराच खो घातला आहे. गेल्या बारा महि न्यातील पाणबुडया बोटीची कामगिरी व बेडर जहाजाची कामगिरी याची जर तुलना केली तर स्वतःची बंदरें व किनारा याचे संरक्षण करण्याच्या कामी किंवा शत्रूचा व्यापार बुडवून शत्रूच्या बंदरात धुमाकूळ घालण्याच्या कामीं बेडर जहाजाना पाणबुडया बोटींनी मागे टाकले आहे असे स्पष्ट म्हणावे लागते क्रूझरे किंवा बेडर जहाजे सर्व समुद्रात व जगात प्रवास करू शकतात त्याप्रमाणें दोन दोन तीन तीन महिने प्रवास करण्याची शक्ति जर पाणबुडया बोटीना प्राप्त झाली तर साम्प्रतच्या महायुद्धानें बेडर पद्धतीच्या लोखंडी तरत्या किल्ल्याचे दिवस संपुष्टात येतील, व अल्प खर्चाच्या चिमुकल्या पाणबुडयाच्या मन्वंतरास प्रारंभ होईल, अशी चिन्हे दिसत आहेत.

## पश्चिम रणभूमि

फ्रान्स व रशिया या दोन्ही राष्ट्राशीं म्हणजे पश्चिम व पूर्व या दोन्ही सरहद्दी वर लढण्याचा एकदम प्रसंग आल्यास प्रथम पश्चिम सरहद्दीवर फ्रेंच लष्कराचा एकदम चक्काचूर करावयाचा व नंतर पूर्वेस वळून सावकाशपणें रशियाचा समा-चार घ्यावयाचा असें लष्करी धोरण जर्मनीनें पू र्वीपासून आखून ठेविलें होते आणि या धोरणास धरून जर्मनीनें पहिल्या वर्षी आपल्या सैन्याच्या हालचाली केल्या. असे धोरण असण्याचें कारण इतकेंच आहे कीं युरोपांत रशियाचें राज्य अवाढव्य व अजस्त्र जरी असलें तरी एका दृष्टीनें मागासलेलें समजलें जातें. रशियाला आपल्या

सैन्याची जमवाजमव जलदीनें करता यावयाची नाहीं आणि जमवाजमवीच्या केंद्र-स्थानीं सैन्य जरी गोळा झालें तरी रणभूमीकडे तें जलदीनें पाठविता येणार नाहीं, असा जर्मनीचा अदाज होता. सैन्य जलदीनें गोळा करणें व रणभूमीवर ते जलदीनें आणणें या कामात सर्वांत पहिला नंबर आपला, दुसरा नंबर फ्रान्सचा, आणि तिसरा नंबर रशियाचा अशी जर्मनीची समजूत. ही समजूत पहिल्या वर्षी काहीं अशी खरी ठरली व काहीं अशी खोटी ठरली. खरी कोठे ठरली व खोटी कोठे ठरली हे कथाप्रसगानें ठिकठिकाणी सांगण्यात येईल. दोन तीन महिने पूर्व रण-भूमि ऑस्ट्रियावर सोपवून पहिले तीन महिने फ्रान्साचाच पिच्छा पुरवावयाचा या इराद्याने चार ऑगस्टला जर्मन सैन्य बेल्जममध्ये घुसले—आणि ७ आगस्टपासून १५ ऑगस्टपर्यंत लीज शहराच्या उत्तरेकडून जर्मन सेना बेल्जममध्ये घुसू लागली. बेल्जमच्या लोकानी दहा बारा दिवस या सैन्यास अडवून धरलें पण आपला निभाव लागत नाहीं असे पाहून २० ऑगस्टच्या सुमारास बेल्जम सैन्य अँटवर्प-कडे वळले—व जर्मन सेना बेल्जमच्या राजधानीत म्हणजे ब्रुसेल्स शहरात घुसली. पहिल्या आगस्टपासून २० आगस्टपर्यंत इंग्रजी व फ्रेंच काय करीत होते ? जर्मन सेना तातडीने गोळा होईल व एकदम आपल्यावर चाल करून येईल हें फ्रेंचाना माहीत होतें. जर्मनीच्या इतक्याच तातडीने फ्रेंचांनी आपली सेना गोळा केली. फ्रान्सची पूर्व व उत्तर सरहद्द किल्ल्याच्या रागानी मजबूत केलेली होती व काही काळ मोठ्या सेनेस थोपवून धरण्यास हे किल्ले समर्थ आहेत असा फ्रान्सला विश्वास होता. या किल्ल्याना मजबुती देण्याकरिता जरूर तेवढे सैन्य प्रथम पाठविण्यात आलें आणि बाकीचें लष्कर पूर्व सरहद्दीवर गोळा करून अलसाक व लॉरेन्स प्रात ओलाडून एकदम जर्मनींत घुसण्याचा फ्रेंच सेनापतींनीं निश्चय केला. शत्रूच्या मुलखांत लढाई नेऊन घालणें हे सेनापतीचें पहिलें काम असतें. या तत्त्वाला अनुसरूनच फ्रेंचानीं आपल्या सैन्याची रचना केली. २० आगस्टच्या सुमारास ज्यावेळीं ब्रुसेल्स शहरात जर्मनांनीं प्रवेश केला त्यावेळीं आल्साक व लॉरेन्सचा बराच भाग ओलाडून फ्रेंच सेना ऱ्हाईन नदीच्या जवळ गेली होती आणि शत्रूच्या मुलुखात लढाई टाकण्याचा आपला डाव साधत आला असें त्याना वाटत होतें. उत्तर सरहद्दीवरील किल्ल्याच्या टापूच्या बदोबस्ताकरिता त्यानीं दोन सेना पाठविल्या होत्या पण बेल्जममध्ये जर्मन

घुसले याची वाट कशी करावयाची ? बेल्जममध्यें घुसलेल्या जर्मन सेनेच्या उत्तरेस ॲंटवर्पच्या टापूत एक लाख बेल्जियन होते; शिवाय बेल्जमच्या दक्षिण सरहद्दीवर मॉन्स येथे दीड लाख इंग्रज सैन्य घेऊन जनरल फ्रेंच उभे राहिले होते. शिवाय नामूरचा प्रख्यात किल्ला लीज येथून खाली उतरणाऱ्या जर्मन सेनेशीं टक्कर देण्यास तयार होता. ज्या तातडीनें जर्मन सेना गोळा झाली त्याच तातडीने फ्रेंच सेना गोळा झाली होती. तेव्हा फ्रेंच सैन्याच्या संख्येसंबंधाचे फ्रेंचाचे अंदाज चुकले होते असे म्हणता येत नाहीं. २० आगस्ट रोजी जर्मन सैन्याची जी मांडणी होती व त्या मांडणीस उतारा म्हणून फ्रेंच सैन्याची जी मांडणी करण्यात आली होती, त्या दोन्ही रचनांकडे पाहिले असता जर्मनीची रचना संकटाची व फ्रेंचाची रचना विजयदायक असेंच हिशोबाने सिद्ध करून देता आले असते. पूर्वेकडून फ्रेंच जर्मन मुलुखात घुसणार आणि बेल्जममध्ये उत्तरेस ॲंटवर्प व दक्षिणेस मॉन या दोन चापाच्या सापळ्यात जर्मन सेना सापडणार असेंच भविष्य आकड्याच्या आधारा वरून २० आगस्ट रोजी तिऱ्हाइतानी केले असते. पण वीस आगस्टपासून अवघ्या दहा दिवसात म्हणजे सप्टेंबर पहिलीपर्यंत जर्मन सैन्य पारिस शहराजवळ कसे जाऊन धडकले ? पहिल्या धडकीचा हा मोठा विजय जर्मनीला कसा मिळाला ? फ्रेंचाचा अंदाज कोठे चुकला ? सैन्याच्या संख्येसंबंधानें फ्रेंचाचा अंदाज चुकला नाही. कोण किती सैन्य किती वेळात गोळा करील या संबंधाचे फ्रेंचाचे अंदाज गेल्या बारा महिन्यात खोटे ठरले नसून रशिया, फ्रान्स व इंग्लंड यांच्या संख्येच्या ताकदीसंबंधाने जर्मनीचेच अंदाज खोटे ठरले आहेत. मग पहिल्या धडकीचा डाव फ्रेंचाच्या आंगलट कां यावा ? जर्मनीच्या मशिनगन्सची संख्या, चपल तोफखान्याची संख्या, मध्यम तोफांचें सामर्थ्य व अवजड तोफांची अचाट शक्ति, वर्ष अखेरीला इंग्लंड फ्रान्स व रशिया यांच्या अनुभवाला जितकी आली तितकी जर महायुद्धाच्या प्रारंभीं फ्रेंचांना माहीत असती तर, महायुद्धाचें स्वरूप कांही निराळेंच झालें असते. शत्रूच्या संख्येसंबधानें जर्मनीनें कांहीं चुका केल्या, आणि शत्रूच्या तोफखान्याच्या बळासंबधानें फ्रेंचानीं चुका केल्या; आणि या चुकांची कडू फळे बाराहि महिने दोन्ही पक्षांना खावीं लागलीं. २० आगस्टला नामूरच्या प्रचंड किल्ल्यावर जर्मनांनीं हल्ला केला. २१ आगस्टला नामूर पडलें आणि २२ आगस्टला नामूरच्या आसपासचा सर्व कारभार आटपून नामूर पडल्याची बातमी मॉन्स येथें जनरल फ्रेंच

यांना पोचण्यापूर्वीच जर्मन सेनेनें इंग्रज सेनेला तीन बाजूनीं गराडा दिला. २२ आगस्टपासून पहिल्या सप्टेंबरपर्यंत मॉन्स येथून इंग्रज सेनेनें आपला सेनाशकट मोडू न देता जी अपूर्व पिछेहाट केली ती इंग्रजी लष्कराच्या इतिहासांत चिरस्मरणीय राहील यात शंका नाहीं. इंग्रजी सेनाशकटाचे त्यावेळी तुकडे झाले असते तर, पारिस शहरात जर्मनाचा प्रवेश तत्काळ झाला असता. नामूर पडून इंग्रजाची पिछेहाट होण्याबरोबर त्याच्या उजव्या बाजूच्या फ्रेंच सैन्याचाहि पराभव झाला आणि त्याही सैन्यास मागे हटावें लागले. उत्तर पूर्वेच्या बाजूलाहि मेटझच्या जवळ जर्मन तोफानीं फ्रेंच सैन्याला चागलाच हात दाखविला. सर्व फ्रेंच सैन्याला मागे हटल्याशिवाय दुसरे गत्यतरच नव्हते. कदाचित् तोफाची कुमक जर वेळेवर मिळाली असती तर ऐन नदीच्या उत्तरेकडील डोंगराळ मुलूख सोडून पारिसच्या पूर्वेस व ऐन नदीच्या दक्षिणेस मार्न नदीपर्यंत पिछेहाट करण्याचे काहीच कारण नव्हतें. तोफानीं हा आपला पराभव केला आहे हे फ्रेंचाच्या ध्यानात आले नाही, फ्रेंच सेनापति जनरल जोफ्रे याना वाटले की, मोठया सख्येने धाकटया सख्येचा केलेला हा पराभव आहे. धाकटया सख्येचा हा असा पराभव होत असताना लहान लहान घास तिच्या मदतीला पाठविला म्हणजे घासामागून घास गिळत बसून सर्व सैन्याचा फडशा पाडण्यास शत्रूस मदत करण्यासारखे आहे, अशा प्रसगीं बाजू आगलट आली असता धाकटया सैन्याची आस्ते आस्ते पिछेहाट करून ज्या केंद्रातून मदत पाठवावयाची असते त्या केंद्रस्थानाजवळ धाकटी सेना आणावी आणि सर्व मदत एकदम त्या सेनेस पोचवून ती सेना शत्रूहून अधिक मोठी करावी असे नेपोलियनचे तत्त्व आहे. या तत्त्वास अनुसरून सेनापति जोफ्रे यानी फार कुशलतेने ५ सप्टेंबर पर्यंत सर्व सेना मॉर्न नदीवर मागे ओढून घेतली, आणि नवीन कुमक एक गठ्ठयानें मॉर्न नदीवर पाठवून आठ नऊ सप्टेंबर रोजीं जर्मनीचा मॉर्न नदीवर मोठा पराभव केला. मॉर्न नदीवरील जर्मनांच्या पराभवाचें कारण जनरल जोफ्रे यांचें धिमेपणाचे कौशल्य तर खरेंच, पण त्या बरोबरच फ्रेंच सैन्याच्या सख्येसबधानें जर्मनानीं केलेल्या चुकांच्या पदरीं हें अपयश मारणें जरूर आहे. जर्मनाना वाटलें कीं जेवढें जेवढें सैन्य गोळा झालें तेवढे सर्व सरहद्दीवर पाठविण्यांत आलें असून सरहद्दीवर एकदां आपण त्यांचा पराभव केलेला आहे, मग मॉर्न नदीवर या सैन्यास पुन्हा गाठून शेवटचें चिरडून टाकण्यास का कमी करा ! संख्येसंबधाच

चुकला आणि मोठया विजयाचा लोभ सुटला, त्यामुळें जर्मनांच्या हातून सैन्याच्य हालचालीत घोडयाएवढी मोठीच चूक ह्यावेळी झाली, आणि त्या चुकीची दुरुस्ती दोन तीन लाख सैन्य बळी देऊनहि जर्मनाना करता आली नाही. इंग्रजाच्या मागे लागलेले दोन तीन लाख जर्मन सैन्य सप्टेंबरच्या दुसऱ्या तिसऱ्या तारखेस पारिस शहराच्या पश्चिमेस व उत्तरेस पसरलेले होते. या सैन्याच्या पिछाडीस सोमनदीच्या उत्तरेचा कॅलेपर्यंतचा सर्व उत्तर–पश्चिम फ्रान्स मोकळा पडला होता, व सोम नदीला धरून कॅलेपर्यंतचा सर्व प्रांत बळकावून बसणे त्या सैन्याला अगदी सुलभ होते. पण मॉर्न नदीवर जाऊन एकदम फ्रेंच सैन्याचा फडशा उडवून पारिस जवळच युद्धाची परिसमाप्ति करण्याच्या मोठया लोभाला जर्मन सेना बळी पडली. सोमनदी पकडून बसण्याऐवजी इंग्रज सेनेला वळसा घालून पूर्वेस मॉर्न नदीकडे जर्मन सेनापति जावयास निघाले. इंग्रजानी त्याना आपल्या उत्तरेकडून पूर्वेकडे जाऊ दिले, पण ते खाली पूर्वेस वळण्याबरोबर लगेच त्याच्या पिछाडीवर हल्ला करण्यास सुरुवात केली ! मॉर्न नदीवर सर्व जर्मन सेना गोळा झाली खरी पण तेथे काय वाढून ठेवलेले ? मोठया सख्येशी सामना, अर्थात पराभव. तारीख ६ पासून तारीख ९ सप्टेंबरपर्यंत मॉर्न नदीवर जर्मनाना निकराने लढावे लागले आणि आईन नदीवरील चराच्या रागा तयार झाल्यानतर जर्मन सैन्य मागे सरून या चराच्या चक्रव्यूहाच्या आश्रयाने दहा बारा सप्टेंबरच्या सुमारास जे जाऊन बसले ते तेव्हापासून आतापर्यंत तेथेच लपून बसलेले आहे ! बारा सप्टेंबरपासून ऐननदीच्या काठीं गेल्या अकरा महिन्यात विशेषसा फेरबदल झालेला नाही. साईसन्स व व्हर्डून या दोन बाजूला जर्मनानी एक दोन वेळा उचल खाल्ली व आरगॉन प्रातात फ्रेंचानी पाच सात वेळा पुढे पाऊल टाकण्याचा प्रयत्न केला, पण कोणच्याच पक्षास विशेषसे यश मिळाले नाहीं. ऐन नदीच्या उत्तरेकडील डोंगराळ मुलूख मोठया तोफानी मजबूत केलेल्या चराच्या तटबंदीस व या भक्कम तटबंदीपुढे मशिनगन्सनी सांभाळलेल्या चराच्या चक्रव्यूहाच्या लहान लहान किल्ल्यांचें जाळे पसरविण्यास फारच सोयीचे आहे. हा मुलुख कबजात घेऊन चराच्या तटबंदीने तो मजबूत करता यावा म्हणून आपण धावून मॉर्न नदीपर्यंत गेलों आणि ऐन नदीचा बंदोबस्त होण्याबरोबर मागे परतलों, यात आमचा पराभव कसला असें जर्मनाचें म्हणणें आहे. मशीनगन्स,

हलक्या तोफा, मध्यम तोफा व अवजड तोफा, त्याचा उपयोग व शक्ति याच्या संबधानें जर्मनीचें लष्करी शास्त्र जितके परिणत स्थितीस आज गेलें आहे तितकें फ्रेंचाचें शास्त्र परिणत झालेले नाही ही गोष्ट खरी आहे. अर्थात् या तोफाच्या जोरावर चालविलेल्या युद्धात स्वसरक्षणाच्या समयीं चर कसे खणावे, चराचे चक्रव्यूह बनवून चक्रव्यूहात थोडीं माणसे व बऱ्याच मशिनगन्स ठेवून लहानसान किल्ल्याप्रमाणे या चराच्या चक्रव्यूहाचा उपयोग कसा करून घ्यावा, आणि मागे अतरावर दुसऱ्या चराच्या रागातून मोठया तोफा बसवून मोठया तोफाची कुमक चक्रव्यूही किल्ल्याना कशी पोचवावी, या सर्व लष्करी कलेचें ज्ञान आज फ्रेंचाहून जर्मनाना अधिक आहे ही गोष्ट खरी. पण या ठिकाणी असा प्रश्न उद्भवतो कीं ऐन नदीवर चर खणण्याकरिता जर मॉर्न नदीवर सैन्याचा नुसता पडदाच थोडा वेळ उभा करावयाचा झाला, तर सेनापति क्लक याचे सैन्य पारिसच्या पश्चिमेकडून पूर्वेकडे कशाला नेले ? सेनापति फॉन बुलो व क्राऊन प्रिन्स याच्या सैन्याना ते काम सहज करता आले असते. सेनापति क्लक याच्या सैन्याने सोम नदी पकडून सोम नदीच्या मुखापर्यंत चराची तटबदी त्यावेळीं निर्माण करावयास पाहिजे होती म्हणजे कॅले घेण्याकरिता जे दोन तीन लाख जर्मन निष्फळ बळी द्यावे लागले ते बळी द्यावे लागले नसते आणि सोम नदीच्या मुखापर्यंतचा सर्व पश्चिम फ्रान्स जर्मनाच्या हातात सापडून कॅलेचा किल्लाहि ॲटवर्पच्या किल्ल्याप्रमाणेच गाभूळलेल्या फळासारखाच अवजड जर्मन तोफाच्या मुखात पडला असता. अदाज चुकला आणि जर्मनानी मॉर्न नदीवर मार खाल्ला हीच गोष्ट खरी. मॉर्न नदीवरील जर्मनाचा पराभव, ऐन नदीवरील जर्मनाची चराची तटबदी आणि मोठमोठे किल्ले थोडया अवकाशात हस्तगत करण्याची जर्मन तोफाची शक्ति, या तीन बाबींना धरूनच पश्चिम रणभूमींत पहिल्या वर्षांतील सर्व गोष्टी घडून आल्या. पराभूत केलेल्या सेनेवर जसे तुटून पडावे त्याप्रमाणे ऐन नदीच्या तटबदीवर दहा दिवस फ्रेंच सेना तुटून पडत होती आणि वीस सप्टेंबर नतर ध्यानात आले कीं कायम बसण्याच्या इराद्यानें जर्मनानीं हे चर निर्माण केले असून मागे हटता हटतां पाठलाग करणारांना काही काळ थोपवून धरण्याकरिता ऐन नदीचा बदोबस्त केलेला नाहीं. फ्रेंचाना हें ज्ञान व्हावयाच्या सुमारासच जर्मनानीं ॲटवर्पच्या किल्ल्याकडे जाण्यास सुरुवात केली. ॲटवर्पचा किल्ला फार मजबूत म्हणून समजला जात असे

व तो कित्येक महिने जर्मनाना दाद देणार नाहीं अशी सर्वांची अटकळ होती. ह्या अटकळीला अनुसरून अॅटवर्पला कुमक न पाठविता ऐन नदीवरील जर्मनाच्या फळीला पश्चिमेकडून वळसा देण्याचा उद्योग फ्रेंचानीं व इंग्रजानी आरंभिला. २० सप्टेंबरपासून हा वळसा देण्यास जो आरंभ झाला, तो पांच सात आक्टोबरपर्यंत चालूच होता. ऐन नदीपासून आरास, लेन्स, लीली, ऑस्टेन्ड, अशा रोखानें जर्मनाचे चर समुद्र किनाऱ्यापर्यंत जाऊन पोंचले आणि त्याच सुमारास जर्मनाच्या मोठ्या तोफाहि अॅटवर्प किल्ल्याच्या जवळ गेल्या. ५–७ आक्टोबरला ऑस्टेन्ड येथून तातडीने मदत अॅटवर्पला पाठविण्यात आली, पण ९ आक्टोबरला अॅटवर्पचा किल्ला पडला आणि १५ ऑक्टोबरच्या सुमाराला ऑस्टेन्ड पर्यंतचा सर्व बेल्जम किनारा जर्मनाच्या ताब्यात गेला. अॅटवर्प घेण्याच्या जर्मनाच्या ह्या उद्योगासंबंधाने असे म्हणणें भाग आहे की, हा उद्योग लष्करी दृष्टीपेक्षा राष्ट्रीय दृष्टीने करण्यात आला. अॅटवर्पचा किल्ला सर करण्याकरिता दोन लाख सैन्य तरी गुन्तविण्यात आलेलें असले पाहिजे. हे एवढे मोठे सैन्य अॅटवर्पकडे न पाठविता जर दक्षिणेस सोम नदीकडे पाठविण्यात आलें असते तर ऐन नदीवरील चराची तटबंदी वायव्य दिशेने वर सरकत जाऊन ऑस्टेन्डजवळ समुद्रास न मिळता पश्चिम दिशेने सरकत जाऊन सोम नदीच्या मुखाजवळ इंग्लिश चानलला मिळाली असती, आणि नन्तर दोन चार महिन्यात कॅले व अॅटवर्प हे दोनहि किल्ले आस्ते आस्ते सहज पडले असते. सोम नदीच्या मुखापर्यंत चर लांबविण्याने जर्मनाच्या लष्करी धोरणाचें मोठे कार्य झाले असते. इंग्लंड फ्रान्सपासून अलग पडलें असतें. इंग्लंडला फ्रान्सपासून अलग पाडण्याचे लष्करी धोरण जर्मनानीं त्यावेळीं का मागे टाकले ? कॅले घेऊन जें धोरण साधावे म्हणून जर्मनानीं पुढे दोन महिने अट्टाहास केला ते धोरण सहज साधण्याची वेळ आली असता जर्मन लष्कराने ती वेळ वाया कशी जाऊ दिली ? सोमनदीपर्यंत कॅलेच्या दक्षिण प्रांताचा दक्षिण किनारा ही हस्तगत केलीं असता इंग्लण्ड व फ्रान्स, परस्पराच्या लष्करास कुमक करण्याच्या दृष्टीने, बऱ्याच अंशी अलग झाले असतें, पण ह्या अलगपणापेक्षा दुसरा एक अलगपणा जर्मनाच्या दृष्टीने या युद्धात अधिक महत्वाचा होता; आणि तो अलगपणा घडवून आणण्याकडे जर्मन कारस्थानानीं लक्ष पुरविलें होतें. तुर्कस्थानचा बांध मध्यें घालून डार्डानेलिसच्या मार्फत रशियाला इंग्रजांची व

फ्रेंचाची कुमक न मिळेल असा उद्योग जर्मनानीं याच सुमारास आरंभिला होता. गोवेन आणि ब्रासला हीं जर्मन क्रूझरें तुर्की राजधानींत पोंचल्यामुळें तुर्की आरमारात नवी महत्त्वाकांक्षा उत्पन्न झाली होती. पहिल्या पासून जर्मनीकडे ओढा असलेला एन्वर पाशाचा तरुण तुर्कांचा पक्ष फ्रान्समधील पहिल्या धडकीच्या विजयामुळे उघड उघड जर्मनीच्या बाजूला कलडला होता, पण मार्न नदीवरील पराभवामुळें व रशियाने ऑस्ट्रियावर केलेल्या जोराच्या स्वारीमुळे तरुण तुर्कांच्या उचबळयास जरा ओहोटी लागली होती. तरुण तुर्कांना उत्तेजन मिळेल असले काहींतरी शतकृत्य करून दाखविणें त्यावेळीं जर्मनीला भाग होते. युरोपच्या इतिहासांत फार प्रसिद्ध असलेला अँटवर्पचा किल्ला घेतल्यानें तरुण तुर्कांस नवीन उत्साह उत्पन्न झाला, आणि तुर्कस्थान जर्मनीच्यातर्फे महायुद्धात सामील होऊन फ्रान्स व इंग्लण्ड ह्यापासून रशियाला अलग पाडण्याचें साधले, पण इंग्लड अलग पाडण्याचें गमावले. आक्टोबर ९ ला अँटवर्पचा किल्ला पडून १६ आक्टोबरला ऑस्टेन्ड पर्यंतचा बेल्जम किनारा जर्मनाच्या ताब्यात गेल्यानन्तर जे गमाविले होते ते सपादण्याचा उद्योग जर्मनानीं आरभिला. कॅले व कॅलेचा दक्षिण किनारा हस्तगत करून घेण्यास आरास व लाबासी यैथून चाल करून जाणे सोयीचे होय. ह्या दोनहि ठिकाणाहून जर्मनानी पुढे चाल करून जाण्यास प्रयत्न केला. पण फ्रेंचानी चागला अडथळा केल्यामुळे फ्रेंचाची फळी फोडण्यापेक्षा इंग्रजाची फळी फोडणें सुलभ जाईल, असे जर्मनाना वाटले. इंग्रजी सेनेला जर्मन त्यावेळीं कःपदार्थ समजत ! इंग्रजाना धुडकावून लावू असल्या घमेंडीने १७–१८ आक्टोबरपासून जर्मनानी यिप्रेसवर जोरानें हल्ला करण्यास सुरवात केली. हे हल्ले २१ नोव्हेंबरपर्यंत एकसारखे जोरानें चालू होते. ह्या एक महिन्याच्या लढाईंत सुमारें एक लाख इंग्रजावर पाच लाख जर्मन तुटून पडत होते. या यिप्रेसच्या लढाईंत इंग्रज सेना इतक्या शौर्यानें व निकरानें लढली कीं २१ नोव्हेंबरनतर इंग्रजाची फळी फोडण्याचा नाद जर्मनाना सोडून द्यावा लागला आणि इंग्रज सेना पोकळ नसून भरीव आहे असे जर्मनीच्या अनुभवास येऊन इंग्रजी शौर्यास सलाम करून जर्मनांना आपले तोंड चराच्या गुहेंत लपवावें लागलें. २१ नोव्हेंबरनतर तीन महिने हिंवाळयात पश्चिम रणभूमि शांत होती. लाबासी वगैरे ठिकाणीं किरकोळ चकमकी झाल्या,

पण एकमेकानीं एकमेकांस चिमटे घेण्यापलिकडे विशेष काहींच कोणी केलें नाहीं. तारीख १२ मार्च रोजीं नौचापेली येथे इग्रजानीं जर्मनावर तोफाचा भडिमार फार भयकर केला. सबध बोअर युद्धात जेवढा दारूगोळा खर्च झाला नाही तेवढा दारूगोळा नौचापेली येथे तीन दिवसात खर्च झाला आणि एक खेडे मिळण्यापलिकड काहीं फायदा झाला नाहीं. मार्च महिन्यात फ्रेंच आरगोन प्रातात असेच हल्ले करीत होते, पण भरपूर दारूगोळा जवळ असल्याशिवाय असले हल्ले निष्फळ होतात, हें फ्रेंचाच्याहि तेव्हाच ध्यानात आले. एप्रिल महिना इग्रज व फ्रेंच स्वस्थ होते, मे महिन्यात रशियावरील ग्यालिशियातील जर्मनाची जगी स्वारी सुरू व्हावयाची होती. त्यावेळीं इग्रज व फ्रेंच आपणावर उलट हल्ले केल्यावाचून रहाणार नाहीत हे जर्मनी ओळखून होता म्हणून १७ एप्रिलपासून यिप्रेस येथे जर्मनीने विषारी धुराच्या सहाय्याने इग्रजावर आपण होऊन हल्ला करण्यास सुरुवात केली. यिप्रेसची ही दुसरी लढाई १७ एप्रिलपासून १७ मे पर्यंत चालली होती या लढाईत दोन चार मैल इग्रजहि मागे हटले व दोनचार मैल जर्मनहि मागे हटले. १० मेच्या सुमारास फ्रेंचानीं आपल्या जगी हल्ल्यास सुरुवात केली. १० मे पासून १० जूनपर्यंत आरास व लाबासी या टापूत फ्रेंच तोफखाना व फ्रेंच सेना जर्मनावर तुटून पडत होती. ग्यालिशियन युद्धाच्या वेळीच फ्रेंचानीं हा जगी हल्ला चढविला होता, हे विसरता कामा नये. मार्च–एप्रिलमधील फ्रेंचाच्या हुलकावण्या मेटझच्या बाजूच्या होत्या. मे महिन्यातील जगी हल्ला त्याच बाजूला होईल असे जर्मनाना त्यानी भासविले होते, पण मे महिन्यातील खरा हल्ला आरास, लाबासी या टापूवरच करण्यात आला. लष्करी धोरणाच्या दृष्टीने विचार केला असता हाच टापू फ्रेंचाच्या हल्ल्यास योग्य. ऐन नदीच्या उत्तरेकडचा प्रात डोगराळ, लहान सान उचवटयालाहि जर्मनानीं किल्ल्याचे रूप दिलेलें ! अशा ठिकाणापेक्षा लाबासी व आरास येथील सपाट मैदानावर लढणे बरें. शिवाय कॅले घेऊन इग्रजाना व फ्रेंचाना अलग करण्याचा जर्मनाचा डाव लाबासी व आरास या टापूतील जर्मनाना हाकून लावल्यानें कायमचा फसणार ! तेव्हा तारीख १० मे च्या सुमारास आरास व लाबासी याच्यामधील लेन्सच्या रोखानें फ्रेंचानी जेव्हा जगी हल्ला सुरू केला त्यावेळी जर्मनीचें एक मोठे लष्करी धोरण कायमचे बुडणार असे सर्वांना वाटले. ग्यालिशियन युद्धास आरभ झाला होता त्या दृष्टीनें १० मे ही तारीख फ्रेंचाच्या

जंगी हल्लयास उचितच होती. शिवाय दुसरें एक राजकीय कारण या हल्लयाच्या पाठीशीं होते, महायुद्धात सामील व्हावें किंवा कसें याचा विचार इटली त्यावेळी करीत होता. इटलीला त्यावेळीं प्रोत्साहन मिळावें म्हणून काहीं तरी विशेष गोष्ट करून दाखविणें फ्रेंचाना भाग होते. तारीख १० मे च्या जगी हल्लयास फ्रेंचानी सुरुवात करण्याबरोबर पहिल्या तडाख्यासरशी फ्रेंचानी तीन चार गावे घेतली. आल्बेन, कॅरेन्सी, नॉव्हेली, सेटव्हास, व सौचेजचा बराच भाग एक आठवडयात घेतला. पण सौचेज खेडयाच्या पूर्वेकडील चराच्या चक्रव्यूहात मेच्या दुसऱ्या पधरवडयापासून फ्रेंच लोक जे गुरफटले गेले ते मे, जून, जुलै अखेरपर्यंत तसेच कायम खिचपत पडले. या सौचेजच्या लढायात जर्मन चराचें खरें स्वरूप प्रकट झालें. चराच्या एका मागून एक लाबलचक रागाच केवळ नसतात तर पहिली राग व दुसरी राग याच्यामधील दोन तीन मैल रुदीच्या टापूत चराचे लहान लहान चक्रव्यूह तयार करून मशिनगन्सच्या सहाय्यानें ह्या चक्रव्यूहाना चिमुकल्या किल्लयाचे स्वरूप दिलेले असते ! या चिमुकल्या किल्लयामागे पुन्हा एक चराची जगी राग असते. ह्या चरात तोफा असतात. या तोफाच्या मागेहि चिमुकल्या किल्लयाचे जाळे पसरून ठेवलेले असून त्याच्या मागे तोफाच्या चराची तिसरी राग असते. म्हणजे एकदरीत तोफाचे लाबलचक तीन चर असतात, आणि या तीन चरामध्ये चराच्या चक्रव्यूहाच्या चिमुकल्या किल्लयाची दोन जाळी पसरलेलीं असतात. तोंडावरच्या तोफावर एकसारखा तोफाच्या गोळ्याचा वर्षाव करून बिनीच्या तोफा मागे हटवाव्या आणि सैन्यानें चाल करून जावें तो चिमुकल्या किल्लयाच्या पहिल्या जाळयात हल्ला करणारे सैन्य अडकून पडते ! या पहिल्या जाळयाचे धागे तोडून दुसऱ्या जाळयास पोचण्यास आठ दहा दिवस सहज घालवावे लागतात. आणि आठ दहा दिवसाचा असा अवकाश मिळाला म्हणजे तिसरे जाळे त्या वेळात जर्मन निर्माण करतात. म्हणजे बिनीच्या तोफाची फळी फोडण्याचा खटाटोप फुकट जातो. चराच्या लहान लहान किल्लयाचें दुपद्री तिपद्री जाळे, मशिनगन्सचा भरपूर पुरवठा, आणि मोठया तोफाचा पाठिंबा, याच्या सहाय्यानें थोडया लोकांनी मोठी सेना थोपवून धरण्याची युक्ति जर्मनीनें पश्चिम रणभूमींत अमलात आणली असून सैन्याचें पुष्कळ बळ रशियाच्या अगावर फेकलें आहे, असे फ्रान्सला मे–जूनच्या हल्लयाच्या वेळीं समजून चुकलें. जुलई महिना जर्मनीच्या या

युक्तीवर कोणची मात्रा चालवावी याचा विचार करण्यांत जाऊन आगस्ट प्रारभीं महायुद्धाचें पहिलें वर्ष सपलें.

## पूर्व व दक्षिण सरहद्द

जर्मनीनें महायुद्धाचे पहिले तीन महिने फ्रान्सच्या बाजूचा बदोबस्त करण्यांत घालविले, आणि नतर जर्मनीचें लक्ष रशियाकडे लागले. फ्रान्सचा बदोबस्त केल्या नतर रशियाच्या अगावर तुटून पडावयाचें आणि रशियाला पूर्णपणे चिरडून महायुद्धाचा निकाल आपल्यातर्फे लावून घ्यावयाचा असे धोरण जर्मनीचें पहिल्यापासून होते, व त्या धोरणाला अनुसरून जर्मनी आतापर्यंत वागत आला आहे. रशिया आपल्या हातून चिरडला जात नाहीं अशी प्रत्यक्ष रणागणावर खात्री झाल्यानतर जर्मनी रशियाचा पिछा सोडील, तोपर्यंत सोडणार नाही, अशी खात्री होण्यास दुसऱ्या वर्षाचेहि तीनचार महिने जावे लागतील. म्हणजे १९१५ सालच्या प्रारभाला जर्मनीची अशी खात्री होईल कीं इग्लण्ड काय, फ्रान्स काय, किंवा रशिया काय कोणालाच आपणास चिरडता येत नाही. इतकेच नव्हे तर तीन, चार, पाच वर्षे हे महायुद्ध सारखे चालून अखेरीस दमात उखडून पडण्याशिवाय स्वतःचे नशिबी दुसरें तिसरे काही लिहिलेले नाहीं. दमात उखडून पडण्याची भीति साप्रतच जर्मनीस थोडी थोडी वाटत आहे, पण रशियावर मिळविलेल्या पोकळ व भाकेदार विजयाच्या दिव्य वस्त्रालकाराच्या पाघरुणाखालीं दुबळे होत चाललेलें हृदय साप्रत तो झाकून ठेवीत आहे. नेपोलियनच्यावर आमच्या सैन्यानें ताग केली असे जरी बाहेरून तो ठासून ओरडत आहे तरी हृदयाचे ठोके निःसत्व होत चाललेले आहेत, हे त्याच्या कानात स्वच्छपणे ऐकू येऊ लागलें आहे. रशिया चिरडला जात नाही अशी पक्की खात्री झाल्यावर रशियाच्या बाजूलाहि चराच्या चक्रव्यूहात बदुका व तोफा लपवून ठेवून कॅलेच्या रोखानें पुन्हा एकदा शेवटची स्वारी करून इग्लण्ड व फ्रान्स याना अलग करण्याचा पुन्हा जारीनें प्रयत्न करण्यात येईल, असा अन्दाज आहे. या कामातील जर्मनीच्या कपाळाचे पूर्वीचें अपयश पुढेहि जर्मन रक्ताच्या प्रवाहानें धुतलें जाणार नाही, हे सांगणे नकोच. प्रथम प्रथम रशियाकडे दुर्लक्ष करावयाचें आणि नतर रशियाचा पिच्छा पुरवून रशियाला चिरडून टाकावयाचें, या धोरणानें रशियाशीं जर्मनी कसा लढला तें आतां पाहू. रशियासंबधानें जर्मनीनें पहिली चूक अशी केली कीं रशियाच्या हातून मोठें

सैन्य लवकर गोळा होणार नाहीं, असे मानून एकट्या आस्ट्रियासच रशियाशीं त्यानें लढू दिलें. या चुकीची दुरुस्ती करिता करिता गेल्या मे महिन्यापर्यंत रशियाकडील बाजू ऑस्ट्रियाच्या आगलट आली आणि ऑस्ट्रियास आवरून धरण्यापलिकडे पहिले नऊ महिने जर्मनीस काहीं करता आले नाही. ७ ऑगस्टला रशियानें जर्मनीच्या ईस्ट–प्रशिया प्रांतावर स्वारी केली आणि १६ ऑगस्टच्या सुमाराला कानिंग्जबर्ग किल्ल्याजवळ रशियन सैन्य येऊन थडकले. जर्मनी घाबरला. पूर्व प्रशियाच्या सरहद्दीवरील जंगलाची, दलदलीची व चोरवाटाची पूर्ण माहिती असलेले वृद्ध सेनापति हिंडेनबुर्ग यानी रशियन सैन्याला बरेच आंत घेऊन दलदलीच्या कोंडमाऱ्यात टॅनेनबर्ग येथे रशियन सैन्याला वेढले आणि ३१ आगस्ट रोजी रशियन सैन्याचा नाश करून रशियन सेनापति सॅम्सोनोफ यानाहि रणांगणावर देह ठेवण्यास लाविले. टॅनेनबर्गच्या ह्या विजयानंतर रशियन सैन्याचा पाठलाग नीमेन नदीपर्यंत जर्मन सैन्याने केला, पण २५ सप्टेंबरनन्तर आगस्टोव्हच्या जंगलात जर्मन सेनेची फार खराबी झाली आणि सेनापति हिंगेनबुर्ग याना स्वतःच्या हद्दीत परत यावे लागले. दक्षिणेस ऑस्ट्रिया प्रथम प्रथम लुबलीनच्या रोखानें थोडासा पुढे गेला, पण आगस्ट अखेरीपासून रशियाला एकसारखे विजय मिळून तारीख ३ सप्टेंबर रोजी लेंबर्ग शहर रशियाने घेतलें, आणि सप्टेंबर अखेरीस प्रेजमिसलचा किल्ला घेऊन क्रॅकोच्या पूर्वेस शंभर मैलावर रशियन सैन्य येऊन थडकले! ऑस्ट्रियावरील रशियाचा हा दाब थोडा हलका पडावा म्हणून सेनापति हिंडेनबुर्ग यानी ऑक्टोबर प्रारंभापासून वार्सावरील पहिल्या स्वारीस सुरुवात केली. १० ऑक्टोबरला जर्मन सैन्य लोड्ज जवळ गेले, आणि १६ ऑक्टोबरला वार्सा शहर जर्मन घेतात कीं काय अशी स्थिति येऊन पोचली. ह्याच सुमाराला पश्चिमेस ॲंटवर्पचा किल्ला पडला होता. वार्साचाहि किल्ला पडला अशी खोटीच कंडी पिकवून जर्मनीनें त्यावेळीं तुर्कांचा इस्तंबल किल्लाहि महायुद्धात सामील करून घेतला! असो. रशियन सेनापति ग्रँड ड्यूक निकोलस यानी १६ ऑक्टोबरचे सुमारास वार्साच्या उत्तरेस व दक्षिणेस मोठें सैन्य गोळा केलें आणि १९ ऑक्टोबरपासून जर्मनांना मागे हटावयास लावून ऑक्टोबर–अखेरीस सेनापति हिंडेनबुर्ग हे पोसनजवळ स्वतःच्या सरहद्दींत येऊन बसले. याच सुमारास यिप्रेसची लढाई मोठी जोरजोरानें लढली जात होती. अर्थात नोव्हेंबर

महिना सपेपर्यंत जर्मनांना मूग गिळून स्वस्थ—बसावें लागलें. वार्सावरील पहिल्या स्वारीच्या वेळीं वार्साला मदत पोचावी म्हणून क्रॅकोकडील रशियन सैन्य जरा आखडून धरावें लागलें व त्यामुळें प्रिजमिसलचा किल्ला थोडा वेळ आस्ट्रियाच्या ताब्यात गेला. नोव्हेंबर प्रारंभापासून ऑस्ट्रियावरील आपल्या स्वारीस रशियानें पुन्हा सुरुवात केली आणि प्रिजमिसल किल्ला घेऊन नोव्हेंबरच्या पहिल्या आठवड्यात क्रॅकोच्या टापूत रशियाने जोराच्या युद्धास सुरुवात केली. कार्पेथियन पर्वतावरील घाटांना रशियाची तबी बसली आणि क्रॅको आपल्याला सभाळतां येईल की नाहीं याचीच शका ऑस्ट्रियनांना वाटू लागली. अर्धामुर्धा सर्व्हिया जिंकून पुढें गेलेलें ऑस्ट्रियन सैन्य मागें घ्यावें लागलें आणि यिप्रेसची लढाई ढिली करून, कॅलेचा नाद सोडून देऊन जर्मनीला ऑस्ट्रियाच्या मदतीकरिता पूर्वेकडे यावें लागलें. नोव्हेंबरच्या दुसऱ्या आठवड्यात क्रॅकोच्या बाजूस घनघोर युद्ध होईल असा अदाज रशियानें बांधला, पण क्रॅकोच्या बाजूस मोठ्या खटाटोपाचें नुसतें अवडबर दाखवून १५ नोव्हेंबरच्या सुमारास वार्टना व व्हिश्चुला या दोन नद्यांमध्यें सैन्य घुसून सेनापति हिंडेनबुर्ग यांनीं वार्सावरील दुसऱ्या स्वारीस सुरुवात केली. सेनापति मॅकेन्सेन यांच्या हाताखालचें जर्मन सैन्य २३ नोव्हेंबरला लीज शहरात पुन्हा शिरलें, आणि डिसेंबर आरंभाला झुरा नदीचा कांठ जर्मनीनें गाठला. ८ डिसेंबरला झुरा नदी ओलांडून रशियाच्या वार्सावरील मुख्य फळीवर सेनापति मॅकेन्सेन यानें जोराचे हल्ले करण्यास सुरुवात केली. आठ डिसेंबरपासून जानेवारीपर्यंत तीन आठवडे व पुढें जानेवारींतहि दहा पधरा दिवस वार्सा घेण्याकरितां जर्मनीनें लाख दीड लाख लोकं बळी देऊन आटोकाट धडपड केली, पण कांहीं उपयोग झाला नाहीं. थोडासा उपयोग एवढाच झाला कीं, ८ डिसेंबरच्या सुमारास अगदीं क्रॅको शहराजवळ येऊन पोंचलेले रशियन सैन्य डुनाजी नदीपर्यंत मागें हटलें, आणि डुक्ला घाटातून खालीं उतरणाऱ्या ऑस्ट्रियन सैन्याला क्रॉस्नोपर्यंत जाता आलें. जानेवारी महिना अशा रीतीनें गेला. फेब्रुवारीच्या प्रारंभाला वार्सावर जनरल मॅकेन्सननें पुन्हा हल्ले केले. समोरून हल्ले करून कांहीं यश मिळत नाहीं असे पाहून फेब्रुवारीच्या दुसऱ्या आठवड्यात नीमेन नदी ओलांडून वार्सा पेट्रोग्राड रेल्वे मोडण्याचा सेनापति हिंडेनबुर्ग यांनीं प्रयत्न केला; पण नीमेन नदीवर हात टेकून फेब्रुवारी अखेर स्वतःच्या सरहद्दीकडे परत यावें लागलें. नीमेन

प्रमाणें नॅरू नदीहि कबजांत घेण्याचा याच वेळीं प्रयत्न करण्यांत आला आणि ता. २० फेब्रुवारी रोजीं प्राजनीज शहर जर्मनांनीं घेतलें, पण फेब्रुवारी अखेरीस प्राजनीज सोडून जर्मनांना मागे हटावें लागलें. मार्च महिन्यांत वार्सा, नॅरू किंवा नीमेन ह्या बाजूला जर्मन स्वस्थ बसून होते. मार्च आणि एप्रील हे दोनहि महिने महायुद्धाचे पहिल्या वर्षांत रशियाला मोठया विजयाचे गेले. हे दोनहि महिने रशिया ऑस्ट्रियाला एकसारखा तुडवीत होता; रशियानें यावेळीं बुकोव्हिना प्रात घेतला; २२ मार्चला प्रिजमिसलचा किल्ला रशियाने घेतला, आणि एप्रिल अखेर युझाक घाट शिवाय करून कार्पेथियन पर्वताचें सर्व घाट रशियाचे ताब्यात जाऊन डुकला घाटाने रशिया हंगेरियाच्या मैदानावर उतरूहि लागला. मार्च व एप्रिल हे दोनहि महिने कार्पेथियन पर्वताचें महायुद्ध झालें. एप्रिल महिन्यात जर्मन सैन्य ऑस्ट्रियाच्या मदतीस धावलें. बुकोव्हिना प्रांतातून रशियाला त्यानें प्रथम मागे हटविलें आणि युझाक घाटातून खालीं उतरून रशियन सैन्यावर हल्ला चढविला. रशियाला वाटलें कीं जर्मन व ऑस्ट्रियन सैन्याचें मुख्य बळ युझाक घाटाच्या बाजूला एकवटले असून तेथेंच त्याचे कबरडे मोडलें पाहिजे. युझाक घाटाकडे रशियाच्या मोठया तोफा गेल्या, दारूगोळयाचा साठा तेथेंच आला, आणि सैन्याचें बळ कार्पेथियन पर्वताच्या मध्यावर बेसुमार फेंकण्यांत आलें. कार्पेथियन पर्वतावरील या लढाईंत रशियाचा प्रत्यक्ष नाहीं तरी अप्रत्यक्ष पराभव झाला. युझाक घाट मिळाला नाहीं तो नाहींच, पण दारूगोळा बेसुमार खर्च होऊन दारूगोळयाच्या पुढील दिवाळ्याचा खरा आरंभ युझाक घाटात झाला ! कार्पेथियन पर्वताच्या मध्यभागावर एप्रिल महिन्यात रशियास गुन्तवून ठेऊन एप्रिल महिन्यांतच वार्साचा टापू सोडून सेनापति मॅकन्सन यांना क्रॅकोच्या टापूत जर्मनानीं आणिलें. तेथें दोन हजार तोफा गोळा झाल्या; सात आठ लाख सैन्य जमलें; आणि तोफाच्या गोळयाचे पर्वतच्या पर्वत रचण्यांत आले; २८ एप्रिलला सेनापति मॅकेन्सन याच्या नव्या सैन्यानें गार्लिश शहर घेतलें, तारीख २ मे ला डुनाजी नदीवर रशियाची फळी फोडली; ११ मे ला सॅन नदी गांठून प्रेजमिसलचा निम्मा मार्ग आक्रमिला; ३ जूनला प्रिजमिसल घेतलें; व २२ जूनला लेंबर्ग शहरात जर्मन शिरलें ! जून अखेर लेंबर्गच्या पूर्वेस लोटालिपा नदीच्या पलीकडे रशियन सैन्य गेलें, आणि सेनापति मॅकेन्सन हे

उत्तरेस ल्यूबलिन व खोल्म रेल्वेवर चाल करून गेले. जुलईच्या प्रारंभाला सेनापति हिंडेनबुर्ग यांनीं उत्तरेस रिगा व कोव्हनो याच्या रोखानें, आणि मध्यावर नेरू व नीमेन ह्याच्या रोखानें चाल करण्यास सुरुवात करून दक्षिणेकडील सेनापति मॅकेन्सन याच्या हल्लयास एकदम दुजोरा दिला, आणि आगस्टच्या प्रारभाला वार्सा शहर सोडून देण्यास भाग पाडण्याइतकी रशियाची स्थिति करून नेपोलियनासहि मागे टाकणाऱ्या आपल्या लष्करी हालचालीच्या दिमाखात सेनापति हिंडेनबुर्गे यानीं महायुद्धाचें पहिले वर्ष सपवून दुसऱ्या वर्षास आरभ केला.

## किरकोळ गोष्टी

युरोप खण्डाबाहेर आफ्रिका व एशिया या दोन खण्डातहि महायुद्धाच्या ठिणग्या पहिल्या वर्षांत दृष्टीस पडल्या. आगस्ट आणि सप्टेंबर महिन्यात ऑस्ट्रेलियन लोकानी पासिफिक महासागरातील जर्मनीचे ठाणें घेतलें. तारीख १० नोव्हेबरला जपानने चीनमधील जमनीचें ठाणे घेतले. पश्चिम आफ्रिकेमध्ये २७ आगस्टला जर्मनीचे टोगोलॅड पडलें. पहिल्या वर्षांत कॅमेरूनचा बराचसा भाग फ्रेंचानीं काबीज केला व पूर्व आफ्रिकेला इग्रजानीं तबी दिली. दक्षिण आफ्रिकेतील सर्व जर्मन वसाहत जनरल बोथा ह्याच्या हातात गेली. किरकोळ बाबींत तुर्कांचें युद्ध विशेष महत्वाचें असून डार्डानेलिसवरील इग्रजाच्या हल्ल्याच्या दिवसापासून पश्चिम किंवा पूर्व रणभूमिइतके महत्त्व या युद्धासहि आस्ते आस्ते येऊ लागलें आहे. तुर्क महायुद्धात सामील झाल्याने रशिया अलग पडला. या अलगपणाचे अनिष्ट परिणाम गेल्या मे महिन्यापासून पूर्णपणें दृष्टीस पडू लागल्यामुळे तुर्कांचा अडथळा दूर करणें हे पश्चिम रणभूमीवर जय मिळविण्या इतकेच महत्वाचे झालें आहे. तारीख १ नोव्हेंबरला तुर्कस्थान युद्धात सामील झालें. लगेच इराणी आखातात हिंदी फौज शिरली आणि इग्रजानीं २३ नोव्हेबरला बसरा आणि २९ नोव्हेबरला कुर्ना घेतलें. एप्रिल—मे महिन्यांत तैग्रीस नदीवर आरमाराच्या पलीकडे आणि युफ्रेटीस नदीवर नासीरेच्या पलीकडे इग्रजानीं तुर्कांना पिटाळून लावलें. डिसेंबरच्या अखेरीस जानेवारीच्या प्रारम्भाला काकेशियस प्रातात सारिकामिश येथें मोठया तुर्की सेनेचा पराभव केला. फेब्रुवारीच्या तीन चार तारखेला तुर्कांनीं सुवेजच्या कालव्यावर हल्ले चढविले, पण त्यांत त्याची पूर्ण फजिती झाली. सुवेजच्या बाजूला, काकेशियस प्रांतांत, व इराणात तुर्कांनीं जी टुरटूर चालविली

होती ती कायमची बन्द पडावी म्हणून मार्च महिन्यांत इंग्रजी आरमारानें डार्डा-नेलिसवर हल्ला केला. डार्डानेलिसच्या अरुंद नरडींत शिरण्याच्या जवळ जवळ इंग्रज व फ्रेंच लढाऊ जहाजांची प्रगति झाली होती, पण पाणबुड्या बोटी, टार्पेडो व सुरुंग यांच्या माऱ्यानें चारपांच लढाऊ जहाजें बुडल्यामुळें नुसत्या आरमारा-कडून डार्डानेलिसचें तोंड उघडण्याचा प्रयत्न सोडून देण्यात आला आणि एप्रिल तारीख चोवीस पंचवीसच्या सुमारास इंग्रजी सैन्य डार्डानेलिसच्या मुखाजवळील शेंड्यावर उतरविण्यांत आलें. ह्या शेंड्याजवळील आकिबाबा नांवाची महत्वाची टेकडी अर्धवट काबीज करण्यात चाळीस पन्नास हजार लोक मेले व जखमी झाले, आणि आकीबाबाचें डोकें गाठून पलीकडे उतरण्याच्या अगोदरच महायुद्धाचें पहिलें वर्ष संपलें.